

# पारमार्थिक शतकोटी

(भाग - २)

# अनुक्रमणिका

श्री गणेशाय नमः

# (१) नामाचे श्रेष्ठत्व

१) नाम मंगलात मंगल आहे.

**सकळ मंगळनिधी । श्री विठ्ठलाचे नाम आधी ॥ ज्ञान.**

२) नाम पवित्रात पवित्र आहे.

**नाम बरवया बरवंट । नाम पवित्र आणि चोखट ।**
**नाम स्मरे निलकंठ । निजसुखे निवाला ॥ ज्ञान.**

नाम कधी अपवित्र होत नाही. अपवित्राला पवित्र करण्याचे सामर्थ्य नामात आहे.

३) नाम बऱ्यात बरे आहे.

**नामा म्हणे तुझे अवघेचि बरवे । त्याहुनि बरवे नाम तुझे ॥ नाम.**

४) नाम खऱ्यात खरे आहे.

**सत्य साच खरे । नाम विठोबाचे बरे ॥ तु.म.**

५) नाम उत्तमात उत्तम आहे.

**आगळे हे सार उत्तमा उत्तम । ब्रह्मकर्मा नाम एक तुझे ॥ तु.म.**

**उत्तमा उत्तम । वाचे बोला पुरुषोत्तम ॥ तु.म.**

६) नाम सारात सार आहे.

**नाम साराचेहि सार । शरणांगत यमकिंकर ॥ तु.म.**

७) नाम गोडात गोड आहे.

**जिव्हे गोड तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिके पुढे ॥ तु.म.**

८) नाम मोठ्यात मोठे आहे. सगळ्यात आकाश मोठे आहे. पण नाम आकाशापेक्षा मोठे आहे.

**हा गा नामचि एक जयाचे । पहाता गगनहि दिसे टांचे ॥ ज्ञाने. ६/१११**

**ज्ञानदेव पुसे निवृतीसी चाड । गगनाहुनि वाढ नाम आहे ॥ ज्ञान.**

**अवघाचि आकार ग्रासियेला काळे । एकचि निराळे हरिचे नाम ॥ तु .म.**

९) नाम श्रेष्ठात श्रेष्ठ आहे.

**तुका म्हणे ऐसा आहे श्रेष्ठाचार । नाम हेचि सार विठोबाचे ॥ तु.म.**

१०) नाम चांगल्यात चांगले आहे.

**नाम चांगले चांगले । माझे कंठी राहो भले । कपिकुळ उध्दरिले । मुक्त केले राक्षसा ॥ तु.म.**

११) सर्वात मोठे पुण्य हवे असेल तर नाम गावे. पुण्यात पुण्य.

**पुण्य ऐसे काय रामनामा पुढे । काय ते बापुडे यज्ञ याग ॥ तु.म.**

**हरि मुखे म्हणा हरि मुखे म्हणा । पुण्याचि गणना कोण करी ॥ ज्ञान.**

१२) नामाचे हे सर्व विशेषत्व आहे. शिवाय नाम हे सर्वात सोपे अर्थात सोप्यात सोपे नामच आहे.

**तुका म्हणे सोपे आहे सर्वाहूनि । शहाणा तो धणी घेत असे ॥ तु.म.**

**चिंतन :** नामाचे चिंतन सतत केले तर जीव देव होतो. 'राम म्हणता रामची होईजे । पदी बैसोनि पदवी घेईजे ॥' तु.म. योग, याग, तप, दान, व्रत या सर्वांपेक्षा देवाचे नाम म्हणणे सोपे आहे. शिवाय काम करताना म्हणता येते. 'कामामध्यें काम । कांही म्हणा रामराम । जाईल भवश्रम । सुख होईल दुःखाचे ॥' तु.म. 'हरि मुखे म्हणा हरि मुखे म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥' ज्ञान.

व्यवहारात एखाद्या गोष्टीचा ध्यास लागला तर ती गोष्ट प्राप्त होते.

**दृष्टांत :** अमेरिकेचे पहिले अध्यक्ष जॉर्ज वॉशिंग्टन होऊन गेले. अमेरिका जेव्हा पारतंत्र्यात होती तेव्हा हे वॉशिंग्टन शाळेत शिपाई होते. शिपायाचे काम घंटा वाजविणे. शाळा भरताना घंटा, लघवीची सुट्टी व जेवणाची सुट्टी, शाळा सुटताना घंटा वाजविणे. पाच वेळा दिवसातून घंटा वाजवावी लागत होती. पण घंटा वाजविताना हे म्हणायचे, 'घण घण घण घण, अमेरिकेचा अध्यक्ष वॉशिंग्टन !' शिपायाचे काम करता करता यांनी प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर माध्यमिक व उच्च शिक्षण घेऊन हे वकील झाले. राजकारणात पडले व एक दिवस वॉशिंग्टन अमेरिकेचे अध्यक्ष झाले. यांच्याबद्दल अमेरिकेत अतिशय आदर आहे. बाकीच्या शहरांचा विकास झाला पण अमेरिकेची राजधानी मात्र वॉशिंग्टनच आहे. 'घण घण घण घण, अमेरिकेचा अध्यक्ष वॉशिंग्टन' असे म्हणून जर वॉशिंग्टन अमेरिकेचे अध्यक्ष होतात तर राम म्हणून राम का होणार नाही ?'

**दृष्टांत :** अमेरिकेच्या घटनेपेक्षा भारतात अशी घटना घडली आहे. पं. जवाहरलाल नेहरूंच्या मंत्रिमंडळात असताना मोरारजी देसाई म्हणाले, 'मी एक दिवस तरी भारताचा पंतप्रधान होईन.' काही काळाने जनता पार्टीचे राज्य आले व मोरारजी देसाई भारताचे काही काळ का होईना पंतप्रधान झाले. जसा साधक नामाची माळ जपतो तशी त्यांनी पंतप्रधान, पंतप्रधान ही माळ जपली असावी. जर पंतप्रधान पंतप्रधान म्हणून मोरारजी देसाई पंतप्रधान होतात तर आपण विठ्ठल विठ्ठल म्हणून विठ्ठल का होणार नाही ? 'रंगला या रंगी । तुका विठ्ठल सर्वांगी ॥' तु.म. शिवाय जीवाचा व देवाचा कायमचा संबंध आहे. नामाच्या ध्यासामुळे जीव प्रत्यक्ष देव होतो.



# (२) तारक नाम

**कथा :** रामप्रभुने लंकेत जाण्याकरिता समुद्रावर सेतू बांधण्याचे ठरविले. नल-निल वानरांना ऋषींचे वरदान असल्यामुळे त्यांच्या हाताने पाण्यावर दगड तरत होते. पण त्यांना अभिमान झाला. थोडा तयार झालेला सेतू बुडाला . हनुमंताने सांगितले, ''एका दगडावर 'रा' लिहा दुसऱ्यावर 'म' लिहा. दगड तरतील.'' रामनामाने दगड तरायला लागले. अर्धा सेतू तयार झाला. लंकेत वाऱ्यासारखी बातमी पसरली. राक्षसांना समजले रामाच्या ताब्यात दगड आहेत. दगडांचा वर्षाव जर लंकेवर झाला तर राम लंका सहज जिंकतील व राक्षसांचा नायनाट करतील. सर्वत्र घबराट पसरली. सर्व सैन्याचे धैर्य खचले. ही बातमी रावणाच्या कानावर गेली. रावणाने विचार केला. सैन्याचे धैर्य खचले तर युद्धात पराभव अटळ आहे. रावणाने समुद्रकाठी सर्व सैन्याची सभा घेतली. रावण म्हणाला, ''सागरावर दगड तारण्याची शक्ती माझ्याकडेसुद्धा आहे. दगड आणा.'' दहा राक्षसांनी एक मोठा दगड आणला, रावणाकडे दिला. रावणाने दगड तोंडाजवळ घेऊन काही तरी पुटपुटल्यासारखे केले व सर्वांच्या समोर सागरात दगड सोडला. दगड तरायला लागला. सर्व राक्षस खुश झाले. रावण म्हणाला, ''शंका असेल तर पन्नास राक्षस त्यावर जाऊन बसा. दगड बुडणार नाही.'' पन्नास राक्षस बसले पण दगड बुडला नाही. राक्षसांनी रावणाचा जयजयकार केला. मिरवणूक काढली. रावण म्हणाला, ''आपण राक्षस आहोत. ते मानव व माकडे, आम्हास काय करतील ?'' सर्व आपापल्या घरी गेले. रावण शयनगृहात शिरला. मंदोदरी म्हणाली, ''आज वेगळी बातमी कानावर आली आहे. आपण दगड टाकला तो सागरावर तरतो आहे.'' रावण म्हणाला, ''खरे आहे. शंका असल्यास सकाळी पाहून ये.'' मंदोदरी म्हणाली, ''रामनामाने दगड तरतील हे मी मानते पण आपण समुद्रात दगड टाकून तो तरतो आहे हे ऐकून मोठे आश्चर्य वाटले.'' रावण रागावला. म्हणाला, ''मला सभेत त्रास झाला आहे. गप्प झोपू दे.'' मंदोदरी म्हणाली, ''जो पर्यंत तुम्ही गुह्य सांगणार नाही तो पर्यंत तुम्हास झोपू देणार नाही.'' बालहट्ट, स्त्रीहट्ट, योगीहट्ट याप्रमाणे रावण म्हणाला, ''फक्त तुलाच सांगतो, कोणास कळता कामा नये. राक्षसांचे धैर्य जागृत करण्याकरिता मी थोडे 'राजकारण' केले. राक्षसांना दगड आणण्यास सांगितले व दगडास शपथ घातली, बुडालास तर रामनामाची शपथ आहे. दगड तरला. ही माझी शक्ती नाही, ही रामनामाची शक्ती आहे. रामात जी शक्ती नाही ती रामनामात आहे.''

**मी तो अल्पमती हीन । काय वर्णू तुमचे गुण ।**
**उदकी तारिले पाषाण । हे महिमान नामाचे ॥ तु.म.**

जे दगड स्वतः बुडतात, दुसऱ्यास बुडवितात ते दगड तरले व वानरांना, राम सैन्यास समुद्रातून तारले हे सामर्थ्य रामनामामध्ये आहे.

**नव्हे समुद्राचे लक्षण । नव्हे पाषाणाचा गुण ।**
**नव्हे वानरी वरदान । रामनाम प्रतापे ॥ भा.रामायण ॥ नाथ**

त्रेता युगात रामाने सागरावर सेतू बांधला. या कलियुगात दगडावर राम लिहून नदीवर अथवा समुद्रावर सेतू तयार होईल का ? याचे उत्तर नाही असेच द्यावे लागेल. कारण त्यावेळी रामाच्या दृष्टीने हे सर्व घडले असे नाथ महाराज सांगतात. आता तशी दृष्टी राहिली नाही.

**श्रीराम प्रताप दृष्टी । शिळा तरती सागरापोटी ।**
**की वसिष्ठ वचनासाठी । तपे शाटी रविमंडळी ॥ १/१०८ नाथ.**

तुकाराम महाराजांनी मात्र हा प्रताप केला.

**मनुष्याकृती राघवे ख्याति केली । शिळा शिखरे सागरी तारियेली ।**
**तुका स्वामी हा पूर्ण ब्रह्मप्रकाशी । जळी रक्षिले निर्जिवा कागदासी ॥ निळो.**

★★★★★

## (३) भगवंताचे रूप

परमात्म्याची दोन रुपे आहेत. मूर्त व अमूर्त, सगुण व निर्गुण. निर्गुण परमात्मा सगुण होतो. ज्याप्रमाणे पाण्याचे बर्फ होते. 'जो गुणरहित सगुण सोई कैसे । जल हिम उपल बिलग नही जैसे ॥' तुळशी. 'अव्यक्त हे आकारले । रुपा आले गुणवंत ॥' तु.म.

रुपक करायचे ठरले तर निर्गुण परमात्मा म्हणजे दूध. या दुधात विरजण घातले तर त्याचे दह्यात रूपांतर होते. अर्थात निर्गुण देवाने मायेचा आधार घेऊन हे जग तो स्वतःच नटला आहे. माऊली सांगते,

**माझेया विस्तारलेपणाचेनि नावे । हे जगचि नोहे आघवे ।**
**जैसे दूध मुराले स्वभावे । तरि तेचि दही ॥ ज्ञाने.९/६४**

अथवा

**का बीजचि जाहले तरू । अथवा भांगारचि अलंकारू ।**
**तैसा मज एकाचा विस्तारू । ते हे जग ॥ ज्ञाने.९/६५**

वास्तविक बीजात काही दिसत नाही. पण त्याने जमिनीचा, पाण्याचा, प्रकाशाचा आधार घेतला तर त्याचे खोड, डहाळ्या, पाने, फुले व फळामधे रूपांतर होते. तद्वत देवाने मायेच्या साहाय्याने चौऱ्याऐंशी लक्ष योनी, चार खाणी, तीन गुणी, जलचर, भूचर, वनचर, खेचर अशी सर्व सृष्टी

निर्माण केली. दही झाल्यानंतर ते जास्त टिकत नाही. त्याचे मंथन झाले. प्रसंग पडल्यानंतर हाच परमात्मा अनेक अवतार घेतो अर्थात हे देवाचे रूप आहे लोण्याचे. हे अवतार अनेक कामाकरिता आहेत पण मुख्य भक्तांकरिता आहेत. ''दो जळचर, दो भूचर, दो विप्र दो राजा । बौद्ध कलंकी अवतार लिया भक्त जनोंके काजा ॥ आम्हासाठी अवतार । मत्स्यकूर्मादि सूकर ॥'' तु.म. पण शेवटी लोणी तापविल्यानंतर जे शेवटचे सार उरते त्यास तूप म्हणतात. तूप अवतार हा पांडुरंगाचा, विठोबाचा आहे. बाकीचे अवतार यापासून निर्माण होतात. हे सर्व रूपाचे सार आहे.

**अनंत रूपाचे हे सार । अनंत तीर्थाचे माहेर । अनंता अनंत अपार ।**
**तो हा कटीकर विटे उभा ॥ धन्य धन्य पांडुरंग ॥ नाम.**

सर्व रूपात सुंदर, गोजिरे असे रूप पांडुरंगाचे होय. पांडुरंग या शब्दाची व्याख्या वल्लभाचार्य करतात - श्रीकृष्ण परमात्मा गोकुळी असताना संध्याकाळी गोरज मुहूर्तावर घरी येताना त्याच्या चेहऱ्यावर गाईच्या खुराची पांढरट माती पसरलेली असायची. म्हणून यास पांडु + रंग = पांडुरंग हे नाव पडले. मुखमंडितरेणुं चारितधेनुं वादितवेणुं मधुरसुरम् ॥ वल्लभाचार्य (नंदकुमाराष्टक). हे नाम विष्णू सहस्रनामामध्ये नाही. सर्व भक्तांना हेच रूप फार आवडते. 'आवडे हे रुप गोजीरे सगुण । पाहता लोचन सुखावले' 'दावी रूप मज गोपिका रमणा । ठेवीन चरणांवरी माथां ॥' तु.म.

हे रूप पाहिले तर मन स्थिर होते. 'रूपी जडले लोचन । पायी स्थिरावले मन ॥' तु.म.

हा निलमणी आहे. रामाचा रंग निळा आहे.

**ध्यात्वा नीलोत्पलश्यामं रामं राजीवलोचनम ।**
**जानकी लक्ष्मणोपेतं जटामुगुटमण्डितम् ॥ रामरक्षा.**

श्रीकृष्णाचा रंगही निळाच आहे. माऊलींनी तीन उपमा दिल्या आहेत.

**कैसें नीलोत्पलातें रांवित । आकाशाही रंगु लावित ।**
**तेजाची वोज दावित । इंद्रनीळा ॥ ज्ञाने.११/६००**

**अर्थ :** श्रीकृष्णाचा हा निळा रंग निळ्या कमळास रंगविणारा, आकाशास रंग देणारा किंबहुना इंद्रनील नावाच्या रत्नाला शुद्धता (निळ्या रंगाचे पाणी) देणारा आहे. विठोबाचा रंगसुद्धा निळा आहे.

'पंढरपुरीचा निळा लावण्याचा पुतळा । विठू देखियेला डोळा बाईयानो ॥' ज्ञान. देवाने आपला रंग बदललेला नाही (पक्षांतर कधीच नाही.) रामाच्या, कृष्णाच्या रूपास शिवासह सर्व जीव भुलतात. 'मैं भुली घर जानी बाट । गोरस बेचने आयी हाट ॥ कान्हा रे मनमोहन लाल । सबहि बिसरु देखे गोपाल ॥' तु.म. याच्या रूपाचा डोळ्यास कधी वीट येत नाही. डोळे तेजस्वी होतात. म्हणून तुकोबाराय म्हणतात - 'आता दृष्टी पुढे ऐसाची तू राहे । जो मी तुज पाहे पांडुरंगा ॥' यास पाहिल्यानंतर देहभाव विसरला जातो.

**दृष्टांत :** एकदा विष्णू सत्यलोकात आले. सर्वजण उठून उभे राहिले पण सनकादिक चार भाऊ उठलेच नाहीत. हे ब्रह्मदेवाचे मानसपुत्र. ब्रह्मदेवास राग आला. माझ्या मुलांनी माझ्या पित्याचा अपमान करावा ? ते रागावले व विचारले, ''परमात्मा आल्यानंतर सर्व उठून उभे राहिले. तुम्हाला काय पद्धत आहे की नाही ?'' तेव्हा सनकादिक म्हणाले, ''तात, देवाचे रूप पाहिल्यानंतर आम्ही स्वतःस इतके विसरून गेलो की आम्ही बसलेले आहोत की उभे आहोत याचे भानच उरले नाही. क्षमा करा.'' 'देहभाव हरपला । तुज पाहता विठ्ठला ॥' तु.म.

**दृष्टांत :** राम प्रभूचे दर्शन घेण्याकरिता सर्व ऋषी आले होते. त्यांना अगोदरच बातमी समजली होती की रामाच्या स्पर्शाने शीळा स्त्री झाली. आपणास पण एक स्त्री मिळावी म्हणून प्रत्येकजण दगड घेऊन आला होता. पण जेव्हा त्यांनी रामाचे रूप पाहिले, त्यांची वासनाच बदलली. ते म्हणाले, 'आम्हास आपली पत्नी करा.' राम म्हणाले, 'हा मर्यादा पुरुषोत्तम अवतार आहे, पुढच्या अवतारात आपली इच्छा पूर्ण होईल.' श्रीकृष्ण अवतारात ऋषी गवळणी झाले पण सुना, श्रुती रूपी गौळणी या लेकी व गोलोकातील गौळणी सासवा झाल्या. 'कोणी सुना कोणी लेकी । कोणी एक सतंता ॥' तु.म.

**दृष्टांत :** राम प्रभूंनी सागरात सेतू बांधावयास घेतला. सर्व वानर दगड आणू लागले. ते रामनामाने तरंगल्यामुळे सेतू तयार होऊ लागला, पण चिंचोळा ! सर्व वानरांना घाई झाली होती. रस्ता मोठा व्हावा या उद्देशाने राम प्रभू रस्त्यावरून चालू लागले. रस्त्याच्या दोन बाजूस मोठ-मोठे मासे प्रभूंना पहाण्याकरिता आले, अर्थात रस्ता तीन पदरी झाला. रस्ता रुंद झाल्यामुळे माशांवरून माकडे जाऊ लागली. जांबुवंत म्हणाला, ''प्रभू, मासे व माकडे - दोघेही चंचल. कसे होणार ? सर्व वानर बुडतील.'' प्रभू म्हणाले, ''जांबुवंत, काळजी करण्याचे कारण नाही. माझ्या रूपामुळे मासे तटस्थ राहतील, देहभान विसरतील, त्यांचे शरीर दगडासारखे होईल व वानर सहज पलिकडे जातील.'' असा प्रभूच्या रूपाचा प्रभाव आहे. श्रीकृष्णाच्या दर्शनाने गौळणीतर सर्वकाही विसरत होत्या. त्यांना काळाचा, देहाचा, कामाचा, खाण्या-पिण्याचासुद्धा विसर पडत होता. 'कृष्णाचिया सुखे भूक नाही तहान । सदा समाधान सकळाचे' ॥१॥ 'कळलेचि नाही झाले किती दिस । बाहेरील वास विसरली' ॥२॥ 'विसर कामाचा तुका म्हणे झाला । उद्वेग राहिला जावे यावे' ॥३॥

**देवाच्या रूपाचे तीन प्रकार :**

१) **स्वयंरूप** - दुसऱ्या कोणत्याही वस्तूची अपेक्षा न धरता जे रूप स्वतः आविर्भूत होते त्यास स्वयंरूप म्हणतात. ज्याप्रमाणे पांडुरंग.

'उगवले बिंब अद्वैत 'स्वयंभ' । नाम हे सुलभ विठ्ठल राज ॥' निवृत्तीनाथ

२) **तदेकात्मरूप -** हे स्वयंरूपाशी अभिन्न असते पण आकार व चरित्र वेगळे असते. जसे मत्स्य, कच्छ, नृसिंह अवतार.

३) **आवेश रूप -** ज्ञान, शक्ती इत्यादी कलांनी ज्या ठिकाणी आविष्ट झाल्यासारख्या वाटतात ते महात्मे आवेश रूप होत. उदा. नारद, सनकादिक.

देवाचे दर्शन सामान्य जनास चित्रात अथवा मूर्तीत होते, साधकास स्वप्नात होते, सिद्धास हृदयात होते व संतांना देव प्रत्यक्ष दर्शन देतो.

★★★★★

# (४) भगवंताचे गुण

देवाचे म्हणजे श्रीकृष्णाचे अनंत गुण आहेत. माऊली म्हणते तो गुणांचा सागर आहे.

**ऐसे भक्तचकोरचंद्रे । तेथ त्रिभुवनैकनरेंद्रे ।**
**बोलिले गुण समुद्रे । संजयो म्हणे ॥ ज्ञाने.६/४८६**

तथापि ज्ञानोबा-तुकोबांनी सहा गुणांना महत्त्व दिले आहे. त्यांना गुणवर्य म्हटले आहे. जसे गुरू वेगळे व गुरुवर्य वेगळे.

**आइका यशश्री औदार्य । ज्ञान वैराग्य ऐश्वर्य ।**
**हे साही गुणवर्य । वसती जेथ ॥ ज्ञाने.६/३७**

'षड्गुण ऐश्वर्य संपन्न । एक भगवंत जाण ॥' तु.म. हे सहा गुण ज्यांच्याकडे असतात त्यांना भगवान म्हणतात. देवाच्या गुणांचे वर्णन केले तर आपली वाचा पवित्र होते. 'गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥' तु.म. 'करावे कीर्तन । मुखी गावे हरिचे गुण ॥' तु.म.

**कैसे माझ्या गुणी धाले । देशकाळाते विसरले ।**
**कीर्तने सुखी झाले । आपणपांचि ॥ ज्ञाने ९/२०९**

याचे गुण गायले तरी तृप्ती होत नाही. 'धणी न पुरे गुण गाता । रूप दृष्टी न्याहाळिता ॥' तु.म. श्रीकृष्णाच्या सुंदर रुपाला हे सहा गुणरूपी गोंडे आहेत. बाळाच्या टकुच्यास (टोपी) गोंडे असतील तर बाळ सुंदर, छान दिसते. 'कान्होबा तुझी घोंगडी चांगली चांगली । आम्हासी कां दिली वांगुली रे । स्वगत सच्चिदानंद मिळोनि शुद्ध सत्व गुण विनली रे । षड्गुण गोंडे रत्न जडीत तुज श्याम सुंदरा शोभली रे ॥' ज्ञान. वास्तविक याचे गुण वर्णन करणे कठीण आहे. पुष्पदंत ऋषींच्या शिवमहिम्न स्तोत्रातील श्लोक असा आहे.

**असितगिरिसमं स्यात्कज्जलं सिंधुपात्रे ।**
**सुरतरुवरशाखा लेखिनी पत्रमुर्वी ।**
**लिखति यदि गृहीत्वा शारदा सर्वकालं ।**
**तदपि तव गुणानामीश पारं न याति ॥**

**अर्थ** - सर्व पृथ्वीचा कागद केला, डोंगर टाकून समुद्राची शाई बनविली, कल्पतरूची लेखणी केली, प्रत्यक्ष शारदा सर्वकाळ लिहायला बसली तरी देवा तुझ्या गुणांचा पार लागत नाही. एवढ्या मोठ्या श्लोकाचे तु.म. अति कमी शब्दात भाषांतर करतात. 'तुका म्हणे मही । पत्र सिंधु न पुरे शाई ॥' थोडक्यात याच्या गुणांचे वर्णन असे आहे.

१) **यश** - परमात्मा कधीही अपयशी ठरत नाही. माऊली म्हणते यश या एका गुणाचे वर्णन वेद करू शकला नाही.

**प्रणवाचिये पेठे । जाहलें शब्दब्रह्म माजिठें ।**
**तें जयाचिया यशा धाकुटें । वेदू न पुरे ॥ ज्ञाने.६/१०९**

'रामो राजमणी सदा विजयते । रामं रमेशं भजे ॥' रामरक्षा. श्रीकृष्णांनी दोन वेळा अपयश घेतले आहे. कौरव-पांडवांची शिष्टाई सफल केली नाही व कालयवनांचा मृत्यू मुचकुंद राजाच्या दृष्टीमुळे होणार असल्यामुळे रणांगणातून पळाले म्हणून त्यांचे नाव रणछोड पडले, हे अपयश घेतले आहे. आले नाही. आपल्या जीवनात क्वचितच यश नाही तर अपयश ठरलेले असते. मात्र भगवंताचे नावच यशवंत आहे.

२) **श्री** - लक्ष्मी ही परमात्म्याची दासी आहे. सर्व जग लक्ष्मीकरिता धावते आहे. पण लक्ष्मी देवाच्या पायाची सेवा करते. 'पाय लक्ष्मीच्या हाती । तिशी यावे काकुलती ॥' तु.म.

३) **औदार्य** - श्रीकृष्ण हा उदार, स्वतंत्र व श्रीमंत आहे.

**तुझे औदार्य जाणों स्वतंत्र । देता न म्हणसी पात्रापात्र ।**
**पै कैवल्य ऐसे पवित्र । वैरियाही दिधले ॥ ज्ञाने.११/९८**

देवास मारण्याकरिता आलेल्या पुतनेस मोक्ष, सभेमध्ये शिव्या दिणाऱ्या शिशुपालास मुक्ती, ध्रुवबाळास अढळपद, सुदाम्यास सुवर्ण नगरी. परमात्मा पात्रतेपेक्षा हजारपट देतो. याच्यासारखा उदार कोणी नाही.

४) **ज्ञान** - परमात्मा सर्वज्ञच नाही तर सर्वज्ञांचा बाप आहे. सर्व ज्ञान याच्यापासून निर्माण होते.

**ऐसे सर्व ज्ञानाचा बापू । जो श्रीकृष्ण ज्ञानदिपु ।**
**तो म्हणतसे सकृपु । ऐके राया ॥ ज्ञाने.४/२१**

५) **वैराग्य** - याच्यासारखा वैराग्यवान कोणी नाही. जीव ओवाळून टाकणाऱ्या गोपिका, पण त्यांचा त्याग केला. मथुरा जवळ असून श्रीकृष्ण गोकुळात गेले नाहीत. मथुरेचा त्याग करून द्वारकेत आले. परत मथुरेत गेले नाहीत. आपली एखाद्याशी ओळख झाली तर त्यास कंटाळा येईपर्यंत त्याच्याकडे जातो.

६) **ऐश्वर्य** - याच्यासारखे ऐश्वर्य कोणाकडे नाही. भगवान वैभवसंपन्न आहे. हे देवाचे सहा गुण आहेत. पण परमात्मा इतका गुणवान आहे की हे सर्व गुण आपल्या भक्तांना देतो. आपण गुण उधळतो. निळोबाराय एका अभंगात सांगतात याने सहा भक्तांना सहा गुण दिले. 'यशे थोरविला मारुती । बिभीषण केला लंकापती । औदार्य देऊनि कर्णा हाती । किर्ती दिगंती मिरविली ॥ ज्ञाने उपदेशिला चतुरानन । ऐश्वर्ये वाढविला अर्जुन । वैराग्य शुकाते बोधून । ब्रह्म सनातन पावविला ॥'

परमात्मा मूळचा निर्गुण आहे पण भक्तांकरिता तो गुणवान झाला. किंबहुना त्यास निर्गुणाचा वीट आला व वीटेवर सगुण झाला. 'विसरोनि देवपणा । उभा पंढरीचा राणा । विटोनि निर्गुणा । रूप धरिले गोजिरे ॥' तु.म. 'गुणा आला विटेवरी । पीतांबरधारी सुंदर जो ॥' म्हणून याचे गुण गा व तृप्त व्हा.

देवाचे अनंत गुण आहेत. त्यापैकी सहा गुणवर्य आहेत. संतांचे गीतेत २६ गुण सांगितले आहेत. यासच दैवी संपत्ती म्हणतात. गीता १६/१ ते ३ अध्याय. मायेचे मात्र तीन गुण आहेत. सत्व, रज, तम. यामध्ये कमी अधिक प्रमाण होत असते. पारमार्थिक माणसाने तम कमी करून रज वाढवावा. पुढे पुढे रजोगुण कमी करून सत्वगुण वाढवावा. 'तुका म्हणे येथे सत्वाचे कारण । करावा परमार्थ अहर्निशी ॥' शेवटी याचाही त्याग करून शुद्धसत्व गुणी व्हावे. पुढे तर गुणातीत व्हावे.

**दृष्टांत** - एक शेतकरी होता. त्याचे उसाचे शेत होते. शेतकरी दुपारी घरी जेवण्यास जात असे. परत आल्यानंतर त्यास जाणवत होते ऊस चोरीस जातात. बरेच दिवस असे चालले होते. एक दिवस शेतकरी अचानक घरी जाता जाता अर्ध्या रस्त्यातून शेताकडे आला. तीन चोर ऊस चोरून मोळी बांधत होते. त्यात एक ब्राह्मण, एक क्षत्रिय व एक वैश्य होता. तिघांना एकदम मारू शकत नव्हता. ब्राह्मणास नमस्कार केला. क्षत्रियाकडे आदराने पाहिले व वैश्यास एक कानाखाली वाजविली. वैश्य पळून गेला. दोघे राहिले. त्यास वाटले यांना पण शिक्षा झाली पाहिजे. क्षत्रियास म्हणाला, 'तुझ्या बापाचे शेत आहे का ?' तोही निघून गेला. ब्राह्मणास म्हणाला, 'आपल्यासारख्या 'भूदेवास' हे काम शोभते का ?' तो खाली मान घालून निघून गेला. शेतकऱ्याने चोरांपासून उसाचे संरक्षण केले. आपल्या देहात पण तीन चोर आहेत. सत्व, रज, तम - यांनापण क्रमा क्रमाने हाकलून दिले पाहिजे. संतांना या गुणांची बाधा नसते. 'सत्व रज तम बाधा । नाही हरिभक्तांसी कदा ॥' तु.म.



# (५) भगवंताचे रूप-गुण

**कथा :** एकदा भोज राजा कवी कालिदासांबरोबर वनात विहार करण्यासाठी जातात. भोज राजा विनोदाने म्हणतात, ''कालिदास, आपणास देवाने बुद्धीमत्ता दिली पण रूप दिले नाही.'' कालिदास काहीच बोलत नाहीत. एक दिवस उन्हाळ्यात भोज राजा कालिदासाच्या घरी येतात. व पिण्यास पाणी मागतात. कालिदासास राजाचा टोमणा लक्षात असतो. कालिदास म्हणतात, ''सोन्याच्या तांब्यातील साधारण गरम पाणी देऊ ? का, मडक्यातील थंड पाणी देऊ ?'' भोज राजा म्हणतात, ''मडक्यातील थंड पाणी द्या.'' भोज राजा पाणी पिऊन शांत होतात. कालिदास विचारतात, ''सोन्याच्या भांड्यातील पाणी आपण का मागितले नाही ?'', राजा म्हणतात ''ते गरम पाणी पिऊन तहान शांत होणार नाही. मडक्यातील थंड पाणीच तहान शांत करते''. कालिदास म्हणातात, ''आपण रूप पाहिले नाही, गुण पाहिले.'' माणसाचे रूप महत्त्वाचे नाही गुण महत्त्वाचे आहेत. तुकोबारायांनी आपल्यापुढे निवड ठेवली आहे. 'सोनियाचा कळस । माजी भरिला सुरारस' ॥१॥ 'काय करावे प्रमाण । तुम्ही सांगा संतजन' ॥२॥ 'मृत्तिकेचा घट । माजी अमृताचा साठ' ॥३॥ 'तुका म्हणे हित । ते मज सांगावे त्वरित' ॥४॥

यावरून एक कोटी तयार होते.

१) रूप वाईट - गुण वाईट २) रूप वाईट - गुण चांगले ३) रूप चांगले - गुण वाईट ४) रूप चांगले - गुण चांगले. या कोटीवरून रामायणातील चार स्त्रिया समोर येतात.

**१) त्राटिका** - रामप्रभूने जिचा वध केला. ही दिसावयास राक्षसीणच होती व यज्ञांचा विध्वंस करीत असे. रूपही वाईट व गुणही वाईट.

**२) त्रिजटा** - ही बिभीषणाची मुलगी. (एका रामायणात बहीण) ही सीतेच्या सेवेस होती पण रामाची भक्त झाली. दिसायला राक्षसीण पण गुणाने भक्त - रूप वाईट पण गुण चांगले.

**३) कैकयी** - दिसायला सुंदर, दशरथाची आवडती राणी. पण एका वराने रामास वनवास त्यामुळे दशरथास स्वर्गवास. शेवटी गुण उधळले. सर्वांना ताप झाला.

**४) सीता** - रूपवानही होती व गुणवानही होती.

असे म्हणतात सीतेस रामाने साडे-तेरा वर्षे झोपलेली पाहिली नाही. मग सीता झोपत नव्हती का ? झोपत होती पण राम झोपल्यानंतर व राम उठायच्या अगोदर सीता उठत होती. रामास हे माहीत होते. तिला दिवसा विश्रांती मिळावी म्हणून प्रभू मुद्दाम बाहेर जात होते. त्यावेळी सीतेस थोडी विश्रांती मिळत होती. रामाने सीतेस कधी झोपलेली पाहिली नाही पण काहींच्या नशिबी बायको कधी जागी दिसत नाही. कामावर जाताना झोपलेली व कामावरून आल्यानंतर पण झोपलेली असते.

ज्ञानोबारायांनी साहित्य कसे असावे हे सांगताना स्त्रियांची चार लक्षणे सांगितली आहेत -

**जेथ साहित्य आणि शांती । हे रेखा दिसे बोलती ।**
**जैसी लावण्यगुणकुलवती । आणि पतिव्रता ॥ ज्ञाने.४/२१८**

वाङ्मय असे असावे असे माऊलीचे मत आहे - जे तनाचे (रूप), मनाचे (गुण), बुद्धीचे (कुळ), आत्म्याचे (पातिव्रत्य) कल्याण करते.

माणसाने रूपाकडे पाहू नये. गुणांकडे पहावे. मोर दिसायला जगातील सुंदर पक्षी पण खातो मात्र साप - 'तुलसी देखि सुवेषु भूलही मूढ न चतुर नर । सुंदर केकिहि पेखु बचन सुधा सम असन अहिं ॥'



## (६) सम (विठोबा)

**समचरणसरोजं सांद्रनीलांबुदाभम् । जघननिहितपाणी मंडनं मंडनानाम् ॥**

**तरुणतुलशीमाला कंधरं कंजनेत्रम् । सदयधवलहासं विठ्ठलं चिंतयामि ॥**

**अर्थ :** ज्यांचे चरणकमल समान आहेत, ज्यांचे शरीर सजल निळ्या आकाशासारखे आहे, ज्यांनी कमरेवर हात ठेवले आहेत (जगाच्या हिताकरिता), जे सर्व मंडणांचे मंडण आहेत, ज्यांच्या गळ्यात नेहमी प्रफुल्लित असणारी तुळशीमाला आहे, ज्याचे नेत्र कमलासारखे आहेत, ज्यांचे हास्य दयारूप व शुभ्र आहे अशा विठ्ठलाचे चिंतन असो.

विठोबा हा सर्व बाबतीत सम आहे. पण सर्व संतांनी त्याचे पाय सम आहेत असे विशेषत्त्वाने वर्णन केले आहे.

**अ) समचरण दृष्टी विटेवरी साजिरी । तेथे माझी हरी वृत्ति राहो ॥ तु.म.**

**विटेवरी ज्याची पाऊले समान । तोचि एक दानशूर दाता ॥ तु.म.**

मुख्य दहा अवतारांपैकी सुंदर आहेत - राम, कृष्ण, हरी (विठ्ठल) पण त्यांच्या पायांचा विचार केल्यास रामाचे पाय धनुष्यबाण मारताना मागे पुढे होतात. धनुर्धारी रामाचे पाय मागे-पुढे आहेत. कृष्ण हा सर्व बाबतीत बाका बिहारीच आहे. त्याचे पायपण वाकडे आहेत - 'देहुडा चरणी वाजवितो वेणू । गोपिका रमणु स्वामी माझा ॥' नाम. 'त्रिभंगी देहुडा ठाण मांडुनिया माये । कल्पद्रुमातळी वेणू वाजवितु आहे ॥' ज्ञान. पण विठोबाचे पाय मात्र समानच आहेत. पंढरपूरचा विठोबा सर्वांकरिता खुला आहे. सर्व पंथांचे, वर्णांचे, धर्मांचे व आश्रमातील लोक याच्या पायाचे दर्शन घेऊ शकतात. हा

उघडा उभा आहे. वारकरी सांप्रदायाचे एक वैशिष्ट्य आहे - देव उघडा, मंत्र उघडा, गुरू उघडा व उपदेश उघडा आहे.

१) देव : **नेणो ब्रह्म मार्ग चुकले । 'उघडे' पंढरपुरासी आले ।**
**भक्त पुंडलिके देखिले । उभे केले विटेवरी ॥ ज्ञान.**

**असे 'उघडा' हा विटेवरी उभा । धरूनि कटसूत्र हे भक्तिलोभा ।**
**पुढे वाट दावी भवसागराची । विठो माऊली सिद्ध हे साधकांची ॥ तु.म.**

२) मंत्र : **उघडा मंत्र जाणा रामकृष्ण म्हणा । तुटती यातना गर्भवास ॥ तु.म.**

तुकाराम महाराज म्हणतात कानफुंक्याचे येथे काही काम नाही.

**सुलभ हे केले सकळा जीवन । फुंकावेचि कान नलगे काही ॥ तु.म.**

३) गुरू : **'उघडे' परब्रह्म श्रीगुरूची मूर्ति । पुरविती आर्ती शिष्याचिया ॥ ज्ञान.**

४) उपदेश : **तुका म्हणे 'उघडे' आहे हित घात । जयाचें उचित तैसें करा ॥ तु.म.**

**कथा -** माझा एक मित्र तिरुपतीचा वारकरी आहे. त्याच्या मुखातून ऐकलेली कथा अशी आहे. तिरुपतीचे लांबून दर्शन घेतात. तिरुपती बालाजीच्या पायाला स्पर्श करण्याचा अधिकार फक्त ब्राह्मणांना आहे. बालाजीपण विष्णूचेच अवतार. एका क्षत्रियाने तिथल्या ब्राह्मणांना कांही रकमेचे आमीष दाखवून बालाजींच्या पायाचा स्पर्श मागितला. ब्राह्मणांनी कबूल केले. (लोभामुळे) पण बालाजी सर्व ब्राह्मणांच्या स्वप्नात गेले व सांगितले असे करू नका. ही प्रथा मोडू नका. संकटे येतील. माझ्या पायाचेच दर्शन हवे असल्यास त्या क्षत्रियास पंढरपुरास पाठवावे. मी तिथे सर्वांकरीता उघडा उभा आहे.

ब) विठोबाचे हात सम आहेत. ते कमरेवर ठेवले आहेत. याचे अनेक अर्थ होतात. एखादा माणूस अवघड काम करून दमला म्हणजे दोन हात कमरेवर ठेवून उभा राहतो. तसा विठ्ठल मागील आठ अवतारात भक्तांकरिता अनेक कष्ट सोसून आता कमरेवर हात ठेवून उभा आहे. असे तु.म. म्हणतात. 'दोन्ही हात ठेवुनि कटी । उभा भीवरेच्या तटी । कष्टलासी साठी । भक्तिकाजे विठ्ठल ॥' अथवा एखादी आई शाळेतून येणाऱ्या मुलाची आतुरतेने वाट पाहत अशीच कमरेवर हात ठेवून उभी असते. अथवा एखाद्या बाईचा पती काम करून येताना उशीर झाला तर ती दारात वाट पहात अशाच प्रकारे उभी राहते. तद्वत विठोबा हा भक्तांची वाट पहात पंढरपुरास उभा आहे - 'वाट पाहे उभा भेटीची आवडी । कृपाळू तातडी उतावीळ ॥' तु.म. 'सच्चिदानंदघन । पंढरीये परिपूर्ण । कर ठेवुनी जघन । वाट पाहे भक्तांची ॥' ज्ञान.

मात्र शंकराचार्य म्हणतात, माझ्याकडे आलात तर 'भवसागर' फक्त कमरेएवढाच आहे. हे सांगण्याकरिता विठोबाने कमरेवर हात ठेवले आहेत.

**प्रमाणं भवाब्धेरिदं मामकानां । नितंबः कराभ्यां धृतो येन तस्मात् ॥**
**विधातुर्वसत्यै धृतो नाभिकोशः । परब्रह्मलिंगं भजे पाण्डुरंगम् ॥**

क) विठोबाची दृष्टीही 'सम' आहे. वर प्रमाण आले आहे. हा सर्वांकडे सारखा पाहतो. याच्या पाहण्यामध्ये भेद नाही. पण याची दृष्टी सारखी हालते असे शंकराचार्य सांगतात. 'मनोजगर्वमोचनं विशाललोललोचनम् ।' अथवा तुकया बंधू कान्होबा म्हणतात, विशाल 'व्यंकट' नेत्र वैजयंती तळपे कंठी वो ॥ देवाची दृष्टी लंबकाच्या घड्याळाप्रमाणे हालते. पण कशाकरिता ? (पांडुरंग शास्त्रींच्या प्रवचनातील दृष्टांत) एक कामगार कामावर जाताना जेवणाचा डबा नेत नाही. कामावरून येतो, फार भूक लागलेली असते. पण घरास कुलूप पाहतो. शेजारी विचारतो 'ही' कुठे गेली आहे ? शेजारची बाई सांगते, समोर हॉलमध्ये महिलांची सभा आहे, तिथे बसली आहे. हा जातो. सर्व स्त्रियांना पाहतो. काही तक्रार करतात. याची दृष्टी प्रथम बायकोच्या शोधाकरिता फिरत असते. बायकोस पाहतो. दृष्टी स्थिर होते. तिला खुणावतो व बोलावून घेतो. तद्वत देव पाहतो, या जगात माझा कोण आहे का ? जेव्हा त्याचा भक्त त्यास दिसतो, त्याच्यावर दृष्टी स्थिर होते व आपल्याकडे आकर्षित करून घेतो. भक्त पाहण्याकरिता याची दृष्टी सारखी हालत असते पण आहे मात्र सम.

ड) हा परमात्मा, विठ्ठल सर्वांच्या हृदयात समरूपाने आहे. 'समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेषोऽस्ति न प्रियः । ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥' गी.९/२९

**अर्थ :** मी सर्वभूतांच्या ठिकाणी सम आहे. मला परका व आपला कोणी नाही. पण मला जे भक्तिपूर्वक भजतात, ते माझ्या ठिकाणी आहेत आणि मी देखील त्यांच्या ठिकाणी आहे.

माऊली सांगते -

**तो मी पुससी कैसा । तरी जो सर्वभूतीं सदा सरिसा ।**
**जेथ आपपरू ऐसा । भागु नाही ॥ ज्ञाने.९/४०७**

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् ।**
**विनश्यत्स्वविनश्यंतं यः पश्यति स पश्यति ॥ गी.१३/२७**

**अर्थ :** सर्वभूतांच्या ठिकाणी सारखाच असणाऱ्या व नाश पावणाऱ्या भूतांमध्ये अविनाशी असलेल्या, अशा परमेश्वरास जो जाणतो, तोच ज्ञान्यांतील डोळस होय. माऊलींनी परमात्मा सगळ्यांच्या अंतःकरणात सम कसा याकरिता बरेच दृष्टांत दिले आहेत. त्यातील फक्त तीन.

ज्याप्रमाणे भोपळ्याचे प्रकार अनेक (लंबोळा, डेरेदार, वाकडा) पण भाजी एकच. इंगळ वेगळे वेगळे पण अग्नि एक, पावसाचे प्रकार अनेक (मुसळधार, रिमझिम, वळवाचा) पण पाणी मात्र एकच असते. तसे जगातील (६०० कोटी) सर्व माणसे वेगळी वेगळी पण सर्वांच्या अंतःकरणात परमात्मा मात्र समरूपाने किंबहुना सर्व वस्तूत समरूपाने. ज्याप्रमाणे आकाश सर्वात आहे !

माऊलींच्या ओव्या

**पै नानाप्रयोजनशीळें । दीर्घें वक्रें वर्तुळे ।**
**होती एकीचींच फळें । तुंबिणीयेचीं ॥ ज्ञाने.१३/१०६०**

**अंगारकणीं बहुवसीं । उष्णता समान जैशी ।**
**तैसा नाना जीवराशीं । परेशु असे ॥ ज्ञाने.१३/१०६२**

**गगनभरी धारा । परी पाणी एकचि वीरा ।**
**तैसा या भूताकारा । सर्वांगी तो ॥ ज्ञाने.१३/१०६३**

**हे भूतग्राम विषम । परी वस्तु ते एथ सम ।**
**घटमठीं व्योम । जियापरी ॥ ज्ञाने.१३/१०६४**

तुझ्याकडे जे येतील ते कसेही असले तरी त्यांना तुझ्या दर्शनाने मोक्ष मिळाला पाहिजे, असा वर पुंडलिकाने विठ्ठलाकडे मागून घेतला आहे. 'ज्ञानविज्ञानहीनानां मूढानां पापिनामपि । दर्शनास्ते भवेन्मोक्षः प्रार्थयामि पुनः पुनः ॥'

**अर्थ** - ज्ञानविज्ञान ज्यास माहीत नाही, जे मूढ, पापी आहेत त्यांना तुझ्या दर्शनाने मोक्ष दे, अशी मी तुला पुन्हा पुन्हा प्रार्थना करतो. 'मूढपापी जैसे तैसे । उतरी कासे लावूनि ॥' तु.म.
तात्पर्य - विठोबाचे पाय, हात, दृष्टी व सर्वांच्या हृदयात सम असून सर्वांना दर्शनाकरिता खुला आहे

**चिंतन :** विठोबा पंढरपुरास केव्हा आला, कोठून आला, कशाकरिता आला व कसा आला ?

१) विठोबा अठ्ठाविस युगे पंढरपुरला उभा आहे - 'युगे अठ्ठाविस विटेवरी उभा ॥' नाम.

ज्ञानोबाराय म्हणतात याच्या अगोदरपासून तो उभा आहे - 'हे नोहे आजी कालीचे । ना युगे अठ्ठाविसाचे ॥' ज्ञान.

हे प्रमाण जेव्हा नामदेवरायांच्या लक्षात येते, तेव्हा ते म्हणतात - 'जेव्हा नव्हते चराचर । तेव्हा होते पंढरपूर ॥' नाम. विठोबा हा अनादि आहे.

२) एकनाथ महाराज म्हणतात हा वैकुंठाहून आला - 'हरि वैकुंठाहुनि । आला पुंडलिका लागोनि । उभा राहिला अझुनि । युगायुगे भक्तासंगे । एका जनार्दनी संत शोभा शोभा ॥'

तुकाराम महाराज म्हणतात हा द्वारकेहून आला - 'द्वारकेचे केणे आले याचि ठाया । पुढे भक्त राय चोजवीत ॥'

ज्ञानोबाराय म्हणतात हा गोकुळातून आला - 'पुंडलिकाच्या भावार्था । गोकुळाहूनि झाला येता । निजप्रेम भक्ती भक्ता । घ्या घ्या ऐसे म्हणतसे ॥' याचे उत्तर, एखादा कामगार गावावरून येऊन, मुंबईत राहतो व एखाद्या कंपनीत काम करतो. जेथून आला ती मूळ जन्मभूमी, जिथे काम

करतो ती कर्मभूमी, जिथे राहतो ती भोगभूमी तद्वत विठोबा मूळचा वैकुंठीचा. त्याची कर्मभूमी द्वारका व प्रेमभूमी गोकुळ. आता तो पंढरपुरात उभा आहे. पंढरपुरचा विठोबा गोकुळातील बालमूर्ती आहे असे तुकोबाराय म्हणतात. 'पाडुरंग बालमूर्ती । गाई गोपाळ सांगाती । येऊनिया प्रीति । उभे समचि राहिले ॥'

३) विठोबा पुंडलिकाकरिता आला. पण फायदा सर्वांना झाला. ज्या प्रमाणे पाऊस चातकाकरिता पडतो, पण फायदा सर्वांना होतो. सूर्य कमळाकरिता उगवतो पण सर्वजण प्रकाशाचा फायदा घेतात. गाय वासराकरिता दूध देते पण घरातील सर्व माणसे दूध पितात. गीता अर्जुनाकरिता सांगितली पण फायदा सर्वांचा झाला. तद्वत विठोबा पुंडालीकाकरिता आला पण सर्वांचा फायदा झाला. माऊलीच्या शब्दात -

**परि वत्साचेनि वोरसें । दुभतें होय घरोद्देशें ।**
**जालें पांडवाचेनि मिषें । जगदुद्धरण ॥ ज्ञाने.१८/१४६७**

**चातकाचिये कणवे । मेघु पाणियेसिं धांवे ।**
**तेथ चराचर आघवें । निवालें जेवीं ॥ ज्ञाने.१८/१४६८**

**कां अनन्यगतीकमळा । लागीं सूर्य ये वेळोवेळां ।**
**कीं सुखिया होइजे डोळां । त्रिभुवनींचां ॥ ज्ञाने.१८/१४६९**

**तैसें अर्जुनाचेनि व्याजें । गीता प्रकाशूनि श्रीराजें ।**
**संसाराएवढें थोर ओझें । फेडिलें जगाचें ॥ ज्ञाने.१८/१४७०**

**पायाळाच्या गुणें पडिले ठाऊकें । जगा पुंडलिके दाखविले ॥ तु.म.**

४) हा विठोबा मात्र गुण घेऊन आला. 'गुणा आला विटेवरी । पीतांबरधारी सुंदर जो ॥' तु.म.

★★★★★

## (७) पीतांबर

पंढरपूरचा विठोबा उघडा आला, पण त्याने पीतांबर धारण केला आहे. विष्णू फक्त पीतांबर व एक उपरणे धारण करतात. यांची छाती नेहमी उघडी असते. कशाकरिता ? भक्त भृगूने मारलेली लाथ जगास दिसावी म्हणून ! किंबहूना हे भूषण म्हणून मिरवतात. 'हृदयी श्रीवत्सलांछन । मिरवी भक्तांचे भूषण । नाही तयाचा शीण । सुख धरिले लातेचे॥' तु.म. पीतांबरसुद्धा भक्तांकरिता धारण केला आहे.

**१) भक्तावर छाया (सावली) धरण्याकरिता.**

**पीतांबर छाया करी लोभापर । पाहे ते उत्तर आवडीचे ॥ तु.म.**

**घात आघात निवारी । छाया पीतांबरी करी ॥ तु.म.**

वासकर फडावर पूर्वी १२ तास कीर्तन होत असे. भाऊसाहेब बार्शीकर हे फडावरील प्रसिद्ध कीर्तनकार होते. 'जन्मोनिया कुळी वाचे स्मरे राम । धरी हाचि नेम 'अहर्निशी' ॥' तु.म. ते बारा तास, सकाळी ७ ते संध्याकाळी ७ पर्यंत कीर्तन करीत. एकदा कोणीतरी त्यांच्या डोक्यावर दुपारी १२च्या दरम्यान सावलीसाठी वस्त्र धरले होते. हे त्यांच्या ध्यानी-मनीही नव्हते. पण समोरील श्रोत्यांना दिसत होते. त्यांनी रात्री मालकाकडे तक्रार केली. श्री.ह.भ.प. मल्लाप्पा वासकर महाराजांनी बार्शीकरांचा अधिकार ओळखला व सांगितले की उद्यापासून सकाळी ७ ते ९ व संध्याकाळी ७ ते ९ कीर्तन होईल. आपण देवास त्रास देऊ नये. ती प्रथा अद्यापही चालू आहे. कार्तिक वारीस पंढरपुरहून आळंदीस जाताना कधी कधी आम्हास हा अनुभव येतो. बरोबर उन्हाच्या वेळी ढग येतात व गारवा निर्माण होतो. आम्हा वारकऱ्यांना वाटते देवाने आमच्यावर पीतांबर धरला आहे.

**२) वाट झाडण्याकरिता**

भक्त बिना चप्पलचा जर वारी करत असेल, वाटेत खडे, काटे असतील तर विठ्ठल पुढे जाऊन ती वाट पीतांबराने साफ करतो. ज्यामुळे भक्ताच्या पायास त्रास होणार नाही. 'लागे पाठोवाटी पाहे पायांकडे । पीतांबर खडे वाट झाडी ॥' तु.म.

**३) मुख पुसण्याकरिता अथवा भक्तांचे अश्रू पुसण्याकरिता**

भक्त चालताना, पळताना, अथवा नाचताना घाम येतो. तो घाम पुसण्याकरिता देव पीतांबराचा उपयोग करतो. 'घेई उचलोनि पुसे तहान भूक । पुसीं माझे मुख पीतांबरे ॥' तु.म.

**४) संकट निवारण करण्याकरिता.**

महाभारतात कौरवांचे सर्वांत मोठे पाप कोणते? तर द्रौपदी वस्त्र हरण. 'अन्यायेंवीण नागवी रावो । तैं धावणिया धांवे देवो । द्रौपदी वस्त्र हरण पहा वो । हा मुख्य अन्यावो कौरवा ॥' भा. १/२१२. दुःशासनाने द्रौपदीची साडी भर सभेत ओढली. प्रथम पती, नंतर आचार्य, तद्नंतर स्वतःची शक्ती वापरून लाज राखण्याचा प्रयत्न केला पण यात यश आले नाही. शेवटी अनन्य होऊन श्रीकृष्णाचा धावा केला. परमात्मा धावत आला. साड्या पुरवल्या नाहीत तर तोच साडी झाला, वस्त्रावतार धारण केला. 'कौरवी पांचाळी सभेमाजी आणिली । वस्त्रे हरणे वस्त्रे कैसी झाली माऊली ॥' तु.म डोंगरे महाराज म्हणातात, दुःशासनाने ९९९ साड्या ओढल्या. याचे कारण श्रीकृष्णाचे बोट कापले होते, तेव्हा द्रौपदीने जी चिंधी दिली होती, त्या चिंधीस ९९९ धागे होते. देव कोणाचे ऋण ठेवत नाही. हजार पटीने देतो. 'बाप उदार देवो अपरिमितु । याचक स्वेच्छा सदोदितु ।

असे सहस्रवरी देतु । सर्वस्व आपुलें ॥' ज्ञाने ११/११७. मात्र हजारावी साडी नव्हती तर पीतांबर होता. भीष्माचार्यांनी सांगितले, मूर्खा दुःशासना तो पीतांबर आहे. यास हात लागला तर जळून भस्म होशील. मरणाच्या भितीने दुःशासन बाजूस झाला व पीतांबरामुळे द्रौपदीची लाज राखली गेली. संकट निवारण झाले.

तात्पर्य - विठ्ठल पितांबर नेसला आहे भक्ताकरिताच. 'गुणा आला विटेवेरी । पितांबरधारी सुंदर जो ॥' तु.म. पीतांबराचा रंग लालसर पिवळा असतो. अर्थात हे त्यागाचे व मांगल्याचे लक्षण आहे.

★★★★★

# (८) देव - जीव

१) जो सदा आहे, भूतकाळात होता, वर्तमान काळात आहे व भविष्य काळात सेवानिवृत्त होणार नाही; कायम राहतो त्यास देव म्हणतात.

२) जो सर्वत्र आहे, जो सर्व देशात आहे, ज्याच्या अस्तित्वाशिवाय एकही जागा शिल्लक नाही.

**म्हणोनी अर्जुना मी नसें । ऐसा कवणु ठाव असें ।**
**परि प्राणियांचे दैव कैसें । जे न देखती माते ॥ ज्ञाने.९/३००**

३) जो सर्वांचा आहे. परमात्मा सर्वांच्या हृदयात निवास करतो.

**सर्व भूतांच्या अंतरी । हृदयमहाअंबरी ।**
**चिद्वृत्तीच्या सहस्रकरीं । उदयला असे जो ॥ ज्ञाने.१८/१२९९**

४) जो सर्वज्ञ आहे. सर्वांच्या अंतःकरणात काय चालले याची जाणीव, ज्ञान देवास असते. आमच्यावर देवाची कृपा आहे की दुसऱ्याच्या अंतःकरणातील कळत नाही. जर कळले असते तर एक दिवसात जग संपले असते.

५) जो समर्थ आहे. कर्तुम्, अकर्तुम्, अन्यथाकर्तुम् शक्ती ज्याच्याकडे आहे. तात्पर्य - जो, सदा, सर्वत्र, सर्वांचा, सर्वज्ञ व समर्थ आहे त्यास देव म्हणतात. देवाचा व जीवाचा अनादि काळापासून कायमचा संबंध आहे. देव आहे, सिंधू व जीव आहे बिंदू. समुद्राच्या सर्व पाण्यात जे गुण असतात ते सर्व गुण छोट्या बिंदूमध्ये असतात. पण समुद्रात जी ताकद असते ती मात्र छोट्या थेंबात नसते. देव जसा अविनाशी आहे तसा जीवसुद्धा अविनाशी आहे. तो मरत नाही. फक्त देह बदलतो.

**जैसें जीर्ण वस्त्र सांडिजे । मग नूतन वेढिजे ।**
**तैसे देहांतरातें स्वीकारिजे । चैतन्यनाथें ॥ ज्ञाने २/१४४**

ज्याप्रमाणे माणूस जुने कपडे बदलतो व नवीन धारण करतो. 'ईश्वर अंश जीव अविनाशी । चेतन अमल सहज सुख राशी ॥' तुलसी. देव चेतन आहे. जीव पण चेतन आहे. देव जसा दिसत नाही त्या प्रमाणे जीवपण दिसत नाही. आईच्या उदरात केव्हा येतो, आईस दिसत नाही. जाताना बायकोस दिसत नाही. कारण देव जसा सूक्ष्म आहे तसा जीवपण अतिसूक्ष्म आहे. जीव किती सूक्ष्म आहे ? उपनिषद सांगते, आपल्या केसाचा अग्रभाग घेऊन त्याचे दहा हजार भाग करावे. त्यातील एक भाग म्हणजे जीव. ही सुद्धा कल्पना आहे. 'बालाग्र शतभागस्य शतधा कल्पितस्यच । भागो जीवः स विज्ञेयः सचानन्त्याय कल्पतें ॥' श्वेताश्वत्तरोपनिषद ५/९ जीव एवढा लहान आहे पण याची शक्ती प्रचंड आहे कारण ईश्वराचा अंश म्हणून ! देहास महत्त्व जीवामुळे आहे. देहातून जीव निघून गेला की देह म्हणजे ओल्या मातीचा गोळा. त्यामुळे लवकर विल्हेवाट लावावी लागते. शरीरात जीवाची सत्ता चालते. 'हात पाय दिसे शरीर चालता । नांवे भेद सत्ता जीवाची ती ॥' तु.म.

**दृष्टांत :** राम प्रभू वालीस मारतात. वालीची पत्नी तारा शोक करते. राम प्रभू विचारतात तू कां रडतेस ? ती सांगते माझा पती गेला. प्रभू म्हणतात ज्याच्याबरोबर संसार केलास तो पंचभूतांचा पुतळा तुझ्यासमोर पडला आहे. ती सांगते याच्यातील जीव निघून गेला. प्रभू विचारतात याच्यात जो जीव होता तो कधी पाहिलास कां ? ती सांगते नाही पाहिला. मग जो पाहिलाच नाहीस त्यास माझा कसा म्हणतेस व त्या बद्दल शोक का करतेस ? 'छीती जल पावक गगन समिरा । पंचरचीत अती अधम सरीरा ॥ प्रगट सो तनु तंव आगे सोवा । जीव नित्य केवी लगी तुम रोवा ॥' तुलसी. जो नित्य आहे त्याकरिता शोक का करावा ? तारांस सर्व ज्ञान होते व ती रामाची भक्त बनते. 'अमर आहां अमर आहां । खरे कीं पहा खोटें हें ॥' तु.म. जीव मरण पाहतसुद्धा नाही. 'जीव न देखे मरण । धरी नवी सांडी जीर्ण । संचित प्रमाण । भोग शुभाअशुभासी ॥' तु.म. मग जीवास जीवपण कशामुळे ? तर मायेमुळे.

**तैसें भूतजात सर्व । हे माझेचि कीर अवयव ।**
**परि मायायोगें जीव । दशे आले ॥ ज्ञाने ७/६६**

'जीव अवघे देव । परी हा नागवी संदेह ॥' तु.म. जीवाचे अज्ञान, विकार, विषय, अहंभाव हे सर्व गेले की जीवच देव होतो. जसे ज्ञानदेव, नामदेव, चांगदेव, सर्व संत देव झाले. 'तुका म्हणे हा तो स्वयें परब्रह्म । मुर्ख नेणे वर्म संतचरण ॥' संतांच्या कृपेने, देवाच्या प्रेम भक्तीने जीवाचा मळ जातो व तो शिव होतो. 'तुका म्हणे लाभ अकर्तव्या नांवे । शिवपद जीवे भोगिजेल ॥' एकदा जीव, शिव म्हणजे देव झाला, तर देवास जसे जन्म मरण नसते तसे त्या संतास जन्म मरण राहत नाही. 'बीज भाजोनि केली लाही । आम्हा जन्म मरण नाही ॥' तु.म. 'कर्म नेणो धर्म नेणो नेणो आम्ही कांही । ज्ञानदेव म्हणे आम्हा येणे जाणे नाही ॥'

★★★★★

# (९) ध्यान

ध्यान कशास म्हणतात ? डोळ्याने जे पाहतो, जे मनपटलावर उमटले जाते त्यास ध्यान म्हणतात. 'राहो आता हेचि ध्यान । डोळा मन लंपटो ॥' तु.म. ध्यानाच्या पाच अवस्था आहेत.

१) **स्थिती** - ध्यान करण्याचे ठिकाण पवित्र पाहिजे. घरी गोंधळात काय ध्यान करणार ? शांत 'ध्यान मंदिर' हवे. माऊलीच्या भाषेत

**जो संती वसविला ठावो । संतोषासि सावावो ।**
**मना होय उत्सावो । धैर्याचा ॥ ज्ञाने ६/१६५**

**परि आवश्यक पांडवा । ऐसा ठावो जोडावा ।**
**तेथ निगूढ मठ होआवा । कां शिवालय ॥ ज्ञाने ६/१७९**

२) **संस्थिती** - ध्यान कोणाचे करावे ? आपणास आवडणाऱ्या देवाचे ध्यान करावे. डोळ्यास सुंदर पदार्थ आवडतात. देवापेक्षा सुंदर कोण आहे ? देवाच्या दहा अवतारांत सुंदर तिघे आहेत. राम, कृष्ण, हरी. (विठ्ठल) सुंदर ते ध्यान मांडीवरी घेऊनी । कौसल्या जननी गीती गाय ॥१॥ सुंदर ते ध्यान नंदाच्या अंगणी । गोपाळ गौळणी खेळताती ॥२॥ सुंदर ते ध्यान चंद्रभागे तटी । पुंडलिका पाठी उभा असे ॥३॥ सुंदर ते ध्यान एका जनार्दनी । जनी वनी मनी भरलासे ॥४॥ शंकर नेहमी श्रीकृष्णाचे ध्यान करतात. पण गोकुळामधील कृष्ण, 'रूप पाहता डोळसु । सुंदर पाहता गोपवेशु । महिमा वर्णिता महेशु । जेणे मस्तकी वंदिला ॥ ज्ञान.

रामभक्त रामरक्षा म्हणतात, रामाचे ध्यान करतात.

**अथ ध्यानम् - ध्यायेदाजानुबाहुं धृतशरधनुषं, बद्धपद्मासनस्थं**
**पीतं वासो वसानं नवकमलदलस्पर्धिनेत्रं प्रसन्नम् ।**
**वामाङ्कारूढसीतामुखकमलमिलल्लोचनं नीरदाभं**
**नानालङ्कारदीप्तं दधतमुरुजटामण्डनं रामचंद्रम् । इति ध्यानम्॥**

देव म्हणतात माझे कोणतेही ध्यान करा फायदाच आहे. 'ज्याने ज्याने जैसें ध्यावे । तैसें व्हावे कृपाळे ॥' तु.म. भक्तांचे ध्यान केले तरी दुप्पट फायदा होतो. कारण त्यांच्या ध्यानात परमात्मा असतो. 'सतत कृष्णमूर्ती सावळी । खेळे हृदय कमळी । शांती-क्षमा तया जवळी । जीवे भावे अनुसरल्या ॥' ज्ञान. 'तुका म्हणे संता ध्याता । परब्रह्मची आले हाता ॥'

तात्पर्य - अविनाशी देव अथवा संतांचे ध्यान करावे.

३) **विगती** - ज्याचे ध्यान करायचे त्याचे ज्ञान पाहिजे. तरच त्याच्याविषयी प्रेम वाढत जाते.

श्रीकृष्ण शक्तिवान, रूपवान, गुणवान, ज्ञानवान, कृपाळू, दयाळू आहे. हे देवाचे, संतांचे गुण ज्ञात झाले तर प्रेम वाढते. यास विगती म्हणतात.

४) **प्रगती** - ज्याचे ध्यान करायचे ते सतत झाले पाहिजे. प्रथम अर्धा तास, नंतर एक, दोन, तीन, चार तास, शेवटी सतत ध्यान रहावे. ध्यानाचा परिणाम एवढा व्हावा, की सर्व वस्तूत, सर्व भूतात श्रीकृष्ण अथवा श्रीराम दिसावा. यास प्रगती म्हणतात.

५) **संस्मिती** - ही शेवटची अवस्था आहे. ध्याता ध्येयाने ध्येयरूप होणे. ज्याचे ध्यान करायचे तेच रूप प्राप्त होणे. 'ध्यानी ध्याता पंढरीराया । मनासहित पालटे काया ॥' तु.म. 'जया ज्याचे ध्यान । तेचि होय त्याचे मन ॥' तु.म. मनच नाही तन पण बदलते. ध्यानाचा महिमा - ध्यानाने भरत राजा मृग झाला. 'देहासी येता मरण । भरतासी मृगाचे ध्यान । तेणे मृगजन्म पावे आपण । जन्मांतर कारण ऐसे जाले ॥' नाथ.२/१८२

**काया वाचा आणि मन । पुरुष एकाग्र करून ।**
**जे जे वस्तूचे करी ध्यान । तद्रूप जाण तो होय ॥ भागवत ९/२३६**

**स्नेहे द्वेषे अथवा भये । दृढ ध्यान जेणे होय ।**
**तेणे तदरूपता लाहे । उभवोनि बाहे सांगतो ॥ भागवत ९/२३७**

**देह गेलीया तदरूपता । होईल हे वचन वृथा ।**
**येणेचि देहे येथे असता । तदरूपता पाविजे ॥ भागवत ९/२३८**

द्वेषभावाने ध्यान झाले तरी तो तद्रूप होतो (ज्याप्रमाणे कंस) 'द्वेषाचिया भावे हरिरूप झाले । भाव हरपले देहादिक ॥' तु.म. रामायणात राम ध्यानाने सर्व रामरूप झाले.

**राम रूप केली । रामे कौसल्या माऊली ॥१॥**

**राम राहिला मानसी । ध्यानीं चिंतनी जयासी ॥**
**राम होय त्यासी । संदेह नाही भरवंसा ॥२॥**

**अयोध्येचे लोक । राम झाले सकळीक ॥३॥**

**स्मरता जानकी । रामरूप झाले कपि ॥४॥**

**रावणेंशीं लंका । राम आपण झाला देखा ॥५॥**

**ऐसा नित्य राम ध्याय । तुका वंदी त्याचे पाय ॥६॥**

'गोविंदे गोविंद केले लोकपाळ । चिंतने सकळ तुका म्हणे ॥' गोकुळातील सर्व जन गोविंदरूप झाले.

ध्यान कसे करावे ?

**दुडीवरी दुडी । चाले मोकळी गुजरी ॥१॥**

**ध्यान लागो ऐसे हरी । तुझे चरणी तैशापरी ॥२॥**

**आवतण्यांची आस । जैसी लागे दुर्बळास ॥३॥**

**लोभ्या कळांतरांची आस । बोटे मोजी दिवस मास ॥४॥**

**तुका म्हणे पंढरी नाथा । मजला आणिक नको व्यथा ॥५॥**

**कृष्ण ध्याता चित्ती । कृष्ण गाता गीती ।**
**तेही कृष्ण होती । कृष्ण ध्याने ॥ तु.म.**

**कथा -** राम रावणाचे युद्ध सात दिवस चालले होते. रावण मरत नव्हता.सीता त्रिजटेला विचारते, हा दुष्ट मरत का नाही ? त्रिजटा म्हणाली सीते, घोटाळा असा झाला आहे, रावणाच्या हृदयात आपण आहात व आपल्या हृदयात राम आहे. राम आत्मघात कसा करतील ! मग हा दुष्ट रावण मरणारच नाही का ? माझी सुटका होणार नाही का ? त्रिजटा म्हणाली राम रावणास बाणाने हैराण करतील. एक वेळ अशी येईल रावण आपणास विसरणार मग प्रभू त्यास बाण मारून ठार करणार. अर्थात तसेच झाले. हनुमंताचे ध्यान केले तरी रामाच्या ध्यानाचा फायदा होतो. कारण हनुमंताच्या हृदयात राम आहेत. 'पवन तनय संकट हरन मंगल मुरती रूप । राम लखन सीता सहित हृदयी बसऊ सूर भूप ॥' तुलसी.

वैशिष्ट्य - नाथ महाराज, माऊली व तुकोबाराय एकाच भिंगुरटीचा दृष्टान्त देतात.

**भिंगुरटी किटकीते धरी । कोंडी भिंतीमाजीले घरी ।**
**ते मरण भये ध्यान करी । निरंतर भ्रमरिचे ॥**
**तेणे तीव्र ध्याने किटी । होऊन ठाके भिंगुरटी ।**
**गगना चढे उठाउठी । प्रत्यक्ष दृष्टी देखिजे ॥ नाथ ९/२३९ ते २४०**
**भांबावसी झणे हे शरीर कर्दळीस्तंभ ।**
**भस्म कृमी विष्ठा उभे आहे ते सुशोभ ।**
**भाविता किटकी झाली भृंगी तिही क्रमिले नभ ।**
**भावे भक्ति सुलभ ओळगा ओळगा पद्मनाभ ॥ ज्ञान.**
**तुका म्हणे आळी । जीवे नुरेचि वेगळी ॥**

तात्पर्य - ध्यानाने स्वरूपता मुक्ती प्राप्त होते. जीवच नाही तर देह सुद्धा ब्रह्मरूप होतो.

★★★★★

# (१०) अनन्य

अनन्य याची व्याख्या नारदांनी भक्ति सूत्रात केली आहे. 'अन्याश्रयाणां त्यागो अनन्यता॥' ना.भ.सू.१०. आपला प्रियतम सोडून दुसऱ्या आश्रयाचा त्याग करणे यास अनन्यता म्हणतात. देवास अनन्य भक्त फार आवडतात. त्यांचा तो सर्व भार चालवितो तशी त्याची प्रतिज्ञाच आहे 'अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते। तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेम वहाम्यहम् ॥' गी.९/२२ जो अनन्य आहे त्यास मी सुलभ आहे असे श्रीकृष्ण सांगतात. अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः। तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः। गी.८/१४ संत वाङ्मयात अनन्यता दर्शविणारे बरेच दृष्टांत आले आहेत.

१) चातक हा फक्त पावसाचेच पाणी पीतो.

**भरले सरिता समुद्र चहूकडे । परि ते बापियासी कोरडे ।**
**का जैं मेघोनी थेंबु पडे । तैं पाणी कीं तया ॥ ज्ञाने. १०/१८३.**

समुद्र, नद्या, तलाव याकडे तो पाहत नाही. 'पहा ते चातक नेघे भूमिजळा। वर्षतो उन्हाळा मेघ तया ॥' तु.म. 'चातका लागोनि मेघ नित्य वर्षे। तो तुज उदास करील केवी ॥' तु.म. तुलसीदास म्हणतात चातकास घाबरविण्याकरिता पाऊस येताना वारा जोरात वाहतो. ढगांचा गडगडाट होतो. विजा चमकतात. पण चातक आपल्या प्रियतमाचे दोष पाहत नाही. त्याच्यावर प्रेमच करतो. त्यांच्या शब्दात - 'पवि पाहन दामिनी गरजी झरी झकोरी खरी खिजी। दोष न प्रियतम रोष लागी तुलसी रागही रिझी ॥' एकदा एक चातक पक्षी गंगेच्या पाण्यात पडला. क्षणभर त्यास वाटले, बरे झाले. मरताना गंगेचे पाणी आपल्या मुखात जात आहे. पण दुसऱ्या क्षणी आठवले पूर्ण जीवन जमिनीवरील पाणी प्यायलो नाही. मरताना प्यायलो तर डाग लागेल. म्हणून चातकाने चोच वर केली व प्राण सोडले. अशा प्रकारे जीवन निष्कलंक राखले.

२) चकोर हा असा पक्षी आहे, स्वाती नक्षत्रातीलच पाणी पितो. बारा महिने तृषापीडित राहतो. 'जाचे बारह मास पिये पपिया स्वाती जल ॥' तुलसी. माऊली म्हणते

**सांगे कुमुददळाचेनि ताटें । जो जेविला चंद्रकिरणे चोखटें ।**
**तो चकोरु काई वाळुवंटें । चुंबितु आहे ?॥ ज्ञाने.५/१०७**

३) पतिव्रता स्त्री ही नेहमी आपल्या पतीशी अनन्य असते. ती परपुरुषाची स्तुतीही करीत नाही. 'पतिव्रता नेणे आणिकांची स्तुती। सर्व भावे पती ध्यानी मनी ॥' तु.म. काया, वाचा, मने जीवनभर पतीची सेवा करते.

४) कृपण माणूस हा फक्त संपत्तीवर प्रेम करतो. त्याला बाकी काही प्रिय नसते. स्वतःच्या देहाचीसुद्धा काळजी करीत नाही. त्याचे चित्त संपत्तीत गुंतलेले असते.

**कृपण चित्तवृत्ती जैसी । रोवोंनि घाली ठेवयापासी ।**
**मग नुसधेंनि देहेंसीं । आपण असे ॥ ज्ञाने.११/६३३**

५) लेकरू हे आपल्या आईशी अनन्य असते. आपली आई कशीही असली तरी ते तिच्याकडे जाते. माऊली म्हणते एखाद्या बालकासमोर सुंदर नटी, विश्वसुंदरी, राजकारणी बाई किंवा जगातील सुंदर स्त्री रंभा उभी केली व त्याची विद्रूप असणारी आई उभी केली तर ते बालक कोणाकडे जाईल ? अर्थात आपल्या आईकडेच जाईल.

**आणि आपुली माये । कुब्ज जरी आहे ।**
**तरी जीजें तें नोहे । स्नेह कुन्हें कीं ॥ १८/९२७**

**येरी जिया पराविया । रंभेहूनि बरविया ।**
**तिया काय कराविया । बाळकें तेणें ॥ ज्ञाने.१८/२८**

**जैसी तैसी माय बरी । मानिल्या त्या माना येरी ॥ तु.म.**

६) भ्रमर हा कमळदलात प्रेमामुळे अडकून राहतो. कमळासी अनन्य म्हणून.

**जैसा भ्रमर भेदी कोडें । भलतैसें काष्ठ कोरडें ।**
**परि कळिकेमाजीं सांपडे । कोंवळिये ॥ ज्ञाने.१/२०१**

७) सर्व संत साहित्याचा अभ्यास करताना असे दिसते. सर्वांत अनन्य 'मासा' आहे. जगातील सर्व जीवांना पाणी लागते. 'जीव जीती जीवना संगे । मत्स्या मरण त्या वियोगे ॥' तु.म. पण बाकीचे जीव पाण्याशिवाय भरपूर जगू शकतात. उंटास तीन महिन्यातून एकदा पाणी मिळाले तरी चालते. उंदरास सहा महिने पाणी नाही मिळाले तरी चालते. पशू, पक्षी, माणूस, पीके पाण्याशिवाय खूप वेळ जगू शकतात. काही जीव असे आहेत, ते पाण्यातही राहतात अथवा पाण्याबाहेरही राहतात. उदा. बेडूक, पाणसाप, कासव, मगर. पण मासा हा असा एकच प्राणी आहे जो पाण्याशिवाय जगूच शकत नाही. म्हणून संतांनी अनन्यता सांगण्याकरिता माशाचाच दृष्टांत दिला आहे.

**जैसे जळचरू जळ सांडे । आणि तत्क्षणीं मरण मांडे ।**
**स्वधर्मु हा तेणें पांडे । विसंबों नये ॥ ज्ञाने.३/११७**

'जीवना वेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥ जैसी जीवनावेगळी मासोळी । तैसा बोधालागी तळमळी । प्रेम पडिभराच्या मेळी । देह न सांभाळी सर्वथा ॥' भा.७/२३० माशास भरपूर पाणी हवे असते. ते गढूळ, निर्मळ अथवा खारे असले तरी चालते. मासा पावसाळ्यात आनंदाने पुराच्या उलट दिशेने धावतो. हत्ती मात्र शक्तिशाली असून पुरात वाहतो. 'जो ज्याके शरण गये ताकह ताकी लाज । उलटे जल मछली चले बह्यो जात गजराज ॥' तुलसी. मासा जीवंतपणी पाण्याशी अनन्य असतो असे नाही. मेल्यानंतरपण पाण्याशी अनन्य राहतो. मच्छी बाजारात मासे विकणारे लोक

मासा चकाचक दिसावा म्हणून सतत पाणी मारतात. मासे शिजविण्याकरिता जास्त पाणी लागते. जी माणसे मासे खातात ती जास्त पाणी पितात, व ज्या भांड्यात मासे शिजविले जातात ती भांडी घासण्यास जास्त पाणी लागते. तसे भक्त जीवंतपणी देवाशी अनन्य असतात पण मेल्यानंतरपण अनन्य राहण्याचा प्रयत्न करतात. ज्ञानोबाराय आपले मनोगत प्रगट करतात.

**आकार स्थूल नाशिवंत । हे तरी जाईल भूमिआत ।**
**तयावरी हरि चालत । तेणे होईल कृतकृत्य ॥१॥**

**देह जावो अथवा राहो । पांडुरंगी दृढ भावो ॥धृ॥**
**दुजा गुण आपी मिळे । तरी मी होईन गंगाजळे ।**
**हरि अभिषेक अनुदिनी । सुखे सर्वांगावरी खेळे ॥२॥**

**तिजा गुण तेजरूप । तरी मी होईन महादीप ।**
**हरि रंगणी दिपमाळा । दीप उजळीन समीप ॥३॥**

**वायुव्यापक चौथा गुण । तरी मी विंजणा होईन ।**
**हरि अष्टांगे निवविन । मना ऐशा दृढ धरीन खुणा ॥४॥**

**आकाश पाचवा गुण । तरी मी प्रासादी राहेन ।**
**बाप रखुमादेवीवरा । अखंड तुझे अनुसंधान ॥५॥**

**दृष्टांत :** शंकराचा भक्त उपमन्यू तपश्चर्या करीत होता. त्याची परीक्षा पाहण्याकरिता शंकराने इंद्राचे रूप घेतले. इंद्र आले म्हणून उपमन्यूने स्वागत केले. इंद्र म्हणाले, 'शंकर स्मशानात राहतात. तुला काय देणार ? मी तुला वैभव देतो.' इंद्राने अनेक प्रलोभने दाखविली पण उपमन्यू म्हणाला, 'अपि कीटः पतंगो वा भवेयं शंकराज्ञया । नत्विंद्राहं त्वया दत्तं त्रैलोक्यमपि कामये ॥'

**अर्थ :** 'हे देवराज माझा स्वामी शंकर. त्यांची आज्ञा झाली तर मी कीटपतंगादि योनीमध्ये जाण्यास तयार आहे. पण आपण दिलेले त्रिलोकीचे वैभव मला नको आहे.' उपमन्यूची निष्ठा पाहून इंद्रवेषातील शंकर प्रगट झाले. उपमन्यूस क्षीराचा सागर देऊन टाकला.

**मागां दूध दे म्हणतलियासाठी । आघवियाची क्षीराब्धीची क़रूनि वाटी ।**
**उपमन्यूपुढें धूर्जटी । ठेविली जैसी ॥ ज्ञाने.१०/१७**

**दृष्टांत :** गंधमाधन वानर युद्धात कुंभकर्णाच्या हातात सापडला. कुंभकर्ण म्हणाला, 'रावणाचा म्हटलास तर मी तुला जीवदान देतो.' गंधमाधन वानर म्हणाले, 'रावणाचा म्हणून जीवंत राहण्यापेक्षा रामाचा म्हणून मेलो तरी चालेल.' वानराचा प्राण गेला पण अनन्यतेचा भंग होऊ दिला नाही.

या युगात अनन्यता दुर्मीळ होत चालली आहे. माणसे स्वार्थाकरिता वाटेल ते करण्यास तयार

होत आहेत. पण व्यवहारात, परमार्थात अनन्यतेला अनन्यसाधारण महत्त्व आहेच. तुकाराम महाराज एकाच अभंगात आठ दृष्टांत देतात.

**मातेविण बाळा । आणिक न माने सोहळा ॥१॥**

**तैसे झाले माझे चित्ता । तुजविण पंढरीनाथा ॥२॥**

**वाट पाहे मेघा बिंदू । नेघे चातक सरिता सिंधू ॥३॥**

**सारसाशी निशी । ध्यान रवीच्या प्रकाशी ॥४॥**

**जीवनाविण मत्स्य । जैसे धेनू लागी वत्स ॥५॥**

**पतिव्रते जिणें । भ्रताराच्या वर्तमाने ॥६॥**

**कृपणाचे धन । लोभ्यालागी जैसे मन ॥७॥**

**तुका म्हणे काय । तुजविण प्राण राहे ॥८॥**

**दृष्टांत :** एकदा एक चोर फकिराची गोधडी चोरतो. चोराने ती गोधडी स्वतःच्या पिशवीत ठेवलेली असते. फकिर पोलिसाकडे जातो व तक्रार करतो, 'साहेब माझी एकुलती एक गोधडी चोरीस गेली.' पोलीस नोंद करतात. फकिर रडतो व सांगतो, 'साहेब माझी उशी, तकिया, चादर, लुंगी वगैरे सर्व काही चोरीस गेले.' पोलीस पटापट चोरीस गेलेल्या सर्व वस्तूंची यादी करतो. फकिर सारखा रडतो व परत बोलतो, 'माझी गोधडी गेली'. ज्या चोराने गोधडी चोरली होती, त्यास मोठे नवल वाटते. त्यास वाटते हा फकिर किती खोटे बोलत आहे. मी फक्त गोधडीच चोरली आहे, पण हा किती लांबलचक यादी सांगतो. चोर पोलिसाकडे जातो व सांगतो, 'साहेब मी चोर आहे. या फकिराची फक्त गोधडीच चोरली, ही घ्या.' समोर टाकतो. फकिर लगेच गोधडीवर झडप घालतो व नाचू लागतो. साहेब माझी गोधडी मिळाली. पोलिसाला राग येतो. तो म्हणतो, 'तुमची फक्त गोधडीच चोरीस गेली असताना, ही लांबलचक यादी का सांगितली ?' फकिर म्हणतो, 'साहेब, माफ करा. माझी गोधडी म्हणजे माझे सर्व काही आहे.'

तात्पर्य - महात्मे आपली सगळीच नाती देवाशी जोडतात.

**त्वमेव माता च पिता त्वमेव । त्वमेव बंधू च सखा त्वमेव ।**
**त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव । त्वमेव सर्वं मम देव देव ॥**

**विठ्ठल बाप माय चुलता । विठ्ठल बंधू भगिनी आणि भ्राता ।**
**विठ्ठलेविण चाड नाही गोता । तुका म्हणे आता नाही दुसरे ॥ तु.म.**

**कथा :** एकदा कोल्ह्यास खूप तहान लागली. तहानेने व्याकूळ होऊन नदीकाठी आला व

घाईघाईने अधाशासारखे पाणी पिऊ लागला. पाणी पिण्याची तडफड पाहून पाण्यातील मासा म्हणाला, 'पाण्यामुळे तुम्हास इतका आनंद होतो का ? मला काहीच वाटत नाही.' कोल्हा म्हणाला, 'मला पाण्यामुळे एवढा आनंद का झाला ते तुला जाणून घ्यायचे का ?' मासा म्हणाला, 'होय' कोल्ह्याने चटकन माशास उचलून तापलेल्या वाळूवर टाकले. मासा तडफडू लागला. खूप त्रास झाला. मृत्यू जवळ येऊ लागला. पुन्हा कोल्ह्याने त्यास पाण्यात टाकले. कोल्ह्याने माशास विचारले, 'समजले का पाण्यात किती आनंद आहे ?' मासा खजील झाला व म्हणाला, 'माझे जीवनच पाणी आहे. मी पाण्याशिवाय जगूच शकत नाही.' माशासारखी माणसास परमार्थाची तळमळ हवी.

★★★★★

## (११) एवढा प्रभू

प्रभू या शब्दाचा अर्थ मालक, सत्ताधारी.

**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।**
**प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ गीता ९/१८**

'प्रभू' या शब्दावर ज्ञानोबारायांनी पाच ओव्या लिहिल्या आहेत.

**आकाशें सर्वत्र वसावें । वायूने नांवभरी उगें नसावें ।**
**पावके दाहावें । वर्षावें जळें ॥ ज्ञाने.९/२८१**

**पर्वतीं बैसका न संडावी । समुद्रीं रेखा नोलांडावी ।**
**पृथ्वीया भूतें वाहावीं । हे आज्ञा माझी ।। ज्ञाने.९/२८२**

**म्या बोलविल्या वेदु बोले । म्या चालविल्या सूर्यु चाले ।**
**म्या हालविल्या प्राणु हाले । जो जगातें चाळिता ॥ ज्ञाने.९/२८३**

**मियांचि नियमिलासांता । काळु ग्रासितसा भूतां ।**
**इयें म्हणियागतें पंडुसुता । सकळें जयाचीं ॥ ज्ञाने.९/२८४**

**ऐसा जो समर्थु । तो मी जगाचा नाथु ।**
**आणि गगना ऐसा साक्षीभूतु । तोही मीचि ॥ ज्ञाने.९/२८५**

थोडक्यात देव सांगतात, आकाश, वायू, अग्नि, पाऊस, पर्वत, समुद्र पृथ्वी हे सर्व माझ्या आज्ञेने चालतात. मी बोलवितो म्हणून वेद बोलतो. सूर्य माझ्यामुळे चालतो. वायू माझ्यामुळे चलनवलन

करतो. मी असा समर्थ आहे की काळसुद्धा माझ्या ताब्यात आहे. जगाचा मी नियंत्रक आहे. असा या ओव्यांचा थोडक्यात अर्थ आहे. नामदेवराय असेच म्हणतात.

**तुझिया सत्तेने वेदाशी बोलणे । सूर्यासी चालणें तुझिया सत्ते ॥१॥**

**ऐसा तू समर्थ ब्रह्मांडाचा धनी । वर्म हे जाणुनि शरण आलो ॥२॥**

**मेघांनी वर्षावे पर्वती बैसावे । वायूने विचरावे तुझ्या सत्ते ॥३॥**

**नामा म्हणें काही न हाले साचार । 'प्रभू' तू निर्धार पांडुरंगा ॥४॥**

सत्ता ही देवाची सर्वात मोठी शक्ती आहे. 'वृक्षाचेही पान हाले ज्याची सत्ता । राहिली अहंता मग कोठे' ॥ 'सकळ सत्ता तया हाती । माझी कींव काकुळती ॥' तुवा केले रे अमृता । गोड त्याही तू परता । पाचा तत्त्वांचा जनिता । सकळ सत्तानायक' ॥ 'जेणे हे विश्व निर्मिले । महर्षी देवा संस्थापिले । एकविस स्वर्गाते धरिले । सत्ता मात्रे आपुल्या ॥' तु.म.

आपली तशी कोणावर सत्ता चालत नाही. पण हा मात्र सत्तानायक आहे. सर्व जगावर याची सत्ता आहे. कधी कधी हा आपणास पण सत्ता देतो. कारण आपण त्याची लेकरे आहोत. ज्याप्रमाणें एखादा बाप मुलाच्या स्वाधीन होतो.

**दृष्टांत :** एक न्यायाधीश रविवारी घरी होता. त्याची पत्नी म्हणाली, 'न्याय देण्याच्या कामापेक्षा मुलाला सांभाळणे फार अवघड असते. मी आज महिला मंडळाच्या सभेस जात आहे. आपण आजचा दिवस चार तास बाळूस सांभाळावे.' न्यायाधीश म्हणाले, 'काही हरकत नाही.' बाप व मुलगा घरी राहतात. चार वर्षाचा बाळू वडिलांना म्हणाला, 'बाबा मला घोडा पाहिजे.' वडील म्हणाले, 'काठीचा, लाकडाचा का प्लॅस्टिकचा घोडा हवा ?' बाळू म्हणाला 'तुम्ही घोडा व्हा. मी तुमच्या पाठीवर बसणार.' घरी कोण नव्हते. न्यायाधीश घोडा होण्यास तयार झाले. बाळूने वडिलांना घोडा करून संपूर्ण हॉलभर फिरविले. मुलाची आई घरी आली. न्यायाधीश म्हणाले, 'मी बाळूस न रडू देता नीट सांभाळले.' सोमवारी न्यायाधीश ऑफिसला निघाले. बाळूनी हट्ट धरला, 'मी तुमच्या ऑफिसला येणार.' साहेब नोकरास म्हणाले, 'बाळूला गाडीत बसव.' बाळू व न्यायाधिश ऑफिसात पोहोचले. न्यायदानाचे काम चालू झाले. बाळूस मधेच लहर आली. तो वडिलांना म्हणाला, 'मला आत्ता घोडा पाहिजे.' वडिल नोकरास म्हणाले, 'बाजारातून त्याला पाहिजे तसा घोडा आणून दे.' पण बाळू म्हणाला, 'बाबा मला बाजारातील घोडा नको. तुम्ही कालच्यासारखे घोडा व्हा.' हे ऐकल्याबरोबर न्यायाधिशांनी (वडिलांनी) बाळूच्या थोबाडीत मारली व नोकरास सांगितले, 'यास ताबडतोब घरी पोचव.' परमात्मा आपला पिता आहे. कधी कधी सत्ता आम्हास देतो पण सर्वकाळ सर्वांवर याचीच सत्ता असते. एवढा सत्तावान कोणीही नाही. सर्व ब्रह्मांडावर याची सत्ता असते.

जगामध्ये एवढा व्यापक कोणी नाही. ज्याच्या उदरात अनंत ब्रह्मांडे आहेत. 'अनंत ब्रह्मांडे

उदरी । हरी हा बालक नंदाघरी ॥' तु.म. ब्रह्मदेवाच्या कक्षेत येणाऱ्या एका भागास ब्रह्मांड म्हणतात. यापेक्षा याच्या एकेका केसामध्ये अनंत ब्रह्मांडे आहेत. 'अनंत ब्रह्मांडे । एके रोमी ऐसे धेंडे ॥' तु.म. आपल्या अंगावर जसे साडेतीन कोटी केस आहेत, तसे विराटाच्या अंगीपण साडेतीन कोटी केस आहेत. श्रीकृष्ण अवतारात देवाने तिघांना विश्वरूप दाखविले. १) अर्जुन २) यशोदा ३) गवळणी. यशोदेस दोन वेळा 'झलक' दाखविली.

१) माती खातांना चवदा भुवने दाखविली. 'मारावया तिने उगारिली काठी । भुवने त्या पोटी चवदा देखे ॥' तु.म. ज्ञानोबाराय पण हे सांगतात.

**मागां बाळपणी येणें श्रीपती । जैं एक वेळ खादली होती माती ।**
**तैं कोपोनियां हातीं । यशोदा धरिला ॥ ज्ञाने.११/१८२**

**मग भेणें भेणें जैसें । मुखीं झाडा द्यावयाचेनि मिसें ।**
**चवदाही भुवनें सावकाशें । दाविलीं तिये ॥ ज्ञाने.११/१८३**

२) गणपती पूजनाच्या वेळीसुद्धा तोंड उघडून श्रीकृष्णानी ब्रह्मांड दाखविले. 'सांग म्हणे माय येरू वासी तोंड । तव ते ब्रह्मांड देखे माजी ॥' तु.म. सामान्य लोकांना याची कल्पना येणे अवघड आहे. मी गोदरेजमध्ये कामास लागलो. प्रथम रजेवर गावी गेलो. गावातील एका माणसाने विचारले, 'गोदरेज शेठ किती श्रीमंत आहेत ?' १९७२ मध्ये आमच्या तालुक्यात वारंगे शेठ श्रीमंत होते. त्यांचे दोन ट्रक होते. त्या माणसाने विचारले, 'गोदरेज शेठ वारंगे एवढे श्रीमंत आहेत का ?' मी म्हणालो, 'गोदरेजशेठचे नोकर वारंगेपेक्षा श्रीमंत आहेत.' त्यास मी सांगितलेले पटले नाही. तो म्हणाला, 'ही थाप आहे.' जे बोचक्यातील कपडे काढून कधीतरी तालुक्याच्या गावी जातात, त्यांना जिल्हा, राज्याची राजधानी काय कळणार ? दिल्ली तो बहुत दूर है । डबक्यातील बेडकास सागराची काय कल्पना असणार ? 'बसणे थिल्लरी । बेडूक सागरा धिक्कारी ॥' तु.म.

हा व्यापक आहेच, पण याच्यासारखा गुणवान कोणी नाही. सर्व गुणांनी सर्वश्रेष्ठ हाच आहे. सकळ गुणे संपन्न । एक देवाचे लक्षण ॥१॥ वरकड कोठे काही । एक आहे एक नाही ॥२॥ षड्गुण ऐश्वर्य संपन्न । एक भगवंत जाण ॥३॥ तुका म्हणे जे जे बोला । तें तें साजे या विठ्ठला ॥४॥ याचे 'गुण' वेगळ्या कोटीत लिहिले आहेत. 'एवढा' गुणसंपन्न हाच आहे. हा गुणवान आहेच, पण जगामध्ये याच्यासारखा सुंदर कुणीही नाही. किंबहुना जगामध्ये जे सर्व सौंदर्य आहे, ते यापासून निर्माण होते. 'त्रिलोकीचे बरवेपण । भुलोनि कृष्णापाशी आले जाण । ना कृष्णलेशें बरवेपण । शोभे संपूर्ण तिहीं लोकी ॥' भाग.१/४३ जगात पुरुषांमध्ये सुंदर 'मदन' आहे व स्त्रियांमध्ये 'लक्ष्मी'. पण हे दोघेही श्रीकृष्णाच्या सौंदर्यास भुलले. 'श्रीकृष्ण सौंदर्यापुढे । भुलोनि लक्ष्मी झाली वेडे । मदन पोटा आले बापुडें । तेथे कोणीकडे इंद्र चंद्र ॥' भाग.२/४१ एवढा सुंदर हाच आहे. विश्वात याच्यासारखा

शक्तिवान कोणीही नाही. कर्तुम्, अकर्तुम्, अन्यथाकर्तुम् या सर्व शक्ति याच्याकडे कायम वास्तव्य करतात. वयाच्या सहाव्या दिवशी पुतनेचा वध श्रीकृष्णाने केला. ''मारिले दैत्य गाढे । ज्याचे पुराणी पवाडे ॥'' तु.म. फक्त करंगळीवर गोवर्धन पर्वत उचलून धरिला. सर्वांमध्ये एवढा ताकदवान कोणी नाही. हे सर्व असून याच्यासारखा दयाळू कोणी नाही. पुतना राक्षसीण श्रीकृष्णास स्तनात विष भरून मारण्याकरिता आली. पण श्रीकृष्णांनी आपल्या आईपेक्षा तिला चांगली गती दिली. 'तुका म्हणे तुज ऐसे जी दयाळ । धुंडिता सकळ नाही आम्हा ॥'

तात्पर्य - सत्तेत, व्यापकपणात, गुणात, शक्तीत, सौंदर्यात, दयाळूपणात याच्यासारखा एवढाच आहे. 'हरिसे कोई नही बडा । दिवाने क्यूं गफलतमें पडा' ॥कबिर॥ हा निरपेक्ष, निरूपाधिक, निर्निमित्त, अनंत मोठा आहे.

१) **निरपेक्ष मोठा -** याच्या मोठेपणाकरिता कोणाची अपेक्षा नाही. घरांत मोठा भाऊ, दादा असतो. पण लहान भावाच्या अपेक्षेने. रात्री अंधारात झीरोचा बल्ब म्हणतो मी काय कमी आहे कां ? पण त्या पुढे ४० व्होल्टेजचा बल्ब लावला तर तो कमी दिसतो. ४०च्या पुढे ट्यूबलाईट लावली तर पहिला बल्ब फिका पडतो. ट्यूबलाईटच्या पुढे हॅलोजन बल्ब लावला तर ट्यूब फिकी पडते. पण सूर्याच्या समोर सर्व फिके पडतात. 'दीपदीपिका शशी तारा । होतू कां कोटीवरी रे । परी न सरे निशी नुगवे दिवसु । दिनकर नाथु जयापरी रे ॥' ज्ञान.

**ना तरी भानू हा तेजें । नापेक्षी जेवी विरजें ।**
**कां सिंहें न पाहिजे । जावळिया ॥ ज्ञाने.१८/८५६**

सूर्य हा प्रकाशाच्या बाबतीत कोणाची अपेक्षा करीत नाही. किंवा सिंह जसा शिकारीच्या बाबतीत सोबतीची अपेक्षा करीत नाही. तद्वत परमात्मा निरपेक्ष मोठा आहे.

२) **निरूपाधिक मोठा -** काही उपाधिने मोठे असतात. जोपर्यंत खुर्ची, सत्ता असते तोपर्यंत सर्व मान देतात, सत्ता गेली की चपराशीसुद्धा नमस्कार करीत नाही. सेवानिवृत्त होणारे अधिकारी, बाजारात आले तर त्यांना भाजीवालीपण मान देत नाही. पण परमात्मा निरूपाधिक मोठा आहे. 'उपाधी वेगळे तुम्ही निर्विकार । काहींच संसार तुम्हा नाही ॥' तु.म.

३) **निर्निमित्त मोठे -** काही जण निमित्ताने मोठे असतात. जसे सभेपुरते अध्यक्ष. सभा संपल्यानंतर त्यांना कोणी विचारीत नाही. यात्रेत ज्याच्या हातात मूर्ती असते त्याला नमस्कार करतात. यात्रा संपल्यानंतर कोणीही विचारीत नाहीत. पण परमात्मा कोणत्याही निमित्ताशिवाय मोठा आहे.

४) **अनंत मोठा -** प्रत्येकाच्या मोठेपणास काळाची, वयाची सीमा आहे. पण देवाच्या मोठेपणास अंत नाही. म्हणून हा अनंत मोठा आहे. 'एवढा' असणारा प्रभू मात्र एका भावामुळे आपलासा होतो.

**जया देवाची पाहतां थोरी । विश्व परमाणुही दशा न धरी ।**
**तो भावाचिये सरोभरी । नव्हेचि काई ॥ ज्ञाने.१६/३८**

परमात्मा एवढा मोठा आहे. परमाणूपेक्षा लहान, आकाशापेक्षा मोठा तो भक्तांच्या भावासारखा होत नाही का ? तर होतो. भक्तांच्या हृदयात वास्तव्य करतो. 'एवढा प्रभू भावे । तेणे संपुष्टी रहावे ॥' तु.म.

★★★★★

## (१२) बोलणे

माणसाची पात्रता, मानस, देश बोलण्यावरून समजते.

**आचारः कुलम् आख्याति, देशं आख्याति भाषणम् ।**
**संभ्रमः स्नेहम् आख्याति वपुराख्याति भोजनम् ॥ सुभा.**

**अर्थ :** आचरणावरून कुळ समजते. भाषेवरून देश समजतो (जळगावकर, जुन्नर, कोल्हापूर, कोकणी, मद्रासी, गुजराथी, कानडी, उत्तर प्रदेशाचे) अंतःकरणात किती प्रेम आहे हे आदर सत्कारावरून व काय खातो हे शरीरावरून समजते. कोल्हापूरची म्हण आहे 'चारू तेव्हा वारू' (घोडा). मनात काय आहे हेसुद्धा बोलण्यावरून समजते.

**तरी जाणिजे झाड फुलें । कां मानस जाणिजे बोलें ।**
**भोगें जाणिजे केलें । पूर्वजन्मीचें ॥ ज्ञाने.१७/७४**

पात्रता पण बोलण्यावरून समजते. बोलण्याचे सहा प्रकार आहेत.

१) **नरक स्पर्श** - काही लोक अतिशय घाणेरडे बोलतात. शिव्या देणे वगैरे. 'कुशब्दाची घाणी । अमंगळविली वाणी ॥' 'झाली क्रोधासवे भेटी । तोंडावाटे नरक लोटी ॥' तु.म. श्रीकृष्णास त्रिभुवनातील चांगल्या लोकांच्यासमोर शिशुपालाने शंभर शिव्या दिल्या होत्या. नंतर देवाने त्याचे शिर सुदर्शन चक्राने उडविले.

**हां गा राजसूययागाचिया सभासदीं । देखतां त्रिभुवनाची मांदी ।**
**कैसा शतधा दुर्वादीं । निस्तेजिलासी ॥ ज्ञाने.११/१०१**

२) **इंद्रिय स्पर्श** - आपल्या शरीराकरिता जे लागते ते मागणे यास इंद्रिय स्पर्श म्हणतात. उदा. पाणी द्या, जेवायला वाढा, टि.व्ही. लावा वगैरे.

३) **मन स्पर्श** - मनात येईल तसे वेड्यासारखे बोलणे. ही लक्षणे विकृत मनाची असतात.

४) **बुद्धी स्पर्श -** विचार करून, बुद्धी वापरून बोलणे यास बुद्धी स्पर्श म्हणतात. असे म्हटले जाते सीता व द्रौपदीने बुद्धी न वापरता वाक्य उच्चारले, त्यामुळे रामायण, महाभारत घडले.

५) **चित्त स्पर्श -** फक्त विचार करून नाही तर सारासार विचार करून बोलणे यास चित्त स्पर्श म्हणतात.

६) **परतत्त्व स्पर्श -** देवाशिवाय न बोलणे यास परतत्त्व स्पर्श म्हणतात.

**वाचे बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्व ।**
**रसिकत्वीं परतत्व । स्पर्शु जैसा ॥ ज्ञाने.१८/३४७**

संत मात्र देवाशिवाय बोलतच नाहीत. 'बोलणेचि नाही । आता देवाविन काही ॥' तु.म. 'सर्व भावे त्यांचे देव भांडवल । आणिक ते बोल न बोलती ॥' तु.म. यात सात प्रकार पडतात.

१) जनाशी बोलताना देवाबद्दल -

'ऐक रे जना । तुझ्या स्वहिताच्या रवुणा । पंढरीचा राणा । मनामाजी स्मरावा ॥' तु.म.

२) बायकोशी बोलताना देवाबद्दल -

'देव पहावया करी वो सायास । न धरी हे आस नाशिवंत ॥' तु.म.

३) मनाशी बोलताना देवाबद्दल -

'मना तेथे धांव घेई । राहे विठोबाचे पायी ॥' तु.म.

४) भक्ताशी बोलताना देवाबद्दल -

'आईका जी तुम्ही भक्त भागवत । कराल ते हित सत्य करा ॥' तु.म.

५) पक्षाशी बोलताना देवाबद्दल -

'उड उड रे काऊ तुझे सोन्यान मढीन पाऊ । पाहुणे पंढरीराऊ घरा कै येती ॥' ज्ञान.

६) भूतासी बोलताना देवाबद्दल -

तुलसीदासांना भूत प्रसन्न झाले. तुलसीदास म्हणाले, 'रामाची भेट करून देशील कां ?'

७) देवाशी बोलतानापण देवाबद्दल -

'देवा आता ऐसा करी उपकार । देहाचा विसर पाडी मज ॥', 'देवा ऐके हे विनंती । मज नको रे हे मुक्ती । तया इच्छा गती । हेचिं सुख आगळे ॥' तु.म. अशी अनेक प्रमाणे देता येतील. संत कोणाशीही बोलताना देवाबद्दलच बोलतात. आमचा अनुभव आहे, कुठेही गेलो तर संसाराबद्दलच बोलतात. याचे कारण आमच्या आत संसारच भरला आहे. तेच बाहेर येते. पोटातले ओठात.

**दृष्टांत :** 'तोल तोलकर बोल । वाणीमें रस घोल ॥' ब्रिटनची राणी व्हिक्टोरिया व पती एडवर्ड यांचे जोरात भांडण झाले. एडवर्ड रुसून खोलीत बसले. दरवाजा बंद केला. राणीने दरवाजा ठोठावला. एडवर्डने विचारले, 'कोण आहे ?' ती अभिमानाने म्हणाली, 'मी व्हिक्टोरिया राणी आहे.' दरवाजा उघडला नाही. दोन तीन वेळा हा शब्दप्रयोग झाला. पण दरवाजा उघडला नाही. शेवटी राणी म्हणाली, 'मी आपली प्रिय पत्नी आहे.' मग दरवाजा उघडला व भांडण मिटले.

**कथा : बोलामुळे तोटा** - विंध्य पर्वताच्या एका गुहेत महात्मा तपश्चर्या करत होते. ते नेहमी मौनातच असत. त्यांना अनेक सिद्धी प्राप्त होत्या. त्यांची सेवा करण्यास दोन शिष्य होते. ते खाली रहात. महात्मा एकटेच वरच्या गुहेत रहायचे. बरेच लोक दर्शन घेऊन जात. पण बाबा बोलत नसत. एकदा राजा-राणी महात्म्यांच्या दर्शनासाठी आले. त्यांना मुल-बाळ नव्हते. दुःखी होते. पण महात्मा त्यांच्याशीसुद्धा काहीच बोलले नाहीत. राजा नाराज झाला. पण राणी मात्र नेहमी महात्म्यांच्या दर्शनास येऊ लागली. पाऊस-ऊन-वारा याची तमा न बाळगता राणी सतत त्यांना भेटत होती. तिची आतुरता, सेवा पाहून एक दिवस महात्म्यांनी आपले मौन सोडून तिला विचारले, 'आपली काय इच्छा आहे ?' ती म्हणाली, 'कूस पवित्र व्हावी' महात्मा म्हणाले, ' जा, मुलगा होईल.' महात्म्यांनी अंतर्ज्ञानाने पाहिले, राजा-राणीच्या नशिबी अपत्यसुख नाही. त्यांनी स्वतःचा देह सोडला. शिष्यांनी त्याचे दहन केले. महात्म्यांनी राणीच्या पोटी जन्म घेतला, मुलगा झाला. सर्वत्र आनंदोत्सव साजरा झाला. मात्र मुलगा ८ वर्षाचा झाला तरी त्याला बोलता येत नव्हते, बाकी सर्व काही त्याला करता येत होते. राजाने जाहीर केले, 'माझ्या मुलास जो बोलके करील त्यास अर्धे राज्य दिले जाईल'. पण कोणीही त्याला बोलके करू शकले नाही. एकदा प्रधानाचा मुलगा व राजाचा मुलगा शिकारीस गेले होते. शिकार मिळाली नाही. परत येताना एका झुडुपात हरीण लपून बसले होते. हरणानी आवाज केला. प्रधानाच्या मुलाने बाण मारला व हरीण मेले. राजाचा मुलगा पटकन म्हणाला, 'अरेच्या ! मी बोलून फसलो, तू तर मेलास'. प्रधानाचा मुलगा राजवाड्यात आला व राजास म्हणाला, याला मी बोलके करतो. खूप विनंती करून मुलगा बोलला नाही. शेवटी राजाने जाहीर केले, प्रधानाचा मुलगा अर्ध्या राज्याच्या अपेक्षेने खोटे बोलला. यास फाशी द्यावी. फाशीचा दिवस उजाडला. राजाच्या मुलाला राहवले नाही. त्याने सर्वांसमोर तोंड उघडले व सांगितले, 'मी बोलू शकतो. यास फाशी देऊ नका. मी मागच्या जन्मी मौनी महात्मा होतो. पण राणीच्या सेवेवर प्रसन्न होऊन मी माझे मौन सोडले. राजा-राणीच्या नशिबात मुल-बाळ नसल्यामुळे मी देहत्याग केला व आपल्या पोटी जन्म घेतला. मला इथे रहायचे नाही.' सर्व राज्याचा त्याग करून मुलगा जंगलात निघून गेला.

तात्पर्य - मौनव्रत फार चांगले. फक्त जरूरीपुरतेच बोलावे.

सहा वेळा मौन धरावे, बोलू नये.

**१) उत्सर्गे मैथुने चैव प्रस्ताणे दन्त धावने ।**
**श्राद्धे भोजनकाले च षट्सु मौनं समाचरेत ॥ सुभा.**

**अर्थ :** शौच, लघवी करताना, मैथुनाच्या वेळी, रक्ताभिसरण होताना, दात घासताना, श्राद्धाच्या वेळी व भोजन करताना मौन पाळावे.

**२) न नर्मयुक्तं वचनं हिनस्ति न स्त्रीषु राजन न विवाहकाले ।**
**प्राणात्यये सर्वधनापहारे पञ्चानृतान्या हुरपातकानि ॥ सुभा.**

**अर्थ :** मस्करीत, बायकोशी, लग्न जमत असेल, एखाद्याचा प्राण जात असेल, चोर सर्व धन घेऊन जात असेल तर खोटे बोलले तरी चालेल असे म्हणतात. पण तुकोबारायांना हे मान्य नाही. 'असत्य वचन होता सर्व जोडी । जरी लग्नघडी परउपकार ॥' तु.म.

**कथा -** एका गांवात दोन भाऊ राहत होते. वीस एकर बागायती जमीन होती. दोघेही शिकलेले होते. मोठा मॅट्रिक झाला होता. दुसरा पदवीधर होता. शेतीचे उत्पन्न चांगले असल्यामुळे नोकरीची दोघांनाही गरज नव्हती. मोठ्या भावाचे लग्न झाले होते. छोट्या भावाचे लग्न मात्र काही अडथळ्यांमुळे दहा वर्षांनी झाले. दुसरी नवी नवरी शिकलेली होती. थोडी स्टँडर्ड व मॉडर्न होती. लग्न झाल्यानंतर चार दिवसांनी लहान भावाने शेतात नांगर धरला होता. नवी नवरी सकाळी ११ वाजता जेवण घेऊन शेतात निघाली होती. शेतात जाताना एका आंब्याच्या झाडाखाली एक म्हातारा बसला होता. त्याने त्या मुलीस विचारले, 'तू जाधवाची सून कां ?' ती होय म्हणाली. म्हाताऱ्याने तिला थांबवले व म्हणाला, 'गळ्यात फक्त मंगळसूत्रच दिसते आहे.' तिने सांगितले, 'फक्त चार तोळ्याचे मंगळसूत्रच लग्नात घातले आहे.' म्हातारा म्हणाला, 'मी ऐकतो आहे तुझ्या जावेच्या गळ्यात शंभर तोळे सोने असते.' ती शेतात गेली. जेवणाची पाटी रागानेच आपटली व नवऱ्याला म्हणाली, 'तुम्हास काही 'डोके' वगैरे आहे की नाही ?' तो म्हणाला, 'मी पदवीधर आहे ते डोक्याशिवाय का ?' ती म्हणाली, 'व्यवहारातील तुम्हाला काही कळत नाही असे दिसते.' तो म्हणाला, 'चार दिवसात माझा व्यवहार, डोके तुला कसे काय समजले ?' पत्नी म्हणाली, 'मी ऐकते आहे, तुमच्या वहिनीच्या गळ्यात शंभर तोळे सोने आहे व माझ्या गळ्यात फक्त चारच तोळे ? केवढा हा फरक ?' तो रागातच म्हणाला, 'वहिनी दहा वर्षांपूर्वी घरात आली आहे. माझा आईप्रमाणे सांभाळ केला आहे. आमची आई लवकर गेली पण वहिनींने आईची आठवण होऊ दिली नाही. शेतीत फायदा होत होता. त्यातील गरज भागून उरेल त्याचे तिला सोने खरेदी केले आहे. आता आम्ही भावांनी ठरविले आहे, येथून पुढे शेतीत फायदा झाला तर तुला दागिने करायचे. काल येऊन तू वहिनीची बरोबरी करू नकोस. 'सिनिऑरिटी' वगैरे काही आहे की नाही ? जर हे तुला पटत नसेल तर तू खुशाल आपल्या बापाच्या घरी जाऊ शकतेस.' नव्या नवरीस हे पटले. ती म्हणाली, 'क्षमा करा, आपले विचार योग्य आहेत.'

नवरा म्हणाला, 'पण हे तुझ्या डोक्यात कोणी घातले ?' ती म्हणाली, 'मागच्या आंब्याच्या

झाडाखाली बसलेला म्हातारा मला बोलला.' त्या तरुणास राग आला व लगेच त्या म्हाताऱ्याजवळ गेला व म्हणाला, 'आमच्या घरात भांडणे लावता का ?' म्हातारा म्हणाला, 'मी आपला 'सहज' बोललो.' तरुण म्हणाला, 'असे सहजच बोला व दुसऱ्याच्या घरास आग लावून द्या.'

★★★★★

## (१३) मनशुद्धी

मनशुद्धीशिवाय देवाची प्राप्ती नाही. चोखट मनात देव वास्तव्य करतो.

**तरी जयांचे चोखटे मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी ।**
**जयां निजेलियातें उपासी । वैराग्य गा ॥ ज्ञाने.९ /१८८**

'निर्मल मन जन सो मोहि पावा । मोहि कपट छल छिद्र न भावा ॥' तुलसी. निर्मल मन झालेला माणूस माझी प्राप्ती करून घेतो. एका संहितेत मनाचे सहा मळ सांगितले आहेत. हे गेल्याशिवाय मन शुद्ध होत नाही

१) **राग कालुष्य -** संसारात मिळालेले सुख कायम रहावे ही आसक्ति मनात सतत रहाणे यास राग कालुष्य म्हणतात. (जीवनातली ही घडी अशीच राहू दे. पण रहात नाही. गोकुळासारख्या कुटुंबात एखादा कंस निर्माण होतो व सर्व घडी विस्कटते.)

२) **ईर्षा कालुष्य -** दुसऱ्याची उन्नती, श्रीमंती, विकास, पगार पाहून मनात जलन निर्माण होणे यास ईर्षा कालुष्य म्हणतात.

३) **अपकार कालुष्य -** दुसऱ्यावर अपकार करण्याची इच्छा, वाईट चिंतणे, दुसऱ्यास दुःख देण्याची इच्छा यास अपकार कालुष्य म्हणतात.

४) **असूया कालुष्य -** दुसऱ्याच्या गुणात दोष पाहण्याची मनोवृत्ती. दुसऱ्यास आपल्या थर्मामीटरने मापणे. 'मोठा हरिश्चंद्र' पडला असा टोमणा मारणे यास असूया कालुष्य म्हणतात.

५) **द्वेष कालुष्य -** आपणास त्रास देणारा, शिव्या देणारा, अपमान करणारा, बदनाम करणारा याकरिता मनात द्वेष असणे.

६) **अमर्ष कालुष्य -** आपली अवज्ञा, तिरस्कार, अपमान करणाऱ्याविषयी क्रोध निर्माण होणे यास अमर्ष कालुष्य म्हणतात.

हे कालुष्य म्हणजे मळ मनातून गेल्याशिवाय देवाविषयी भक्ती निर्माण होत नाही.

तुकोबाराय म्हणतात हे मळ आम्ही घालविले. 'महामळे मन होते जे गादले । शुद्ध चोखाळले स्फटिक जैसे ॥'

मनाची स्थिरता संसारिक पदार्थाने नाही तर साधनेने होते.

**कथा :** एका राजाने एकदा जाहीर केले, 'माझ्या शेळीचे जो पोट भरील त्यास वीस हजार रु. बक्षीस दिले जाईल. पण संध्याकाळी शेळीचे पोट भरले की नाही याची परीक्षा मी घेणार !'. सर्वांना वाटले शेळीचे पोट भरणे सोपे आहे. एकाने शेळी जंगलात नेली. दिवसभर हिरवे गवत चारले. पोट तुडुंब भरले. त्यास वाटले, आपणास वीस हजार रुपये मिळणार. संध्याकाळी शेळी राजवाड्यात आणली. राजाने शेळीची परीक्षा पाहण्याकरिता गवताची हिरवी पेंढी समोर धरल्याबरोबर शेळी गवतावर तुटून पडली. राजा म्हणाला, 'शेळीचे पोट भरलेले नाही. आपण नापास झालात'. दुसऱ्या दिवशी एका युवकाने हाच प्रयत्न केला पण युवक परिक्षेत नापास झाला. एकाने विचार केला, शेळी आधुनिक दिसते (स्टँडर्ड आणि मॉडर्न). तिला गोदरेज अथवा हिंदुस्थान लिव्हरचे पशूखाद्य दिवसभर घालू. तसे केले पण संध्याकाळी पशूखाद्य खाऊनसुद्धा शेळी गवतावर ताव मारू लागली. हा सुद्धा नापास झाला. ज्ञानोबारायांनी म्हटले आहे, 'शेळीसारखे कोण चरत नाही. वाऱ्यासारखे कोण धावत नाही व आगीसारखे कोण जाळत नाही.

**जैसे चरणें शेळियेचे । कां धावणें वारियाचें ।**
**जाळणें आगीचें । भलतेउतें ॥ ज्ञाने.१६/२८८**

एका हुशार युवकाने शेळीचा सर्व अभ्यास केला व राजास सांगितले 'मी शेळी घेऊन जातो आहे. आपण वीस हजार रुपये संध्याकाळी तयार ठेवा'. राजा फक्त हसला. युवक शेळी घेऊन गेला व हिरव्या गवताची पेंढी पुढे ठेवली. शेळी गवत खाणार इतक्यात एक काठीचा फटका तोंडावर मारला. शेळी घाबरली. परत पेंढी दाखविली. खाण्याचा प्रयत्न केला, परत दुसरा फटका मारला. आता मात्र शेळी पूर्ण घाबरली. संध्याकाळी येताना पेंढी दाखविली, पण शेळी पेंढी पाहून पळू लागली. युवकाने संध्याकाळी शेळी राजवाड्यात आणली. शेळीचे पोट आत गेले होते. राजा युवकास म्हणाला, 'शेळी चारली आहे कां ?' युवक म्हणाला, 'दिवसभर चारली आहे. परीक्षा घ्या'. राजाने नेहमीप्रमाणे गवताची हिरवी पेंढी काढली. पण पेंढी पाहून शेळीने तोंड फिरविले व पळू लागली. युवक म्हणाला, ''वीस हजार रुपये द्या''. राजाने त्याला वीस हजार रुपये दिले. हा दृष्टांत झाला. मनरूपी शेळीचे पण कितीही संपत्ती मिळाली तरी तृप्ती होत नाही. तुकोबाराय सांगतात, 'धना गुंतले चित्त माझे मुरारी । मन हिंडवी घेऊनि दारोदारी । मन हिंडता न पुरे यासि काही । मही ठेंगणी परि ते तृप्ती नाही' ॥ मग या मनास काय करावे तर ज्ञानाचे, स्वाध्यायाचे, पायी वारीचे, अभ्यासाचे फटके मारल्याशिवाय हे ताळ्यावर येत नाही. तुकोबाराय म्हणतात, चार पायांचा मेंढा मारण्यापेक्षा मनरूपी मेंढा आम्ही मारला. 'मन मारोनि मेंढा मुठी । आशा मनसा तृष्णा सुटी । भक्तिभाव नैवेद्य ताटी ।

भरोनि केला हाकारा' ॥ भक्तिने मनाचा मळ-दोष जातो. ज्ञानाने आवरण दोष जातो व वैराग्याने विक्षेप दोष जातो. मन निर्मळ होते. मन मोकळे होते व देव त्यात वास करतो. 'तुका म्हणे मोकळे मन । नारायण भोगासी ॥'

**मनाचा परिणाम तनावर**

**दृष्टांत :** अमेरिकेत एक प्रयोग झाला. एका माणसास फाशीची शिक्षा झाली. काही वैज्ञानिक त्याच्याकडे गेले व म्हणाले, 'आपणास फाशीची शिक्षा झालीच आहे. आम्हास तुमच्यावर प्रयोग करायचा आहे.' तो गृहस्थ म्हणाला, 'ठीक आहे. पण कोर्टाची परवानगी घ्यावी लागेल.' वैज्ञानिक म्हणाले, 'ती आम्ही घेतो.' कैदी म्हणाला, 'आपण कोणता प्रयोग करणार आहात ते कळू द्या.' वैज्ञानिक एक दिवस एक साप (अस्सल नाग) व घोडा घेऊन त्याच्याकडे गेले आणि म्हणाले, 'आपण प्रयोग पहावा.' त्याच्या समोर नाग घोड्यावर सोडला. नागाने घोड्यास दंश केला. सर्वांच्या समोर घोडा तडफडत मेला. वैज्ञानिकांनी सांगितले, 'फाशीच्या दिवशी आम्ही हाच नाग आपणावर सोडणार आहोत.' तो म्हणाला, 'ठीक आहे. मी असाही मरणार तसाही मरणार. आपला प्रयोग तरी यशस्वी होऊ दे.' फाशीचा दिवस उजाडला. त्या माणसास तोंडावर काळे फडके बांधून मैदानात आणले. वैज्ञानिकानी त्याच्यावर नाग सोडण्याऐवजी एक उंदीर सोडला. उंदराने त्या माणसाच्या पायाचा चावा घेतला. त्या माणसाच्या मनात आले, ज्याच्या दंशामुळे एवढा सशक्त घोडा मेला, मी कसा जगणार ? परिणाम असा झाला, सर्वांसमोर त्या गुन्हेगाराने प्राण सोडला. वैज्ञानिकांचा प्रयोग यशस्वी झाला.

तात्पर्य - एखादी गोष्ट मनावर घेतली तर त्याचा तनावर परिणाम होऊ शकतो. जगद्‌गुरू तुकोबारायांनी ही गोष्ट साडेतीनशे वर्षांपूर्वीच नोंद करून ठेवली आहे.

**गोविंद गोविंद । मना लागलीया छंद ॥१॥**

**मग गोविंद ते काया । भेद नाही देवा तया ॥२॥**

अथवा

**ध्यानी ध्याता पंढरीराया । मनासहित पालटे काया ॥**

**कथा -** लक्ष्मणास रावणाची शक्ती लागल्यानंतर सुषेण वैद्य सांगतात द्रोणागिरी पर्वतावरील झाडांच्या वल्लीच लक्ष्मणाचा प्राण वाचवू शकतात. राम हनुमंताला आज्ञा देताच, हनुमंत उड्डाण करून पर्वताकडे जातात. वाटेत कालनेमीचा वध करून द्रोणागिरी पर्वतच उचलून आणतात. नंदीग्रामवर भरत रामस्मरण करीत बसलेले असताना त्यांना एक वानर आकाशातून पर्वत घेऊन चालले आहे असे दिसते. भरत धनुष्यबाण लावून हनुमंतास खाली खेचतात. हनुमंतांचा अभिमान थोडा खाली येतो. त्यांस भ्रम होतो लंकेहून राम इकडे कसे आले ? हनुमान बरेच तोंडसुख घेतात. 'आम्ही १८

पद्म वानर असता आपण घाबरलात कसे ?' भरत सर्व ऐकून घेतात व विचारतात, 'मला राम समजता की काय ? मी राम नाही. रामाचा लहान भाऊ भरत आहे.' हनुमंत म्हणतात 'आपण हुबेहुब रामासारखेच दिसता याचे कारण काय ?' भरत म्हणातात ' का दिसणार नाही ? माझ्या चित्तात, वाचेत, दृष्टीत राम आहे. कानाने रामाचीच कीर्ति ऐकतो. मनासहित सर्व इंद्रिये रामरूप झाली आहेत. मग मी रामासारखा का दिसणार नाही ?'

**चित्ते मुकुंदो वदने मुकुंदो दृष्टौ मुकुंदः श्रवणे मुकुंदः ।**
**एवं सदा सर्वगतो मुकुंदस्ते मानवाः किं न मुकुंदतुल्याः ॥ भा.रा.युद्धकांड/अ.४७/१**

तुकोबाराय दृष्टांत देतात 'तुका म्हणे आळी । जीवे नुरेचि वेगळी' ॥

माणसानी सर्वांगांनी देवाची सेवा केल्यास देह देव होतो. 'ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनी । भाग्यतरी ऋणी देव ऐसा ॥' तु.म. 'कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ॥' तु.म.

मनाचे तीन प्रकार

१) **लुब्ध मन -** सतत पैशावर डोळा

२) **मुग्ध मन -** सतत विषयावर लक्ष

३) **बुद्ध मन -** सतत सत्विचारावर लक्ष

**कथा :** एका पतिव्रतेसमोर एक वेश्या राहत होती. पतिव्रता स्त्री मात्र सतत त्या वेश्येची निंदा करीत असे. मात्र वेश्या पाहात होती या बाईचा नवरा कुरूप, गुणहिन, निर्धन, व्यसनाधीन असून ही स्त्री नवऱ्याची उत्तम सेवा करीत आहे. पतिव्रतेबद्दल वेश्येच्या मनात अतिशय आदर होता.

काही दिवसांनी पतिव्रता व वेश्या वारल्या. मात्र पतिव्रतेपेक्षा वेश्येस उंच जागा मिळाली. पतिव्रता यमराजास म्हणाली, 'मी पतिव्रता असून, या माझ्या समोर राहणाऱ्या वेश्येस माझ्यापेक्षा उंच जागा कशी ?' यमराज म्हणाले, 'परिस्थितीला वश होऊन ही बाई वेश्या व्यवसाय करीत होती पण हिच्या मनात तुझ्याबद्दल अतिशय आदर होता. ही नेहमी मनातून तुझी स्तुती करीत असे. तू नवऱ्याची सेवा तनाने करीत होतीस मात्र मनाने सतत वेश्येची निंदा करीत होतीस. स्वर्गात तनापेक्षा मनाची किंमत जास्त आहे. त्यामुळे तुझ्यापेक्षा तिला वरची जागा मिळाली.'

क्रियेपेक्षा भावना श्रेष्ठ आहे. स्वर्गाच्या कायद्याप्रमाणे पापपुण्याची गणना मनावर अवलंबून आहे.

मनात नेहमी देवाचे मनन असावे.



# (१४) संरक्षण

परमात्मा आपल्या भक्तांचे संकटातून संरक्षण करतो. हे त्याचे ब्रीदच आहे. भक्त प्रल्हादास मारण्याकरिता त्याच्याच पित्याने अकरा प्रयोग केले. १) सर्व सैन्य एकट्या प्रल्हादावर सोडले. २) विषारी साप अंगावर सोडला. ३) मदोन्मत्त हत्तीच्या पायाखाली तुडविण्याचा प्रयत्न केला. ४) लाकडाच्या आगीत टाकले. ५) अन्नात विष घालून मारण्याचा प्रयत्न केला. ६) हिरण्यकश्यपूचा पुरोहित षंडामर्क याने अग्निशिखासमान कृत्या निर्माण करून वक्षस्थलावर जोरात प्रहार केला, पण ती शिखा उलटली. ७) पर्वतावरून खाली टाकले. ८) प्रल्हादास भीती दाखविण्याकरिता मायावी शम्बरासुराने हजारो माया निर्माण केल्या. ९) वायूस भक्षण करण्यास सांगितले. १०) हिरण्यकश्यपूने प्रल्हादास मुरगळले, छातीत लत्ताप्रहार केला. ११) नागपाशाने बांधून समुद्रात टाकले व वरून पर्वत टाकले. पण या सर्व प्रकारातून देवाने प्रल्हादाचे रक्षण केले. शेवटी नृसिंह अवतार घेऊन हिरण्यकश्यपूस ठार मारले. कारण प्रल्हाद देवाचे सतत स्मरण करीत होता.

**प्रल्हादाकारणे स्तंभी अवतार केला । विदारूनि दैत्य प्रेम पान्हा पाजीला ॥ तु.म.**

**प्रल्हादासी पिता करितो जाचणी । परि तो स्मरे मनी नारायण ॥ तु.म.**

श्रीकृष्णाने पांडवांना सर्व संकटातून वाचविले कारण सुखात अथवा दुःखात पांडव देवास विसरत नव्हते. 'पहा ते पांडव अखंड वनवासी । परि त्या देवासी आठविती ॥' तु.म. महाभारतीय युद्धात ३९,३६,६०० सैन्य होते. पण जिवंत फक्त दहाच राहिले. पाच पांडव, श्रीकृष्ण, सात्यकी व कौरवांच्या बाजूचे तिघेजण - कृतवर्मा, कृपाचार्य व अश्वत्थामा. यापैकी दोन चिरंजीव आहेत. देव म्हणाले माझ्या भक्तांचे रक्षण करणे माझे कर्तव्य आहे. 'देव तारी त्यास कोण मारी ?' व 'देव मारी त्यास कोण तारी ?' गजेंद्र हत्तीला नक्राने पाण्यात पकडले. हजारो वर्षे युद्ध चालू होते. सर्व नातेवाईकांनी मदत केली पण शेवटी सोडून गेले. 'गजेंद्र पशू आप्ते मोकलिला । तो तुज स्मरला पांडुरंगा ॥' तु.म. देवाने त्यास सोडविले.

**पाहें पां सावजें हातिरू धरिलें । तेणें तया काकुळती मातें स्मरिलें ।**
**कीं तयाचें पशुत्व वावो जाहलें । पावलिया मातें ॥ ज्ञाने.९/४४२.**

श्रीकृष्णाने द्रौपदीची भरसभेत वस्त्रावतार घेऊन लाज राखली. पांचालीची सून उत्तरेच्या गर्भावर, कौरवांचा चवथा सेनापती अश्वत्थामा याने पांडवांचे कुळ समूळ नाहीसे करण्याकरिता ब्रह्मास्त्र सोडले. उत्तरेने फक्त श्रीकृष्णांचा धावा केला. (रामसुखदास महाराज यांनी साधक संजीवनमध्ये महाभारतातील चार भक्त सांगितले आहेत. १) आर्त - उत्तरा २) अर्थार्थी - सुदामा ३) जिज्ञासू - उद्धव ४) ज्ञानी - गौळणी) देवाने उत्तरेच्या गर्भात सुदर्शन चक्राने ब्रह्मास्त्राचा नायनाट केला व परिक्षितीचे संरक्षण केले.

**द्रौण्यस्त्र विप्लुष्टमिदं मदङ्ग । सन्तानबीजं कुरुपांडवानाम् ।**
**जुगोप कुक्षिं गत आत्तचक्रो । मातुश्च मे यः शरणं गतायाः ॥ भा. १०/१/६**

**अर्थ :** परिक्षीती राजा शुकाचार्यांना सांगतात, द्रोणपुत्र अश्वत्थामा याने मला मारण्याकरिता गर्भाशयावर ब्रह्मास्त्र सोडले. कौरव व पांडव यांचे संतान, बीजरूपाने मी एकटाच उरला होतो. पण माझी आई श्रीकृष्णांस शरण गेली. श्रीकृष्णाने आईच्या उदरात जाऊन सुदर्शन चक्राने रक्षण केले.

साधकाने घराच्या बाहेर पडताना 'रामरक्षा' वाचून बाहेर पडावे. रामरक्षा हे कवच आहे. तुमच्या संरक्षणाची जबाबदारी रामावर पडते. कारण त्यामध्ये पायाच्या नखापासून डोक्याच्या केसापर्यंत रामाने रक्षण करावे असे आवाहन आहे. रक्षण करण्याकरिता देवास विनंती करावी.

**जले रक्षतु वराहः स्थले रक्षतु वामनः । अटव्यां नारसिंहश्च सर्वतः पातु केशवः ।। सुभा.**

**अर्थ :** जळात वराहाने, जमिनीवर वामनाने, जंगलात नरसिंहाने व सर्व ठिकाणी केशवाने माझे रक्षण करावे.

**न देवा दण्डमादाय रक्षन्ति पशुपालवत ।**
**यं तु रक्षतुमिछन्ति बुद्ध्यासंविभजन्तितम् ॥ सुभा.**

**अर्थ :** देव पशुसारखे हातात काठी घेऊन रक्षण करीत नाही. तर ज्याचे प्राण रक्षण करायचे त्यास अशी बुध्दी देतो की तो संकटाकडे जातच नाही. संकटात माणसांचे सात साथी असतात.

**तुलसी साथी विपत्तीके विद्या विनय विवेक ।**
**साहस सुकृत सत्यव्रत राम भरोसो एक ॥**

अर्थ सोपा आहे. अग्निपासून देवाने सहा भक्तांचे रक्षण केले.

**अग्नि जाळी तरी न जळती पांडव । हृदयी माधव म्हणोनिया ॥१॥**

**अग्नि जाळी तरी न जळती गोपाळ । हृदयी देवकीबाळ म्हणोनिया ॥२॥**

**अग्नि जाळी तरी न जळती हनुमंत । हृदयी सीताकांत म्हणोनिया ॥३॥**

**अग्नि जाळी तरी न जळती प्रल्हाद । हृदयी गोविंद म्हणोनिया ॥४॥**

**अग्नि जाळी तरी न जळती पै सीता । हृदयी रघुनाथा म्हणोनिया ॥५॥**

**लंकेसी उरले बिभिषणाचे घर । हृदयी सीतावर म्हणोनिया ॥६॥**

**नामा म्हणे तुम्ही स्मरावे गोविंदा । चुके भव बाधा संसाराची ॥७॥**

**कथा :** महाभारतीय युद्ध सुरू होणार होते. पण एका पक्षिणीची पिल्ले कुरूक्षेत्रावर होती.

सगळ्यांना ती घेऊन जाऊ शकत नव्हती. पक्षिणीने देवाचा धावा केला. युद्ध सुरू झाले पण एक हत्तीची मोठी घंटा त्या पिल्लांवर पडली. युद्ध अठरा दिवस चालले. पण सर्व पिल्ले वाचली.

**कथा :** एका झाडावर एक पक्षिण रहात होती. खोडात पिल्ले होती. पक्ष्यांना मारणारा पारधी आला. त्याने झाडावर ससाणा सोडला व खाली पक्ष्यांना मारण्याकरिता बाण घेऊन सज्ज झाला. पक्षिण संकटात सापडली. वर जावे तर ससाणा, खाली जावे तर पारधी, काय करावे ? तिने देवाचा धावा केला. पारधी बाण मारणार एवढ्यात देवाने सापाचे रूप घेतले व पारध्यास दंश केला. त्याचा बाण सुटला व नेमका ससाण्यास लागला. पारध्याच्या व ससाण्याच्या तावडीतून पक्षिण व तिची बाळे सुखरूप राहिली. 'विंधोनिया पारधी भूमिसी पाडिला । बाण तो लागला ससाण्याशी ॥' तु.म. (क्षेपक) काही माणसे म्हणतात आमच्या संरक्षणाकरिता पोलीस, कमांडो, बॉडीगार्ड ठेवू अथवा झेड सुरक्षेची योजना करू. हे सर्व ठीक आहे. यदाकदाचित् इहलोकांत या माणसांमुळे रक्षण होईल पण यमदूत आल्यानंतर कोण रक्षण करणार ? मरणाच्या वेळी कोणताच प्रयोग उपयोगी पडत नाही. 'लावण्य मान्यता विद्यावंत । सखे स्वजन पुत्र कलत्र । विषयभोग वयसा व्यर्थ । देहासहित मरणांती ॥' ज्ञान. यम आल्यानंतर तुमचे रूप, मान्यता, विद्या, मुले, नातेवाईक, विषयभोगाच्या वस्तू, वय, देह हे सर्व व्यर्थ होते. यमाच्या तावडीतून फक्त परमात्मा अथवा त्याचे भक्त, महात्मेच सोडवू शकतात. 'मैत्र केला महाबळी । कामा नये अंतकाळी ॥' तु.म. देव इथेही संरक्षण करतो व यमाच्या तावडीतून सोडवतो. 'देव आम्हा राखे राखे । घाली कळिकाळासी काखे ॥' तु.म. राखे शब्द दोन वेळा आहे. इहलौकिक व पारलौकिक संरक्षणाकरिता !

**कथा :** अकबर व बिरबल गप्पा मारत बसले असताना एक फकीर आला व बादशहास प्रसाद म्हणून सब्जा दिला. फकीर निघून गेला. एक हिंदू संन्याशी आला व त्याने राजास प्रसाद म्हणून राख दिली. संन्याशी निघून गेला. बादशाहा म्हणाला, 'बघ बिरबल आमच्या फकिराने सब्जा दिला. याचा उपयोग आहे. पण तुमच्या साधूने राख दिली याचा काय उपयोग ?' हजरजबाबी बिरबल म्हणाला, 'आमच्या साधूने तुम्हास आशीर्वाद दिला पण फकिराने शाप दिला.' बादशहा म्हणाला, 'हे कसे काय ?' बिरबल म्हणाला, 'शब्दाकडे पाहा 'सब' जा (सर्व जाऊदे) 'राख' रक्षण कर !' देवाचे चिंतन केले तर तो या लोकात रक्षण करतो व भवसागरातून संरक्षण करतो. 'तयाच्या चिंतने निरसेल संकट । तराल दुर्घट भवसिंधु ॥' तु.म.

★★★★★

# (१५) संबंध (देवाचा)

**कथा :** एका शहरात एक पंडि्त रहात होता. चांगल्या कामात अत्यंत तरबेज असल्यामुळे त्यास मानधनाचे दहा हजार रुपये मिळाले होते. त्याची मुलगी ८ वर्षाची होती. त्याने विचार केला हे पैसे आपणास मुलीच्या लग्नासाठी उपयोगी पडतील. त्याने शहरातील एका दुकानदाराकडे १० हजार रुपये ठेवण्याचे ठरविले. तो पंडि्त एका श्रीमंत दुकानदाराकडे गेला व म्हणाला, 'शेठजी हे माझे दहा हजार रुपये आपणाजवळ ठेवतो आहे हे फक्त तुम्हाला व मलाच माहीत असू दे. माझी मुलगी ८ वर्षाची आहे. १८ वर्षाची झाल्यानंतर मी तिचे लग्न करणार आहे, त्यावेळी आपण हे पैसे मला द्यावे.'

दहा वर्षाचा काळ लोटल्यानंतर, मुलगी उपवर झाल्यावर पंडिताने मुलीचे लग्न ठरविले व दुकानदाराकडे पैसे मागण्यास गेला. पण दुकानदार म्हणाला, 'मी आपणास ओळखत नाही. कशावरून तुम्ही माझ्याकडे पैसे ठेवले ? तुमच्याकडे काही लिहिलेले आहे का ?' पंडित म्हणाला, 'लिहिलेले नाही'. दुकानदार म्हणाला, 'निदान कोणी साक्षीदार तरी आहे कां ?' पंडि्त म्हणाला, 'नाही. हा आपल्या दोघात झालेला व्यवहार होता'. दुकानदाराने कानावर हात ठेवले. पैसे दिले नाहीत. पंडि्त खूपच दुःखी झाला. या दहा हजाराच्या रकमेवर त्याने मुलीचे लग्न ठरविले होते. पंडि्त राजाकडे गेला व सर्व हकीकत सांगितली. राजाने विचारले, 'आपणाकडे काही लिखापटी अथवा साक्षीदार आहे कां ?' पंडिताने सांगितले, तीच तर समस्या आहे.' राजाने सांगितले, 'मी त्या श्रीमंत दुकानदारास ओळखतो. पैसे मिळणे अवघड आहे.' पंडिताच्या डोळ्यात अश्रू आले. राजास दया आली. त्याने सांगितले, 'पंडित महाशय आपण एक युक्ती करा. माझी मिरवणूक शहरातून निघणार आहे. आपण चांगले कपडे करून दुकानदाराच्या दुकानाजवळ उभे रहावे. तो मोठा धूर्त माणूस आहे. मला गुलाबाचा मोठा हार घालण्यास येईल. त्यावेळी मी युक्ती करतो.'

राजाची मिरवणूक निघाली. दुकानदाराच्या दुकानाजवळ आली. दुकानदाराने राजास सुंदर हार घातला. राजाची नजर पंडिताकडे गेली. राजा रथातून खाली उतरला. पंडिताला नमस्कार केला. राजा म्हणाला, 'गुरुजी आपण इथे का उभे ?' हातास धरले व रथात आपल्या शेजारी बसविले. एका मैलावर पंडितास खाली उतरविले व राजा म्हणाला, 'पंडित आपण व आता आपले नशिब !'

जेव्हा दुकानदाराने पंडितास राजाबरोबर बसलेले पाहिले, तो घाबरला. या पंडिताचे राजाशी संबंध दिसतात. वह्या चाळल्या, दहा वर्षापूर्वीची वही सापडली. पंडिताने १० हजार रुपये दिल्याची छोटी नोंद होती. मुनीमजीला बोलविले व सांगितले, 'ताबडतोब पंडिताला शोधून आणा.' मुनीमजी गेले व पंडितास घेऊन आले. पंडि्त आतून अतिशय खूष होता. युक्ती सफल झाल्याची भावना चेहऱ्यावर होती. दुकानदारास विचारले, 'कशाकरिता बोलाविले शेठजी ?' शेठजी म्हणाला, 'आपण

राजाबरोबर रथावरून गेला व मी वह्या पाहिल्या. दहा वर्षापूर्वीच्या वहीत आपण मला १० हजार रुपये दिल्याची नोंद आहे. त्याचे चक्रवाढ व्याजाने २५ हजार रुपये झाले आहेत. शिवाय आपल्या मुलीचे लग्न ठरले आहे. आपण एक हजार रुपये सप्रेम भेट म्हणून माझ्याकडून घ्यावे.' पंडितास दुकानदाराने २६ हजार रुपये दिले. तात्पर्य - सामान्य राजाचा संबंध आला तर केवढा फायदा झाला. मग महाराजांचा संबंध आला तर किती फायदा होईल ? सार्वभौम महाराज पंढरपूरला रहातात असे नाथ महाराज सांगतात.

**पंढरपूर पाटणी गा 'महाराज' सार्वभौम । पांडुरंग दीनबंधू जयाचे ते नाम ॥**

जगातील सर्वांचा संबंध शरीरापुरता मर्यादित आहे. शरीर संपले की संबंध संपला.

**शरीर संबंधु पुत्र पत्नी बंधू धन लोभ मायावंते ।**
**जनलोकपाळ मैत्र हे सकळ सोईरी सज्जन बहुते ।**
**नाना कर्मडाय करिती उपाय बुडावया घातपाते ।**
**तुका म्हणे हरि राखे भलत्यापरी आम्ही तुझी शरणांगते ॥ तु.म.**

हा संबंध कशामुळे येतो. तर संचितामुळे, असे तु.म. सांगतात. तुका म्हणे देह संबंध संचिते। कारण निरूते पांडुरंगी ॥' यांचा संबंध तोडता येतो. 'पुत्र पत्नी बंधू । यांचा तोडावा संबंधु ॥' तु.म. जर हे परमार्थास विरोध करत असतील तर संबंध तोडावा. बिभीषणाने भावाचा, प्रल्हादाने वडिलांचा, भरताने आईचा, गोपिकांनी नवऱ्याचा संबंध परमात्म्याकरिता सोडला. किंबहुना बलिने गुरूचा संबंध तोडला, असे तुलसीदास सांगतात.

**तज्यो पिता प्रल्हाद बिभीषण बंधु भरत महतारी ।**
**बलि गुरू तज्यो कन्त ब्रजबनितनि भे सब मंगलकारी ॥ तुलशी**

देवाचा व जीवाचा संबंध कायमचा आहे. बाकीच्यांचा तात्पुरता संबंध आहे. म्हणून देवास जीवलग म्हणतात. 'पांडुरंगे येई वो पांडुरंगे । जीवाचे जीवलगे येई वो पांडुरंगे ।।' तु.म. संतसुद्धा जीवलग आहेत. 'आता तुम्ही कृपावंत । साधूसंत जीवलग ॥' तु.म. देवाचा संबंध जोडला तर सर्व फायदे मिळतात. मान व धनसुद्धा.

**हरिभक्तिके तीन गुण हरकोई लागे पाव ।**
**खाने को मिष्टान्न मिले आखीर वैकुंठको जाव ॥**

अ) मुलगी गरीब आहे शिवाय शिकलेली नाही. पण देखणेपणामुळे शेठने पसंत केली तर ती शेठानी होते.

**दुर्बळाची कन्या समर्थाने केली । अवदशा निमाली दारिद्र्याची ॥ नाथ.**

वकिलाची बायको न शिकता वकिलीण, डॉक्टराची बायको न शिकता डॉक्टरीण. असे का ? तर यास संबंध कारण आहे.

ब) गुरूनानकांना वडिलांनी २० रुपये व्यापाराकरिता दिले होते. त्यांनी अन्नदान केले. देवाची भक्ती केली. त्यांच्या ग्रंथास शिख लोक गुरू मानतात. शिवाय पंजाबला ग्रंथाकरिता करोडो रुपयाचे सुवर्णमंदिर उभे आहे.

क) देवाचे ज्ञान नसले तरी चालेल पण देवाशी संबंध जोडला तर फायदा होतो. जसे श्रीमंताच्या मुलास आपल्या बापाकडे किती पैसे आहेत हे माहीत नसते. दिवाणजीस सर्व माहीत असते. पण संपत्तीचे ज्ञान असणाऱ्या दिवाणजीस फक्त महिना पगार मिळतो. पण मुलास संपत्तीचे ज्ञान नसताना तो मुलगा असल्यामुळे संपत्तीचा वारस असतो.

**चिंतन** - संबंध तीन प्रकारांचा असतो

१) **फसली** - नातेवाईकांचा, संपत्तीचा, जो संबंध त्यास फसली-फसविणारा संबंध म्हणतात.

२) **नकली** - देहाचा संबंध या जन्मापुरता म्हणून नकली.

३) **असली** - देवाचा व जीवाचा कायमचा संबंध. त्यास असली संबंध म्हणतात.

★★★★★

# (१६) बंधन

जगात माणसाचे तीन प्रकार आहेत. मूर्ख, मुमुक्षू, मुक्त. मूर्खांना बंधन म्हणजे काय याचे ज्ञान नसते. जसे वेडीस माहेर काय सासर काय सारखेच असते.

**दृष्टान्त :** एकदा राज्यात क्रांती झाली. नवा राजा आला. नवीन कायदे काढले. त्यातील पहिले कलम होते तुरुंगातील सर्व कैद्यांना सोडून द्यावे. प्रधानजी म्हणाले, 'तुम्ही राजे आहात. जनतेच्या कल्याणाकरिता कायदे करा पण माझा सल्ला घ्या. कारण मला अनुभव जास्त आहे.' राजे म्हणाले, 'पहिल्या कलमाबद्दल आपले काय मत आहे ?' प्रधानजी म्हणाले, 'सगळे कैदी जर सोडले तर राज्यात गोंधळ निर्माण होईल. हे चांगले म्हणून तुरुंगात गेलेले नाहीत. ज्यांची सुटण्याची इच्छा असेल त्यांनाच सोडू.' राजा म्हणाला, 'याकरिता काय करावे लागेल ?' प्रधानजी म्हणाले, 'आपण तुरुंगात जाऊ व मोठा फलक लावू. 'नवीन राजे आलेले आहेत. ज्याला पाहिजे ते मिळेल.' मी, आपण व एक लेखनिक बरोबर घेऊ. सर्व तुरुंगात गेले. बोर्ड लागला. कैद्यांना फार मोठा आनंद झाला. रांग लागली. पहिल्यास विचारले, 'तुला काय हवे आहे ?' त्याने सांगितले, 'रोज दोन सिगारेट पाकिटे मिळाली तर मी आपला आभारी राहीन.' दुसऱ्यास विचारले, 'तुला काय हवे आहे ?' त्याने सांगितले, 'मला रोज झोपताना एक बियर बाटली हवी.' तिसऱ्याने सांगितले, 'मला ज्वारीची भाकरी मिळावी.' एक हजार कैद्यांनी तुरुंगात काय हवे ते मागितले. शेवटचा एक कैदी होता

तो म्हणाला, 'खरंच मी मागेन ते मिळेल का ?' प्रधानजी म्हणाले, 'तसा बोर्ड आहे.' तो चुकून तुरुंगात गेला होता. त्याने सांगितले, 'तुमच्या पायातील चप्पल माझ्या गालावर मारा. पण मला तुरुंगातून बाहेर काढा.' हजारापैकी एकाचीच तुरुंगातून सुटण्याची इच्छा झाली. तद्वत सर्व संसारी लोक संसारातीलच वस्तू देवाकडे अथवा संतांकडे मागतात. ज्याला संसारातून सुटण्याची इच्छा असते असा हजारात एखादा असतो.

**मनुष्याणां सहस्त्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ गी.७/३**

**अर्थ :** सहस्रावधी मनुष्यांमध्ये एखादाच सिद्धीसाठी प्रयत्न करतो. प्रयत्न करणाऱ्यांमध्ये एखादाच मला यथार्थ जाणतो. जो देवाकरिता प्रयत्न करतो त्यास मुमुक्षू म्हणतात. हा बंधनातून सुटण्याचा प्रयत्न करतो. ज्ञानोबाराय मुमुक्षूची व्याख्या करतात.

**पैं भवस्वर्गा उबगले । मुमुक्षु योगज्ञाना वळघले ।**
**पुढती न यों इया निगाले । पैजा जेथ ॥ ज्ञाने. १५/२७७**

**अर्थ :** ज्यांना संसाराचा व स्वर्गाचा उबग आला, जे योगज्ञानाकडे वळले, पुन्हा जन्माला यायचे नाही अशी ज्याने पैज लावली त्यास मुमुक्षू म्हणतात. थोडक्यात ज्यांना बंधन कळत नाही ते मूर्ख. जे बंधनातून सुटण्याकरिता प्रयत्न करतात ते मुमुक्षू व ज्यांना बंधनच नसते त्यास मुक्त म्हणतात. 'मुक्त कासया म्हणावे । बंधनची नाही ठावे ॥' तु.म. शास्त्रामध्ये संतांनी बंधनातून सुटण्याकरिता नामस्मरण सांगितले आहे.

**येणे तुटती बंधने । उभय लोकी किर्ती जेणे ॥ तु.म.**

**करा वासुदेव स्मरण । येणे तुटे रे बंधन ।**
**खंडेल कर्माचे वदन । वासुदेव जपताची ॥ नाथ**

बंधनाचे दुसरे दोन प्रकार आहेत. १) शारीरिक २) भावनिक. शारीरिक बंधनातून माणूस सुटू शकतो पण भावनेचे बंधन फार अवघड आहे. शिवाजी महाराज आग्र्यातून सुटून आले. बरेच तुरुंगातून सुटतात. भावनेच्या बंधनाचे ज्ञानोबाराय तीन दृष्टांत देतात. कोशकिडा, भ्रमिष्ट माणूस व शुक (पोपट). माऊलींनी एका ओवीत चार चार दृष्टांत दिले आहेत. पण पोपटाच्या दृष्टांताकरिता चार ओव्या वापरल्या आहेत.

**जैसी ते शुकाचेनि आंगभारे । नळिका भोविन्नली एरी मोहरें ।**
**तरी तेणे उडावें परि न पुरे । मनशंका ॥ ज्ञाने. ६/७६**

**वायांचि मान पिळी । अटुवें हियें आवळी ।**
**टिटांतु नळी । धरूनि ठाके ॥ ज्ञाने. ६/७७**

**म्हणे बांधला मी फुडा । ऐसिया भावनेचिया पडे खोडां ।**
**कीं मोकळिया पायांचा चवडा । गोंवी अधिकें ॥ ज्ञाने. ६/७८**

**ऐसा काजेंवीण आंतुडला । तो सांग पां काय आणिकें बांधला ।**
**मग न सोडीच जऱ्ही नेला । तोडूनि अर्धा ॥ ज्ञाने. ६/७९**

**पाहें पां बंधभावना दृढा । नळियेवरी तो बापुडा ।**
**काय मोकळेयाही चवडा । न ठकेचि पुंसा ॥ ज्ञाने १८/३९३**

थोडक्यात, पोपट पकडण्याकरिता पारधी दोरीत नळी टाकून ती दोन झाडांना बांधतात. त्यावर पोपट बसतो. नळी फिरते व पोपट उलटा होतो. वर आकाश दिसते. त्याला वाटते आपण बांधले गेलो आहोत. त्यास अर्धा तोडून नेला तरी नळी सोडत नाही. तुकोबाराय हाच दृष्टांत देतात, 'शुक नळीकेसी गोवियले पाय । विसरोनि जाय पक्ष दोन्ही ।।' माकड पकडणे अवघड आहे. पण माकडवाले चिंचोळ्या तोंडाच्या भांड्यामध्ये चणे टाकून ज्या झाडावर माकडे असतात त्या झाडाखाली भांडी ठेवतात. माकडांना चणे फार आवडतात. मात्र चणे आवडतात ती सगळीच माकडे नसतात. माकडे खाली येतात. पुढचा एक पाय भांड्यात घालतात. चणे पकडतात. त्यामुळे पाय मुठीसारखा होतो. माकडवाल्याने माकडास पकडले तरी माकड चणे सोडीत नाही. यास भावनेचे बंधन म्हणतात. 'माकडे मुठिसी धरिले फुटाणे । गुंतले ते नेणे हात तेथे ।।' तु.म. नामावर प्रेम वाढले तर दोनही बंधने तुटतात. शिवाय भक्तिप्रेमामुळे भगवान भक्तांच्या बंधनात सापडतो.

**बंधनानि खलु सन्ति बहूनि । प्रेमरज्जू दृढ बन्धनमुच्यते ।**
**दारूभेदनिपुणोऽपि षडाङ्घ्रि । निष्क्रियो भवति पंकजकोषे । सुभा.**

**अर्थ :** बंधनाचे अनेक प्रकार आहे. पण प्रेमाचे बंधन सर्वात मोठे आहे. कठीण लाकडे पोखरण्यात निपूण असणारा भुंगा कमळाच्या कोवळ्या पाकळ्यात अडकतो. 'नाही काष्टाचा गुमान । गोवी भ्रमरा सुमन ।।' तु.म. जो जगास बंधनात टाकतो तो भगवान भक्तांच्या प्रेमबंधनाचे उल्लंघन करू शकत नाही. 'तुका म्हणे भक्तिसुखाचा बांधला । आणिक विठ्ठला धर्म नाही ।।' तु.म.

**दृष्टांत :** एका राजाने प्रवचनाकरिता एक विद्वान साधक राजवाड्याशेजारी ठेवला होता. त्याची सर्व सोय राजा स्वतःप्रमाणे करीत होता. दोन वर्षे प्रवचन ऐकले. एक दिवस राजा म्हणाला, 'दोन वर्षात आपले प्रवचन ऐकूनसुद्धा चित्तात फरक पडला नाही.' विद्वान बेचैन झाला. कारण राजा रुष्ट झाला तर सर्व सुविधा काढून घेईल. विद्वान एका वैराग्यवान महात्म्यास भेटला व आपली समस्या सांगितली. महात्मा म्हणाला, 'मी येतो व समस्या सोडवितो.' तो राजवाड्यात आला. राजास म्हणाला, 'आपण स्वतःला बांधून घ्या. या विद्वान साधकास मी बांधतो.' दोघे बांधले गेले. महात्मा म्हणाला, 'आता एकमेकांना सोडविण्यास विनंती करा.' दोघे म्हणाले, 'आम्ही बंधनात आहोत. एकमेकांना विनंती करून कसे सुटणार ?' महात्मा म्हणाला, 'मी आपल्या प्रश्नाचे उत्तर दिले आहे.

जो स्वतःच संसाराच्या बंधनात गुंतला आहे तो दुसऱ्यास बंधनातून कसा सोडविणार ? जो गुरु स्वतःच संसारपाशात अडकला तो शिष्यांची कशी सुटका करणार ?'

'आपली आपण करा सोडवण । संसार बंधन तोडा वेगी ॥' ज्ञान. संसाराचे, कर्माचे बंधन तोडणे फार अवघड आहे. पण नाम हे एक जबरदस्त असे साधन आहे की जी कर्मे बंधनात टाकतात ती नामाने नाहीशी होतात. ज्या प्रमाणे जी नाव नदीकडे नेताना खूप कष्ट लागतात तीच नाव नदीत आल्यानंतर आपणास नदीच्या पलिकडे नेते असे ज्ञानोबाराय सांगतात.

**स्थळी नावा जिया दाटिजे । जळी तियाचि जेवीं तरिजे ।**
**तेवीं बंधकी कर्मी सुटिजे । नामे येणे ॥ ज्ञाने १७/३६६**

**चिंतन :** आपल्यात व परमात्म्यात दोन बोटे अंतर आहे. यशोदा माता श्रीकृष्णास दोराने बांधत होती. पण दोन बोटे दोरी कमी पडत होती. शेवटी बरसानाची राधा, तिची प्रेमरूपी दोरी आणली व श्रीकृष्ण बांधले गेले. दोन बोटे कमी म्हणजे मी व माझे (अहं व ममता) यांचा जोपर्यंत त्याग होत नाही तोपर्यंत श्रीकृष्ण परमात्मा बांधला जात नाही.

★★★★★

## (१७) समाधान

प्रत्येक जीवास समाधान हवे असते. समाधान ही मनाची स्थिती आहे.

**मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धीचे कारण ।**
**मोक्ष अथवा बंधन । सुख समाधान इच्छा ते ॥ तु.म.**

संसारात कितीही मिळाले तरी समाधान होणे शक्य नाही. रावणाचे समाधान झाले नाही मग सामान्य लोकांचे समाधान होणे कसे शक्य आहे ? तुकोबाराय रावणाचे वैभव सांगतात,

**पाषाण परिस भूमि जांबूनद । वंशाचा संबंध धातयाचा ॥१॥**
**सोनियाची पुरी समुद्राचा वेढा । समुदाय गाढा राक्षसांचा ॥२॥**
**ऐंशी सहस्र ज्या सुंदर कामिनी । माजी मुखरणी मंदोदरी ॥३॥**
**पुत्रपौत्रांचा लेखा कोण करी । मुख्य पुत्र हारी इंद्रा आणी ॥४॥**
**चौदा चौकडीया आयुष्य गणना । बंधुवर्ग जाणा कुंभकर्ण ॥५॥**
**तुका म्हणे ज्याचे देव बांदवडी । सांगाते कवडी गेली नाही ॥६॥**

अर्थ स्पष्ट आहे. एका शाळेत शिक्षकाने सातवीच्या विद्यार्थांना विचारले, 'रावण दररोज एक नवीन सोन्याचा मुगूट वापरत होता. तर वर्षाचे किती मुगूट होतील ?' काही विद्यार्थ्यांनी सांगितले ३६०, काहींनी सांगितले ३६५ मुगूट. गुरुजी हसले व म्हणाले, 'कोणीही डोकं वापरून उत्तर दिले नाही. रावणास डोकी किती होती ?' मग मात्र मुलांच्या डोक्यात प्रकाश पडला. मग सगळ्यांनी कबूल केले वर्षाला ३६५० मुगूट होतात. कारण रावणास दहा डोकी होती. रावणास ८० हजार सुंदर पत्न्या होत्या पण समाधान झाले नाही. समाधानी असता तर सीतामातेची अपेक्षा धरली नसती.

संसारात समाधान मानायचे असते.

**ठेविले अनंते तैसेचि रहावे । चित्ती असो द्यावे समाधान ॥ तु.म.**

तुकोबारायांची पत्नी कर्कशा होती. पण महाराज समाधान व्यक्त करतात. बरे झाले.

**बरे झाले देवा बाईल कर्कशा । बरी ही दुर्दशा जनामध्ये ॥ तु.म.**

नाथ महाराजांची पत्नी पारमार्थिक होती. तेसुद्धा देवाचे आभार मानतात. देवाने परमार्थात मदत करणारी पत्नी दिली. नरसिंह मेहतांची पत्नी वारली तेव्हा त्यांनीसुद्धा देवाचे आभार मानले. 'भलु थयू भागी जंजाळ । सुखे भजेशू गोपाळ ॥' देवा बरे झाले बायको वारली. झंझट मिटली. आता प्रेमाने भजन करण्यास मोकळा झालो. काही म्हातारपणीपण बायको शोधतात.

**कथा :** एका राजाचे बोट अचानक कापले. तो प्रधानजीकडे गेला व म्हणाला, 'माझे बोट कापले.' प्रधानजी भाविक होते. ते म्हणाले, 'जशी देवाची इच्छा.' राजास राग आला. त्याने प्रधानजीस तुरुंगात टाकले. प्रधान म्हणाला, 'जशी देवाची इच्छा.' दुसरा प्रधान नेमला. काही दिवसांनी राजा व प्रधान शिकारीस गेले. जंगलात प्रधान, सैन्य व राजा यांची चुकामुक झाली. राजा भिल्लांच्या हातात सापडला. ते देवीस बळी देण्याकरिता माणूस शोधत होते. आयता गोरा गोमटा राजाच सापडला. राजास देवळात नेले. पण देवी म्हणाली, 'मूर्खांनो मला अव्यंग बळी पाहिजे. याचे बोट तुटले आहे. हा चालणार नाही. म्हणून यास हाकलून द्या.' राजास हकलले. राजा राज्यात आला. व पहिल्या प्रधानजीस तुरुंगातून बाहेर काढले व समाधानाने म्हणाले, 'बरे झाले हे बोट कापले म्हणून. नाहीतर आज मान कापली जात होती. मी वाचलो. देव सर्व बऱ्याकरिता करतो. पण प्रधानजी आपण तुरुंगात जाताना म्हणाला होता जशी देवाची इच्छा. हे कसे काय ?' प्रधानजी म्हणाला, 'मी आपल्याबरोबर जंगलात शिकारीस आलो असतो. मी आपल्या जवळ सावलीसारखा राहिलो असतो. जर भिल्लांच्या तावडीत आपण दोघे सापडलो असतो तर तुम्हास व्यंग म्हणून सोडले असते. पण मी अव्यंग म्हणून माझा बळी गेला असता. सर्व बऱ्याकरिता होते.' राजा व प्रधानजी जन्मभर समाधानी राहिले. समाधानी माणसे सशक्त असतात. एक सुभाषित सांगते.

**सर्पाः पिबन्ति पवनं नच दुर्बलास्ते । शुष्के तृणं वनगजो बलिनो भवन्ति ।**
**कंदैः फलैः मुनिवरा क्षपयन्ति कालम् । संतोष एव पुरुषस्य परम निधानम् ॥**

अर्थ : सर्प हवा खातो पण दुबळा नसतो. त्यास सर्व घाबरतात. हत्ती वाळलेले गवत खातो पण बलवान असतो. मुनी, ऋषी कंदमुळे, फळे याद्वारा कालक्रमण करतात.

तात्पर्य - संतोष (समाधान) हेच माणसाचे खरे धन आहे. तीन गोष्टीत समाधानी असावे. तीन गोष्टीत समाधानी नसावे.

**संतोषः त्रीषु कर्तव्यः स्वदारे भोजने धने ।**
**त्रीषु चैव न कर्तव्यः स्वाध्याये जप दानयोः ॥ सुभा.**

**अर्थ :** माणसाने स्वपत्नी, भोजन व धन यांच्यामध्ये समाधानी असावे पण स्वाध्याय, जप व दान यामध्ये समाधानी नसावे. ज्ञानोबारायांच्या तीन ओव्या हेच सांगतात.

**सांगें शूद्राघरीं आघवीं । पक्वान्नें आहाति बरवीं ।**
**तीं द्विजे केवीं सेवावीं । दुर्बळु जरी जाहला ॥ ज्ञाने ३/२२१**

**तरी लोकांचीं धवळारें । देखोनियां मनोहरें ।**
**असतीं आपुलीं तणारें । मोडावीं केवीं ॥ ज्ञाने ३/२२३**

**हें असो वनिता आपुली । कुरूप जरी जाहली ।**
**तरी भोगितां तेची भली । जियापरी ॥ ज्ञाने ३/२२४**

अर्थ सोपा आहे. थोडक्यात, धनाच्या दृष्टीने आपल्यापेक्षा खालच्या माणसाकडे पहावे. समाधान मिळेल. पण ज्ञानाच्या बाबतीत मोठ्याकडे पाहावे.

काही माणसांकडे धन भरपूर असते. पण समाधानी नसतात. हे दारिद्र्याचे लक्षण आहे नाथ महाराज सांगतात.

**ऐक दरिद्र्याचे लक्षण । गांठी असता कोटी धन ।**
**ज्याचे संतुष्ट नाही मन । परम दरिद्री जाण या नांव ॥ नाथ १९/५५८**

**कथा :** एक भिकारी भीक मागून मिळेल ते खात असतो. त्याच्याजवळ श्रीमंत माणूस येतो व काही अन्नपदार्थ देतो. पण भिकारी नको म्हणतो, 'आजच्या पुरते भरपूर आहे.' श्रीमंत म्हणतो, 'उद्याकरिता घे.' तो म्हणतो, 'उद्याचे उद्या बघू. आज गरज नाही.' महात्मे मात्र सदा समाधानी असतात. जे नेहमी संतुष्ट, समाधानी असतात त्यांना साधू म्हणावे.

**सन्तुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः । गीता १२/१४**

**वार्षियेवीण सागरु । जैसा जळें नित्य निर्भरु ।**
**तैसा निरुपचारु । संताषी जो ॥ ज्ञाने १२/१५२**

**अर्थ :** पाऊस जरी नाही पडला तरी सागर संतुष्ट असतो. भरपूर पडला तरीपण संतुष्ट राहतो. तद्वत् दुखाःच्या, सुखाच्या वेळी महात्मे समाधानी असतात. 'संतुष्ट हे चित्त सदासर्वकाळ । गेली हळहळ त्रिगुणाची ॥' तु.म.

**उदये सविता रक्तः रक्तचास्तमये तथा ।**
**संपतौ च विपत्तौ च महतामेकरूपता ॥ सुभा.**

**अर्थ :** सूर्य उगवताना लाल दिसतो. मावळताना पण लालच दिसतो. तद्वत् महात्मे संपत्ती-विपत्तीमध्ये समानता ठेवतात. समाधानी असतात. विचार केला असता समाधान दोनच गोष्टींमध्ये आहे. सदा समाधान पाहिजे असल्यास सदा नामस्मरण करावे.

**सदा नामघोष करु हरिकथा । तेणे सदा चित्ता समाधान ॥ तु.म.**

दुसरे समाधान संताच्या भेटीत आहे.

**तुका म्हणे मना होय समाधान । देखिल्या चरण वैष्णवाचे ।**
**झाले समाधान । पायी स्थिरावले मन ॥ तु.म.**

**अभय उत्तरी संती केले दान । झाले समाधान चित्त तेणे ॥ तु.म.**
**तुका म्हणे तुम्ही केले अभय दान । तेणे समाधान राहिलेसे ॥**

ज्ञानोबाराय म्हणतात गुरूजवळ ज्ञान असते. ज्ञानाने आत्मदर्शन होते व आत्मदर्शनाने समाधान मिळते.

**गुरू तेथे ज्ञान । ज्ञानी आत्मदर्शन ।**
**दर्शनी समाधान । आथी जैसे ॥ ज्ञाने.१८/१६३६**

सतत नामस्मरण करावे व सतत सतसंगती करावी म्हणजे नेहमी समाधान मिळते, असे संत म्हणतात. संसारात, जोपर्यंत संतोषधन येत नाही तोपर्यंत तृष्णेची धाव थांबत नाही.

**जो दस बीस पचास भये सत् होई हजार तो लाख माँगैगी ।**
**कोटी अरब्ब खरब्ब असंख्य पृथ्वीपती होनकी चाह जगेगी ।**
**स्वर्ग पातालको राज करो तृष्णा अघकी अती आग लगेगी ।**
**सुंदर एक 'संतोष' बिना सठ तेरी तो भूख कभी न भगैगी ॥ सुंदरदास**

**अर्थ :** ज्याच्याजवळ दहा, वीस रुपये असतात त्यास वाटते पन्नास रुपये मिळावे. पन्नास वाल्यास शंभर, शंभरवाल्यास हजार, हजारवाल्यास लाख, लाखवाल्यास कोटी, कोटीवाल्यास

अब्ज, अब्जवाल्यास खर्व, खर्ववाल्यास पृथ्वीपती, पृथ्वीपतीवाल्यास वाटते स्वर्गाचे, पाताळाचे राज्य मिळावे. तृष्णारूपी पापाची आग हृदयात लागते. जोपर्यंत जीवनात संतोष (समाधान) येत नाही तो पर्यंत ह्या तृष्णेची भूक शमत नाही.

★★★★★

## (१८) अमृत

जे प्राशन केल्यानंतर मृत्यू येत नाही त्यास अमृत म्हणतात. रामायणात कथा येते. राम रावणास मारून सर्व देवांची सुटका करतात. देव प्रभूचे आभार मानण्याकरिता येतात. इंद्र म्हणतो, 'आपण आमची सुटका केली. आम्हास आपण काही काम सांगावे.' प्रभू म्हणतात, 'माझी वानरे युद्धात मेली आहेत. त्यांची हाडे रणांगणांवर पडली आहेत. त्यावर अमृताचा वर्षाव करून त्यांना जिवंत करावे.' इंद्राने अमृताचा पाऊस पाडून सर्वांना जिवंत केले. व सर्व वानर रामाबरोबर अयोध्येस गेले. मात्र त्याच रणांगणावर राक्षसांची हाडे होती पण अमृताचा पाऊस पाडण्याच्या अगोदर शंकराच्या सेवकांनी (भूतांनी) ती समुद्रात टाकली होती. माऊली वस्तूसामर्थ्ये सांगतात.

**लोहांचे कनक होये । हें सामर्थ्य परिसींच आहे ।**
**कीं मृतही जीवित लाहे । अमृतसिद्धि ॥ ज्ञाने १/७७**

हे अमृताचे सामर्थ्य आहे.

**लोहा परिसाची घृष्टी । वोहळा गंगेची भेटी ।**
**कां मृता जैसी वृष्टी । पीयूषाची ॥ ज्ञाने १७/३९८**

एकनाथ महाराजांनी भावार्थ रामायणात अमृताचे पाच प्रकार व त्यांची स्थाने सांगितली आहेत. अर्थात हे लौकीक अमृत आहे.

**स्वादामृत उन्मादामृत । सुप्त्यमृत तृप्त्यमृत ।**
**ये अमृते प्रलोभार्थ । परमामृत पांचवे ॥ अरण्यकांड ६/१११**

**स्वादामृत अप्सरांसी । तेणे त्या स्वादिष्ट सर्वांसी ।**
**तृप्त्यमृत ते देवासी । क्षुधा त्यासी बाधीना ॥ अरण्यकांड ६/११२**

**उन्मादामृत दैत्यासी । तेणें ते उन्मत्त अहर्निशी ।**
**सुषुप्त्यमृत ते दैत्यासी । तेणे ते सुखेसी डुल्लत ॥ अरण्यकांड ६/११३**

**डुलक्या येती निद्रितासी । तेवीं डुल्लेने दिग्गजांसी ।**

**ये तंव अमृतें वायसी । देवें सर्वांसी चावळिलें ॥ अरण्यकांड ६/११४**

**समुद्र मथिला समस्तीं । झाली अमृताची प्राप्ती ।**
**कलहो करिता देव दैत्तीं । मोहिनी हातीं दिधलें ॥ अरण्यकांड ६/११५**

**मोहिनीरुपे श्री विष्णू जाण । तेणें अमृत विभागून ।**
**इतरा अमृत वाढोन । राखिले आपण परमामृत ॥ अरण्यकांड ६/११६**

ज्ञानोबारायांनी ज्ञानेश्वरीत अमृताचे बेगडी स्वरूप उघड केले आहे.

**जे काळकुटाचे सहोदर । मृत्यु भेणे प्याले अमर ।**
**तरी दिहाचे पुरंदर । जाती चौदा ।। ज्ञाने १०/१९२**

**ऐसा कवण एक क्षीराब्धीचा रसु ।**
**जया वायाचि अमृतपणाचा आभासु ॥ ज्ञाने १०/१९३**

कारण हे अमृत प्राशन करणारा इंद्र ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत चौदा वेळा मरतो. भागवतात नाथ महाराज चंद्रामृताचे वर्णन करतात.

**म्हणती चंद्रामृत जो आरोगी । तो होय नित्य निरोगी ।**
**मुख्य चंद्रचि क्षयरोगी । त्यांचे अमृत निरोगी करीं केवीं ॥ भा. २/२४६**

**कथा :** विक्रम राजाच्या दरबारात कवींची सभा भरली होती. राजांनी विचारले, 'अमृत कशास म्हणतात ?' एक कवी म्हणाले, 'ज्याचा सुगंध सर्वत्र दरवळतो त्या फुलातील मध हेच अमृत आहे.' दुसरा कवी म्हणतो, 'शरद पौर्णिमेला रात्री शीतल चांदण्याचा चंद्र वर्षाव करतो, ज्याला सुधाकर म्हणतात. त्या चंद्रामध्ये अमृत असते.' तिसरा पंडित उठतो व सांगतो, 'दधी समुद्रातून मंथनामुळे देव दैत्यानी जे मिळविले ते खरे अमृत होय.' सर्वात शेवटी भर्तृहरिने सांगितले, 'ज्यामध्ये जन्म मरणाचा फेरा चुकविण्याची शक्ती आहे ती ब्रह्मविद्या ज्याच्या मुखातून बाहेर पडते तेच खरे अमृत आहे.' 'तुका म्हणे सुख पराविया सुखे । अमृत हे मुखे स्त्रवतसे ॥' हे उत्तर ऐकून विक्रम राजा खूष झाला. खरे पहाता देवच अमृत स्वरूप आहे. त्याच्या संबंधाने अमृत शब्दास खरेपण येते. उदा. नामामृत, कथामृत, चरणामृत वगैरे. सर्व संतांनी नामासच अमृत मानले आहे.

**जिव्हे गोड तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिके पुढे ॥ तु.म.**

**गोड हे गोमटे अमृतासी वाड । केला कैवाड माझ्या चित्ते ॥ तु.म.**

**गंगोदकाहुनी निके । गोडी अमृत झाले फिके ॥ ज्ञान.**

**अमृताहुनी गोड नाम तुझे देवा । मन माझे केशवा कां बा नेघे ॥ नाम.**

**नामामृत गोडी वैष्णवा लाधली । योगीया साधली जीवनकळा ॥ ज्ञान.**

रामायणात शंकर पार्वतीस या अमृताचे श्रेष्ठत्व सांगतात.

**श्रीरामनामाक्षरमंत्रबीजं जाप्यं मतीयं परमामृतं मे ।**
**समुद्रजातं गरलं वृथाकृतं ध्येयं मदीयं सतु रामचंद्रः ॥**

**अर्थ :** हे पार्वती मी रामनामाक्षरांचा अखंड जप करतो. ते माझे परमामृत आहे. क्षीरसागरातून जे विष निघाले, ते मी प्यायलो पण या अमृतामुळे विषाचा परिणाम झाला नाही. माझे ध्येयच रामचंद्र आहेत. रामायणात आणखी एक गोड श्लोक आहे. तो नामामृताची महती सांगतो.

**ब्रह्माम्भोधि समुद्भवं कलिमल प्रध्वंसनं चाव्ययम् ।**
**श्रीमच्छंभुमुखेंद्र सुदरवरं संशोभितं सर्वदा ।**
**संसारमयभेषजं सुमधुरं श्री जानकीजीवनम् ।**
**धन्यास्ते कृतिनः पिबन्ति सततं श्रीरामनामामृतम् ॥**

**अर्थ :** ब्रह्म समुद्रातून निघालेले. कलिमलाचा नाश करणारे जे अविनाशी आहे. शंकराच्या मुखात शोभून दिसणारे. संसाररूपी महारोगावरील औषधच, श्री सीता देवीचे मूर्तिमंत जीवनच, असे श्री रामनामामृत जे प्राशन करतात ते खरोखर धन्य होत.

तात्पर्य - हे नामामृत सतत घ्यावे व कायमचे अमर व्हावे.

**कथा -** भारतात अकबर बादशहाचे राज्य होते. बादशहास बिरबलबरोबर विनोद करण्याची लहर येत असे. एकदा भर सभेत बादशहा म्हणाला, 'बिरबल हे सांग, सर्व दुधात चांगले दूध कोणते ? गाईचे, म्हशीचे, उंटिणीचे का बकरीचे ?' बिरबल हसत म्हणाला, 'सर्वात चांगले दूध म्हशीचे आहे.' सर्व लोक आश्चर्यचकित झाले. बादशहापण बिरबलकडे पाहातच राहिला. बिरबल कट्टर हिंदू असताना गाईच्या दुधाच्या ऐवजी म्हशीच्या दुधास पहिला क्रमांक देतो म्हणजे काय ? बादशहा म्हणाला, 'बिरबल तू सारखा म्हणतोस 'गोमाता' 'गोमाता', मी कधी ऐकले नाही 'म्हैस माता' ! असे असताना तू म्हशीच्या दुधास का प्राधान्य देतोस ?' बिरबल हसला व म्हणाला, 'दुधाची तुलना चालली आहे. दुधात म्हशीचेच दूध चांगले. गाईचे दूध नाही, ते 'अमृत' आहे. त्यास जे दूध म्हणतात ते अज्ञानी आहेत असे म्हणावे लागेल. जिच्या शरीरात तेहतीस कोटी देव आहेत, श्रीकृष्ण परमात्मा गाईच्या मागे बिना चप्पलचा जंगलात धावत होता त्या गोमातेच्या दुधास अमृताचीच उपमा शोभते.'

**कथा -** परीक्षिती राजास शुकाचार्यांनी भागवत् सांगून सात दिवसात मुक्त केले. कथेच्या सुरुवातीस स्वर्गातील देव अमृत घेऊन आले व परीक्षिती राजास म्हणाले, 'हा अमृत कलश आपण घ्यावा व आम्हास कथामृत द्यावे.' परीक्षिती राजाने शुकाचार्यांना विचारले, 'अमृत व कथामृत यामध्ये काय फरक आहे ?' शुकाचार्य म्हणाले, 'अमृतामुळे दिर्घता मिळेल व कथामृतामुळे दिव्यता

मिळेल. अमृतामुळे रोगरहीत, म्हातारपणरहीत स्वर्गात दिव्य भोग मिळतील पण कथामृतामुळे श्रीकृष्णाची प्राप्ती होईल. शिवाय जन्ममरणातून मुक्तता होईल. तुला काय पसंत आहे ?' परीक्षिती राजा म्हणाला, 'मग मी कथामृताचेच सेवन करतो. देवांना अमृत मिळते पण कथामृत मिळत नाही. ज्यांची भोगात आसक्ती आहे त्यांना कथामृताचा आनंद मिळत नाही.'

तात्पर्य - स्वर्गातील अमृतापेक्षा कथामृत श्रेष्ठ आहे. सात दिवस कथामृताचे सेवन करून परीक्षिती राजा जन्ममरणातून मुक्त झाला.

★★★★★

# (१९) छंद

प्रत्येक मनुष्यास कोणता ना कोणता छंद असतोच. या छंदाचे दोन प्रकार पडतात. १) संसारिक छंद २) पारमार्थिक छंद

संसारिक छंदात अनेक प्रकार आहेत. 'बहुतां छंदाचे बहु असे जन । नये वाटूं मन त्यांच्या संगे ॥' तु.म. काहींना वाचनाचा छंद, त्यात प्रत्येकाचे लेखक आवडीचे असतात. काहींना सिनेमाचा छंद, त्यात काही मराठी, काही हिंदी, काही इंग्रजी चित्रपट पाहतात. काहींना नाटकाचा, काहींना तमाशाचा, काहींना कपड्याचा, काहींना केसाचा, काहींना सुगंधी द्रव्याचा, काहींना गाड्यांचा छंद असतो. काही दरवर्षी गाडी बदलतात. काहींना जिवंत मॉडिलचा छंद असतो.

**चित्त आराधी स्त्रियेचें । आणि तियेचेनि छंदे नाचे ।**
**माकड गारुडियाचे । होय जैसे ॥ ज्ञाने १३/७९२**

कांहींना एवढे घाणेरडे छंद असतात की ते त्यापायी आपल्या आयुष्याची बरबादी करून घेतात. त्यांना कोणाची पर्वा नसते. तु.म. म्हणतात मूर्ख लोकांना लावण्याचा छंद असतो. 'पारखी तो जाणे अंतरीचा भेद । मूढ जना छंद लावण्याचा ॥' बहुतेकांना पैसे जमविण्याचा छंद असतो. ते साठवून मरतात. सर्व धन दुसऱ्याच्या स्वाधीन करतात. न दान देता, न उपभोग घेता ! माऊलीने मधमाशीचा दृष्टान्त दिला आहे. मदालसा आपल्या मुलांना उपदेश करते, 'सांडीरे सांडी बाळा सांडी संसार छंदु । माशिया मोहळ रे रचियेला कंदु । झाडुनि आणिकी नेला तया फुकटची वेधु । तैशापरी होईल तुज उपदेश आनु ॥' ज्ञान.

**पिपिलकाऽर्जितं धान्यं मक्षिका संचितं मधु ।**
**लुब्धेन संचितं द्रव्यं समूलं विनश्यती ॥ सुभा.**

**अर्थ :** मुंग्या धान्य जमा करतात, मधमाशा मध जमा करतात, लोभी माणूस धन जमा करतो. ते मूळासह नाहीसे होते. 'साचवूनि मरे धन । लावी पोरांसी भांडण । नाहीं नारायण। तुका म्हणे स्मरला ॥' तु.म.

महत्त्वाचा मुद्दा असा, जो पर्यंत संसाराचा छंद सुटत नाही तोपर्यंत परमार्थाचा छंद लागत नाही. तुका म्हणे 'सोडी संसाराचा छंद । मग परमानंद पावशील ॥' बाकीचे छंद नाशिवंत आहेत. मनास अविनाशी परमात्म्याचा छंद लागावा. 'गोड एक आहे अविट गोविंद । आणिक ते छंद नाशिवंत ॥' तु.म.

परमार्थातसुद्धा अनेक प्रकारचे छंद आहेत. काहींना गाण्याचा, काहींना वादनाचा, काहींना पाठांतरांचा, काहींना फक्त परमार्थाचे ढोंग करण्याचा छंद असतो. एका संन्यासी गुरूंचे अनेक शिष्य होते. गुरुजींनी दाढी वाढविली म्हणून काही संसारी शिष्यांनी दाढी वाढविली. त्यांचा उद्देश, आपणास लोकांनी साधू म्हणावे. संन्यासी गुरुजींनी विचारले, 'तुम्ही दाढी कां वाढविली ?' त्यांना उत्तर देता आले नाही. गुरुजींनी सांगितले, 'आत्ताच दाढी काढा, नाहीपेक्षा सर्वस्वाचा त्याग करून माझ्याबरोबर जंगलात रहा. बायका, मुले, नोकरी, व्यापार करताना दाढी वाढविण्याची गरज काय ? दाढी वाढवून अथवा चमन करून देवाची प्राप्ती होत नाही. काहींना तपाचा, काहींना मुक्तीचा वगैरे छंद आहे. तु.म. म्हणतात, 'आम्ही या भानगडीत पडत नाही.'

**करोत तपादि साधने । कोणी साधोत गोरांजने ॥१॥**

**आम्ही नवजो तया वाटा । नाचू पंढरीचा चोहटा ॥२॥**

**पावोत आत्मस्थिती । कोणी म्हणोत उत्तम मुक्ती ॥३॥**

**तुका म्हणे छंद । आम्हा हरिदासा निंद्य ॥४॥**

वैष्णवांना एकच छंद असतो. सतत नामस्मरण करणे.

**सहज तया छंद । वाचे गोविंद गोविंद ॥ तु.म.**

हाच चांगला छंद आहे.

**बरवा हाचि छंद । वाचे गोविंद गोविंद ॥ तु.म.**

महाराज म्हणतात तोच भाग्यवान ज्यास नामाचा छंद आहे.

**भाग्यवंता छंद मनी । कोड कानी ऐकती ॥ तु.म.**

तुकोबाचे चरित्र प्रसिद्ध आहे. एक ब्राह्मण त्यांच्या घरी भेटीस आले होते. तु.म. शौच विधीस गेले असे त्यांच्या पत्नीने सांगितले. ते घाईने तिकडे गेले. महाराज शुद्ध न होताच विठ्ठल विठ्ठल

म्हणत होते. त्या ब्राह्मणानी सांगितले, 'आपण पवित्र नामाचा उच्चार पवित्र होऊन करावयास हवा होता.' महाराज म्हणाले, 'काय करू माझी वाचाच माझ्या ताब्यात नाही.' 'माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ॥' तु.म. ज्ञानोबारायांचा बाळछंद मोठा प्रसिद्ध अभंग आहे. ते त्यात म्हणतात, देवा मला हाच नामाचा छंद लागो. बाकी काही नको. 'पृथ्वीतळ राज्यमद । मी नेघे नेणे हेहि पद । राम कृष्ण वाचे गोविंद । हाचि छंद तुझ्या पंथे ॥' या छंदाचा फायदा असा की मल मूत्राची ही शरीररूपी पिशवी गोविंदाच्या नामाने ब्रह्मरूप होते. देहच देव होतो. 'गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ।। मग गोविंद ते काया । भेद नाही देवा तया ॥' तु.म. जीवाने हाच छंद धरावा.

★★★★★

## (२०) देवाची घरे

तुळशी रामायणात रामाने वाल्मिकी ऋषींना विचारले, 'मी कुठे राहू ?' ऋषींनी सांगितले, 'आपण कुठे नाही ?' पण भक्तांना मोठेपण देण्याचा आपला स्वभाव आहे. आपण त्या घरात रहावे.' त्यांची अशी लक्षणे आहेत, अशी चौदा घरे ऋषींनी सांगितली आहेत.

**१) 'जिन्हे के श्रवण समुद्र समाना । कथा तुम्हारि सुभग सरिनाना ॥**
**भरहि निरंतर होहिंन पुरे । तिन्हकेहिय तुम्ह कहुँ गृह रूरे ॥**

**२) लोचन चातक जिन्ह करि राखे । रहहि दरस जलधर अभिलाखे ॥**
**निदरहि सरित सिंधु सरबारी । रूप बिंदु जय होहिं सुखारी ॥**
**तिन्हके हृदय सदन सुखदायक । बसहु बंधु सिय सह रघुनायक ॥**

**३) यश तुम्हार मानस बिमल हंसिनी जीहा जासु ॥**
**मुकताहल गुन गन चुनइ राम बसहु हियँ तासु ॥**

**४) प्रभू प्रसाद शुचि सुभग सुवासा । सादर जासु लहइ नित नासा ।**
**तुमहि निवेदित भोजन करहीं । प्रभू प्रसाद पट भूषण धरहीं ॥**
**शीश नवहिं सुरगुरू द्विज देखी । प्रीति सहित करी विनय विशेखी ।**
**कर नित करहिं राम पदपूजा । राम भरोस हृदय नहिं दूजा ।**
**चरन राम तीरथ चलि जाहीं । राम बसहु तिन्हके मनमाहीं ।।**

**५) मंत्र राज नित जपहि तुम्हारा । पूजहि तुमहिं सहित परिवारा ।**
**तर्पण होम करहिं विधि नाना । बिप्र जिमाय देहिं बहु दाना ।**

तुम्ह ते अधिक गुरूहिं जिय जानी । सरल भाव सेवहि सनमानी ।
सबकर माँगहिं एक फल, रामचरण रति होऊ ।
तिन्हके मनमंदिर बसहु, सिय रघुनन्दन दोऊ ॥

६) काम कोह मद मान न मोहा । लोभ न क्षोभ न राग न द्रोहा ।
जिन्हके कपट दम्भ नहीं माया । तिन्हके हृदय बसहु रघुराया ॥

७) सबके प्रिय सबके हितकारी । सुख दुख सरिस प्रशंसा गारी ।
कहहिं सत्य प्रिय बचन बिचारी । जागत सोहत शरण तुम्हारी ।
तुम्हहिं छाँडि गति दूसरी नाहीं । राम बसहु तिन्हके मनमाहीं ॥

८) जननी सम जानहिं परनारी । धन पराय विष ते विष भारी ।
जे हरषहिं पर सम्पत्ति देखी । दुखित होहिं परबिपति विशेखी ।
जिनहि राम तुम प्रान पियारे । तिनके उर शुभ सदन तुम्हारे ॥

९) स्वामी सखा पितु मातु गुरू, जिन्हके सब तुम्ह तात ।
तिन्हके मन मंदिर बसहु, सीय सहित दोऊ भ्रात ॥

१०) अवगुण तजि सबके गुण गहहीं । विप्र धेनु हित संकट सहहिं ।
नीति निपुण जिन्हकै जग लिका । घर तुम्हारे तिन्हके मन नीका ॥

११) गुण तुम्हार समुझहिं निजदोसू । जेहि सब भाँती तुम्हार भरोसु ।
राम भक्त प्रिय लागहि जेही । तेहि उर बसहु सहित बैदेही ॥

१२) जाती पाँती धन धर्म बडाई । प्रिय परिवार सदन सुखदाई ।
सब तजि रहहिं तुम्हहिं लौ लाई । तेहि के हृदय बसहु रघुराई ॥

१३) स्वर्ग नरक अपवर्ग समाना । जहँ तहँ देखि धरे धनुबाना ।
मन क्रम बचन जो राउर चेरा । राम करहु ताके उर डेरा ॥

१४) जाहि न चाहिय कबहुँ कछु, तुम्ह सन सहज सनेह ।
बसहु निरन्तर तासु उर सो राउर निज गेह ॥

**अर्थ :** १) ज्यांचे कान समुद्रासारखे आहेत, त्या कानात प्रवेश करणारी आपली कथारूपी नदी सतत वाहत असताना समुद्र भरत नाही. तसे ज्यांचे कान तृप्त होत नाहीत, त्यांचे हृदय आपले उत्तम घर आहे.

२) ज्यांचे डोळे चातकासारखे आपल्या दर्शनाची इच्छा करतात, चातक समुद्र, नद्यांच्या पाण्याकडे

पाहात नाही, एका पावसाच्या बिंदूने सुखी होतो, तद्वत ज्याला आपल्या रूपाचा थोडासा लाभ झाला तर संतुष्ट होतो, त्यांच्या हृदयरूपी घरात आपण लक्ष्मण, सीतासहित सुखाने रहा.

३) ज्याची जिव्हा आपल्या विमल यशरूपी मानस सरोवराची हंसिनी आहे आणि जी आपल्या गुणरूपी मोतीयास ग्रहण करते. त्यांच्या हृदयात आपण वास करावा.

४) ज्यांचे नाक आपल्या पवित्र प्रसादाचा सुगंध घेते, जे प्रथम आपणास अर्पण करून नंतर भोजन करतात, प्रभूचा प्रसाद म्हणून वस्त्र व भूषणे धारण करतात, जे गुरू, देवता, ब्राह्मण यांना पाहिल्याबरोबर नतमस्तक होतात, प्रेमाने विनय प्रगट करतात, जे आपल्या हातानी आपली पूजा करतात, ज्यांचे पाय रामतीर्थास जातात, हे राम प्रभू त्यांच्या मनात आपण निवास करावा.

५) जे नित्य राम मंत्र जपतात, सर्व कुटुंबाबरोबर आपली सेवा करतात, जे अनेक प्रकारे तर्पण, होम करतात, जे ब्राह्मणांना भोजन देऊन दान देतात, जे आपल्यापेक्षा गुरूंना मानतात व त्यांची सेवा करतात, हे सर्व करून रामचरणावर प्रेम राहावे अशी मागणी मागतात, त्यांच्या मनमंदिरात सीता व आपण दोन रघुवंश कुमारांनी वास करावा.

६) ज्यांच्या हृदयात काम, क्रोध, मान, मद, मोह, लोभ, क्षोभ, आसक्ति, द्रोह (द्वेष), कपट, दंभ, माया नाही, हे रघुनाथ त्यांच्या हृदयात आपण वास करावा.

७) जे सर्वांचे प्रिय व सर्वांचे हित करणारे, ज्यांना सुखदुःख, स्तुती-निंदा समान वाटते, जे विचार करून सत्य व प्रिय बोलतात, जे जागेपणी, झोपेत आपणासच शरण असतात, आपणास सोडून ज्यांना अन्य गती नाही, त्यांच्या हृदयात आपण वास करावा.

८) जो परस्त्रीला माता समजतो, परधनास विष समजतो, जो दुसऱ्याची संपत्ति पाहून सुखी होतो व दुसऱ्याचे दुःख पाहून दुःखी होतो, हे राम, आपण ज्यांना प्राणापेक्षा प्रिय आहात, त्यांचे हृदय म्हणजे आपले सुंदर घर होय.

९) हे रामप्रभू, ज्यांचे सखा, माता, पिता आणि गुरू सर्व काही आपणच आहात, त्यांच्या मनमंदिरात सीतासह दोन्ही भावांनी वास्तव्य करावे.

१०) जे अवगुणांचा त्याग करतात, जे गुणग्राही आहेत, जे गायी, ब्राह्मणांकरिता संकट सहन करतात, ज्यांची गणना नीती निपुण अशी आहे त्यांच्या मनात आपले उत्तम घर असावे.

११) जे चांगले झाले तर आपणास श्रेय देतात, वाईट झाले तर आपलेच दोष असे समजतात, ज्यांना कोणत्याही बाबतीत आपलाच विश्वास आहे, हे रामप्रभू, त्यांच्या हृदयात आपण जानकीसह वास करावा.

१२) जे जात-पात, धन, धर्म, मोठेपण, आपले कुटुंब आणि घर यांचा मनातून त्याग करून आपल्यावर

प्रेम करतात त्यांच्या हृदयात आपण वास करावा.

१३) ज्यांना स्वर्ग, नरक, मुक्ती एकसारख्या आहेत, जो सर्व जागी आपणास धनुष्यबाणधारी पाहातो, जो मन, वाचा, कायेने आपली सेवा करतो, त्यांच्या हृदयात आपण कायम रहा.

१४) प्रभू, ज्याला कधीच, काहीच नको आहे. आसक्तिरहित आपल्यावर सहज प्रेम करतो, त्याच्या हृदयात आपण निरंतर राहा. तेच आपले घर आहे.

चवदा घरांचा हा स्वैर अनुवाद केला आहे.

माऊलींनी ज्ञानेश्वरीत आठ घरे सांगितली आहेत. त्यांना 'धाम' म्हटले आहे.

**सती आणि सत्पुरुख । दानशीळ याज्ञिक ।**
**तपस्वी अलौकिक । संन्यासी जे ॥ ज्ञाने.१६/४०२**

**कां भक्त हन महात्मे । इयें माझीं निजाचीं धामें ।**
**निर्वाळलीं होमधर्में । श्रौतादिकीं ॥ ज्ञाने.१६/४०३**

**अर्थ :** पतिव्रता, सत्पुरुष, दानशील पुरुष, याज्ञिक, लोकोत्तर तपस्वी व संन्यासी, अथवा भक्त आणि महात्मे ही माझी स्वतःची 'घरे' श्रौतादिक, यज्ञक्रियांनी शुद्ध झालेली असतात. जे मला मिळाले व ज्यांची पुनरावृत्ती (जन्म-मरण) संपली तेसुद्धा माझे धाम आहेत.

**ते माझे परम । साचोकारें निजधाम ।**
**हें आंतुवट तुज वर्म । दाविजत असे ॥ ज्ञाने.८/२०३**

★★★★★

## (२१) स्वभाव

स्वभाव त्यास म्हणतात जो बदलत नाही. स्वभावास औषध नसते.

१) दुष्टाचा स्वभाव सांगताना सुभाषितकार सांगतात.

**नलिकायामपि कुटिलं न भवति सरलं शूनः पुच्छम् ।**
**तद्वत् खलजनहृदयं बोधितं नैवयाति माधुर्यम् ॥**

अर्थ : कुत्र्याचे शेपूट, सहा महिने सरळ नळीमध्ये टाकले. पण ते सरळ होत नाही. त्याप्रमाणे दुष्टाला कितीही उपदेश केला तरी त्याच्या 'स्वभावात बदल होत नाही.' दुष्टाबद्दल एक सुभाषित प्रसिद्ध आहे.

**तक्षकस्य विषं दंते मक्षिकाया विषं शिरे । वृश्चिकस्य विषं पुच्छे सर्वांगे दुर्जनो विषम् ॥**

**अर्थ :** सापाच्या दातात विष असते. माशीच्या डोक्यात विष असते. विंचवाच्या शेपटीत विष असते. मात्र दुर्जनाच्या सर्वांगात विष असते. तुका म्हणे, 'विंचवाची नांगी । तैसा दुर्जन सर्वांगी ॥'

**कथा :** रामकृष्ण परमहंस नदीत स्नान करीत असता त्यांना एक विंचू बुडताना दिसला. त्यांनी त्यास बाहेर काढण्याकरिता हातात घेतला. पण विंचवाने नांगी मारली. असे चार वेळा झाले. एक माणूस म्हणाला, 'महाराज विंचवाने आपणास चार वेळा नांगी मारली. आपण पुन्हा पुन्हा त्यास बाहेर का काढता ? मरू दे त्यास.' रामकृष्ण परमहंस म्हणाले, 'विंचू नांगी मारण्याचा दुष्ट स्वभाव सोडत नाही. मग मी आपला त्याला वाचविण्याचा चांगला स्वभाव कां सोडू ? मी कंपनीत कामास असताना कामावर वेळेवर जात असे. कांही मंडळी नेहमी उशिरा येत असत. शिफ्ट ड्युटी असल्यामुळे जाणारी माणसे उशिरा येणाऱ्यावर वैतागत असत. आमच्या ग्रुपने निर्णय घेतला, सर्वांनी उशिरा जायचे. पण माझ्या स्वभावामुळे मी लवकर गेलो. सर्वांनी मला विचारले, 'ठरले असताना लवकर कां आलास ?' मी सांगितले, 'कांही कामगार उशिरा येण्याचा स्वभाव सोडत नाही. मग मी लवकर, वेळेवर येण्याचा स्वभाव कां सोडू ?'

२) मूर्खांचा स्वभावसुद्धा कितीही सांगितले तरी सुधारणारा नसतो. पण मूर्ख दुष्टांपेक्षा बरे असतात. दुष्ट दुसऱ्यांचे नुकसान करतात. मूर्ख फक्त स्वतःचे नुकसान करतात. मूर्खांना सांगण्यात आपला वेळ खर्च करू नये. 'मूरखको समझावते ज्ञान गांठ का जाय । कोयला होय उजला सौ मन साबून लगाय ।' कोळशाचा काळेपणा शंभर मण साबण लावून जाणार नाही. तसा मूर्खात फरक पडत नाही. फरक पडला तर त्यास मूर्ख कोण म्हणेल ?

**फुलै फलै न बेत यद्यपि सुधा बरसतहि जलद ।**
**मूरख हृदय न चेत यदि गुरू मिलें विरंचिसम ॥**

**अर्थ :** वेताच्या झाडावर अमृताचा पाऊस पडला तरी वेताला फुलं-फळं येत नाहीत. तसेच मूर्खास ब्रह्मदेवासारखे ज्ञानी गुरू मिळाले तरी त्याच्या हृदयात प्रकाश पडत नाही.

३) गाढवाच्या, कुत्र्याच्या स्वभावात बदल होत नाही.

**गाढव शृंगारिले कोडे । कांही केल्या नव्हे घोडे ॥१॥**

**त्याचे भुंकणे न राहे । 'स्वभावासी' करील काय ॥२॥**

**श्वान शिबिके बैसविले । भुंकता न राहे उगले ॥३॥**

**तुका म्हणे 'स्वभावकर्म' । कांही केल्या न सुटे धर्म ॥४॥**

**दृष्टांत :** एकदा खंडोबाच्या मूर्तीची देवळातून चोरी झाली. (जेजुरीस अशी चोरी झाली आहे)

देवाची यात्रा भरली. पालखीची प्रथा असल्यामुळे भक्तगणांनी विचार केला, पालखीत का ठेवायचे ? एकाने डोके चालविले. तो म्हणाला मूर्ती नाही. पालखी तर निघाली पाहिजे. कुत्र्याला खंडोबाचे रूप समजतात, त्यास पालखीत बसवू. सर्वांना विचार पटला. एका कुत्र्यास चांग सजविले. गळ्यात हार घातला, झूल अंगावर टाकली. कुत्र्यास पालखीत बसवून पालखी उचलली वाजत गाजत मिरवणूक निघाली. ८-१० भोई पालखी खांद्यावरून घेऊन निघाले. भर चौका पालखी आली. पालखीतील कुत्र्यास त्याचे भाऊबंद दिसले. त्यानी भुंकण्यास सुरुवात केली पालखीतून उडी मारून दुसऱ्या कुत्र्याशी भांडू लागला. पालखीस खांदा देणारे नाराज झाले. अरे ज्यास 'देव' म्हणून खांद्यावर घ्यावे तो आपला स्वभाव काही सोडत नाही. कुत्र्याच्या, गाढवाच्य स्वभावात कधीही बदल होत नाही. अशीच कुत्र्या - गाढवांसारखी माणसेसुद्धा आहेत की ज्यांच्य स्वभावात काहीच बदल होत नाही.

४) एका गावात मीराबाई नावाची एक भांडकुदळ बाई रहात होती. भांडणाशिवाय तिला अन्न पचत नव्हते. गावातील लोकांनी निर्णय घेतला. टाळी एका हातानी वाजत नाही. मीराबाईशी आपण भांडायचे नाही. दोन दिवस गेले. भांडण न झाल्यामुळे तिला चैन पडेना. शेजारी गेली व म्हणाली, 'राधाबाई विस्तव आहे का ?' राधाबाई म्हणाली, 'मीराबाई विस्तव आहे पण घेणार कशात ?' मीराबाई म्हणाली, 'द्या पदरात.' राधाबाई सहज म्हणाली, 'मीराबाई असे वेड्यासारखे काय बोलता ?' मीराबाईने लगेच भांडणास सुरुवात केली. ती म्हणाली, 'मला वेडी म्हणतेस काय ? तुझी आई वेडी, आजी वेडी' असे म्हणत तिने राधाबाईच्या सगळ्या कुळाचा उद्धार केला. मीराबाईचे बोलणे ऐकून राधाबाई तिच्याकडे बघतच राहिली.

५) गीतेत देवाने व ज्ञानेश्वरीमध्ये ज्ञानोबारायांनी अर्जुनाच्या स्वभावाचा प्रसंग रेखाटला आहे. पांडवांच्या अज्ञातवासात कौरवांनी विराट राजावर स्वारी केली. विराटाचा उत्तर नावाचा पुत्र बृहन्नडा (अर्जुन) सारथी घेऊन आला. पण कौरवांचे सैन्य पाहून घाबरला व पळू लागला. 'उत्तर न देता उत्तर उत्तर दिशेस पळाला' (मोरोपंत) पण अर्जुनाचा क्षत्रिय स्वभाव त्यास गप्प बसू देईना. बाहू स्फुरण पावले व शमीच्या वृक्षावरील शस्त्रे काढून एकट्या अर्जुनाने अकरा अक्षौयिनी सैन्यास पराभूत केले तो प्रसंग -

**उत्तरु वैराटींचा राजा । पळतां तूं कां निघालासि जुंझा ।**
**हा क्षात्रस्वभावो तुझा । जुंझविल तुज ॥ ज्ञाने.१८/१२९५**

**महावीर अकरा अक्षौहिणी । तुवां येकें नागविले रणांगणीं ।**
**तो स्वभावो कोदंडपाणी । जुंझवील तूतें ॥ ज्ञाने.१८/१२९६**

परशुराम नेहमी आपला शिष्य भीष्म यास म्हणायचे, 'भीष्मा मला कोण समजतोस ? मी एकविस वेळा पृथ्वी निःक्षत्रीय केली आहे.' बऱ्याच वेळा हे ऐकून घेऊन, न राहवून, मर्यादा सोडून

क्षत्रियाचा स्वभाव जागृत होऊन भिष्म पटकन म्हणाले, 'क्षमा करा गुरूवर्य. त्यावेळी हा देवव्रत भीष्म नव्हता.'

६) बर्फाचा स्वभाव थंड, अग्निचा स्वभाव दाहक, दगडाचा स्वभाव कठीण, साखरेचा स्वभाव गोड, लिंबाचा स्वभाव कडू, मीठाचा स्वभाव खारट.

७) देवाचा स्वभाव मात्र 'कृपाळू' आहे. 'तैसा नव्हे देवराव । याचा कृपाळू स्वभाव॥' तु.म. भक्ताविषयी देवाचा स्वभाव कृपाळू आहे. 'कनवाळू कृपाळू भक्तालागी मोही । गजेंद्राचा धांवा तुवा केला विठाई ॥' तु.म.

**दृष्टांत :** एका गावात एक म्हातारा म्हातारी राहात होते. परिस्थिती चांगली होती. दुर्दैवाने त्यांना अपत्य नव्हते. त्यांनी सेवानियोजन खात्यास कळविले की आमचा संभाळ करण्याकरिता एक सज्जन मुलगा पाठवा. खात्याने कळविले, येथे पदवीधरांची नोंदणी होते. दुर्जनांची, सज्जनांची नोंद होत नाही. त्यांना प्रयत्न करून एक सज्जन मुलगा मिळाला. मुलास सांगितले, 'आमचा मरेपर्यंत सांभाळ करावयाचा. मेल्यानंतर सर्व संपत्ती तुझीच आहे.' सज्जन मुलगा म्हणाला, 'आपले सर्व मान्य आहे. पण माझे चार आळू आहेत. ते सांभाळले तर मी आपणाकडे राहतो.' जोडपे म्हणाले, 'कोणते आळू ?' मुलगा म्हणाला, 'मी लाजाळू आहे.' म्हातारा-म्हातारी म्हणाले, 'लाज स्त्रियांना शोभते. वाईट कामाची लाज पुरूषाचे भूषण आहे. हा आळू आम्हास मान्य आहे.' तो म्हणाला, 'मी थोडा पोटाळू आहे.' म्हातारी म्हणाली, 'भरपूर संपत्ती आहे. भरपूर खा. हाही आळू आम्हास मान्य आहे.' मुलाने तिसरा आळू पुढे सरकवला, म्हणाला 'मी झोपाळू आहे.' वृद्ध जोडपे म्हणाले, 'ठीक आहे. २४ तासात १२ तास झोप. बाकी बारा तास आहेतच कामाकरिता.' शेवटी तो हळुच म्हणाला, 'मी थोडा कामकंटाळू आहे.'' असे म्हटल्याबरोबर म्हातारा-म्हातारीनी त्यास दरवाजा दाखविला.

तात्पर्य - लाजाळू म्हणजे लाजण्यामध्ये प्रथम क्रमांक, पोटाळू - खाण्यामध्ये, झोपाळू - झोपण्यामध्ये व कामकंटाळू म्हणजे काम न करण्यामध्ये तरबेज. तद्वत देव, कृपा करण्यामध्ये पहिला नंबर आहेत. म्हणून देवास कृपाळू म्हणतात.

तुलसीदासाने देवाचा आणखी एक स्वभाव सांगितला आहे. 'सुनु सुरेश रघुनाथ सुभाऊ । निज अपराध निसाई निकाऊ । जो अपराध भगत कर करई । राम रोष सो पावक जरई ॥'

**अर्थ :** राम स्वतःचा अपराध सहन करतात. पण भक्तांचा कोणी अपराध केला तर रामास सहन होत नाही. हा त्याचा स्वभाव आहे. (माभळभट व गर्गाचार्य कथा.)

८) मात्र आईचा स्वभाव बालकाकरिता वेगळाच आहे.

**जिचे पिडे बाळ । प्राण तियेचा विकळ ॥१॥**

**ऐसा मातेचा 'स्वभाव' । सूत्र दोरी एकजीव ॥२॥**

**सुखाची विश्रांती । उमटे मातेचिया चित्ती ॥३॥**

**तुका म्हणे संत । तुम्ही बहु कृपावंत ॥४॥**

तुकोबारायांनी आईच्या स्वभावाचे वर्णन केले आहे.

**न लगे मायेसी बाळे निरवावें । आपल्या 'स्वभावे' ओढे त्यासी ॥१॥**

**मज कां लागला करणें विचार । ज्याचा जार भार त्याचे माथा ॥२॥**

**गोड धड त्यासी ठेवी न मागता । समाधान खातां नेदी मना ॥३॥**

**खेळता गुंतले उमगूनि आणी । बैसोनिया स्तनीं लावी बळे ॥४॥**

**त्याच्या दुःखे पडे आपण खापरीं । लाही तळी वरी होय जैसी ॥५॥**

**तुका म्हणे देह विसरे आपुला । आघात तो त्याला लागो नेदी ॥६॥**

जसा आईचा स्वभाव स्वतःच्या मुलाकरिता कळवळ्याचा असतो तसा जगातील जीवाविषयी संतांचा 'स्वभाव' असतो. देव कृपाळू आहे व निष्ठूरसुद्धा आहे. पण संत मात्र फक्त कृपाळूच आहेत निष्ठूर अजिबात नाहीत असे ज्ञानोबाराय आहेत. 'कृपाळू उदार माझा ज्ञानेश्वर । तया नमस्कार वारंवार ॥' नाथ. 'तुका म्हणे तुम्ही उदार कृपाळ । शृंगारिले बाळ कवतुके ॥' कृपाळू सज्जन तुम्ही संतजन । एवढे कृपादान तुमचे मज ॥' तु.म.

★★★★★

## (२२) प्रेम

देव व भक्त यांच्यातील महत्त्वाचा संबंध म्हणजे 'प्रेम'. देव सर्वांपेक्षा भक्तावर जास्त प्रेम करतो व भक्त फक्त देवावरच प्रेम करतो. परमात्मा सर्वांचा पिता असल्यामुळे साहजिकच सर्वांवर प्रेम करतो. पण यामध्ये तीन प्रकार पडतात. १) सामान्य प्रेम २) विशेष प्रेम ३) अतिविशेष प्रेम.

**१) सामान्य प्रेम -** जगातील सर्व जीवावर प्रेम असल्यामुळे देव सर्वांना सर्व कांही देतो. जन्मल्या बरोबर देव जीवाच्या दुधाची सोय करतो. 'बाळा दूध कोण करिते उत्पत्ती । वाढवी श्रीपती सवे दोन्ही ॥' तु.म. 'गर्भी असता बाळा । कोण पाळी त्याच्या लळा ॥' तु.म. बाळाची भूक जशी वाढते तशी दुधाचीपण वाढ होते. जगातील सर्व जीवांना हा पोसतो. 'का रे नाठविशी कृपाळू देवासी । पोशीतो जगासी एकलाची ॥' तु.म. पशू-पक्ष्यांची तोच काळजी घेतो.

**पक्षी अजगर न करे संचित । तयासी अनंत प्रतिपाळी ॥ तु.म.**

**कथा :** शिवाजी महाराजांच्या वेळी एकदा दुष्काळ पडला होता. महाराजांनी जनतेच्या उदर निर्वाहाकरिता कामे काढली होती. एका ठिकाणी रस्ता दुरुस्ती चालली होती. शिवाजी महाराजांनी मुद्दाम दुरुस्तीचे काम दाखविण्याकरिता रामदास स्वामींना पाचारण केले होते. स्वामी आले. शिवाजी महाराज म्हणाले, 'स्वामी माझ्या जनतेस मी उपाशी मरू देणार नाही.' स्वामींना महाराजांची प्रौढी वाटली. स्वामींनी एका दगडफोड्यास दगड फोडण्यास सांगितले. दगड फुटला पण त्यातून एक बेडकुळी बाहेर पडली. स्वामी म्हणाले, 'महाराज आपण माणसांच्या पोटांची सोय करताच, पण बेडकुळीचीपण काळजी घेता.' महाराज खजील झाले. खाली मान घातली. स्वामींना सांगायचे होते, परमात्मा सगळ्यांची काळजी घेतो. आपण निमित्त आहोत. पाषाणाच्या पोटी बैसला दर्दुर । तया मुखी चारा कोण घाली ॥' तु.म. पोटी पाषाणांचे जीव । कवण जीव त्यांचा भाव ॥' तु.म. 'जभी दंत नही थे तभी दूध दिया । अभी दंत दिये तो अन्न न दे ? ॥' तुलसी. देवाने मरेपर्यंत सर्वांची सोय केली आहे. 'तुलसी मुर्देको देत है कपडा लकडी आग । जीते रहकर सोच रहे वो नर बडा अभाग ॥' सर्वांचे गाठोडे देवाने बरोबर दिले आहे. पण गाठ सोडण्याची काहींना अक्कल नाही. त्यामुळे दरिद्री रहातात. 'भुखा भिखा कोई नही सबकी गठरी लाल । गाठ खोलना नहीं जाणते इस विधी भये कंगाल ॥' कबीर. पण हे सामान्य प्रेम आहे.

२) **विशेष प्रेम -** देव आपल्या नातेवाईकांवर जास्त प्रेम करतो. श्रीकृष्णाने आपल्या आठ पत्न्यांची सर्व इच्छा पूर्ण केली. १) रूक्मिणी २) सत्यभामा ३) जांबुवती ४) कालिंदी ५) सत्या ६) भद्रा ७) लक्ष्मणा ८) मित्रवृंदा. रूक्मिणी म्हणाली, 'देवा मला आपल्यासारखा सुंदर पुत्र हवा.' श्रीकृष्ण म्हणाले, 'चांगल्या पुत्राकरिता दोघांना तपश्चर्या करावी लागेल.' दहा वर्षे तपश्चर्या केल्यानंतर रुक्मिणीला प्रद्युम्न नावाचा मुलगा झाला. हा अतिशय देखणा होता. सत्यभामा म्हणाली, 'मला स्वर्गातील पारिजातकाचे झाड हवे आहे.' पत्नीच्या मागणीकरिता श्रीकृष्णाने स्वर्गातील पारिजातकाचे झाड आणून सत्यभामेच्या अंगणात लावले. पण त्याची फुले मात्र रूक्मिणीच्या अंगणात पडत होती. जांबुवती एक हजार कमळे वाहून शंकराची आराधना करत असे. एकदा श्रीकृष्ण तिच्याबरोबर फुले वाहण्यास गेले. ९९९ फुले वाहिली. एक कमी पडले. पूजा अपुरी राहते म्हणून श्रीकृष्णांनी स्वतःचे नेत्रकमल वाहिले. म्हणून त्यांचे नाव कान्हा पडले. शंकराच्या प्रसादाने जांबुवतीस सांब नावाचा मुलगा झाला. देवानी आपल्या संबंधीत लोकांना काही कमी पडू दिले नाही. हे त्याचे विशेष प्रेम.

३) **अतिविशेष प्रेम -** हे प्रेम भक्तांवर असते. आपल्या नातेवाईकांपेक्षा आपल्या दासावर परमात्मा जास्त प्रेम करतो. माऊलीनी या प्रेमास निरुपम, अद्‌भूत प्रेम अथवा साजूक प्रेम अशी नावे दिली आहेत.

**देखा नवल तया प्रभूचें । अद्भुत प्रेम भक्तांचें ।**
**जे सारथ्यपण पार्थाचें । करितु असें ॥ ज्ञाने.१/१४२**

**या जगदीश्वराचें प्रेम । एथ दिसतसे निरुपम ।**
**कैसें पार्थे येणें सर्वोत्तम । पुण्य केले ॥ ज्ञाने.१/११**

**पैं गा भक्तासि माझें कोड । मज तयाचे अनन्यगतीची चाड ।**
**कां जें प्रेमळांचें सांकड । आमुचिया घरीं ॥ ज्ञाने.१०/१३७**

**पाहें पां स्वर्ग मोक्ष उपायिले । दोन्ही मार्ग तयांचिये वाहणी केले ।**
**आम्ही आंगही शेषा वेंचिलें । लक्ष्मीयेसी ॥ ज्ञाने.१०/१३८**

**परि आपणपेंवीण जें एक । तें तैसेंचि सुख साजुक ।**
**सप्रेमळांलागीं देख । ठेविलें जतन ॥ ज्ञाने.१०/१३९**

या प्रेमाला देव उपमा देतात - मी देह व भक्त आत्मा !

**तया एकवटलिया प्रेमा । जरी पाडें पाहिजे उपमा ।**
**तरी मी देह तो आत्मा । हेचि होय ॥ ज्ञाने.६/४८५**

पांडवांवरील प्रेमाकरिता श्रीकृष्णाने बळीदादास बाजूस केले. आपला दादा भक्तांच्या आड येणार म्हणून श्रीकृष्णाने एक भाकड, अशक्त गाय निर्माण केली. बळीदादाचा धक्का लागून ती मेली. बळीदादा म्हणाले, 'ब्रह्महत्या घडली. काय करावे ?' श्रीकृष्ण म्हणाले, याकरिता भारत यात्रा करावी लागेल. दादा म्हणाले, 'यात्रा करतो, पण महाभारत युद्धात दुर्योधन किती प्रताप करतो आहे ते मला पाहावयाचे आहे. कारण तो माझा शिष्य आहे.' श्रीकृष्ण म्हणाले, 'डोक्यावर ओझे घेऊन कोण खेळ पाहात नाही. अगोदर तीर्थयात्रा करा, पाप नाहीसे करा व मग युद्ध पहा.' असे म्हणून बळीरामदादांना तीर्थयात्रेस पाठविले. इकडे त्यांच्या गैरहजेरीत युद्ध उरकून घेतले व पांडवांचा विजय घडविला. पांडवांच्या आड येणारा त्यांचाच (भीमाचा) मुलगा बभ्रु नाटक करून भीमाच्या हाती मारला.

**न साहेचि बभ्रु पांडवा पारखा । दुराविला सखा बळिभद्र ॥ तु.म.**

भक्ताच्या आड येणारा प्रल्हादाचा बाप हिरण्यकश्यपूचा पण देवांनी नृसिंह अवतार धारण करून वध केला. देव दुर्वासांना सांगतात, मला सगळ्यात जास्त भक्त आवडतात.

**न तथा मे प्रियतम आत्मयोनिर्न शङ्करः ।**
**न च सङ्कर्षणो न श्रीर्नैवात्मा च यथा भवान ॥ भा. ११/१४/१५**

मला माझा पुत्र ब्रह्मदेव आवडत नाही, शंकर आवडत नाही, माझा भाऊ आवडत नाही, माझी पत्नीसुद्धा मला विशेष आवडत नाही. किंबहुना माझा आत्मासुद्धा तितकासा आवडत नाही, जितके

भक्त मला आवडतात. 'देवा भक्त जीवाहुनी आवडती । सकळहि प्रिती त्यांच्या ठायी ॥' तु.म. भक्तांना पण देवाशिवाय काहीच आवडत नाही. 'ज्यांचा आवडता देव । अखंडित प्रेमभाव ॥' तु.म. 'विषय तो त्याचा झाला नारायण । नावडे जन धन माता पिता ॥' तु.म. देव भक्तांना जीवापेक्षा जास्त आवडतो.

**कानडिया विठोबा कानडिया । बहु आवडसी जीवापासूनिया ॥ ज्ञान.**

जगात सगळ्यात मोठे नाते आहे 'प्रेम' सगाई. सूरदासांचा गोड अभंग -

**'सबसे उंची 'प्रेम' सगाई ॥धृ.॥**

**दुर्योधनको मेवा त्यागो साग विदुर घर पाई ॥१॥**

**जूठे फल शबरीके खाये बहुविधी प्रेम लगाई ॥२॥**

**प्रेमके बस नृप सेवा किन्हीं आप बने हरिनाई ॥३॥**

**राजसु यज्ञ युधिष्ठिर किन्हो तामें जूठ उठाई ॥४॥**

**प्रेमके बस अर्जुन-रथ हांक्यो भूल गई ठकुराई ॥५॥**

**ऐसी प्रीत बढी वृन्दावन गोपीन नाच नचाई ॥६॥**

**सूर क्रूर इस लायक नाहीं कहें लगी करौं बढाई ॥७॥**

प्रेमाकरिता श्रीकृष्णांनी सगळ्यांची कामे केली. पण भक्तांना कशाची उणीव भासू दिली नाही. परमात्मा प्रगट होतो याला कारण काय तर 'प्रेम' आहे.

**अगुन अरुप अलख अज जोइ । भगत 'प्रेम' बस सगुण सो होइ ॥ तुलसी.**

**हरि व्यापक सर्वत्र समाना । प्रेम ते प्रगट वोहिं मैं जाना ॥ तुलसी.**

प्रेमामुळे देव भक्तांकडे आकर्षित होतो व भक्त देवाकडे आकृष्ट होतो. 'तुलसी कुत्ता रामका मोतिया मेरा नाम । कंठे डोरी प्रेमकी जित खींचो उत जाना ॥' 'प्रेम' सूत्र दोरी । नेतो तिकडे जातो हरी ॥' तु.म.

असे हे अनमोल प्रेम कशाने निर्माण होते याचा दाता पण परमात्माच आहे अर्थात त्याचे वर्म नाम आहे. जो 'नाम' सतत घेतो तेथे प्रेम आपोआप प्रगट होते. 'प्रेम तेथे वास करी । मुखी उच्चारिता हरी ॥' तु.म.

प्रेमाच्या अधिकारी गौळणी होत्या. म्हणून श्रीकृष्ण त्यांच्या इशाऱ्यावर नाचत होता. मात्र परम अधिकारी राधा - राधा म्हणजे जिच्या डोळ्यात नेहमी प्रेमाच्या 'धारा' पाझरतात. म्हणून म्हण आहे 'बिना राधा कृष्ण आधा ॥'

**दृष्टांत :** एका जंगलातून काही ऋषी जात होते. त्यांना एक दिव्य स्त्री दिसली. ती तपश्चर्या करीत होती. सर्व ऋषी थांबले. तिची तपश्चर्या झाल्यानंतर ऋषींनी तिला विचारले, 'आपण कोण ? आपण देवता दिसता. आपला अधिकार काय ?' त्या दिव्य स्त्रीने सांगितले मी 'ब्रह्मविद्या' आहे. मी सर्व गोष्टी देऊ शकते. इतकेच काय जगातील मुख्य मौल्यवान मुक्तीसुद्धा देऊ शकते. ऋषीं म्हणाले, एवढा मोठा आपला अधिकार असताना आपण तपश्चर्या का करता ? तेव्हा ती दिव्य स्त्री ब्रह्मविद्या म्हणते, माझ्याकडे अद्याप गौळणींसारखे 'भक्ती-प्रेम' नाही, ज्या प्रेमाचा अंकीत श्रीकृष्ण परमात्मा होतो. ते प्रेम प्राप्त व्हावे याकरिता माझी तपश्चर्या चालू आहे.

**रामायणातील 'प्रेम' प्रकार -** १) दशरथ - सत्य प्रेम २) कौसल्या - वात्सल्य प्रेम ३) अहिल्या - धीर प्रेम ४) जनक - गूढ प्रेम ५) सीता - तत्त्व प्रेम ६) भरत - आगम प्रेम ७) लक्ष्मण - अनन्य प्रेम ८) केवट - सहज प्रेम ९) वनवासी - सरळ प्रेम १०) जटायू - दर्शन प्रेम ११) शबरी - परम प्रेम १२) बिभिषण - चरण प्रेम १३) हनुमान - निर्भर प्रेम

**मक्का मदिना द्वारका बद्री और केदार । बिना प्रेम सब झूठ है कहे मलूक बिचार ॥**

प्रेमाचे लक्षण आहे अष्ट सात्विक भाव निर्माण होणे. 'नेत्री अश्रूचिया धारा । कोठे रोमांच शरीरा ॥' तु.म. इतर अश्रू व प्रेमाचे अश्रू यात मोठा फरक आहे. अश्रू अनेक प्रकारे येतात. १) क्रोध २) शोक ३) हृदयाची दुर्बलता ४) कमजोरी ५) भीती ६) हर्षामुळे (चुकलेला मुलगा सापडला की आनंदाश्रू येतात) ७) स्वार्थामुळे. बाह्य कारणामुळे पण अश्रू येतात. १) कांदा कापताना २) डोळे आल्यावर अथवा दुखावल्यामुळे ३) अति तिखट खाल्ल्याने ४) ठसका लागल्यामुळे ५) घरातील धुरामुळे ६) अश्रूधुरामुळे ७) ग्लिसरीनमुळे. सिनेमामध्ये दुःखाचा प्रसंग आला तर नट-नटीस रडता येत नाही पण रडण्याचा प्रसंग दाखवायचा असतो. मग दिग्दर्शक डोळ्यात ग्लिसरीन टाकतात त्यामुळे आपोआप डोळ्यातून पाणी येते. पण हे खोटे प्रेम असते. या सर्व अश्रूंमध्ये व प्रेमाच्या अश्रूंमध्ये खूप मोठा फरक आहे. प्रेमाचे अश्रू थंड असतात तर दुःखाचे अश्रू गरम असतात. प्रेमाश्रू डोळ्याच्या बाहेरील भागातून येतात. संसारिक दुःखाचे अश्रू डोळ्याच्या आतील भागातून येतात. सासू मेल्यानंतर मुलगी, मुलगा रडतो व सूनही रडते. पण सर्वांच्या रडण्यामध्ये फरक असतो. मुलगा आईच्या उपकारांच्या आठवणीने तर मुलगी आईचा आधार गेल्यामुळे रडते. पण सून रडते ती मात्र दुसरे रडतात म्हणून अथवा लोक नावे ठेवतील म्हणून ! किंवा ही म्हातारी लवकर गेली नाही, मला छळून मेली म्हणून ! देवाकरिता रडणारा विरळा असतो. भक्त मात्र रडतो तो देवाकरिताच. 'आनंदले मन । 'प्रेमे' पाझरती लोचन ॥' तु.म.

**चिंतन -** हनुमंताचे रामावर प्रेम होते पण निष्काम. प्रभूकडून हनुमंतास कोणतीच अपेक्षा नव्हती. मात्र सुग्रीव व विभिषणाने रामाची सेवा केली पण मनामध्ये कामना ठेऊन. त्या दोघांना रामाने राज्य दिले. सुग्रीवास वालीकडून किष्कींदा नगरीचे राज्य दिले व बिभीषणास लंका राज्य

दिले. मात्र या हनुमंताच्या निष्काम सेवेमुळे भारतात सर्व ठिकाणी हनुमंताची मंदिरे आहेत. शंकर अथवा विष्णू हे दोन मोठे देव, पण यांचीसुद्धा हनुमान मंदिराएवढी मंदिरे नाहीत. बिभीषणाचे व सुग्रीवाचे तर एकही मंदिर दिसत नाही. जगात निष्काम प्रेमाचा जास्त आदर होतो. प्रभूसुद्धा हनुमंताचा कायमचा ऋणी आहे.

★★★★★

## (२३) अवघा लाभ

मनुष्याच्या जीवनात सर्वात मोठा लाभ देवाची प्राप्ती होय. 'लाभ तया झाला संसारा येऊनि । भगवंत ऋणी भक्ति केला ॥' तु.म. यासारखा लाभ दुसरा कोणताच नाही. 'तुका म्हणे आता । लाभ नाही या परता ॥'

**यल्लब्ध्वा पुमान सिद्धो भवति, अमृतो भवति, तृप्तो भवति ॥ ना.भ.सू.४**

जर भक्ती-प्रेम प्राप्त झाले तर तो सिद्ध होतो, अमृतमय होतो, तृप्त होतो. प्रेमाने परमात्मा वश होतो. किंबहुना तो भक्तांचे दास्यत्व करण्यास लाजत नाही. 'राखे दारवंटा बळिचा । सारथी झाला अर्जुनाचा । दास सेवकांचा । होय साचा अंकित ॥' तु.म.

नारायणाची प्राप्ती हा लाभ, त्यामुळे बाकीचे सर्वच लाभ मिळतात. ज्याप्रमाणे एखाद्या कंपनीत जर कायम झाले तर पगार मिळतोच, शिवाय बोनस, हक्काच्या रजा, जेवण, कपडे, प्रवास, मुलांचे शिक्षण, आजारपणात डॉक्टरचा भत्ता आदी सर्व प्रकारचे भत्ते, राहत्या ठिकाणचे भाडे मिळते, असे अनेक फायदे होतात. ब्रह्मांडपती जर आपल्या ताब्यात आला तर काय मिळणार नाही ? लाभच लाभ होतो.

१) देव दास होतो व त्यांची (भक्ताची) सर्व कामे करतो.

**असे भक्तांचिया घरी । कामे न सांगता करी ॥ तु.म.**

**भक्त समागमे सर्व भावे हरी । न सांगता करी सर्व काम ॥ तु.म.**

२) देवामुळे त्याचे सर्व पुरुषार्थ देव भक्तास देतो. (धर्म, अर्थ, काम, मोक्ष)

**तैसे सकल 'पुरुषार्थ' । जेणें स्वामी का सनाथ ।**
**तो श्रीकृष्ण रावो जेथ । तेथ लक्ष्मी ॥ ज्ञाने. १८/१६३८**

३) देवापासून लक्ष्मी वेगळी राहात नाही. भक्तांची लक्ष्मी दासी होते.

**वैष्णवा घरी लक्ष्मी कामारी ।**
**एका जनार्दनी देव दास्यत्व करी ॥ तु.म.**

**चक्रगदा घेऊनि हरी । उभा असे त्यांचे द्वारी ।**
**लक्ष्मी कामारी । ऋद्धी सिद्धी सहित ॥ तु.म.**

**दृष्टांत :** बळीराजाच्या द्वारात परमात्मा सेवक झाला. द्वारपालाचे काम पत्करले. नारदाने ही बातमी वैकुंठात लक्ष्मीला सांगितली. लक्ष्मी म्हणाली, 'अखिल ब्रह्मांड पती असा द्वारपालाची नोकरी करतो आहे ?' लक्ष्मी हे पाहण्यासाठी आली. परमात्मा उभा होता. तिला आश्चर्य वाटले. तिने वेश बदलला. ब्राह्मण दासीचे सामान्य रूप घेऊन बळीराजाकडे गेली. म्हणाली, 'मी अनाथ आहे. मला आपल्याकडे काही काम मिळावे.' बळीराजा म्हणाले, 'हरकत नाही. पडेल ते काम करावे' लक्ष्मी म्हणाली, 'मला आपली बहीण समजा.' बळी म्हणाले ठीक आहे. लक्ष्मी महालात सेवा करू लागली. रक्षाबंधनाचा दिवस उजाडला. लक्ष्मीने बळीस राखी बांधली. बळी म्हणाले, 'मी उदार आहे. माझ्याकडे देव हात पसरतो. तुला हवे ते माग.' ती म्हणाली, 'काही नको. मला फक्त तो द्वारपाल देऊन टाका.' बळीस विस्मय वाटला. म्हणाला, 'आपण कोण आहात ?' ती म्हणाली, 'मी लक्ष्मी आहे.' 'माझी सेवा का केली ?' लक्ष्मी म्हणाली, 'माझा पती जर आपली सेवा करतो आहे तर मला लाज कसली ?' तेव्हापासून ब्राह्मणांच्या जीवनात रक्षाबंधनास महत्त्व आले. क्षत्रियाच्या जीवनात दसऱ्यास महत्त्व असते. वैश्याच्या जीवनात दिवाळीस (वही पूजन) महत्त्व असते व शूद्राच्या जीवनात शिमगा सणास महत्त्व असते.

४) लक्ष्मी दासी झाल्यानंतर तिच्या ज्या आणिमादिक सिद्धी आहेत त्या भक्तांच्या दासी होतात.

**आणि आपलेनि कांतेंसीं । ते जगदंबा जयापासीं ।**
**आणिमादिकी काय दासी । नव्हती तयातें ॥ ज्ञाने.१८/१६३९**

**म्हणौनि जिया वाहीं उभा । तो लक्ष्मियेचा वल्लभा ।**
**तेथ सर्वसिद्धी स्वयंभा । येर मी नेणें ॥ ज्ञाने.१८/१६४७**

**अष्टमहासिद्धी ओळंगती द्वारी । नवजती दुरी दवडिता ॥ तु.म.**

मोठ्या सिद्धी प्राप्त होतात. मग लहान राजस, तामस सिद्धी प्राप्त होणारच.

५) देवाची प्राप्ती झाली की सर्व जग भक्तावर कृपा करते.

**देव सखा जरी । जग अवघे कृपा करी ॥ तु.म.**

६) देव सोयरा झाल्यामुळे सर्व भाग्ये घरी येतात.

**अवघी भाग्ये येती घरा । देव सोयरा झालीया ॥ तु.म.**

वैराग्याचे, ज्ञानाचे व भक्तिचे भाग्य प्राप्त होते. पारमार्थिक भाग्य प्राप्त झाल्यावर क्षुल्लक संसारिक भाग्य का प्राप्त होणार नाही ?

७) देव आपली सर्व शक्ती भक्तास देतो. कर्तुम, अकर्तुम, अन्यथा कर्तुम.

**योग भाग्य घरा येती । सर्व शक्ती चालत ।। तु.म.**

८) देव फक्त शक्तीच नाही तर आपली दैवी, संपत्ती भक्तास देतो.

**देव भाग्य घरा येती । 'संपत्ती' त्या सकळा ।। तु.म.**

**देवे भक्तालागी उपचार मांडीले । शांती सुखासनी माने बैसविले ।**
**धरूनी तन्मयाची छत्रे गौरविले । ज्ञान संपत्तीचे दळभार दिधले ।।**

**सुखे राज्य करा म्हणे त्रिभुवनी ।। निळो.**

९) सर्वात महत्त्वाचे म्हणजे ज्या प्रेमामुळे तो वश होतो ते भक्ती-प्रेम परमात्मा भक्तास देतो व मालामाल करतो.

**या या वैष्णवांचे घरी । प्रेमसुख इच्छा करी ।**
**ऋद्धी सिद्धी द्वारी । कर जोडोनि तिष्ठती ।। तु.म.**

तात्पर्य - देवाचे सर्व वैभव भक्तास प्राप्त होते. 'विश्वासी तो करी स्वामीवरी सत्ता । 'सकळ' भोगिता होय त्याचे ।।' तु.म. देवाच्या प्राप्तित सर्व लाभ मिळतात. जीवनात तो लोपला तर सर्व हानी होते. 'नारायणाच्या लोपे । घडली अवघीच पापे ।।' तु.म. ज्याप्रमाणे सूर्य नसताना सर्वत्र अंधारच अंधार तसा परमात्मा नाही म्हणजे सर्वत्र पापच समजावे.

**पै सूर्य जो वेळु नुदैजे । तया वेळा कीं रात्रि म्हणिजे ।**
**तेवीं माझिये भक्तीविण जें कीजे । तें महापाप नोहे ।। ज्ञाने.९/४२६**

परमात्मा मात्र नामसंकीर्तनाने प्राप्त होतो. पण कीर्तन प्रेमाने झाले पाहिजे. 'अवघे लाभ होती या चिंतने । नामसंकीर्तने गोविंदाच्या ।।' तु.म.



# (२४) यज्ञ

निःस्वार्थ भावाने केवळ दुसऱ्यांच्या हिताकरिता केलेले कर्तव्यकर्म यास यज्ञ म्हणतात. यज्ञामुळे सर्व कर्म अकर्म होते. यामुळे आत्मकल्याणपण होते. गीतेच्या ४ अध्यायात चोवीस ते तीस, सात श्लोकात यज्ञाचे बारा प्रकार सांगितले आहेत ते असे -

१) **ब्रह्म यज्ञ -** प्रत्येक कर्मात कर्ता, क्रिया, पदार्थ या सर्वांना ब्रह्मरूप समजून अनुभव घेणे.

२) **भगवदार्पण यज्ञ -** संपूर्ण क्रिया व पदार्थ फक्त देवाचेच, देवाला अर्पण करणे.

३) **अभिन्नतारूप यज्ञ -** असत पदार्थापासून विन्मुख होऊन देवामध्ये लीन होणे. परमात्म्यापासून आपणास अभिन्न समजणे.

४) **संयमरूप यज्ञ -** एकांत काळात आपल्या इंद्रियांना विषयात प्रवृत्त होऊ न देणे.

५) **विषय हवनरूप यज्ञ -** व्यवहार काळात इंद्रियांचा विषयासी संयोग होऊनसुद्धा त्यामध्ये राग, द्वेष निर्माण न होणे. अलिप्त असणे.

**येऱ्हवी इंद्रियांचेनि मेळे । विषयावरी तरी लोळे ।**
**परि विकारांचेनि विटाळे । लिंपिजेना ॥ ज्ञाने.१३/४७९**

६) **समाधिरूप यज्ञ -** मन बुद्धीसहित सर्व इंद्रिये व प्राण यांचा निरोध करून ज्ञानाने प्रकाशित अशा समाधित स्थिर होणे.

७) **द्रव्य यज्ञ -** आपणास मिळणारे सर्व पदार्थ निःस्वार्थ भावाने दुसऱ्यांच्या सेवेसाठी वापरणे.

८) **तपो-यज्ञ -** आपले कर्तव्य करीत असता कठीण परिस्थितीत प्रसन्नपूर्वक सहन करणे.

९) **योग यज्ञ -** कार्याच्या सिद्धी-असिद्धीमध्ये फलाच्या प्राप्ती-अप्राप्तिमध्ये समान राहणे.

१०) **स्वाध्यायरूप ज्ञान यज्ञ -** दुसऱ्याच्या हिताकरिता सत्शास्त्राचे पठण, नामजप वगैरे करणे.

११) **प्राणायामरूप यज्ञ -** पूरक, कुम्भक, व रेचकपूर्वक प्राणायाम करणे.

१२) **स्तंभवृत्ति प्राणायामरूप यज्ञ -** नियमित योग्य आहार घेऊन प्राण, अपान यांना आपल्या स्थानावर व्यवस्थित ठेवणे.

या सर्व यज्ञाचे तात्पर्य हे आहे की आपल्या सर्व क्रिया यज्ञरूप असायला हव्यात. तर आपले जीवन सफल होते.

यज्ञ करणाऱ्यांचे ऐहिक व पारलौकिक कल्याण होते. जे कर्तव्य कर्म करीत नाहीत त्यांचे ऐहिकच

धड नसते तर पारलौकिक कसे चांगले असणार ? माऊलीच्या शब्दात

**जयां ऐहिक धड नाहीं । तयांचें परत्र पुससी काई ।**
**म्हणोनि सांगों कां वांई । पंडुकुमरा ॥ ज्ञाने.४/१५५**

शास्त्रात सांगितलेले पाच यज्ञ -

१) **ब्रह्मयज्ञं देवयज्ञं भूतयज्ञंच सर्वथा । नृयज्ञ पितृयज्ञंच, यथाशक्ति न हापयेत ॥**

**अर्थ :** ब्रह्मयज्ञ, देवयज्ञ, भूतयज्ञ, नृयज्ञ, पितृयज्ञ हे माणसांनी यथाशक्ति करावेत.

२) **अद्यापनं ब्रह्मयज्ञ पितृयज्ञस्तु तर्पणम् । होमो दैवो बलिर्भूतो नृयज्ञोऽतिथि पूजनम् ॥**

**अर्थ :** स्वाध्याय करणे ब्रह्मयज्ञ, आई वडिलांची सेवा हा पितृयज्ञ. होम वगैरे करणे हा देवयज्ञ, पक्ष्यांना, प्राण्यांना अन्न देणे हा भूतयज्ञ व अतिथी सेवा करणे हा नृयज्ञ आहे.

मोठे यज्ञ यास याग म्हणतात. हा विशिष्ट कामनेकरिता करतात. दशरथ राजाने पुत्र कामेष्टी यज्ञ केला. रामाने अश्वमेध यज्ञ केला. पांडवांनी राजसूय यज्ञ केला. राजसूय यज्ञामध्ये प्रत्यक्ष श्रीकृष्ण पत्रावळी उचलण्याचे काम करीत होते. शास्त्रात, पुराणांत असे यज्ञाचे अनेक प्रकार सापडतात.

ज्ञानेश्वर महाराजांनी गीतेच्या आधाराने यज्ञाचे तीन प्रकार सांगितले आहेत. १) द्रव्ययज्ञ २) ज्ञानयज्ञ ३) नामयज्ञ

१) **द्रव्ययज्ञ -** शास्त्रानुसार विधीने यज्ञ करणे. यात नऊ पदार्थ पाहिजेत.

**काम्यकर्मी विघ्नविचित्र । देश काळ मंत्र तंत्र ।**
**द्रव्य दक्षिणा विधीमात्र । शुद्धी सर्वत्र पाहिजें ॥ नाथ १०/५०७**

१) योग्य देश २) योग्य काळ ३) योग्य मंत्र ४) ते योग्य म्हणणे ५) योग्य द्रव्य ६) योग्य दक्षिणा ७) योग्य विधी ८) योग्य पात्र ९) सर्वत्र शुद्धी. एखाद्या पदार्थात, क्रियेत त्रुटी निर्माण झाल्यास यज्ञाचे फळ मिळत नाही. कदाचित उलटा परिणाम होतो. कलीयुगात असे यज्ञ करणे अतिशय अवघड आहे. याची मर्यादा ब्रह्मलोकांपर्यंत आहे.

२) **ज्ञानयज्ञ -** हा द्रव्य यज्ञापेक्षा सोपा आहे पण फळ मुक्ती आहे. माऊली सांगते,

**ते द्रव्यादियागु कीर होती । परी 'ज्ञानयज्ञाची' सरी न पवती ।**
**जैशी तारा तेज संपत्ती । दिनकरापाशीं ॥ ज्ञाने ४/१५९**

बाकीचे द्रव्य यज्ञ म्हणजे ताऱ्यांचे तेज पण ज्ञानयज्ञ म्हणजे सूर्य. किती ताऱ्यांचे तेज एकत्र केले म्हणजे सूर्याची बरोबरी होईल ? 'दिपदीपिका शशी तारा होतु कां कोटीवरी रे । परी न सरे निशी नुगवे दिवसु दिनकरनाथु जया परी रे ॥' ज्ञान. हा यज्ञपण सामान्य जनास अवघड आहे.

यात विवेक, वैराग्य, षट् संपती, तीव्र मुमुक्षुत्व, योग्य गुरूची भेट, महावाक्याचा बोध, नंतर मुक्ती.

३) **नामयज्ञ** - हा सर्वात सोपा आहे व सर्वात श्रेष्ठ आहे शिवाय सर्वांना जमणारा आहे, म्हणून माऊली यास परम म्हणतात.

**नामजपयज्ञु तो परम । बाधूं न शके स्नानादि कर्म ।**
**नामें पावन धर्माधर्म । नाम परब्रह्म वेदार्थें ॥ ज्ञाने.१०/२३३**

नाम घेणाऱ्यास स्नानाची सुद्धा गरज नाही. याने धार्मिक, अधार्मिक लोक पवित्र होतात. याची तुलना ब्रह्माशी नाही तर परब्रह्माशी होते.

**ये पाक यज्ञाश्चत्वारो विधीयज्ञसमान्विताः ।**
**सर्वे ते जपयज्ञस्य कलां नार्हन्ति षोडशीम् ॥ सुभा**

**अर्थ :** चार पाकयज्ञ १) वैश्वदेव २) बलिकर्म ३) नित्यश्राद्ध ४) अतिथीपूजन व विधीयुक्त केलेले सर्वयज्ञ जपयज्ञांच्या एक सोळावा अंश पण योग्य नाहीत.

नामयज्ञाचे श्रेष्ठत्व एवढे आहे की एका नामाची तुलना कोटी यज्ञांशी होते.

**कोटी कोटी यज्ञ नित्य ज्याचा नेम । एक हरिनाम जपता घडें ॥ नाथ.**

**दृष्टांत :** संत कबिरांच्या वेळी एका राजाचा मुलगा रोगग्रस्त होता. एकुलता एक मुलगा व आजारी, त्यामुळे राजा फार दुःखी होता. मुलाचा आजार बरा होण्याकरिता राज्यातील सर्व निष्णात वैद्यांचे उपाय केले पण मुलगा बरा होण्याची चिन्हे दिसत नव्हती. वैद्यकीय उपाय संपल्यानंतर राजा महात्म्यांना भेटू लागला व आपली करूण कहाणी सांगू लागला. एका महात्म्याने सांगितले, 'आपला मुलगा बरा होईल पण त्यास एकच उपाय आहे. त्यास कोटी यज्ञाचे फल पाहिजे.' राजा म्हणाला, 'एक यज्ञ होणे अवघड, मग कोटी यज्ञ कसे होणार ? असे कोटी यज्ञाचे फल असणारा या पृथ्वीवर कोण आहे कां ?' महात्मा म्हणाला, 'आपण संत कबिरांना भेटलात तर आपले काम होईल.' राजा संत कबिरांकडे आला. अत्यंत आदराने नमस्कार केला. आपली कर्म-कहाणी सांगितली. 'मी आपल्याकडे मोठ्या आशेने आलो आहे. आपल्याकडे कोटी यज्ञाचे फळ आहे. त्यामुळे माझा एकुलता एक मुलगा जगणार आहे.' कबिर हसत म्हणाले, 'थांबा, एक कोटी यज्ञांचे फळ देतो.' कबिर कपडे विणत असताना सतत रामनाम घेत होते. एक छोटीशी कपड्याची गाठ राजास दिली व सांगितले ही गाठ जाळा व दुधातून मुलास पाजा.' राजाने कबिराचे औषध मुलास पाजले. एका महिन्यात मुलगा बरा झाला. एका नामाने कोटी यज्ञाचे फळ मिळेल पण ते ज्ञानोत्तर, देवाच्या भेटीनंतर घेतलेले नाम असावे.

**सुखाचे फुकाचे कांही वेचे न भांडार ।**
**कोटी यज्ञापरिस तुका म्हणे हेचि सार ॥ तु.म.**

नाम यज्ञ सर्व प्रकारच्या साधकांकरिता समान आहे. ज्याप्रमाणे काही सौभाग्यवती स्त्रिया हिऱ्याचे दागिने वापरतात तर काही सोन्याचे, काही चांदीचे तर काही मोत्यांचे, तर काही काचेचे. आदिवासी स्त्रिया हाडांचे दागिने वापरतात. दागिन्यांचे वेगवेगळे प्रकार असू शकतात. पण कुंकू मात्र एकाच तांबड्या रंगाचे असते. तद्वत साधक कोणत्याही प्रकारची साधना करोत पण त्यांना नाम आवश्यक आहे. त्याशिवाय शोभा नाही.

★★★★★

## (२५) संस्कार

धार्मिक संस्काराची तुलना सुवर्णावरील संस्कारांशी होऊ शकेल. ज्याप्रमाणे खाणीतून बाहेर निघालेले अशुद्ध सोने अग्निचा संस्कार होताच अधिकाधिक चमकू लागते त्याप्रमाणे संस्कारांनी जीवन उजळून निघते. संस्कार म्हणजेच दोष मार्जन होय. वेद, स्मृती, पुराणे इ. परम पवित्र ग्रंथांतून सोळा संस्कार सांगितले आहेत.

१) **गर्भाधान** - गर्भाधानाच्या दिवशी झालेला संस्कार अतिसूक्ष्म स्वरूपात मातेच्या गर्भाशयावर उमटत असतो. समागमाच्या वेळी पती-पत्नीच्या मनातील भावनांचा गर्भावर होणारा परिणाम म्हणजेच गर्भाधान. उदा. हिरण्यकश्यपू राक्षस वृत्तीचा असूनही नाम उच्चारामुळे उदरी नामधारक प्रल्हाद आला. काही वेळा आई-वडील चांगले असून 'वेळ न साधल्यामुळे वाईट संतती निर्माण होते. 'अन्याय तो त्यांचा नव्हे वायचाळा । मायबापे वेळा न साधिली ॥' तु.म.

२) **पुंसवन** - गर्भधारणेच्या निश्चित निदानांती दुसऱ्या महिन्यात पुंसवन संस्कार करावा. हा संस्कार गर्भाचे पुल्लिंग ठरण्यास पोषक आहे. याचा विधी वटवृक्षाच्या मुळ्यांचा रस वधूच्या नाकाच्या डाव्या नाकपुडीत पिळणे, दह्यात दोन उडीद व एक साळ ठेवून पुंसवन प्राशन करणे. पाण्याने भरलेले मृत्तीकापात्र स्त्रीच्या ओटीपोटावर ठेवून 'सूपर्णोऽसि' हा मंत्र म्हणणे.

३) **सीमंतोन्नयन** - सीमंतोन्नयन हा संस्कार गर्भशुद्धीसाठी व गर्भावस्थेतील बालकाच्या सर्व अवयवांची सर्वांगीण वृद्धी होण्यासाठी पुंनक्षत्रात केला जातो. अभिमंत्रित यज्ञप्रसाद, औदुंबर, साळिंदराचा काटा इ. वस्तूंनी पतीकडून पत्नीच्या सीमंताचे (भांगाचे) होणारे उन्नयन (पृथक करणे). हा संस्कार चौथ्या किंवा सहाव्या महिन्यात करतात.

४) **जातकर्म** - यास व्यवहारात जातक विधी म्हणतात. हा संस्कार मुलाच्या बाराव्या व मुलीच्या

तेराव्या दिवशी करावा. मूल जन्माला आल्यानंतरचा हा पहिला संस्कार होय.

५) **नामकरण** - नामकरण अर्थात बारसे. मुलाचे नाव सम व मुलीचे नाव विषम अक्षरी असावे. शास्त्रात नामाचे चार प्रकार सांगितले आहेत.

(ना) देवता संबंधी - उदा. रामदास, कृष्णदास, राधिका, शिवानी, रूद्राणी

(रा) मास (महिना) संबंधी - उदा. १) चैत्र - वैकुंठ २) वैशाख - जनार्दन ३) ज्येष्ठ - उपेंद्र ४) आषाढ - यज्ञ पुरुष ५) श्रावण - वासुदेव ६) भाद्रपद - हरी ७) अश्विन - योगीश ८) कार्तिक - पुंडरिकाक्ष ९) मार्गशिर्ष - कृष्ण १०) पौष - अनंत ११) माघ - अच्युत १२) फाल्गुन - चक्री

(य) नक्षत्रावरून - नक्षत्राच्या चरणांवरून अवकहडा चक्रातून घेता येतात.

(ण) व्यवहारिक - मुलास अनुरूप नाव ठेवणे. पिंकी, रिंकू नावे टाळावीत. रोहन, वायूल इ. नावे निरर्थक, रुपाली इ. दोषात्मक नावे आहेत. नावे संतांची अथवा देव-देवतांची ठेवावी. त्यामुळे आपली वाचा पवित्र होते.

६) **कर्णवेध** - कान टोचणे हा हिंदू धर्मातील मुख्य संस्कार आहे. कान टोचलेली व्यक्ती 'विंध' म्हणून ओळखली जाते. कानाला वेज नसेल तर डोक्यात साठून राहिलेल्या कामक्रोधांचे स्फोट होतात किंवा वैद्यक शास्त्राप्रमाणे देहात प्रत्येक अवयवातील सूक्ष्म भागात एखाद्या रोगाचे मूळ असते त्या भागास छीद्र (पंक्चर) पाडताच तो रोग नाहीसा होतो. यास ॲक्युपंक्चर म्हणतात.

७) **निष्क्रमण** - बालकास प्रथम घराबाहेर नेणे. सध्याच्या काळात हा संस्कार लुप्त झाला आहे.

८) **अन्नप्राशन** - या संस्कारात बालकाच्या प्रतिनिधीने बालकाच्या जीभेवर मधाच्या बोटाने स्वस्तिक चिन्ह काढावे.

९) **चूडा कर्म** - बालकाच्या हातात तसेच कमरेभोवती गोफ बांधणे. चूडा भरणे यास चौलकर्म असेही म्हणतात.

१०) **उपनयन** - उपनयन म्हणजे धार्मिक शिक्षणाकरिता विधीपूर्वक गुरू करणे. हिंदू धर्माची दीक्षा घेणे - व्रत घेणे. यास मुंज, व्रतबंध असेही म्हणतात. यात ब्रह्मचारी व्रताची दीक्षा दिली जाते व ब्रह्मचर्याचे पालन कसे करावे याविषयी शास्त्रादेश सांगितले जातात.

११) **वेदारंभ** - वेदाध्ययनाकरिता गुरुगृही जाणे. विधीपूर्वक गृहत्याग करून उपनयनानंतर गुरुकुलात जाणे. हल्लीच्या काळात पाल्याचे नाव शाळेत दाखल करणे.

१२) **केशान्त** - वेदाध्ययनाकरिता गुरुगृही जाताना मुंडन करणे यासच जावळ म्हणतात. हल्ली

दोन-तीन महिन्यातच हा संस्कार पार पाडला जातो.

१३) **समावर्तन** - विवाहाच्या आधी सोडमुंज केली जाते. यास समावर्तन म्हणतात. आताच्या काळात मुंजीनंतर लगेच सोडमुंज करण्याची प्रथा आहे.

१४) **विवाह** - तरुणपणी स्त्रीपुरुषांच्या ठिकाणी कामविकार उत्पन्न होतो. त्याच्या शांतीसाठी व सत्प्रजेच्या उत्पत्तीसाठी विवाहाची आवश्यकता आहे. विवाहप्रसंगी सात गोष्टींचा विचार करावा असे शास्त्र सांगते.

**आदौ कुलं परिक्षयेत तथा विद्या ततो वयः ।**
**शीलं धनं तथा रुपं देशं पश्चात् विवाहयेत ॥**

**अर्थ :** लग्न करताना कुल, विद्या, वय, शिल, धन, रूप व देश यांचा विचार करून लग्न करावे. (नाहीतर पुढे पश्चातापाशिवाय वाट्यास काहीच येत नाही.)

१५) **वानप्रस्थ** - शास्त्राप्रमाणे आयुष्याच्या तिसऱ्या टप्प्यात हा संस्कार सांगितला आहे. वनात जाताना स्त्रीस पुत्रांच्या स्वाधीन करून किंवा सात्विक वृत्तीची असेल तर भगवत्‌विभूती समजून वनात जाऊन खडतर तपश्चर्येद्वारे भगवत्प्राप्ती करून घेणे. केवळ नेसत्या वस्त्राने, अपरिग्रह वृत्तीने जावे. सध्या ६६ वर्षांवरून ही मर्यादा ५२व्या वर्षावर आली आहे. बावन - बा-वन. सध्याच्या काळात सेवानिवृत्त झाल्यानंतर इतर कोणता उद्योग न करता सर्व वेळ परमार्थाकरिता देणे. 'तुका म्हणे आता सोडूनि सर्व काम । भजा राम राम रात्रंदिवस ॥'

१६) **अंत्येष्टी** - सर्व वर्णाश्रमांना परंतु आवश्यभावी संस्कार म्हणजे अंत्येष्टी होय. यात तीन विधी सांगितले आहेत. १) शवदहन २) अस्थिमेलन ३) रक्षा विसर्जन.

सध्या संस्कार लुप्त होत चालले आहेत. मात्र संस्कारामुळे जीवनात समाधान मिळते. संस्कार नसतील तर दुःख भोगावे लागते.

★★★★★

# (२६) आवडता भक्त

भागवतामध्ये भक्तांचे तीन प्रकार आहेत. उत्तम, मध्यम, अधम. गीतेमध्ये भक्तांचे चार प्रकार दिले आहेत - आर्त, अर्थार्थि, जिज्ञासू, ज्ञानी. यामध्ये दोन प्रकार होतात. देव ज्यांना आवडतो असे भक्त व देवास जे आवडतात ते भक्त. देवास ज्ञानी भक्त जास्त आवडतात असे देवच सांगतात.

**म्हणोनि आपुलाल्या हिताचेनि लोभें । मज आवडे तोही भक्त झोंबे ।**
**परी मीचि करी वालभें । ऐसा ज्ञानिया एकु ॥ ज्ञाने.७/११९**

**कथा :** एकदा नारद त्रेतायुगात श्रीराम प्रभूंना भेटण्याकरिता अयोध्येत आले. प्रभूंनी स्वागत केले. नारदांची पूजा केली. नारदांनी देवास विचारले, 'प्रभू आपल्याकडे भक्तांची यादी आहे का ?' प्रभू आहे म्हणाले. नारद म्हणाले, 'पाहावयास मिळेल का ?' प्रभूंनी नारदांना भक्तांची यादी दिली. त्या यादीत पहिला नंबर नारदांचा होता. नारदांना खूप आनंद झाला. पण त्या यादीत हनुमंताचा नंबर नव्हता. नारदांना वाईट वाटले. हनुमंतांना चिडविण्याकरिता नारद हनुमंतांकडे गेले. म्हणाले, 'हनुमंता रात्रंदिवस सेवा करून काही उपयोग नाही. भक्तांच्या यादीत आपले नाव नाही.' हनुमंत म्हणाले यादीत नाव यावे याकरिता मी प्रभूची सेवा करीत नाही. कदाचित माझी सेवा प्रभूंना आवडत नसेल, पण मला सेवा करायला आवडते.' नारद म्हणाले, 'ठीक आहे, पण शेवटचा तरी नंबर हवा होता.' हनुमंत म्हणाले, 'प्रभूंनी तुम्हास जी यादी दिली आहे ती दोन नंबरची यादी आहे. एक नंबरची यादी प्रभूंनी खास कपाटात ठेवली आहे.' नारद पुन्हा प्रभूकडे गेले व म्हणाले, 'हनुमंत म्हणतात आपल्याकडे 'खास' भक्तांची यादी आहे. ती पाहावयास मिळेल का ?' प्रभूंनी ती यादी नारदांना दाखविली, त्यामध्ये पहिला क्रमांक हनुमंतांचा होता. नारदांचा चेहरा पडला. त्यांनी प्रभूंना विचारले, 'प्रभू हा पंक्तिप्रपंच का ?' प्रभू म्हणाले, 'नारदा पहिली यादी ज्या भक्तांना मी आवडतो त्यांची आहे व दुसरी यादी मला जे भक्त आवडतात त्यांची आहे.' याचा अर्थ रामास इतर भक्तांपेक्षा ज्ञानी भक्त फार आवडतात. भक्तांच्या समागमात देव असतो पण नक्की कोणत्या भक्तांच्या समागमात असतो ? तु.म. म्हणतात, रावभक्त जेथे असतात तेथे देव नक्की असतो. 'तुका म्हणे जेथे वसे भक्तराव । तेथे नांदे देव संदेह नाही ॥'

शास्त्रात दोन न्याय आहेत. १) मर्कट न्याय २) मार्जार न्याय - मर्कट न्याय म्हणजे माकडीणीला तिचे पिल्लू पकडते. माकडीण या झाडावरून त्या झाडावर उड्या मारते. ती पिल्लाची काळजी घेत नाही. पण पिल्लू चिकटलेले असते तसे इतर भक्त चिकटतात. म्हणून देवास त्यांना सांभाळावे लागते. पण मांजरीचे पिल्लू मांजरी स्वतःच्या दाताने पकडून ५-६ घरे फिरविते. कारण जगात दोन आई-बाप असे आहेत ते आपल्या पिल्लांना खातात. १) सर्पिण २) बोका - तु.म. म्हणतात 'माय बापे जरी सर्पिण का बोका । त्यांच्या संगे सुखा बाळ न पाविजे ॥' बापापासून संरक्षण करण्याकरिता

मांजरी पिल्लांना इकडे तिकडे फिरविते. ज्या दातांनी मांजरी उंदराचा फडशा पाडते त्याच दातांनी पिल्लाला पकडते पण पिल्लास इजा होत नाही. ज्ञानी भक्त मार्जार न्यायाप्रमाणे आहेत. देवास यांच्याकडे विशेष लक्ष द्यावे लागते.

तुलसीदास म्हणतात, 'हे राम मै बार बार कहता हूँ ये राम मेरा है । लेकिन तू एक बार कह दे ये तुलसी मेरा है ।' जर रामानी आपले म्हटले तर आपला उद्धार झाला. 'कैवल्याचा पुतळा । प्रगटला भूतला । चैतन्याचा जिव्हाळा । ज्ञानोबा माझा ।' नाथ. आपण टाळ घोळून ज्ञानोबा माझा, ज्ञानोबा माझा म्हणणे महत्त्वाचे नाही. ज्ञानोबांनी म्हटले पाहिजे की हा माझा भक्त आहे. त्या भक्ताचा बेडा पार झाला.

**दृष्टांत - आवडता भक्त :** एका माणसाने बाजारातून आपल्या चार मुलांकरिता चार लाडू आणले. लाडू पारदर्शक पिशवीत असल्यामुळे दिसत होते. चारही मुलांना लाडू दिसले. सर्वात लहान मुलगा लाडू पाहिजे म्हणून रडायला लागला. त्यास वडिलांनी लाडू दिला. नंबर २च्या मुलाने जबरदस्तीने लाडू मागून घेतला. तिसरा थोडा शहाणा होतो. तो रडला नाही व लाडूही मागितला नाही. फक्त लाडूंकडे आशेने पाहिले. वडिलांनी त्यासही लाडू दिला. पण चौथा मोठा मुलगा आपल्या मस्तीत खेळत राहिला. त्याने लाडूंकडे लक्षही दिले नाही. लाडू मागितला नाही की रडलाही नाही. त्यास वडिलांनी तो जिथे खेळत होता तिथे जाऊन लाडू दिला. चौघांकरिता चार लाडू आणले होते. पण प्रत्येकाची पात्रता वेगळी होती. रडणारा आर्त भक्त, मागणारा अर्थार्थि, पाहणारा जिज्ञासू व मस्तीत राहणारा चौथा ज्ञानी भक्त जो देवास विशेष आवडतो. हनुमंतराय रामास प्रिय असणारे भक्त आहेत.

**अतुलितबलधामं हेमशैलाभदेहं । दनुजवनकृशानुं ज्ञानिनामग्रगण्यम् ।**
**सकलगुणनिधानं वानराणामधीशं । 'रघुपती प्रिय' भक्तं वातजातं नमामि ।।**

**अर्थ -** ज्याची शक्ती अतुलनीय आहे, ज्याचे शरीर सोनेरी पर्वतासारखे आहे, ज्याने शत्रूचे वन विध्वंस केले, जे ज्ञान्यांमध्ये अग्रगण्य आहेत, जे सकळ गुणांची खाण आहेत, वानरात प्रमुख आहेत व रामास प्रिय असणारे भक्त आहेत अशा वायुसूतास मी नमन करतो.



# (२७) सत्संगाची महती

**कथा :** वसिष्ठ आणि विश्वामित्रांचा द्वेष संपल्यानंतर हे दोघे मित्र बनले. एकमेकाकडे जाणे, घेणे-देणे चालू झाले. शास्त्रात मित्राची सहा लक्षणे सांगितली आहेत.

**ददाति प्रतिगृह्याति गुह्यमाख्याति पृच्छति । भुक्ते भोजयते चैव षड्विधं प्रीति लक्षणम् ॥**

**अर्थ -** देणे-घेणे, गुह्य सांगणे व विचारणे, जेवणे व जेवण्यास बोलाविणे ही प्रीतीची सहा लक्षणे आहेत.

प्रथम वसिष्ठ ऋषी विश्वामित्रांकडे गेले. पाहुणचार झाला. वसिष्ठांविषयी आदर प्रकट करत विश्वामित्रांनी निरोप घेतला व आपली एक हजार वर्षांची तपश्चर्या वसिष्ठांना दान दिली. काही दिवसांनी विश्वामित्र वसिष्ठांकडे गेले. बरेच दिवस वास्तव्य केले. जाताना वसिष्ठांनी विश्वामित्रांना अर्ध घडी सत्संगतीचे पुण्य अर्पण केले. विश्वामित्र नाराज झाले. विचार केला कुठे एक हजार वर्षांची तपश्चर्या व कुठे अर्ध घडी सत्संगती ! चेहऱ्यावरील भाव ओळखून वसिष्ठ म्हणाले, 'संख्येवर जाऊ नका. मी दिलेले दान आपल्या दानापेक्षा किंमती आहे. आपली शंका फेडण्याकरिता आपण मोठ्या देवांना विचारू.'

प्रथम हे दोघे ब्रह्मदेवाकडे गेले. ब्रह्मदेव ह्यांना घाबरले. दोघेही तपस्वी, ऋषी. त्यांनी आपली समस्या सांगितली. ब्रह्मदेव म्हणाले, 'मी सृष्टी उत्पन्न करणारा आहे. आपला प्रश्न अवघड आहे. माझ्या कक्षेतील नाही. कृपया आपण विष्णूकडे जावे. आपले समाधान होईल.' दोघेजण विष्णूकडे गेले व आपला प्रश्न मांडला. विष्णू म्हणाले, 'तपश्चर्या हा प्रांत माझा नाही. ह्याची किंमत मला कळणार नाही. सर्वात मोठे तपस्वी महादेव आहेत, त्यांच्याकडे आपल्या प्रश्नाचे उत्तर मिळेल.'

**करिता तापसांची कडसणी । कवणु जवळां ठेविजैल शूळपाणी ॥**
**तोहि अभिमानु सांडूनि पायवणी । माथां वाहे ॥ ज्ञाने.९/३७२**

वसिष्ठ व विश्वामित्र शंकराकडे जातात व विचारतात, 'देवा, एक हजार वर्षांची तपश्चर्या जास्त की अर्ध घडी सत्संगती अधिक ?' शंकर हसतात व म्हणतात, 'जेव्हापासून क्षीरसागरातील विष घेतले तेव्हापासून मी संभ्रमीत आहे. तुमचा प्रश्न अवघड आहे. माझ्यापेक्षा शेष महाराज जास्त तपस्वी आहेत, त्यांच्याकडे आपण जावे. आपली समस्या नक्की सुटेल.'

दोघेजण शेष महाराजांकडे येतात व म्हणतात, 'महाराज, एक हजार वर्षांची तपश्चर्या जास्त की अर्ध घडीची सत्संगती जास्त ? कोणती वस्तू किंमती आहे ?' शेष महाराज म्हणतात, 'माझ्या डोक्यावर जो पृथ्वीचा भार आहे तो थोडा हलका केला तर मी आपल्या प्रश्नाचे उत्तर देऊ शकतो.' विश्वामित्रांना तपश्चर्येचा अभिमान होता. साठ हजार वर्षे तपश्चर्या केली होती. त्यांनी ताबडतोब

संकल्प केला, 'मी एक हजार वर्षांच्या तपश्चर्येचे पुण्य खर्च करतो. (पाणी सोडले) पृथ्वीने थोडे वर जावे.' पण पृथ्वी तीळभरही हलली नाही. विश्वामित्रांचा चेहरा पडला. वसिष्ठांनी संकल्प सोडला, 'मी अर्धघडीच्या सत्संगतीचे पुण्य अर्पण करतो. पृथ्वीने थोडे वर व्हावे.' संकल्प सोडताच पृथ्वी चेंडूसारखी चार फूट वर उडाली. शेष महाराज म्हणाले, 'उत्तर सांगू का मिळाले ?' तात्पर्य सत्संगतीचे महत्त्व जास्त आहे.

**सत्संगती दुर्लभ संसारा । निमिष दंडभरी एकऊ बारा ॥ तुलसी.**

**अर्थ -** सत्संगती दुर्लभ आहे. पण ती एकदा जरी घडली तरी जीवाचे कल्याण होते. उदा. नारदांची वाल्या कोळ्यास थोडा वेळ भेट झाली. परिणाम वाल्या कोळी आद्य कवी वाल्मिक ऋषी झाले.

**एक घडी आधी घडी आधी तै पुनी आध ।**
**तुलसी संगत साधुकी हरै कोट अपराध ॥**

**अर्थ -** एक चतुर्थांश घडी जरी संतांची संगत घडली तरी कोटी अपराध नाहीसे होतात.

**तात स्वर्ग अपवर्ग सुख धरिअ तुला एक अंग ।**
**तूल न ताहि सकल मिली जो सुख लव सत्संग ॥ तुलसी.**

**अर्थ -** रामायणात लंकीणीचे उद्गार आहेत. एका पारड्यात स्वर्ग सुख व मोक्षाचे सुख घातले व दुसऱ्या पारड्यात क्षणीक सत्संगाचे सुख टाकले तरी सत्संगतीचे पारडे जड होऊन खाली होते.

**निमिषार्ध सत्संगती । वास वैकुंठी कल्पांती ।**
**मोक्षपदे येती । ती विश्रांती बापुडी ॥ तु.म.**

**अर्थ -** तुकाराम महाराज म्हणतात, अर्धा क्षण जरी सत्संगती घडली तरी वैकुंठात कल्पापर्यंत निवास होतो. शिवाय त्याच्याकडे मोक्षपदे विश्रांतीस येतात.

**सत्संगती आधी घडी सुमिरन वर्ष पचास ।**
**वर्षा बरसे एक घडी अरट फिरत बारह मास ॥**

**अर्थ -** सत्संगतीची अर्धी घडी म्हणजे पन्नास वर्षांचे स्मरण होय. रहाट-गाडगे बारा महिने फिरते पण एक घडीचा जोरदार पाऊस त्याच्यापेक्षा कितीतरी श्रेष्ठ आहे.

★★★★★

# (२८) सत्संगती लाभ

**कथा :** नारद विष्णूंना विचारतात, 'सत्संगतीने काय लाभ होतो ?' विष्णू सांगतात, 'हा प्रश्न गटारातील किड्यास विचारावा.' नारद गटाराजवळ येऊन किड्यास विचारतात, 'सत्संगतीचे महत्त्व काय ?' गटारातील किडा मरतो. नारद विष्णूकडे घडलेली घटना सांगतात. दोन दिवसांनी विष्णू नारदांना मृत्युलोकात पाठवितात व सांगतात, 'कुंपणावर सरडा आहे, ज्याने नुकताच जन्म घेतला आहे. त्यास सत्संगाचा महिमा विचारा.' नारद कुंपणाजवळ येऊन सरड्यास सत्संगतीचा महिमा विचारतात. पण सरडा नारदांना पाहून गतप्राण होतो. नारद परत घडलेली हकीगत विष्णूंना सांगतात. दोन दिवसांनी विष्णू सांगतात, 'झाडावर पोपटाचे पिल्लू जन्मास आले आहे, त्यास सत्संगतीचे महत्त्व विचार.' नारद झाडाजवळ जातात व पोपटास विचारतात, 'पोपटा, सत्संगतीचे महत्त्व काय ?' पोपट मरतो. दोन दिवसांनी देव नुकत्याच जन्माला आलेल्या गायीच्या वासराकडे नारदांना सत्संगतीचा लाभ विचारण्याकरिता पाठवितात. पण नारदाच्या दर्शनाने, बोलण्याने वासरू मरते. नारद विष्णूंना कळवितात. विष्णू म्हणतात, 'आपण आता एका राजास बऱ्याच दिवसांनी पुत्र झाला आहे, त्यास आपण सत्संगतीचा लाभ विचारा.' नारद म्हणाले, 'देवा, आतापर्यंत ज्यांना सत्संगतीचे महत्त्व विचारले, ते सर्व मरण पावले. जर राजपुत्रास राजवाड्यात जाऊन हा प्रश्न विचारला व ते बालक गतप्राण झाले तर माझी काय दशा होईल ?' विष्णूदेव म्हणाले, 'तसे काही होणार नाही. आपण निर्धास्त जावे.' नारद घाबरत-घाबरत राजवाड्यात प्रवेश करतात. राजा स्वागत करतो. पाद्यपूजा होते. नारद हळूच पाळण्याजवळ जातात व बालकास विचारतात, 'बाळ, सत्संगतीचे काय महत्त्व आहे ?' बालक बोलते, 'ब्रह्मर्षि मी या प्रश्नाचे उत्तर देतो पण ज्यांनी आपणास येथे पाठविले त्यांना घेऊन यावे.' नारदांना आनंद होतो. ते विष्णूकडे येऊन म्हणतात, 'ते बालक आपण तेथे आल्याशिवाय प्रश्नाचे उत्तर देणार नाही. कृपया आपण माझ्याबरोबर यावे.' विष्णू नारदाबरोबर राजवाड्यात येतात. राजाच्या आनंदास पारावार राहत नाही. दोघे बालकाजवळ जातात. बालक पाळण्यातून देवभक्तांना नमस्कार करतो.

बालक म्हणते, 'ब्रह्मर्षि नारद, मी प्रथम एका गटारातील किडा होतो. आपले दर्शन झाले. दोन दिवसात सरडा झालो. परत आपले दर्शन झाले व मला त्या योनीतून बढती मिळाली. मी पोपट झालो. पोपटाचा जन्म घेतल्यावर परत आपले दर्शन झाले व त्यापेक्षा उच्च पदवी प्राप्त झाली. मी वासरू झालो. परत आपले दर्शन झाले व अति उच्च पदवी मिळाली. मी दुर्लभ मानव देहात पदार्पण केले. फक्त मानव देह नाही तर राजघराण्यात जन्म घेतला. तुमच्या दर्शनामुळे आता विष्णूंचे दर्शन झाले. मी कृतार्थ झालो. माझे जन्म-मरण संपले.'

संतांच्या संगतीने अनेक जन्माची पापे धुतली जातात. म्हणजे अनिष्ट निवृत्ती होते व देवाचे दर्शन होते. म्हणजे इष्ट प्राप्ती होते.

**संतदर्शने हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥ तु.म.**

**बरवा वैष्णवांचा संग । येतो सामोरा श्रीरंग ॥ तु.म.**

**बरवा संत समागमु । प्रगटला आत्मारामु ॥ ज्ञाने.**

**धन्य ही आनंदाची सापडली वेळ । तेणे संत सज्जन भेटले कृपाळ ।**
**त्यांनी फेडियेला बुद्धिचा वो मळ । दृष्टी दाखविला यशोदेचा बाळ वो॥ निळो.**

जगात हरी दर्शन दुर्लभ नाही. हरी प्रिय महात्म्यांचे दर्शन दुर्लभ आहे. सर्व विश्वात हरी भरला आहे पण हरीचा प्रिय दुर्लभ आहे. यदाकदाचित हरी प्रसन्न झाला तर जगातील एखादे दुर्लभ पद देईल पण हरी प्रिय संत प्रसन्न झाले तर हरीची प्राप्ती करून देतात. 'हरि दुर्लभ नहीं जगतमें हरिजन दुर्लभ होय । हरि हेरयाँ सब जग मिलें हरिजन कहिं एक होय । हरि से तू जनि हेत कर, कर हरिजन से हेत । हरि रिझै जग देत है हरिजन हरि ही देत ॥

**कथा -** एकदा व्यास बैलगाडीतून चालले होते. गाडीच्या आवाजाने एक किडा पळत होता. व्यासांना किड्याची भाषा समजत होती. त्यास विचारले, 'अरे, पळतोस का ?' तो म्हणतो, 'संरक्षणाकरिता पळतो आहे. मी गाडीखाली मरून जाईन अथवा काहीतरी दुखापत होऊन दुःखाचे जीवन जगावे लागेल.' व्यास म्हणतात, 'या किड्याच्या जन्मात तू सुखी कसा असणार ?' किडा आपली कहाणी सांगतो. 'पूर्वीच्या जन्मात मी श्रीमंत शूद्र होतो. ब्राह्मणांबद्दल मला तिरस्कार होता. मी कंजूष व क्रूर होतो. लोकांना व्याजाने पैसे देत होतो. खोटे बोलून लोकांना फसवित होतो. दुसऱ्याची संपत्ती पाहून जळत होतो. मी निर्दयी व धूर्त होतो. माझ्या जीवनात फक्त माझ्या म्हाताऱ्या आईची थोडी सेवा घडली. त्या पुण्याईमुळे मला गतजन्माची आठवण आहे.'

किडा व्यासांना म्हणाला, 'तपोधन, मला कोणत्या पुण्याईने, शुभ कर्मामुळे सद्गती प्राप्त होईल ?' व्यास म्हणाले, 'शूद्र जीवांना संतांच्या दर्शनाने पुण्य प्राप्त होते. कारण संत तीर्थरूप असतात. तीर्थाचे फळ फार उशिरा मिळते. माझ्या दर्शनामुळे तुझा उद्धार झाला आहे असे समज. 'अहं त्वां दर्शनादेव तारयामि तपोबलम्' (महाभारत) केले कर्माबद्दल पश्चाताप होत असेल तर या जन्मांतून तुला मुक्ती मिळेल. लवकरच तू मानव होशील.' व्यासांचे बोलणे ऐकून किड्याने चाकाखाली आपले जीवन संपविले. त्यानंतर हा किडा प्रथम डुक्कर नंतर मृग, पक्षी व शेवटी चांडाळ योनीत जन्मला. मात्र व्यासांच्या आशीर्वादाने हे जन्म पटापट संपले व एक दिवस हा किडा राजकुमार म्हणून जन्माला आला.

या राजकुमारास एक दिवस व्यास भेटण्यास आले. त्यास गतजन्मांची आठवण होती. व्यासांचा सत्कार केला व म्हणाला, 'व्यास मुनी, मला बसण्याकरिता घोड्याची गाडी आहे. भाऊबहीण चांगले आहेत. मित्रांबरोबर मांस भक्षण करतो.' हे ऐकल्यानंतर व्यासांना वाईट वाटले. व्यास

म्हणाले, 'अद्याप आपण वाईट वृत्ती सोडलेली नाही.' राजकुमारास पश्चाताप झाला व व्यासांच्या समोरच राज्याचा त्याग करून वनात तपश्चर्येस गेला. त्यानंतरच्या जन्मात राजकुमाराचा जन्म ब्रह्मवेत्त्याच्या घरी झाला व मुक्त झाला. तात्पर्य - व्यासांच्या दर्शनाने किडा ब्रह्मपदास प्राप्त झाला. कोणत्याही कारणाने संतांचा एकदा संग झाला तरी जीवनात परिवर्तन होते.

**संत समागम एकादिये परी ।**
**व्हावें त्याचें द्वारी श्वानयाती ॥ तु.म.**

★★★★★

## (२९) वंत

**तदस्यास्तस्मिन्निति मतुप् । पा.अ.**

या पाणिनी सूत्राने 'वत्' प्रत्यय 'युक्त असणे' अर्थाने येतो.

संत वाङ्मयाच्या आधारे संत हे वंत आहेत.

१) **पुण्यवंत** - संतांकडे पुण्याचा साठा आहे.

**तेचि पुण्यवंत तेचि परोपकारी । प्रबोध त्या नारी नर लोका ॥ तु.म.**

२) **भाग्यवंत** - यांच्यासारखे भाग्यवंत जगात कोणीही नाही.

**तिच भाग्यवंते । सरती पुरती धन वित्ते ॥ तु.म.**

३) **कृपावंत** - संत हे देवापेक्षाही कृपावंत आहेत कारण देव कृपाळू आहे पण निष्ठूरसुद्धा आहे. संत मात्र निष्ठूर नाहीत.

**आता तुम्ही कृपावंत । साधुसंत जीवलग ॥ तु.म.**

४) **दयावंत** - देव दयावंत आहे पण पंगतीभेद करतो. आपले परके असा भेद करतो. हा दे संतांकडे नाही.

**दयावंत तरी देवाच सारिखी । आप ते पारखी नोळखती ॥ तु.म.**

५) **धनवंत** - श्रीमंत माणसाकडे नाशिवंत धन असते पण संतांकडे महाधन असते. हे धन अविनाशी अ

**परमार्थ महाधन । जोडी देवाचे चरण । व्हावया जतन । हे उपाय लाभाचे ॥ तु.म.**

**नारायण नारायण । गाठी धन बळकट । तु.म.**

**कबिरा सब जन निर्धना धनवंत नहि कोय । धनवंत वो जाणिये राम नाम धन होय ॥**

६) **निष्ठावंत -** सर्व जन निष्ठेतून निसटतात. पण संत पक्के निष्ठावंत असतात.

**निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म । निर्धार हे वर्म चुको नये ॥ तु.म.**

७) **बळिवंत -** जगात देवाशिवाय कोणीही बलवान नाही. पण संतांपुढे देवाचे बळ चालत नाही. त्याच्याच बळावर हे बळिवंत बनतात.

**बळियाचे अंकित । आम्ही झालो बळिवंत ॥ तु.म.**

८) **धैर्यवंत -** संत कधी धीर सोडत नाहीत. हे धैर्यवानच असतात.

**तुका म्हणे धैर्यवंते । निर्मळ चित्ते सखी ती ॥ तु.म.**

९) **गुणवंत -** संतांकडे गुणांचा खजिना असतो. हे सर्वगुणसंपन्न असतात.

**ऐसा संपूर्ण सर्वगुणी । केवि पाविजे शारंगपाणी ।**
**नामा करी विनवणी । मुक्ती चरणी त्याचिया ॥ नाम.**

**तुका म्हणे ज्याचे नाम गुणवंत । ते नाही लागत पसरावे ॥**

१०) **भक्तिवंत -**

**भगतिवंत अति निचउ प्रानी । मोही प्राण प्रिय असि मन बानी ॥ तुलशी.**

रामदास स्वामींनी शिवाजी महाराजांना सहा वंत वापरले आहेत. 'यशवंत किर्तीवंत । सामर्थ्यवंत वरदवंत । पुण्यवंत नीतीवंत । जाणता राजा ॥' तुकाराम महाराज म्हणतात बाकी सर्व आहे मायावंत.

**स्त्रिया पुत्र कलत्र हे तव मायावंत ।**
**शेवटींचा अंत न पवे कोणी ॥**

★★★★★

# (३०) उदास

उदास या शब्दाचा अर्थ उद् + आस् = उर्ध्वं (वर बसलेला) आसः इति उदासः

एकदा एक माणूस सांगू लागला, 'मी घोड्यास कुत्र्याएवढा पाहिला.' ऐकणारे म्हणाले, 'हे अशक्य आहे. घोडा कितीही लहान झाला तरी कुत्र्याएवढा होणार नाही.' माणूस म्हणाला, 'मी विमानातून पाहिले.' हे मात्र सर्वांना पटले. विमानातून (उंचावरून) पाहतो म्हणून सहा फूट माणूस एक फूट दिसतो. घोडा कुत्र्याएवढा दिसतो. त्याचप्रमाणे महात्मे संसारास तुच्छ समजतात कारण त्यांची आध्यात्मिक उंची वाढलेली असते. 'देव पाहो देव पाहो । उंच ठायी उभे राहो ॥' तु.म.

मनुष्य पाच प्रकारे उदास होतो.

१) **प्रपंचात येण्यापूर्वी उदास** - शुकाचार्य हे आईच्या उदरात बारा वर्षे होते. संसारात येण्यास घाबरत होते. देवाने आश्वासन दिले, आपणास संसार बाधक होणार नाही. नंतर जन्म घेतला व जंगलात पळाले.

**एऱ्हवीं विषय जिणोनि जन्मलें । जे शुकादिक दादुले ।**
**ते विषयोचि वानितां जाहले । भाट ययाचे ॥ ज्ञाने.११/१७३**

२) **प्रपंचात आल्यानंतर उदास** - सनकादिक हे चार बंधु नेहमी ५ वर्षांचे असतात. पण संसारात लिप्त होत नाहीत. यांना सहा विकार नाहीत.

**प्रपंचामाजी असते सुख । तरी कां त्यजिते सनकादिक ।**
**द्वैत तितुके केवळ दुःख । परम सुख अद्वैती ॥ भागवत १०/२४७**

३) **प्रपंचात राहून उदास** - जनक - ज्ञानोबाराय यांचेच उदाहरण देतात.

**देख पां जनकादिक । कर्मजात अशेख । न सांडितां मोक्षसुख । पावते जाहले ॥ ज्ञाने.३/१५२**

**तुका म्हणे राज्य करितां जनक । अग्निमाजी एक पाय जळे ॥**

४) **प्रपंच करून शेवटी उदास** - जडभरत राजा -

**जे राज्यवैभव भोगिती । त्यासी कदा नव्हे गा विरक्ती ।**
**भरते केली नवल ख्याती । सेविला श्रीपती भोग त्यागे ॥ भागवत २/१४१**

५) **प्रपंचात ठेच लागल्याने उदास** - भर्तृहरी राजास पत्नीने फसविल्यानंतर तो संसारावर उदास झाला व आपल्या पापात कोणी भागिदार नाही म्हणून वाल्या कोळी उदास झाला.

१) संसारी माणसे संसारात आसक्त असतात, उदास नसतात.

२) साधकाने उदास असायला हवे.

**साधकाची दशा उदास असावी । उपाधी नसावी अंतर्बाह्य ॥ तु.म.**

३) भक्त मात्र देहावर संसारावर उदास असतात.

**भक्त ऐसे जाणा जे देही उदास । गेले आशापाश निवारोनि ॥ तु.म.**

**कथा :** एक राजा संसारात दुःखी होता. याचे कारण शरीर रोगग्रस्त होते. कोणताच विषय भोगता येत नव्हता. संसारात आरोग्य हवे व आयुष्य हवे. आरोग्य नसेल तर आयुष्यास अर्थ नाही. एक दिवस राजा जंगलात गेला. जंगलात अधिकारी साधू राहत होते. राजाने आपली करुण कहाणी सांगितली. साधूंना दया आली व त्यांनी दुधात राख टाकून राजास पिण्यास सांगितले. मंत्रयुक्त राखेमुळे राजा रोगमुक्त झाला. सर्व विषयात रस घेऊ लागला. बरेच दिवस गेल्यानंतर त्यास दुर्बुद्धी झाली. साधूच्या आशीर्वादाने आपण वैभव भोगतो आहे. तो साधू किती वैभव भोगीत असावा ? हे विचारण्याकरिता जंगलात आला. साधू अंतर्ज्ञानी होते. काही लोक म्हणतात मी बारा गावचे पाणी प्यायलो आहे. पण साधू बाराशे गावचे पाणी प्यायलेले असतात. राजाने विचारण्याअगोदर साधूने हात दाखविण्यास सांगितले. हात पाहिला व चेहरा उदास करून म्हणाले, 'राजे सरकार, आपली हस्तरेषा सांगते आपला सात दिवसात मृत्यू आहे.' राजा आपला प्रश्न विसरून गेला. घरी गेल्यानंतर समोर मृत्यू दिसू लागला. बायको-मुलात, खाण्या-पिण्यात, सैन्यात, सभेत, कशातच लक्ष लागेना. सर्वांना बोलावून दानधर्म करू लागला. एका साधूस बोलावून संध्याकाळी भागवत सप्ताह ठेवला. सात दिवस गेले, आठवा दिवस उजाडला. राजास वाटले, आपण मेलो नाही. जंगलातील साधूस विचारण्यास जावे. आपले भविष्य खोटे झाले. राजा आनंदाने जंगलात आला. साधूस म्हणाला, 'आपले भविष्य खोटे ठरले.' साधू म्हणाला, 'सात दिवस आपली अवस्था काय होती ?' राजाने खरे काय ते सांगितले की कशातच लक्ष नव्हते. देहावर, घरावर, राज्यावर उदास होतो कारण यमदूत सारखा आठवत होता. साधू म्हणाले, 'जसा तू सात दिवस उदास होतास तसे आम्ही जन्मभर देहावर व संसारात उदास राहतो.'

**तात्पर्य -** प्रत्येकाचा मृत्यू सातच दिवसात आहे - सोमवार ते रविवार. फक्त आपल्या मरणाचा वार आपणास माहीत नसतो.

★★★★★

# (३१) वैराग्य निर्मिती

वैराग्य - ''रञ्ज रागे'' धातूपासून राग (आसक्ती) शब्द बनतो; व ''विगतः रागः यस्मात् सः विरागः; विरागस्य भावः'' = वैराग्यम् - गेली आहे आसक्ती ज्यापासून तो विराग - विरागाची स्थिती त्यास वैराग्य म्हणतात.

१) **दुखाःमुळे वैराग्य -** संसारात जास्त ताप झाला तर माणसे संसाराचा त्याग करतात. वनवास पत्करतात व परमार्थास लागतात. उदा. वाल्याकोळी यास समजले ज्यांच्याकरिता आपण पाप करतो आहे ते आपल्या पापात भागिदार नाहीत. संसाराचा त्याग करून रामनामाने वाल्या वाल्मिक ऋषी झाले. भर्तृहरी राजासुद्धा पिंगला राणीने फसविल्यानंतर राज्याचा त्याग करून गोरक्षनाथाचे शिष्य झाले व वैराग्य शतक लिहिले.

२) **भीतिमुळे वैराग्य -** काहीजण आपल्या परिसरात खून करतात. दुसरे मारतील या भीतिने दुसऱ्या राज्यात जाऊन भगवी वस्त्रे धारण करून वैरागी बनतात. मौन धारण करीत असल्यामुळे समाजास त्यांच्या ज्ञानाची पातळी समजत नाही. साधकांना नरकाची भीती वाटते. म्हणून वैराग्य अंगीकारतात. ज्ञानोबाराय भीतिचे पाच दृष्टांत देतात.

**विष खाणें नागवे । जळत घरीं न रिघवे ।**
**व्याघ्रविवरां न वचवे । वस्ती जेवीं ॥ ज्ञाने १३/५१४**

**धडाडीत लोहरसीं । उडी न घालवे जैसी ।**
**न करावे उशी । अजगराची ॥ ज्ञाने १३/५१५**

३) **वीट येतो म्हणून वैराग्य -** जशी आपली उलटी आपणास किळस आणते. तद्वत काहींना संसाराचा वीट येतो व वैराग्य निर्माण होऊन परमार्थास लागतात. ज्ञानोबा तुकोबा हाच दृष्टांत देतात.

**वमिलिया अन्ना । लाळ न घोंटी जेवीं रसना ।**
**कां आंग न सूये आलिंगना । प्रेताचिया ॥ ज्ञाने १३/५१३**

**विटले हे चित्त प्रपंच्यापासूनी । वमन ते मनी बैसलेसे ॥ तु.म.**

**दृष्टांत -** शहरातील एक बाई मे महिन्याच्या रजेत खेडेगावात येते. तिचा मुलगा रात्री ११ वाजता शौचास उठतो. ती त्यास कागदावर बसवते. ती कागद गुंडाळून एका प्लॅस्टिकच्या पिशवीत भरून तो कागद रस्त्यावर फेकते. ती पिशवी नेमकी लाईटच्या खांबाखाली पडते. रात्री शेवटचा 'शो' पाहून बारा वाजता चार तरुण त्या रस्त्याने जात असताना एकाचे लक्ष नेमके पिशवीकडे जाते. तो धावत जातो व पिशवी हातात घेऊन मित्रांना म्हणतो, 'मला पिशवी सापडली. याच्यातले कोणास देणार नाही.' बाकीचे तिघे भांडतात, 'आपण चौघे बरोबर आहे. तुला पिशवी दिसली म्हणून

काय झाले ? यावर चौघांचा हक्क आहे. जर आम्हालाही वाटा मिळाला नाही तर तुला मार खावा लागेल.' असे म्हटल्यावर पहिला तयार झाला. तो म्हणाला, 'ठीक आहे, चौघांची सारखी वाटणी करू.' पिशवीतून कागद बाहेर काढला व जशी दुर्गंधी येऊ लागली तसे तिघे म्हणाले, 'हे तुलाच राहू दे. तुझ्या घरचे शाबासकी देतील.' जशी चौघांना त्या पदार्थाची किळस आली व पिशवी टाकून घरी गेले तसेच संसाराचा वीट येऊन वैराग्य निर्माण होते.

**४) विवेकामुळे वैराग्य -** ज्ञानोबाराय दृष्टांत देतात, एखाद्यास समजले आपणास वाढलेल्या जेवणात विष आहे तर कितीही दिवसाचा उपवास असला व कितीही पक्वान्ने असली तरी तो त्याचा त्याग करतो. तद्वत विषयरूपी विषाचा साधक त्याग करतात व परमार्थास लागतात.

**जे विषें रांधिली रससोये । जैं जेवणारा ठाउवी होये ।**
**तैं तो ताटची सांडूनि जाये । जयापरी ॥ ज्ञाने १५/३८**

**तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता ।**
**तैं वैराग्य दवडितां । पाठीं लागे ॥ ज्ञाने १५/३९**

**दृष्टांत -** एकदा राजवाड्यात एक चोर चोरी करण्याकरिता आला होता. राजा राणी रात्री झोपता झोपता गप्पा मारत होते. राजा म्हणाला, 'आपण पाच मुली राजकुमारास दिल्या. सहावी मुलगी साधूस - वैराग्यवान पुरुषास देऊ.' हे चोराने ऐकले. चोराने विचार केला आपण वैरागी होऊन राजाचा जावई होऊ. तो चोरी न करताच घरी गेला. संन्याशाची वस्त्रे घालून राजवाड्यापासून पाणवठ्यावर एका झाडाखाली डोळे झाकून बसला. स्त्रिया पाणी भरण्याकरिता आल्या होत्या. हा हा म्हणता बातमी गावात पसरली. सर्वजण फळे, पैसे, इतर पदार्थ घेऊन साधूच्या भेटीस आले. पण सोंग घेतलेल्या चोराने तिकडे पाहिलेही नाही. लोकात चर्चा झाली हा विरक्त महात्मा दिसतो. हळू हळू बातमी राजाच्या कानावर गेली. त्याने प्रधानजीस पाठविले. प्रधान सेवकास घेऊन, रत्ने, कपड्यांसहित संन्याशास भेटण्यास आला पण संन्याशाने तिकडे पाहिलेसुद्धा नाही. प्रधानजींनी ही बातमी राजास दिली. राजा राणीस म्हणाला, 'आपण आपल्या मुलीकरिता साधू पती असावा असा विचार करीत होतो. देवाने आपल्याकडे जावयास पाठविले असावे. चल आपण त्यांना भेटू.' राजा राणी संन्याशाच्या भेटीस निघाले. ही बातमी हळूहळू संन्याशाच्या कानावर गेली. राजाराणी जवळ आल्यानंतर संन्यासी पळायला लागला. राजाराणी त्याच्या मागे धावू लागले. चोरास खरे वैराग्य निर्माण झाले. विचार केला वैराग्याचा वेश घेतला तर राजा राणी पाठी लागतात. मग खऱ्या वैराग्याने देव पाठी का लागणार नाही ?

**५) प्रेमामुळे वैराग्य -** संसारात राहून देवावरील प्रेम वाढले तर संसाराचा त्याग करण्याची गरज रहात नाही. जसे ज्ञानोबाराय सांगतात,

**जिये वैराग्यदशे । ईश्वराचेनि वेधवशें ।**
**हें सर्वही नावडे जैसें । वांत होय । ज्ञाने १८/९१९**

हे सगळ्यात उत्तम वैराग्य होय.

**दृष्टांत -** एका मुलीस चित्रपट पाहण्याचा छंद होता. वयात आल्यानंतर लग्न ठरले. ती नवऱ्या मुलास म्हणाली, 'मला आठवड्यातून दोन चित्रपट दाखवणार असाल तर मी आपल्याबरोबर लग्न करीन. मुलगा तयार झाला. लग्न झाल्यानंतर पहिल्या वर्षात दोघेजण आठवड्यास दोन चित्रपट पाहत होते. मुलगा झाला. दोन महिन्यात एकदा चित्रपट पाहवयास गेले. दुसरी मुलगी झाली सहा महिन्यातून एकदाच चित्रपट पाहू लागले. मुले शाळेत जाऊ लागली. त्यांचा अभ्यास, क्लास यामुळे सिनेमा पाहण्यास वेळ मिळत नसे. तिची कॉलेजची मैत्रिण एकदा भेटली व म्हणाली, 'लग्नात ठरल्याप्रमाणे आठवड्यातून दोन चित्रपट पाहतेस की नाही ?' ती म्हणाली, 'शारदा, मुलात गुंतल्यामुळे मला चित्रपटाचा विसर पडला आहे.' या न्यायाने देवावरचे प्रेम वाढविले तर संसाराविषयीचे प्रेम आपोआप कमी होते. संसार त्यागण्याची गरज रहात नाही.

या पाच प्रकारामुळे वैराग्य निर्माण होऊन साधक देवाकडे वळतो. वैराग्याचे तीन प्रकार आहेत.

१) **स्मशान वैराग्य -** प्रेत घेऊन जाताना विचार येतो आपल्या जीवनात हा प्रसंग येणारच आहे. मी, माझ्यात आपण गुंतलो आहोत. पण घरी आल्यानंतर तो विचार मावळतो.

२) **प्रसुती वैराग्य -** स्त्रियांना बाळंतपणात मोठा त्रास होतो. काही स्त्रिया नवऱ्यास शिव्या देतात. 'निजता आला मोहो । विता म्हणे मेला गोहो. ।।' तु.म.

३) **मैथुन वैराग्य -** स्त्री समागमात शक्तीचा ऱ्हास होतो. अंग अशक्त होते. जास्त मैथुनामुळे एखादा आजार होण्याची शक्यता असते तरी पुरुष सावध होत नाही. सिंह वर्षातून एकदाच मैथुन करतो. सर्व प्राणी त्यास घाबरतात. महिन्यातून एकदा मैथुन ठीक आहे. पण आठवड्यास मैथुन केले तर म्हणतात आपली स्मशानातील लाकडे साठवून ठेवावी. 'नव्हे वैराग्य सोपा रे । मज बोलता न वाटे खरे ।।' तु.म.

**दृष्टांत -** अकबर बादशहाने दोन मांजरे पाळली होती. त्यांना असे शिक्षण दिले होते की बादशहा जेवतांना मांजराच्या डोक्यावर समई ठेऊन त्या प्रकाशात जेवण करीत असे. एकदा बादशहा बिरबलास म्हणाला, 'मी सगळ्यांपेक्षा वेगळ्या प्रकाशात जेवतो. मांजराच्या डोक्यावर समई ठेवून त्या प्रकाशात माझे जेवण होते. दोन मांजरे शांत राहतात. अजिबात हालचाल करीत नाहीत.' बिरबल म्हणाला 'मी पाहण्यास येतो.' बादशहाचे जेवण थाटात चालले होते. मांजरे पण शांत होती. समया तेवत होत्या. एवढ्यात बिरबलाने हळूच खिशातून उंदीर काढला व मांजरासमोर सोडला.

उंदीर पाहिल्याबरोबर मांजरांनी उंदरावर झेप घेतली. दोन्ही समया बादशहाच्या जेवणात पडल्या व एक नवीन पक्वान्न तयार झाले.

**तात्पर्य -** जो पर्यंत विषय समोर येत नाही तो पर्यंत वैराग्य ठीक आहे. विषय समोर आल्यानंतर इंद्रिये स्थिर राहणे हे खरे वैराग्य आहे.

★★★★★

## (३२) महिमा

**१) नाम महिमा -** नामाचे मोठेपण असे आहे. जगात नामापेक्षा कोणीही मोठे नाही. नाम मोठे कां राम मोठे ? असा प्रश्न निर्माण झाल्यास नामच मोठे म्हणावे लागेल.

**पुराण प्रसिद्ध सिमा । नाम तारक महिमा ॥ तु.म.**

नामाचे महत्त्व नामी परमात्म्यासुद्धा कळत नाही.

**तुझ्या नामाचा महिमा । तुज न कळे मेघश्यामा ।**
**तुका म्हणे आम्हा । जन्म गोड यासाठी ॥**

**कथा -** त्रेतायुगात, रामसभेत असा प्रश्न निर्माण झाला, राम मोठे का रामनाम मोठे ? चर्चा होत असताना सभेत नारदांनी प्रवेश केला. नारद ब्रह्मर्षी व भक्तिशास्त्राचे प्रणेते म्हणून सर्वांनी नारदांना प्रश्न विचारला, 'मुनी आपण सांगा रामनाम मोठे का राम मोठे ?' नारद गंभीर बनले व म्हणाले, 'प्रश्न अवघड आहे. दोन दिवसांनी उत्तर देतो.' सभा विसर्जित झाली. नारदांनी हनुमंताना गाठले व सांगितले, 'उद्या सभा भरताना सर्वांचे दर्शन घ्यायचे पण विश्वामित्राकडे बघायचे पण नाही.' दुसऱ्या दिवशी सभा भरताना नारदांनी सांगितल्याप्रमाणे हनुमंतांनी सर्वांचे दर्शन घेतले पण विश्वामित्राकडे पाहिले पण नाही. राम चरणाजवळ बसले. नारद विश्वामित्राकडे गेले व म्हणाले, 'हनुमंत रामाचे सेवक आपण रामाचे गुरू. आज आपल्या पाया पडले नाहीत. आपणास अपमान वाटला नाही ?' विश्वामित्रांचा अहंकार जागृत झाला. ते रामाजवळ रागाने गेले व म्हणाले, 'आपल्या राज्यात, सभेत न्याय नाही.' रामाने विचारले, 'असा काय अपराध झाला ?' विश्वामित्र म्हणाले, 'आपला सेवक हनुमान सर्वांच्या पाया पडला. मी आपला गुरू, माझ्याकडे पाहिलेसुद्धा नाही. हा हनुमंताचा अपराध नाही ?' राम म्हणाले, 'हा अपराध आहे. हनुमंतांना शिक्षा झाली पाहिजे.' विश्वामित्र म्हणाले, 'मी सांगिन ती शिक्षा द्यावी.' रामाकडून वचन घेतले. 'रघुकुल रिती सदा चली आई । प्राण जाई परी बचन न जाई ॥' तुलसी. राम म्हणाले, 'सांगा ?' ह्या हनुमंतास प्राणांत शिक्षा द्यावी. प्रभुचा चेहरा पडला. पण वचन दिले आहे. 'वचना फिरती अधम जन । नारायण तो ऐसा नव्हे ॥' तु.म. रामाने दुसऱ्या दिवशी हनुमंतांना मारण्याचे ठरविले. नारदांनी हनुमंतांना गाठले व

सांगितले, 'सकाळी शरयूचे स्नान करून श्रीराम जय राम जय जय राम मंत्र म्हणायचा व सूर्यापुढे हात जोडून उभे राहायचे. प्रभू आपणास मारण्यास येतील.' हनुमंतांनी तसेच केले. स्नान करून मंत्राचा जप करीत राहिले. राम धनुष्यबाण घेऊन आले. हनुमंतांवर बाणांचा वर्षाव केला पण हनुमंताचा केस वाकडा झाला नाही. वास्तविक रामाचा बाण कधी वाया जात नाही. पण हनुमंतापुढे काही चालले नाही. राम बाण मारून थकले. याचे उत्तर, हनुमंत वज्रदेही होते. त्यांना बाण काय करणार ? शिवाय त्यांनी रामनामाचे कवच धारण केले होते. त्याला सामान्य बाण काय करणार ?

**जैसें वज्रकवच लेइजे । मग शस्त्रांचा वर्षावो साहिजे ।**
**परी जैतेंसीं उरिजे । अचुंबित ॥ ज्ञाने २/२३२**

'टाळ घोळ चिपुळिया नाद । दिंडी पताका मकरंद । नाना बागडियाचे छंद । कवच अभेद नामाचे ॥' ज्ञान. हे नाटक पाहण्याकरिता सर्व ऋषी, मुनी आले होते. प्रभुंनी सांगितले, 'आता बाण बंद करा. हनुमंताचा केस वाकडा होणार नाही कारण त्याने रामनामाचे कवच घातले आहे.' सर्व सभेस हजर झाले. नारदांनी विचारले, 'आपणच सांगा राम मोठे का रामनाम मोठे ?' सर्वांनी एक मुखानी निर्णय घेतला रामापेक्षा रामनाम मोठे. रामानी अयोध्या तारली पण नामाने लोक तरत आहेत, तरले, व पुढे तरतील. 'तरले तरती हा भरवसा । नाम धारकाचा ठसा ॥' तु.म. 'ऐसे अनंत अपार । नामे तरले चराचर । नाम पवित्र आणि परीकर । रखुमादेवीवराचे ॥' ज्ञान. सकाळच्या प्रहरी रामरक्षा वाचून घराबाहेर पडले तर आपली रक्षा राम करतो असा विश्वास असावा.

**२) संत महिमा -** संतांपेक्षा कोणी मोठे नाही. सर्व बाबतीत सर्वांपेक्षा मोठे त्यांना संत म्हणतात. बहुतेक सर्व माणसे संसारिक आहेत. हजारात एखादा साधक असतो. लाखात एखादा सिद्ध असतो. मात्र कोटीत एखादा संत होतो. दुःखात देवाचे स्मरण करणारे बहुतेक संसारी लोक असतात. देव मिळविण्याचा प्रयत्न करणारे त्यांना साधक अथवा मुमुक्षू म्हणतात.

**पैं भवस्वर्गा उबगले । मुमुक्षु योगज्ञाना वळघले ।**
**पुढती न यों इया निगाले । पैजा जेथ ॥ ज्ञाने १५/२७७**

ज्यास देवाचा साक्षात्कार (दर्शन) झाला त्यास सिद्ध म्हणावे व देव ज्याच्या ताब्यात असतो त्यांना संत म्हणावे. 'सांपडला हाती । तरी हे झाली निश्चिंती ॥' तु.म. यांचा महिमा प्रजापतीस पण कळत नाही. 'त्यांचा महिमा काय वर्णु मी पामर । न कळे साचार ब्रह्मादिका ।' तु.म. 'तेथ माझा काय कोण तो विचार । वर्णावया पार महिमा त्यांचा ॥' 'ऐसा संताचा महिमा । झाली बोलायाची सीमा ॥' तु.म. फक्त त्यांच्या चरणावर मस्तक ठेवावे.

**३) ग्रंथ महिमा -** जगात खूप ग्रंथ आहेत. मुसलमानांचा प्रमाण ग्रंथ कुराण, ख्रिश्चनांचा बायबल, बौद्धांचा त्रिपिठीका व हिंदूंचा प्रमाण ग्रंथ आहे गीता, जगातील एकमेव ग्रंथ, सर्व तत्वज्ञानांचा पाया असणारा ग्रंथ. शिकागोच्या धर्म परिषदेत गीता सर्वात खाली होती. स्वामी विवेकानंदांनी भाषणांत

सांगितले गीता सर्व धर्मांचा, तत्त्वांचा पाया आहे. काहींनी ती वर ठेवली. स्वामी म्हणाले सर्व धर्मांचा शेवट सुद्धा हाच ग्रंथ आहे. गीतेवर जेवढ्या टीका झाल्या तेवढ्या जगातील कोणत्याच ग्रंथावर झाल्या नाहीत. ज्याच्या श्वासातून वेद निर्माण झाले त्यांच्या श्रीमुखातून गीता ग्रंथ आला.

**हा वेदार्थ सागरु । जया निद्रिताचा घोरु ।**
**तो स्वयें सर्वेश्वरु । प्रत्यक्ष अनुवादला ॥ ज्ञाने १/७२**
**तरी जयाच्या निश्वासीं । जन्म झालें वेदराशी ।**
**तो सत्यप्रतिज्ञ पैजेसीं । बोलिला स्वमुखें ॥ ज्ञाने १८/१४२८**
**बाप बाप ग्रंथ गीता । जो वेदीं प्रतीपाद्य देवता ।**
**तो श्रीकृष्ण वक्ता । जिये ग्रंथी ॥ ज्ञाने ११/२६**

गीता, सर्वज्ञाचा बाप श्रीकृष्णानी सांगितल्यामुळे जगात सर्व श्रेष्ठ आहे. शंकर पार्वती क्षिरसागराच्या तटावर बसले असता शंकर सारखे गीता गीता म्हणायचे. पार्वती म्हणाली, 'या गीतेत असे काय आहे ? आपण सारखे तिचे नाम घेता. माझ्याकडे लक्ष नाही.' तेव्हा महादेव म्हणतात, माऊलीच्या शब्दात,

**या गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी ।**
**जेथ भवानी प्रश्नु करी । चमत्कारोनी ॥ ज्ञाने १/७०**
**तेथ हरु म्हणे नेणिजे । देवी जैसे कां स्वरूप तुझें ।**
**तैसें हें नित्य नूतन देखिजे । गीतातत्व ॥ ज्ञाने १/७१**

प्रत्येक हिंदुंच्या घरी गीता ग्रंथ हवा. दिवसा निदान एक श्लोक तरी वाचावा. गीतेचे नाव घेतले तरी जन्म-मरण नाहीसे होते. 'गीता गीता गीता वाचे जे म्हणती । नाही पुनरावृत्ती तया नरा ॥' नाथ.

**४) व्रत महिमा -** सगळ्या व्रतात एकादशी व्रत थोर आहे. वारकऱ्यांनी सोमवार व एकादशी व्रत केलेच पाहिजे. हे व्रत महान आहे. उपवास करून नाम गाणाऱ्यांची तुलना विष्णूबरोबर होते. 'ऐका व्रताचे महिमान । नेमे आचरती जन । गाती ऐकती हरिकीर्तन । ते समान विष्णूसी ॥' तु.म.

**एकादशी उत्पत्ति कथा -** कुश नावाच्या राक्षसास भगवंताने मारल्यामुळे त्याचा बंधू मुरू हा क्रोधायमान झाला. त्याने सुडाच्या उद्देशाने अनेक वर्षे तपश्चर्या करून भगवान शंकरास प्रसन्न करून घेतले व जगातील कोणत्याच पुरुषापासून माझा मृत्यू होऊ नये असा वर मागून घेतला. शंकर 'तथास्तु' म्हणाले. पुढे त्या वराने उन्मत्त होऊन विष्णूभक्त, साधू, ब्राह्मण यांना अतोनात पीडा देऊ लागला. हा सर्व प्रकार साधू-ब्राह्मणांनी भगवंत विष्णूस निवेदन केला. तेव्हा भगवंतांनी त्या मुरूशी अनेक वर्षे युद्ध केले. तरी तो मरेना तेव्हा विष्णू म्हणाले, 'आता काय करावे ?' असा विचार करीत बसले असता त्यांच्या श्वासापासून एक कन्या निर्माण झाली. तिच्या अंगावर श्वेत वस्त्र होते. तिच्या

एका हातात ढाल, एका हातात तलवार आणि दोन हातात धनुष्यबाण होते. तिने भगवंतांना विचारले 'मी आपली काय सेवा करू ?' तेव्हा भगवंत म्हणाले, 'मुरू या दैत्याचा वध कर.' त्याप्रमाणे तिने मुरूचा वध केला. ती प्रगट झाली त्या दिवशी एकादशी होती म्हणून तिचे नाव एकादशी पडले. भगवंतांनी तिला वर मागण्यास सांगितले. तेव्हा एकादशी म्हणाली, 'हे भगवंत, तुमचीही भक्ती वाढावी व माझी कीर्ती व्हावी असा वर द्यावा.' तेव्हा भगवंत म्हणाले, 'जो एकादशी व्रत करील, तो माझा आवडता भक्त होऊन शेवटी त्याला वैकुंठप्राप्ती होईल.' एकादशी व्रत हे सर्व व्रतात श्रेष्ठ व्रत आहे. ह्या व्रतानेच रुक्मांगदाने अयोध्या नगरी वैकुंठास नेली. 'व्रत एकादशी रुक्मांगद करी । वैकुंठा नगरी नेली त्याने ॥' नाथ. असा या व्रताचा महिमा आहे.

**५) क्षेत्र महिमा -** जगात अनेक तीर्थक्षेत्रे आहेत पण पंढरीचा महिमा विशेष आहे. पंढरी सर्वोत्तम क्षेत्र आहे. चंद्रभागा सर्वोत्तम तीर्थ आहे व पुंडलिक सर्वोत्तम भक्त आहे. 'सर्वोत्तम तीर्थक्षेत्र आणि देव । शास्त्रांनी हा भाव निवडिला ॥' तु.म. 'शंकर सांगे ऋषी जवळी । सकळ तीर्थे माध्यान्ह काळी । येती पुंडलिकाजवळी । करिती आंघोळी । लागती चरणा ॥' नाम. या पंढरीत एक शीत अन्न दिले तरी कोटी यागाचे फळ प्राप्त होते. 'येथे एक शीत दिधल्या अन्न । कोटी कुळाचे उद्धरण । कोटी याग केले पूर्ण । ऐसे महिमान या क्षेत्राचे ॥' 'ऐका पंढरीचे महिमान । राऊळे तितुके प्रमाण । येथील वृक्ष आणि पाषाण । तेही देव जाणावे ॥' नाम.

पंढरीपेक्षा संतांनी आळंदीचे महिमान जास्त सांगितले आहे. 'भूवैकुंठ पंढरपूर । त्याहुनि थोर महिमा या ॥' निळो. आळंदीस इंद्राने अनेक याग केले आहेत. ब्रह्मदेवाने तपश्चर्या केली आहे. शंकर येथे आहेतच. 'शिवपीठ हे जुनाट । ज्ञानाबाई तेथे मुगूट ॥' नाथ. वारकऱ्यांनी वर्षातून एकदा आळंदीस पण आले पाहिजे. देहू, पैठण वगैरे तीर्थे आहेत. बारा ज्योतिर्लिंगापैकी एकट्या महाराष्ट्रात पाच ज्योतिर्लिंगे आहेत. १) भीमा शंकर २) परळी वैद्यनाथ ३) घृष्णेश्वर (वेरूळ) ४) नागनाथ (औंढा) ५) त्र्यंबकेश्वर (नाशिक)

**६) गुरुमहिमा -** ज्ञानोबाराय गुरुमहिमा सांगतात -

**तुमचा अनुग्रहो गणेशु । जैं दे आपुला सौरसु ।**
**तैं सारस्वतीं प्रवेशु । बाळकाही आथी ॥ ज्ञाने.१०/६**

**जी दैविकी उदार वाचा । जैं उद्देशु दे नाभि-काराचा ।**
**तैं नवरससुधाब्धीचा । थावो लाभे ॥ ज्ञाने.१०/७**

**जी आपुलिया स्नेहाची वागेश्वरी । जरी मुकेयातें अंगीकारी ।**
**तो वाचस्पतीशीं करी । प्रबंधु होडा ॥ ज्ञाने.१०/८**

**हें असो दिठी जयावरी झळके । कीं हा पद्मकरु माथां पारुखे ।**
**तो जीवचि परि तुके । महेशेंशीं ॥ ज्ञाने.१०/९**

**एवढें जिये महिमेचें करणें । ते वाचाळपणे वानूं मी कवणें ।**
**का सूर्याचिया आंगा उटणें । लागत असे ॥ ज्ञाने.१०/१०**

ज्ञानोबारायांनी पहिल्या अध्यायात सहा ओव्यात गुरूंचे महिमान सांगितले आहे. अध्याय १०, १२ ते १८ मध्ये प्रथम अनेक उत्तम उपमा देऊन गुरूंचा महिमा सांगितला आहे.

**७) वस्तू महिमा** - जगात अनेक महान वस्तू आहेत. त्यांचा महिमा अलौकिक आहे. उदा. परिस धातूचे सोने बनवितो. 'आपुल्या महिमाने । धातू परिसे केले सोने ॥' तु.म. कल्पवृक्षाचा महिमा मोठा आहे. 'कल्पवृक्षाखाली । फळे येती मागितली ॥' तु.म. कामधेनूचा महिमा फारच मोठा आहे. तसाच अमृताचा महिमा आहे. ज्ञानोबाराय वस्तू सामर्थ्य सांगतात.

**लोहाचें कनक होये । हें सामर्थ्य परिसींच आहे ।**
**कीं मृतही जीवित लाहे । अमृतसिद्धि ॥ ज्ञाने.१/७७**

**जरी प्रकटे सिद्ध सरस्वती । तरी मुकया आथी भारती ।**
**एथ वस्तुसामर्थ्यशक्ती । नवल कायी ॥ ज्ञाने.१/७८**

असा हा नाम, संत, ग्रंथ, व्रत, क्षेत्र, गुरू व वस्तू महिमा आहे.

**देवाचा विविध महिमा**

**१) विश्वरूप महिमा :**

**ऐसें माहात्म्य या श्रीहरीचें सहज । फांकतसे सर्वांगीचे तेज ।**
**ते मुनीकृपा जी मज । दृश्य जाहलें ॥ ज्ञाने.११/२४१**

**तरी आतां दिठीचा विटाळु गेला । तुवां सहजें दिव्यचक्षू केला ।**
**म्हणोनि यथारूपें देखवला । महिमा तुझा ॥ ज्ञाने.११/२९२**

**२) अवतार महिमा :**

**अवतार महिमा वर्णी वेद माझा । सुरवरांच्या काजा नामा म्हणे ॥**

**३) रूप महिमा :**

**रूप पाहता डोळसु । सुंदर पाहता गोववेषु ।**
**महिमा वर्णिता महेशु । जेणे मस्तकी वंदिला ॥ ज्ञान.**

**४) लीला महिमा :**

**लीला याची कोण जाणे महिमान । जगाचे जीवन देव देवा ॥ तु.म.**

५) गुण महिमा :

तुका म्हणे सर्वविशी हा संपन्न । जाणती महिमान श्रुती ऐसे ॥ तु.म.

६) चरण महिमा :

महिमा (साधना)

चरणीचा महिमा । हा तो तुझा पुरुषोत्तम ॥ तु.म.

७) मंगल आरतीचा महिमा :

मंगल आरतीचा थोर महिमा । आणिक द्यावया नाही उपमा ।
श्रीमुखासहीत देखे जो कर्मा । पासुनी सुटे जैसा रवी नाशी तमा ॥ तु.म.

८) ध्यान महिमा :

वर्णिता ध्यान महिमा श्रुति राहिल्या नेती ।
रविकोटी चंद्र तारा प्रकाशा न तुळती ।
उदार सूर गंभीर पूर्ण आनंदमूर्ति ।
तुकया बंधु म्हणे स्तवू मी काय किती ॥

९) आवडीचा महिमा :

ऐका महिमा आवडीची । बोरे खाय भिल्लीणीची ॥ तु.म.

१०) कीर्तन महिमा :

हरिकीर्तन नामोच्चार । जे नर करती वारंवार ।
तया नाही संसार । ब्रह्मादी देव वंदिती ॥१॥
कीर्तन महिमा नारदु । जाणतसे परमानंदु ।
झालासे सर्वा वंद्यु । देव असुरा मानवा ॥२॥
कीर्तन महिमा परिक्षिती । जाणतसे परम प्रीती ।
अंती सायुज्यता मुक्ती । पावती झाली ॥३॥
कीर्तन महिमा जाणे शुक । जाणती ते व्यासादीक ।
वाल्मिकादी सर्व सुख । कीर्तने सरते ॥४॥
कीर्तन महिमा जाणे प्रल्हादु । तोडियेला माया कंदु ।
कोरडे काष्ठी गोविंदु । प्रगटला ॥५॥

**कीर्तन महिमा जाणे बळी । याचक झाला वनमाळी ।**
**एका जनार्दनी कळी । कीर्तने न पिडी ॥६॥**

**म्हणोनि त्रिभुवनीं तूं एकु । तुजसारिखा ना आधिकु ।**
**तुझा महिमा अलौकिकु । नेणिजे वानूं ॥ ज्ञाने.११/५६६**

★★★★★

## (३३) परोपकार

**कथा** - एका गावात एक अनाथ पण सज्जन मुलगा राहत होता. बराच प्रयत्न करून त्यास कशात यश येत नव्हते. जगण्याकरिता अन्न-वस्त्र-निवारा तरी हवा होता. वयाच्या सव्विसाव्या वर्षी त्याने आपली कुलदेवी, कालिकामाता मंदिरात दोन महिने अनुष्ठान केले. एक दिवस देवी त्याच्या स्वप्नात आली व म्हणाली, 'येथून पूर्वेस १६ कोसावर आर्जव मुनी राहतात. त्यांची थोडी सेवा कर. म्हणजे तुझ्या सांसारिक समस्या नाहीशा होतील.' त्यास आनंद झाला. त्याने चार दिवसांची शिदोरी बरोबर घेतली. पूर्वीचे लोक कुठेही बाहेरगावी निघाले की बरोबर शिदोरी घेत असत. आता तशी समस्या राहिली नाही कारण प्रवासात ठिकठिकाणी रस्त्यावर 'ढाब्यांची' सोय असते. मात्र सात्विक माणसाने बरोबर घरची शिदोरी न्यावी. बुद्धी शुद्ध राहते. माऊली म्हणते,

**पैं शिळा कां सिदोरिया । दाटणें एक धनंजया ।**
**परी जें वाहतां विसांवया । मिळिजे तें घेपे ॥ ज्ञाने.१८/९३८**

या मुलाने प्रवास सुरू केला. चार कोस चालल्यानंतर थकल्यामुळे थांबला. गावात एका घरी राहिला. त्या घरी एक म्हातारी व तिची मुलगी राहत होती. म्हातारीने त्याची राहण्याची सोय केली. आपुलकीने विचारले, 'बाळ तू कुठे चालला आहेस ?' तो म्हणाला, 'मी आर्जव मुनीकडे चाललो आहे. त्यांची सेवा केल्यानंतर माझ्या समस्या मिटणार आहेत.' म्हातारी म्हणाली, 'माझीपण एक मोठी समस्या आहे. ती तुझ्या मुनींना विचार.' मुलगा म्हणाला, 'तुमची कोणती समस्या ?' म्हातारी म्हणाली, 'माझ्या मुलीने प्रतिज्ञा केली आहे जोपर्यंत एखादा तरूण सव्वा लाखाचा हिरा घेऊन येत नाही तोपर्यंत मी लग्न करणार नाही. मला चिंता वाटते मुलीचे लग्न होणार की नाही !' सज्जन मुलगा म्हणाला, 'आजी आपल्या प्रश्नाचे उत्तर नक्की आणतो. चार महिन्याने आपणास भेटेन.' तो मुलगा सकाळी उठून चालू लागला. चार कोस चालून दमला व एका मठात थांबला. मठात एक संन्यासी राहत होता. संन्याशाने विचारले, 'कुठे चालला आहेस ?' मुलानी सर्व कथा सांगितली. संन्याशी म्हणाला, 'जात आहेस तर माझाही एक प्रश्न मुनींना विचार. संन्यास घेऊन १५ वर्षे झाली पण अद्याप देव स्वप्नातसुद्धा आला नाही. देव भेटेल की नाही ?' मुलगा म्हणाला आपण मला राहण्यास

जागा दिली. आपल्या प्रश्नाचे उत्तर नक्की आणतो. सकाळी उठून मुलगा चालू लागला. चार कोस चालल्यानंतर एका माळ्याच्या मळ्यात थांबला. माळ्याने त्याची सोय केली. त्याची चौकशी केली. माळ्यालासुद्धा समजले की हा साधूकडे प्रश्न विचारण्यासाठी जात आहे. माळी म्हणाला, 'माझा एक प्रश्न आहे. वडील मरताना म्हणाले, घराच्या उत्तरेस उंबऱ्यापासून दहा फूटावर चाफ्याचे झाड लाव. छोटे झाड लावले. पण मनास समाधान नाही. कृपया मुनींना विचारा यामध्ये काही गुह्य आहे का ?' मुलगा विचारतो म्हणाला व सकाळी उठून चालू लागला. चार कोस चालल्यानंतर मुनींचा आश्रम लागला. सेवकाने मुलाचे स्वागत केले. सज्जन मुलगा म्हणाला, 'मुनींची सेवा करण्याची संधी द्यावी.' मुलाने प्रामाणिकपणे तीन महिने मुनींची सेवा केली. त्याच्या सेवेने मुनी प्रसन्न झाले. अशाप्रकारे साधू सेवेने प्रसन्न होतात व प्रसन्न झाले असता आपल्या शंका, प्रश्न त्यांना विचारावे अशी नीती आहे.

**तद्विद्धि प्रतिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ गी.४/३४**

**ते ज्ञान पैं गा बरवें । जरी मनी आथीआणावे ।**
**तरी संता या भजावे । सर्वस्वेंशी ॥ ज्ञाने ४/६५**

**जे ज्ञानाचा कुरुठा । तेथ सेवा हा दारवंटा ।**
**तो स्वाधीन करीं सुभटा । वोळगोनी ॥ ज्ञाने ४/६६**

**तरी तनु मनुजीवें । चरणासीं लागावें ।**
**आणि अगर्वता करावें । दास्य सकळ॥ ज्ञाने ४/१६७**

**मग अपेक्षित जें आपुलें । तें ही सांगती पुसिलें ।**
**जेणे अंतःकरण बोधलें। संकल्पा नये॥ ज्ञाने ४/१६८**

सेवा न करता साधू प्रसन्न होत नाही. मुलाने सांगितले, 'मला देवीने स्वप्नात सांगितले, आपल्यामुळे माझ्या समस्या सुटणार आहेत. मला चार प्रश्न विचारावयाचे आहेत.' आर्जव मुनींनी सांगितले, 'फक्त तीनच प्रश्न विचारू शकतोस.' मुलाने तिघांना वचन दिले होते. आपल्या नशिबाला दोष देत, म्हातारी, संन्यासी व माळी यांच्या समस्या सांगितल्या. मुनींनी योग्य उत्तरे दिली. हा परत घरी परतला. प्रथम माळ्याच्या घरी उतरला. मुलाने माळ्यास सांगितले, 'वडील मरतांना सर्व नातेवाईक जवळ होते. त्यांना तुम्हास गुह्य सांगायचे होते पण सांगू शकत नव्हते. म्हणून सांकेतिक खुणेने तुम्हास सांगितले. घराच्या उत्तरेस दहा फुटावर खोदकाम करा त्या ठिकाणी सोन्याच्या मोहरांचे दोन हंडे आहेत. त्यात २० हजार सोन्याच्या मोहरा आहेत.' सकाळी मुलाच्या साक्षीने खड्डा खोदला. पाच फुटाच्या अंतरावर दोन मोहरांचे हंडे मिळाले. माळ्याच्या परिवारास खूप आनंद झाला. सर्व लोक नीती-संपन्न होते. मुलाला सांगितले हे धन तुझ्यामुळे सापडले आहे. कृपया अर्धे

धन स्विकारावेच लागेल. नाही हो करता मुलाने दहा हजार मोहरा स्विकारल्या. त्या घेऊन, माळ्यास बरोबर घेतले व चालू लागला. परत चार कोस चालल्यानंतर संन्याशाचा आश्रम लागला. संन्याशाने विचारल्यानंतर सज्जन मुलगा म्हणाला, 'आपण श्रीमंताचे पुत्र आहात. वैतागाने संन्यास घेतला आहे. आपला देवावर पक्का विश्वास नाही. त्यामुळे यदाकदाचित पोटाची सोय होणार नाही. म्हणून आपण घर सोडताना आपल्याबरोबर वडिलांच्या तिजोरीतून सव्वा लाखाचा हिरा आणला आहे. तो आपल्या गाठोड्यात आहे. जोपर्यंत आपण त्याची आसक्ती सोडत नाही तोपर्यंत देवाचे दर्शन होणार नाही. जर त्या हिऱ्याचा त्याग केला तर आपणास ताबडतोब देवाचे दर्शन होईल असे मुनींनी सांगितले आहे.' संन्याशाला पटले व त्याने लगेच हिरा गाठोड्यातून काढून सज्जन मुलास दान केला. हिरा, मोहरा घेउन मुलगा चार कोस चालून म्हातारीकडे उतरला. म्हातारी आतुर होऊन विचारू लागली, 'बाळ माझ्या प्रश्नाचे उत्तर आणले का ?' मुलगा थोडा लाजला व म्हणाला, 'उत्तर नाही आणले पण सव्वा लाखाचा हिरा आणला आहे.' म्हातारीने मुलीला बोलविले. मुलीने हिरा पाहिला व म्हणाली, 'यांच्या बरोबर मी लग्न करण्यास तयार आहे.' म्हातारी खूश झाली. दोघांचे लग्न लावून दिले. मुलगा आपल्या बरोबर सुंदर, श्रीमंत बायको घेउन शिवाय संसाराकरिता दहा हजार सोन्याच्या मोहरा घेऊन घरी पोहोचला. साधूच्या सेवेने भुक्ती, मुक्ती, भक्ती प्राप्त होते. या कथेवरून एक सिद्धांत निर्माण होतो. दुसऱ्यावर उपकार केले तर आपले कल्याण होते. तुकोबाराय सांगतात,

**परउपकारे काया वाचा मन । वेंची सुदर्शन रक्षि तया ॥**

**दृष्टांत -** २) उन्हाळ्याचे दिवस होते. जमीन तापलेल्या तव्यासारखी तापली होती. भोजराजाचे राजकवी काही कामानिमित्त राजाकडे चालले होते. एक गरीब माणूस पायात चप्पल न घालता चालत होता. पाय भाजत होते म्हणून सारखा पळत होता. कोमल हृदयाच्या राजकवींना त्या गरीब माणसाची दया आली. कवींनी आपली चप्पल त्यास दिली. कवींचे शरीर कोमल होते पण तिकडे लक्ष नव्हते. तिकडून राजाचा माहूत राजाच्या हत्तीस घेऊन चालला होता. राजकवींच्या पायात चप्पल नसलेले पाहिले. माहुताने कवींना हत्तीवर घेतले. कवी राजवाड्यात पोहचले. राजास आश्चर्य वाटले. राजा कवींना म्हणाला, 'आपणास हत्ती कसा मिळाला ?' राजकवी म्हणाले, 'मी एका गरीब माणसास चप्पल दिली. देवाने मला हत्ती दिला.' राजा खूश झाला व राजकवींना हत्ती बक्षीस देऊन टाकला.



# (३४) आलिंगन

देव अथवा संत साधकांवर, जीवांवर कृपा करतात. त्याचे अनेक प्रकार जरी असले तरी प्रमुख तीन प्रकार आहेत. १) कृपादृष्टीने पाहणे - 'कृपाकटाक्ष न्याहाळीले । आपुल्या पदी बैसविले । बापरखुमादेवीवरु विठ्ठले । भक्ता दिधले वरदान ॥' ज्ञान. २) मस्तकावर हात ठेवणे - वारकरी सांप्रदयात हा प्रकार जास्त रूढ आहे. ज्ञानोबारायांच्या मस्तकावर निवृत्तीनाथांनी हात ठेवला.

**ज्ञानदेव म्हणे मी चाडें । सद्गुरूंनीं केले कोडें ।**
**माथां हात ठेविला तें फुडें । बीजचि वायीले ॥ ज्ञाने ६/४९२**

नाथ महाराजांच्या मस्तकावर जनार्दन स्वामींनी हात ठेवला आहे. 'येवोनि गुरुनाथे माथा ठेविला करू । अज्ञान तिमिर गेले शुद्ध मार्ग साचारू । गर्जत चालीयेलो फिटला अज्ञान अंधारू । एका जनार्दनी माझा सद्गुरू उदारू ॥' नाथ. तुकाराम महाराजांच्या मस्तकावर बाबाजींनी हात ठेवला. 'सांपडविले वाटे जाता गंगा स्नाना । मस्तकी तो जाणा ठेविला कर ॥' तु.म. तुकोबारायांनी निळोबांच्या मस्तकावर हात ठेवून कृपा केली. 'हात ठेविला मस्तकी । देऊनी प्रसाद केले सुखी ॥' निळो. ३) तिसरा प्रकार आहे आलिंगन देऊन कृपा करणे. हा जवळचा प्रकार वाटतो. कारण लांबून पाहणे, मस्तकावर हात म्हणजे फक्त स्पर्श व आलिंगन म्हणजे भेटणे, मिठी मारणे. संत आलिंगन देतात व जीवास आपलेसे करतात. काहींना टाळावे वाटते पण संतांना कवटाळावे असे वाटते. 'आलिंगने सुख वाटे । प्रेम चिदानंदी गोठे । हर्षे ब्रह्मांड उचटे । समूळ उठे मी पण ॥' ज्ञान. 'आलिंगने संताचिया । दिव्य झाली माझी काया । मस्तक हे पाया । वरी त्यांच्या ठेविता ॥' तु.म. 'आलिंगने घडे । मोक्ष सायुज्यता जोडे ॥' तु.म.

आलिंगनात तीन प्रकार पडतात. १) यमाचे आलिंगन २) कामाचे आलिंगन ३) प्रेमाचे आलिंगन

**१) यमाचे आलिंगन** - या आलिंगनामागे ठार मारण्याचा उद्देश असतो. उदा. धृतराष्ट्र म्हणाला, 'माझ्या दुर्योधनास कोणी मारले ?' सर्वांनी सांगितले, 'भीमाने'. धृतराष्ट्र म्हणाला, मला भीमास भेटायचे आहे. भीम उतावीळ झाला पण श्रीकृष्णांनी लोखंडाचा पुतळा पुढे केला. त्या पुतळ्याला आलिंगन देऊन धृतराष्ट्राने त्याचा चुरा केला. जर भीम भेटला असता तर यमलोकी पोहोचला असता. शिवाजी महाराजांना भेटण्याकरिता प्रतापगडावर अफजलखान आला होता. मारण्याच्या उद्देशाने खानाने आलिंगन देऊन खंजीर डोक्यात मारला. पण महाराज सावध होते. ते तयारीने गेले होते. त्यांनी वाघनख्यांनी खानाचा वध केला. जर तयारी नसती तर महाराजांची यमाशी गाठ पडली असती. दुष्टास आलिंगन देऊन सुख होईल का ? 'इंगळासी सन्निधान अतित्याई । क्षेम देतां काय सुख वाटे ॥' तु.म.

**२) कामाचे आलिंगन** - हा थोडा शृंगार रस आहे. स्त्री-पुरुषांच्या कामाच्या संबंधातील हे आलिंगन

आहे. ज्ञानोबाराय सांगतात, 'स्वप्नातील स्त्री, पुरुषास आलिंगन देऊन सकाम करते. मग जिवंत स्त्री बद्दल प्रश्नच नाही.'

**स्वप्नीं प्रियापुढें तरुणांगी । निदेली चेवऊनि वेगीं ।**
**आलिंगिलेनिवीण आलिंगी । सकामु करी ॥ ज्ञाने १५/८६.**

'उरा लावी उर आलिंगीता कांता । संतासी भेटता अंग चोरी ॥' तु.म. विहित काम ठीक आहे पण कधीकधी निषिद्ध कामाचे आलिंगन मरणास कारण ठरते. दिव्यावर झेप घेणाऱ्या पतंगाप्रमाणे !

**पतंगा दीपीं आलिंगन । तेथ त्यासी अचुक मरण ।**
**तेवी विषयाचरण । आत्मघाता. ॥ ज्ञाने ३/२०१**

३) **प्रेमाचे आलिंगन -** तरुण स्त्री पतिस व पुत्रास आलिंगन देते. पण पतिच्या आलिंगनात काम असतो. पुत्राच्या आलिंगनात प्रेम असते. 'कां पतिपुत्रांते आलिंगी । एकचि ते तरुणांगी । तेथ पुत्रभावाच्या आंगीं । न रिघे कामु ॥' ज्ञाने. १३/४८० देव संतांना, संत संतांना जे आलिंगन देतात ते प्रेमाचे असते व त्यामुळे प्रेम वाढत जाते. ज्ञानोबाराय नामदेवरायांना भेटले व आलिंगन दिले. 'देऊनी आलिंगन प्रितीच्या पडीभरे । पूजिले आदरे यथाविधी ॥' नाम. रामाचे - भरताचे, भरताचे - हनुमंताचे रामायणातील आलिंगन प्रसिद्ध आहे. तुकोबाराय देवास कृपा करण्यास सांगतात. एकाच अभंगात तीनही प्रकार. 'भागलो मी आतां आपुल्या स्वभावें । कृपा करोनि देवें आश्वासीजे ॥१॥ देऊनी आलिंगन प्रितीच्या पडीभरे । अंगे ही दातारे निववावी ॥२॥ अमृताची दृष्टी घालुनिया वरी । शितळ हा करी जीव माझा ॥३॥ घेई उचलुनी पुसें तहान भूक । पुसी माझे मुख पीतांबरे ॥४॥ बैसोनिया माझी धरी हनुवटी । ओवाळुनी दिठी करुनी सांडी ॥५॥ तुका म्हणे बाप्पा अहो विश्वंभरा । आता कृपा करा ऐसी काही ॥६॥

**मग सांवळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु ।**
**आलिंगिला स्वशरणु । भक्तराजु तो ॥ ज्ञाने १८/१४१८**

**चिंतन :** आलिंगन ही प्रेम व्यक्त करण्याची क्रिया आहे. सामान्यतः आलिंगन व मिठी एक मानली जाते. परंतु दोघात अंतर आहे. एकानेच दुसऱ्याला कव घातली तर ती मिठी. दोघांनी एकमेकांना दिले तर तेच आलिंगन ठरते.

पारमार्थिक क्षेत्रातही आलिंगन हा संत भेटीतील एक विधी मानला जातो.

**प्रथम भेटी आलिंगन । मग चरण वंदावे ॥**

परंतु आलिंगन घडण्याकरिता तीन गोष्टीत साम्य असावे लागते.

१) **वय -** वयात समानता असावी. वयवैषम्यतेत आलिंगन नाही.

उदा. - नव्वदीचा म्हातारा दहा वर्षाच्या बालकाला आलिंगन देऊ शकत नाही.

**२) अधिकार** - वयात समानता असून, अधिकारात समानता नसेल तर आलिंगन घडत नाही.

उदा. - शिपाईही चाळीस वर्षाचा, साहेबही चाळीस वर्षाचा म्हणून काही साहेब शिपायाला आलिंगन देत नाही.

**३) अंतःकरणवृत्तीचा भाव** - वयाधिकारातील साम्य आलिंगनाला पुरेसे नाही. अंतःकरण वृत्तीचा भाव समान असावा.

उदा. - येणाऱ्या वरातीतील साहेबही चाळीशीचा. जाणाऱ्या प्रेतयात्रेतील साहेबही चाळीशीचा. मग आलिंगन का घडत नाही.

कारण येणाऱ्याची सुखयुक्त वृत्ती तर जाणाऱ्याची दुःखयुक्त वृत्ती. वृत्ती वैधर्म्यामुळे दोघात आलिंगन घडू शकत नाही.

★★★★★

# (३५) वीर

महाराष्ट्र ही वीरांची भूमी आहे. ज्यांनी तत्वाकरिता जीवन वाहिले.

१) स्वातंत्र्यवीर - सावरकर
२) कर्मवीर - भाऊराव पाटील
३) रणवीर - तानाजी मालुसरे
४) दानवीर - कर्ण
५) धर्मवीर - संभाजी महाराज
६) क्रांतिवीर - नाना पाटील
७) महावीर - जैनांचे गुरू

वीरांचे अनेक प्रकार आहेत पण ज्ञानोबारायांनी ज्यांनी विषयापासून इंद्रिये ताब्यात ठेवली त्यांना 'वीर' म्हटले आहे. त्याकरिता पाच दृष्टांत वापरले आहेत.

**जें सारसांही विघडतां । होय वोहाहूनि वत्स काढितां ।**
**कां भणंगु दवडिता । भाणयावरुनी ॥ ज्ञाने १८/८८५**

**पैं मायेपुढोनी बालक । काळें नेतां एकुलते एक ।**
**होय कां उदक । तुटतां मिना ॥ ज्ञाने १८/८८६**

**तैसे विषयांचे घर । इंद्रिया सांडिता थोर ।**
**युगांतु होय ते 'वीर' । वीराग साहाती ॥ ज्ञाने १८/८८७.**

हल्ली काही सांप्रदायातील लोक सांगतात, काहीही खा काहीही प्या. आमच्या मताप्रमाणे देवाची उपासना करा. तुम्हास देवाची प्राप्ती होईल. हे वेद, संतबाह्य मत आहे. परमार्थात प्रवेश म्हणजे प्रथम इंद्रियावर ताबा. 'इंद्रियासी नेम नाही । मुखी राम म्हणोनि काही ॥१॥ जेवी माशीसंगे अन्न । सुख नेदी ते भोजन ॥२॥' तु.म. वारकरी सांप्रदायात प्रवेश म्हणजे प्रथम तुळशीची माळ घालणे व निषिद्ध गोष्टींचा तिरस्कार व विहिताचा पुरस्कार ! तरच परमार्थात प्रगती शक्य आहे.

**नाइकणें तें कानचि वाळी । न पाहाणें ते दिठीचि गाळी ।**
**अवाच्य तें टाळी । जीभचि गा ॥ ज्ञाने १४/२०९**

सामान्य माणसे इंद्रियांच्या ताब्यात असतात. मात्र संतांच्या ताब्यात इंद्रिये असतात. मालकाच्या ताब्यात कुत्री असावी पण कुत्र्यांच्या ताब्यात मालक नसावा. तु.म. म्हणतात, 'आम्ही इंद्रियांचे धनी आहोत.' 'काम क्रोध बंदी खाणी । तुका म्हणे दिले दोन्ही । इंद्रियांचे धनी । आम्ही झालो गोसावी ॥'

संतांना वीर म्हटले आहे. कारण त्यांच्या ताब्यात इंद्रिये असतात.

**वीर विठ्ठलाचे गाढे । कळी काळ पाया पडे ॥ तु.म.**

**तुका म्हणे विर्या 'वीर' । संत धीर समुद्र ॥**
**ऐसे एकांगी वीर । विठ्ठलरायाचे डिंगर । बापरखुमादेवीवर । तीही निर्धारी जोडिला ॥ ज्ञान.**

संत वाङमयात चार प्रमुख शब्द येतात. वीर, झुंजार, बळी व गाढे. याचे अर्थ वेगवेगळे आहेत. १) वीर - इंद्रियावर ताबा २) झुंजार - काम, क्रोध (विकार) यांच्यावर ताबा ३) बळी - ज्याच्या ताब्यात काळ आहे ४) गाढे - ज्यांनी देवाला हृदयात साठविला आहे.

**तुका म्हणे भूमंडळी । आम्ही बळी वीर गाढे ॥**

ज्ञानोबारायांनी 'विचारवीर' शब्द वापरला आहे, ज्याचा सत्‌विचार स्थिर असतो. ही उपमा अर्जुनास दिली आहे.

रामास रघुवीर म्हणतात.

**त्यागवीरो दयावीरो विद्यावीरो विचक्षणः । पराक्रम महावीरो धर्मवीरः सदाश्रीतः ।**
**पंञ्चवीराः समाख्याता राम एव स पच्चधा । रघुवीर इति ख्यातः सर्ववीरोपलक्षणः ॥**

**अर्थ -** त्यागवीर, दयावीर, विद्यावीर, महावीर व धर्मवीर हे वीरांचे पाच प्रकार आहेत. पण ही सर्व वीरांची लक्षणे रामाजवळ होती म्हणून त्यांना रघुवीर म्हणतात.

हल्ली पोरींचा मार खाणारे 'प्रेमवीर' यांची संख्या वाढत आहे. काही आहेत सेवाचोर, काही आहेत सेवावीर.



# (३६) महिमा संताचा

पहिल्या 'शतकोटीत' संत महिमा सांगितला आहे. या कोटीत पहिल्यापेक्षा वेगळा विषय हाताळला आहे. संत महिमा सांगताना संत कोणापेक्षा महान आहेत याचे वर्णन आहे. या कोटीत संत कशामध्ये मोठे आहेत हे सांगण्याचा प्रयत्न आहे. कोणत्याही बाबतीत संतांचा जीवाशी संबंध आला तरी जीवाचे कल्याण होते. 'संतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकांचे काम नाही येथे ॥' तु.म.

१) **नामाचा महिमा -** संतांच्या नामामुळे पुण्य पदरात पडते. 'पुण्यवंत व्हावे । घेता सज्जनांची नावे ॥' तु.म. संतांच्या नावाने पापे जातात. 'तुका म्हणे पापे । जाती संतांचीया जपे ॥' 'एका जनार्दनी ज्ञानाबाई नाम । पावेन निजधाम संतांचे ते ॥' नाथ महाराजांचा एक मोठा अभंग आहे. त्यात निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई या चौदा अक्षरांचा रात्रंदिवस जप केला तर मुक्ती मिळेल. किंबहुना ज्ञानेश्वर महाराज प्रत्यक्ष भेटतात असा उल्लेख आहे. 'तयाच्या चिंतने तरतील दोषी । जळतील राशी पातकांच्या ॥' तु.म. हा संतांच्या नामाचा महिमा आहे.

२) **वारीचा महिमा -** संतांची, ज्ञानोबारायांची जो वारी करतो तो सर्व कुळास तारतो. 'जो करील याची यात्रा । तो तारील सकळ गोत्रा । सकळही कुळ पवित्रा । याचिया दर्शने होती ।।' नाम. ज्ञानोबारायांची आळंदी यात्रा जे करतात ते विठ्ठलास आवडतात. 'यात्रे अलंकापुरी येती । ते आवडती विठ्ठला ॥' निळो. यापेक्षा देव वर्षातून ज्ञानोबाची एक यात्रा करतात. देवाससुद्धा यांच्या यात्रेमुळे विश्रांती मिळते.

३) **पूजेचा महिमा -** माणसाने देवाची पूजा केली पाहिजे. पण देवपूजा करताना संत आले तर देवाची पूजा बाजूस सारावी व संतांची आरती करावी. 'देव सारावे परते । संत पूजावे आरते ॥' तु.म. काया-वाचा-मने करून संतांची पूजा केल्यास सर्व इच्छा पूर्ण होतात. 'घाली संतांशी आसने । पूजा करी काया-वाचा-मने । एका जनार्दनी जाणे । इच्छिले ते पुरवी ॥' नाथ. विष्णू परमात्मा संतांची पूजा करतात.

एकदा नारद वैकुंठास गेले असता देव दिसले नाहीत म्हणून लक्ष्मी मातेस विचारले, 'देव कुठे आहेत ?' लक्ष्मी म्हणाली, 'देव देव-पूजा करीत आहेत.' नारदास कुतूहल वाटले. देव आणि देव-पूजा ? हळूच देवघरात प्रवेश केला. समोर १४ संतांचे फोटो होते. त्याची देव-पूजा करीत होते.

**प्रल्हाद नारद पराशर पुण्डरिक व्यासाम्बरिष शुक शौनक भीष्म दाल्भ्यान ।**
**रूक्माङ्गदार्जुन वसिष्ठ बिभिषणादीन पुण्यानीमान् परमभागवतान् नमामि ॥ अर्जुन गीता.**

नारद गहिवरले, म्हणाले, 'देवा आमची पूजा आपण करता ?' विष्णू म्हणाले, 'माझा नियमच आहे, जो माझी पूजा करतो त्यांची मी पूजा करतो.'

४) **संगाचा महिमा -** 'संतसंगे हरिची भक्ती । संतसंगे ज्ञान विरक्ती । संतसंगे भुक्ती मुक्ती । साधका वरिती अनायासे ॥' निळो. संतसंगामुळे ज्ञान, विरक्ती, भक्ती, भुक्ती, मुक्ती सर्व काही प्राप्त होते. संतांच्या संगाने जीवाची उत्तम कीर्ती होते. 'संग संतांचा करिता बरवा । उत्तमोत्तम कीर्तिचा ठेवा । पंथ तो सुपंथे चालावा । उगवा वासना लिगाड ॥' तु.म.

५) **दर्शनाचा महिमा -** 'संत दर्शनि हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥' तु.म. संतांच्या दर्शनामुळे ज्याच्या नाभीकमळात ब्रह्मदेवाने जन्म घेतला अशा विष्णूची प्राप्ती होते. रामायणात असा प्रसंग आला आहे. बिभिषण रावणाच्या लंकेतून रामाकडे आले. बिभीषणास आपल्यात सहभागी करून घ्यावे की नाही याबद्दल सभा झाली. जांबुवंत वगैरे म्हणाले, 'प्रभू हा शत्रूंचा भाऊ आहे. याच्यावर विश्वास ठेवू नका.' शेवटी रामाने हनुमंतास विचारले, 'हनुमंता आपण लंकेत जाऊन आलात. आपले मत काय आहे ?' हनुमंत म्हणाले, 'बिभीषण लंकेत आपले भजन करीत होते. काही शंका न घेता यांना आपल्या सैन्यात सामील करून घ्या.' बिभीषण म्हणाले, 'हनुमंता आपल्यामुळे राम जोडला गेला.'

६) **भेटीचा महिमा -** 'संत भेटती आजी मज । तेणें मी जाहलो चतुर्भुज । दोन्ही भूजा स्थूळी सहज । दोन्ही सूक्ष्मी वाढल्या ॥' ज्ञान. 'या या संतांशी भेटता । हरे संसाराची व्यथा । पुढता पुढती माथा । अखंडित ठेवीन ॥' तु.म. असा संत भेटीचा फायदा आहे. संतांची भेट, दर्शन, संग हे शब्द जवळजवळ सारख्या अर्थाने वापरले जातात.

७) **कृपेचा महिमा -** 'होता कृपा तुमची पशू बोले वेद । निर्जीव चाले भिंती महिमा अगाध । भगवत् गीता टीका ज्ञानेश्वरी शुद्ध । करूनी भाविक लोका केला निजबोध ॥' निळो. ज्ञानोबांनी कृपा केली, रेडा वेद बोलू लागला, निर्जीव भिंत चालली. ज्ञानेश्वरीसारखा अप्रतिम ग्रंथ सहज लिहिला. हा यांच्या कृपेचा महिमा आहे. यांची कृपा झाली तर हे आपले पद देतात. 'कृपा कटाक्ष न्याहाळिले । आपुल्या पदी बैसविले । बाप रखुमादेवीवरू विठ्ठले । भक्ता दिधले वरदान ॥' ज्ञान.

८) **आलिंगनाचा महिमा -** 'आलिंगन घडे । मोक्ष सायुज्यता जोडे ॥' तु.म. 'ऐसा संतांचा महिमा । झाली बोला याची सीमा ॥' तु.म. संतांच्या आलिंगनाने आठ फायदे होतात. चार पुरुषार्थ व चार मुक्ती मिळतात. आपली काया दिव्य होते. 'आलिंगने संताचिया । दिव्य झाली माझी काया । मस्तक हे पाया । वरी त्याच्या ठेविता ॥' तु.म.

९) **चरणरजाचा महिमा -** यांचे चरणरज शंकर डोक्यावर धारण करतात. 'चरणीचे रज वंदी शूळ पाणी । नाचती कीर्तनी त्यांचे माथा ॥' तु.म. 'देव इच्छी रज चरणीची माती । धावत चालती मागे मागे ॥' तु.म. 'तुका म्हणे निवे तनु । रज:कणु लागतां ॥'

१०) **ध्यानाचा महिमा -** 'तुका म्हणे संत ध्याता । परब्रह्मचि आले हाता ॥' संतांचे ध्यान केले तर त्यांच्या

हृदयात परमात्मा असल्यामुळे दुप्पट फायदा होतो. हनुमंत, दत्तात्रय, ज्ञानेश्वर महाराज, तुकाराम महाराज ह्यांचे ध्यान केले तरी देवाचे ध्यान होते. कारण त्यांच्या हृदयात परमात्मा आहे. 'सतत कृष्णमूर्ती सावळी । खेळे हृदय कमळी । शांती क्षमा तया जवळी । जीवे भावे अनुसरल्या ॥' ज्ञान.

**११) सेवेचा महिमा** - संतांची सर्वांगाने सेवा केल्यास सर्व काही लाभ होतात. 'नामा म्हणे सेवा घडावी संतांची । होय कृपा त्यांची तेचि ज्ञान ॥' नाम. ज्यांना संतसेवा घडत नाही किंवा संतसेवेत अंग चोरतात. तु.म. म्हणतात त्यांचे आम्हास दर्शन नको. 'संत सेवेशी अंग चोरी । दृष्टी न पडो तयावरी ।।' महाराज म्हणतात, संतसेवा माझ्या पूर्वजांचा ठेवा आहे. 'तुका म्हणे संतसेवा । माझ्या पूर्वजांचा ठेवा ॥' देवसुद्धा यांची सेवा करून सुखी होतो. 'संतांचे सुख झाले या देवा । म्हणउनी सेवा करी त्यांची ॥' तु.म.

**१२) संतांच्या महिमेचा महिमा** - नाथ महाराज म्हणतात, संतांचा महिमा किती वर्णन करावा ? जो जगाचे लक्ष आहे, बऱ्याच लोकांच्या जो लक्षात येत नाही असा अलक्ष परमात्मा याचे लक्ष संत आहेत (ज्ञानेश्वर महाराज). 'संतांचा महिमा वर्णावा तो किती । अलक्ष लक्ष मूर्ती ज्ञानोबा माझा॥' नाथ.

ब्रह्मदेव शंकर यांचे ध्यान करतात. 'म्हणती चौघेजण भाग्याचे । जे निधान ब्रह्मादिकांचे । जे निज ध्यान शंकराचे । सकळ जीवांची जीवनकळा ॥' नाम. साखर सर्व बाजूने गोड असते. परिसास लोखंड कोणत्याही बाजूने लावले तर त्याचे सोने होते. संतांचा संबंध कोणत्याही प्रकारे आला तरी जीवाचे आत्मकल्याण होते. विसोबा खेचरासारख्या दुष्टाचा माऊलीच्या संगाने उद्धार झाला आहे. 'भलतीया भावे शरण जाता भेटी । पाडितसे तुटी जन्मव्याधी ॥' नाथ.

तात्पर्य - संतांशी कायमचा संबंध ठेवावा. यांचा महिमा ब्रह्मदेवास कळत नाही, सामान्य पामरांची काय कथा ?

**त्यांचा महिमा काय वर्णू मी पामर । न कळे साचार ब्रह्मादिका ॥ तु.म.**

**सन्तोहि सत्येन नयन्ति सूर्यः । सन्तो भूमिं तपसा धारयन्ति**
**सन्तो गतिर्भूतभविष्य राजन् । सतांमध्ये नावसीदन्ति सन्तः ॥ महाभारत**

**अर्थ** - संतांच्या सत्यत्वामुळे सूर्य जगास प्रकाश देतो. संतांच्या तपश्चर्येमुळे पृथ्वी स्थिर आहे. भूतभविष्यास कारण संत आहेत व संत नेहमी संतांच्या समुदायात राहतात.

**मत्स्य कूर्मादिक ज्याचे 'महिमेसी' आले । धन्य वैष्णव तेज रविशशीसी पाहाले ॥ ज्ञान.**

**स्वर्ग जयाची पायरी । मोक्ष ज्यांचा आज्ञाधारी ॥१॥**

**ऐसा संताचा महिमा । पायवणी ते शिव ब्रह्मा ॥२॥**

**ब्रह्मज्ञानाची ते मात । कोण तया तेथे पुसत ॥३॥**

**भुक्ति मुक्ति लोटांगणी । शरण एका जनार्दनी ॥४॥**

**चिंतन** - वारकरी सांप्रदायात सगुण व निर्गुण देवास मान्यता आहे. 'बापरखुमादेवीवरु सगुण निर्गुण । रूप विटेवरी दावियेली खूण ॥ ज्ञान. 'सगुण निर्गुणाचा ठाव । विटे पाव धरियेले ॥' तु.म.

मात्र योगाने अव्यक्ताची प्राप्ती होते व भक्तीने व्यक्त परमात्मा प्राप्त होतो.

**तरि व्यक्त आणि अव्यक्त । हें तूंचि एक निभ्रांत ।**
**भक्तीं पाविजे व्यक्त । अव्यक्त योगें ॥ ज्ञाने.१२/२३**
**या दोनी जी वाटा । तूंतें पावावया वैकुंठा ।**
**व्यक्ताव्यक्त दारवंठा । रिंगिजे येथ ॥ ज्ञाने.१२/२४**

योग कठीण आहे. कलियुगात तर शक्यच नाही.

**योग याग विधी येणे नोहे सिद्धी । वायाची उपाधी दंभधर्म ॥ ज्ञान.**

मात्र भक्ती थोडी सोपी आहे. भक्ती पण तिघांची करू शकतो.

१) गुरू २) देव ३) संत

१) गुरुभक्ती तशी अवघड आहे.

२) देवभक्ती त्यापेक्षा सोपी आहे.

३) मात्र संतभक्ती सवपिक्षा सोपी आहे.

१) गुरुभक्तीचे अध्वर्यु आहेत ज्ञानेश्वर महाराज.

२) देवभक्ती मात्र नामदेवरायांनी केली.

३) संतभक्तीस महत्त्व तुकोबारायांनी दिले.

१) गुरुभक्ती कठीण - विज्ञान शाखा - हुशार विद्यार्थी जातात. (९०% पर्यंत गुण असणारे)

२) देवभक्ती थोडी सोपी - वाणिज्य शाखा ६० ते ७०% गुण असणारे विद्यार्थी ही शाखा पसंत करतात.

३) मात्र संतभक्ती म्हणजे कला शाखा. यात काठावर पास होणारे विद्यार्थीपण प्रवेश घेतात.

गुरुभक्ती, देवभक्तिपेक्षा संतउपासना सोपी आहे. तुकोबारायांचे जेवढे संतपर अभंग आहेत, तेवढे कोणत्याच संतांचे नाहीत. याचे कारण ज्ञानोबाराय, नामदेवराय, नाथ महाराज यांचे जीवन तुकोबारायांच्या समोर होते. संत हे देव आहेत शिवाय गुरुसुद्धा आहेत. तिघांपैकी एकाची उपासना केली तरी जीव कृतार्थ होतो.

★★★★★

# (३७) श्रेष्ठ

या जगात मातीपेक्षा पाणी, पाण्यापेक्षा तेज, तेजापेक्षा वायू, वायूपेक्षा आकाश व आकाशापेक्षा माया व मायेपेक्षा ब्रह्म श्रेष्ठ आहे.

जीवाचा विचार केल्यास वनस्पतीपेक्षा जलचर प्राणी श्रेष्ठ, जलचर प्राण्यापेक्षा सरपटणारे प्राणी श्रेष्ठ, सरपटणाऱ्या प्राण्यांपेक्षा पक्षी श्रेष्ठ, पक्ष्यांपेक्षा पशू श्रेष्ठ, पशूपेक्षा मानवप्राणी श्रेष्ठ, मानवापेक्षा संत श्रेष्ठ.

**भूतानां प्राणिनाः श्रेष्ठाः प्राणिनां बुद्धीजिविनः ।**
**बुद्धीमत्सु नराः श्रेष्ठाः नरेषु ब्राह्मणः स्मृताः ।**
**ब्राह्मणेषु च विद्वांसः विद्वत्सु कृतबुद्धयः ।**
**कृतबुद्धिषु कर्तारः कर्तृषु ब्रह्मवादिनः ॥**

**अर्थ -** भूतामध्ये प्राणी, प्राण्यामध्ये बुद्धीवान, बुद्धीवान प्राण्यापेक्षा मानव श्रेष्ठ, मानवात ब्राह्मण श्रेष्ठ, ब्राह्मणात विद्वान ब्राह्मण श्रेष्ठ, विद्वान ब्राह्मणात ज्याची बुद्धी कृतार्थ झाली आहे तो श्रेष्ठ. कृतार्थ बुद्धीपेक्षा कर्तृत्व करणारा, वागणारा श्रेष्ठ व सर्वात ब्रह्मज्ञानी श्रेष्ठ. गीतेच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे शूद्रापेक्षा वैश्य, वैश्यापेक्षा क्षत्रिय, क्षत्रियापेक्षा ब्राह्मण श्रेष्ठ होय. शूद्राचा एक गुण, वैश्याचे दोन, क्षत्रियाचे सात, व ब्राह्मणाचे नऊ गुण आहेत.

**जरी तो ब्राह्मण झाला कर्मभ्रष्ट । तुका म्हणे श्रेष्ठ तिही लोकी ॥ तु.म.**

धनवंतापेक्षा गुणवंत श्रेष्ठ, गुणवंतापेक्षा भक्तिवंत श्रेष्ठ.

**भक्तिवंत अति निचऊ प्राणी । मोही प्राणप्रिय असि मन बानी ॥ तुलसी.**

**वये धने जे श्रेष्ठपण । ते श्रेष्ठत्व अतिगौण ।**
**भगवत्प्राप्ती ते श्रेष्ठ जाण । तेणे भाग्ये परिपूर्ण उद्धवू ॥ नाथ. ११/२३/३८**

१) काही जन्मताच श्रेष्ठ असतात - ज्ञानोबाराय, शंकराचार्य

२) काही स्वतःच्या कर्तृत्वावर श्रेष्ठ बनतात - शास्त्रज्ञ, कर्तृत्ववान लोक

३) काहींच्यावर श्रेष्ठत्व लादले जाते - बाप श्रेष्ठ म्हणून मुलगा श्रेष्ठ - दुर्गुणी, बुद्धू असला तरी.

(Some are born great, some achieve greatness, some have greatness trust upon them) काही भ्रष्ट असले तरी स्वतःस श्रेष्ठ समजतात.

समाजात श्रेष्ठ व्हायचे असल्यास खालील सात लक्षणांचा अंगिकार करावा.

१) **इंद्रियावर ताबा** - ज्याची इंद्रिये ताब्यात नाहीत, ज्याचा खाण्यावर ताबा नाही, नको ते करतो, नको तिकडे जातो, नको ते पाहतो तो स्वतःचे नुकसान करतो व निंदेस पात्र होतो. जे जितेंद्रिय आहेत ते समाजात आदरणीय ठरतात.

२) **निर्वैरता** - कोणाशीही वैर नको, सर्वांच्या अंतःकरणात परमात्मा वास करतो, मग द्वेष - वैर का करावे ? 'कोणाही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचे ॥' तु.म. विश्वामित्रांनी द्वेषाने वसिष्ठांची शंभर मुले मारली. पण वसिष्ठांनी विश्वामित्रांचा द्वेष केला नाही. त्यांची वाहवा केली. वैर मिटले, जगात वसिष्ठ श्रेष्ठ ठरले. 'निर्वैर होणे साधनाचे मूळ । येर ते विल्हाळ सांडी मांडी ॥' 'निर्वैर व्हावे सर्व भूतांसवे । साधन बरवें हेचि एक ॥' तु.म.

३) **सत्संग** - ज्याला श्रेष्ठ व्हावयाचे आहे त्याने सतत संतांचा संग करावा. त्यांचे विचार समजून घ्यावेत. कनिष्ठ माणूस संत्संगाने वरिष्ठ बनतो. नारदांचा थोडासा संग वाल्या कोळ्याचा वाल्मिक ऋषी बनण्यात झाला.

४) **सुविचार** - माणसाच्या मनात दोन्ही विचार येतात. सुविचार व कुविचार. कुविचाराने अधःपतन होते व सुविचाराने जीवनात प्रगती होते. विचारावर व उच्चारावर आचार अवलंबून आहेत.

५) **विद्या** - मानवी जीवनात विद्या कामधेनू आहे जी सर्व इच्छा पूर्ण करते. वकील, डॉक्टर, इंजिनिअर वगैरे समाजात श्रेष्ठ ठरतात. त्यांना मान व धन दोन्हीही मिळतात. कोणतीतरी चांगली विद्या मिळवावी व समाजात श्रेष्ठ व्हावे. गायन, वादन वगैरे सायास करून मिळवणारी मंडळी आदरास पात्र होतात. अध्यात्म विद्या मिळविणारा तर देवातसुद्धा श्रेष्ठ ठरला जातो.

**ज्येष्ठत्वं जन्मना नैव गुणै ज्येष्ठत्वमुच्यते ।**
**गुणात् गुरुत्वमायाति दुग्धं दधि घृतं क्रमात् ॥ सुभा.**

**अर्थ** - जन्माने माणूस श्रेष्ठ ठरत नाही तर गुणानी श्रेष्ठ ठरतो. गुणवान गुरुत्व प्राप्त करतो. जसे दुधापेक्षा दह्यास, दह्यापेक्षा लोण्यास व लोण्यापेक्षा तुपास श्रेष्ठत्व आहे. कारण गुण जास्त आहेत.

६) **धार्मिक** - धार्मिक या शब्दाचा अर्थ ज्याच्याकडे दैवी गुण वास करतात. जो सदाचारी आहे, काम-क्रोध-लोभ-मोह यांच्या ताब्यात जाऊन वाईट काम करत नाही. 'काम क्रोध लोभ की जब लग मनमें खान । तुलसी पंडित मूरख दोनों एक समान ॥' तुलसी.

७) **प्रेम** - ज्याच्या अंतःकरणात सर्वांविषयी दयाभाव, जो परमात्म्यावर निःसीम प्रेम करतो, अंतःकरणात कामाची जागा प्रेमाने घेतलेली असते. सदाचाराने राहून प्रभूचे भजन करणारा भक्त सर्व जगात श्रेष्ठ ठरला जातो. हे सात गुण आत्मसात केल्यास माणूस श्रेष्ठ होतो. समाजास व देवाससुद्धा आवडतो.

**दृष्टांत** - भगवान बुद्धांना एक शिष्य विचारतो, 'दगडापेक्षा कोण श्रेष्ठ ?' भगवान म्हणतात, 'दगडापेक्षा लोखंड श्रेष्ठ, लोखंड दगडास फोडते. लोखंडापेक्षा अग्नि श्रेष्ठ, कारण अग्नित लोखंड वितळते. अग्निपेक्षा पाणी श्रेष्ठ, कारण पाणी अग्नि विझवते. पाण्यापेक्षा वायू श्रेष्ठ, कारण पाण्यास वायू फिरवतो. पण वायूस मात्र माणसाची शक्तीच ताब्यात आणू शकते ! म्हणून सर्व प्राण्यात माणूस श्रेष्ठ ठरतो.

माणसात मात्र संत श्रेष्ठ. जसा पाषाणात परिस, रसात अमृत श्रेष्ठ.

**तो पाषाणांमाजी परिसु । रसांमाजी सिद्ध रसु ।**
**तैसा मनुष्याकृति अंशु । तो माझाचि जाण ॥ ज्ञाने.१०/७६**

जो देवापासून विभक्त नाही तो भक्त, ज्याच्याकडे वैराग्य आहे तो विरक्त, ज्याने मुक्ती मिळविली तो मुक्त, पण भक्त + विरक्त + मुक्त = संत.

**कथा** - काशी विश्वविद्यालयात गामा पैलवानाचा सत्कार होतो. अध्यक्षस्थानी पंडित मदन मोहन मालविय असतात. आचार्य मुलांना सांगतात, व्यायाम करून गामा पैलवानासारखे हिंदकेसरी होऊन प्रसिद्ध व्हा. जेव्हा गामा पैलवान भाषणाकरिता उठतात तेव्हा ते सांगतात, 'मी दुसऱ्याला मारून, छातीवर बसून, 'मोठा' झालो आहे. तसे मोठे होऊ नका तर पंडित मदन मोहन मालवियासारखे दुसऱ्याकरिता देह झिजवून मोठे व्हा. अर्थात संत बना.'

★★★★★

## (३८) सुमन

सुमन या शब्दाचे दोन अर्थ आहेत. सुमन म्हणजे फूल व सुमन = सु + मन. म्हणजेच चांगले मन. देवास फुलेही आवडतात पण चांगले मन विशेष आवडते. जेव्हा एका शब्दाचे दोन अर्थ होतात तेव्हा श्लेष अलंकार होतो.

**दृष्टांत** - (श्लेष) एक आमदार आपल्या कुलवान पत्नीस सारखा म्हणत असे, 'मी आमदार आहे. मला काय समजतेस ?' हा मात्र पक्षाच्या बळावर पात्रता नसताना नशिबाने निवडून आला होता. पत्नी म्हणाली, 'तुम्ही आमदार असा किंवा खासदार असा, तुमची इज्जत माझ्या मुठीत आहे. इज्जत कशी मिळवायची व टिकवून ठेवायची माझ्या हातात आहे. माझ्यासमोर भाव खाऊ नका.' आमदार हट्टास पेटला व म्हणाला, 'माझी इज्जत कशी काढतेस ते बघतोच.' ती म्हणाली 'इज्जत काढली तर रागवायचे नाही.' पत्नी संधीची वाट पाहत होती. पाडव्याच्या दिवशी आमदाराने कार्यकर्त्यांना सभेसाठी बोलाविले होते. बंगल्याच्या बाजूस सभागृह होते. पत्नीने पुरणपोळी बनविण्या

घेतली. इज्जत काढायची चांगली वेळ आहे हे पाहून सभा सुरू झाल्यानंतर आपल्या आठ वर्षांच्या मुलास बोलाविले व म्हणाली, 'शाम जा, बाबा भाषण करत आहेत, माईक हातात घेऊन बोल, आई तुम्हास पुरण वाटण्याकरिता बोलावित आहे.' मुलगा सरळ सभेत गेला. कार्यकर्त्यांनी आमदारांचा मुलगा म्हणून वाट करून दिली. मुलगा बाबांजवळ गेला व म्हणाला, 'बाबा मला माईक हवा आहे.' पाडव्याच्या मुहूर्तावर मुलगा माईक मागत आहे म्हणून बाबांनी कौतुकानी माईक त्याच्या हातात दिला. त्यांना वाटले हा माझी गादी नक्की चालविणार. माईक हातात घेऊन मुलगा मोठ्याने म्हणाला, 'बाबा, आई आपणास पुरण वाटण्याकरिता बोलावित आहे.' आमदारांचा चेहरा पडला. सर्व कार्यकर्ते हसू लागले. आमदारांना अपमान वाटला. कार्यकर्त्यांना सांगून ते घरी आले. अतिशय चिडले होते. रागाने पत्नीला ओरडू लागले, 'तुला काही अक्कल आहे का ? सभेतून मला पुरण वाटण्याकरिता का बोलाविलेस ?' ती म्हणाली, 'आपण रागावू नका. तसा आपला करार आहे. मी म्हणाले होते की आपली इज्जत माझ्या हातात आहे. तुमची इज्जत गेली का ?' आमदार म्हणाले, 'माझी इज्जत घालविलीस, कार्यकर्ते मला हसत आहेत. आता इज्जत वाढव. नाहीतर पुन्हा निवडणुकीस उभा राहू शकणार नाही.' ती म्हणाली, 'इज्जत वाढविणे पण माझ्याच हातात आहे. तुम्हास मी पाट्यावरवंट्यावर पुरण वाटण्याकरिता बोलाविले नाही. पुरण जास्त झाले आहे व कणीक कमी भिजली आहे. पुरण गोड झाले आहे. प्रसाद म्हणून सर्वांना पुरण वाटा.' आमदारांच्या जीवात जीव आला. एक पुरणाचा टोप उचलला. टेबलावर ठेवला व कार्यकर्त्यांना म्हणाले, 'मला बायकोने पुरण वाटण्याकरिता बोलाविले होते पण पाटा-वरवंट्यावर नाही, पुरणाच्या यंत्रामध्ये नाही तर तिला तुमची दया आली. प्रसाद म्हणून पुरण वाटण्याकरिता पाठविले आहे. रांगेत उभे राहा.' सभा उलटली व लोक म्हणू लागले, बाई उदार दिसते ! 'पुरण वाटणे' एकच वाक्य पण अर्थ दोन. यास श्लेष अलंकार म्हणतात. तद्वत देवास फुले व चांगले मन आवडते. तत्त्वज्ञान - गुह्य कोणास सांगावे ? हे ज्ञानोबाराय देवाच्या मुखातून सांगतात,

**यालागी सुमनु आणि शुद्धमती । जो अनिंदकु अनन्यगती ।**
**पैं गा गौप्यही परी तयाप्रती । चावळिजे सुखें ॥ ज्ञाने.९/४०**

ज्याचे मन चांगले आहे, ज्याची बुद्धी शुद्ध आहे, जो कोणाचीही निंदा करीत नाही व देवासी अनन्य आहे त्याला खुशाल गुह्य सांगावे, तत्त्वज्ञान कथन करावे. माऊली म्हणते, 'ज्याचे मन चांगले आहे त्याने हे गीतेचे तत्त्वज्ञान ऐकले तर त्याची समाधी लागेल.'

**खेचराचियाही मना । आणी सात्विकाचा पान्हा ।**
**श्रवणासवें 'सुमना' । समाधी जोडे । ज्ञाने.१३/११५८**

गजेंद्राने देवास एक फूल अर्पण केले पण प्रथम मन शुद्ध करून, संसाराचा संबंध सोडून ! ते फूल देवापर्यंत पोहोचले. देव धावत आले व गजेंद्राचा, त्याचबरोबर त्याचा शत्रू नक्राचासुद्धा

उद्धार केला. काही सुमने झाडावर उमलतात पण झाडावरच सुकून जातात. काही प्रेतावर चढवली जातात, काही स्त्रियांच्या केसात माळली जातात पण काही फुले देवाच्या चरणावर अर्पण केली जातात.

**कथा -** सावरकर व त्यांचे भाऊ तुरुंगात असताना स्वातंत्र्यवीर विनायक सावरकरांनी आपल्या वहिनीस एक पत्र लिहिले आहे. त्यात ते म्हणतात, जगात असे एखादे फूल असते जे गजेंद्राच्या सोंडेतून श्रीहरीस अर्पण केले ते कमल अमर झाले. तसे आमचे कुळ देशाकरिता अर्पण झाले, ते अमर होणार. आपण चिंता करू नये. अशी काही कुळे आहेत ज्यांच्या पिढ्यानपिढ्या परमार्थ करत आहेत. 'ज्ञानदेव म्हणे नाम जपा हरीचे । परंपरा त्याचे कुळ शुद्ध ॥' सावरकरांच्या भाषेत 'तरी ते गजेंद्र शुंडेने उपटिले । श्रीहरीसाठी नेले । कमलदल ते अमर ठेले । मोक्ष दाते पावन ॥' तात्पर्य. चांगल्या मनाने काहीही अर्पण केल्यास देवास पावते. एका पुराणात देवास आवडणारी आठ फुले आली आहेत.

**अहिंसा प्रथमं पुष्पं पुष्पमिन्द्रिय निग्रहः ।**
**सर्वपुष्पं दयाभूते पुष्पं शांतिर्विशिष्यते ।**
**शमः पुष्पं तपः पुष्पं ध्यानं पुष्पं च सप्तमम् ।**
**सत्यं चैवाष्टम् पुष्पमेतैस्तुष्यति केशवः ॥**

**अर्थ -** १) अहिंसा हे पहिले फूल आहे. २) इंद्रियावर ताबा हे दुसरे फूल ३) सर्वांबद्दल अंतःकरणात दया हे तिसरे फूल ४) विशेष शांती हे चवथे फूल ५) मनावर ताबा हे पाचवे फूल ६) तप करणे हे सहावे फूल ७) देवाचे ध्यान हे सातवे फूल ८) सर्व व्यवहार सत्याने करणे हे आठवे फूल. या सुमनांनी केलेली पूजा देवास फार आवडते व तो भक्तांवर संतुष्ट होतो. किंबहुना जसा भ्रमर प्रेमामुळे कमलदलात अडकून राहतो तसा देव भक्तांच्या हृदयकमळात अडकून राहतो. 'नाही काष्ठाचा गुमान । गोवि भ्रमरा सुमन ॥' तु.म.

★★★★★

## (३९) बळ

श्रुती माऊली सांगते, 'नायं आत्मा बलहिनेन लभ्यः॥' बलहीन माणसास आत्मलाभ होत नाही. बळाचे अनेक प्रकार पडतात. कोणत्या बळाने परमात्म्याची प्राप्ती होते ? सामान्यता बळाचे दोन प्रकार १) व्यावहारिक बळ २) पारमार्थिक बळ. व्यावहारिक बळाचे बरेच प्रकार आहेत.

**१) संपत्तीचे बळ -** ज्याच्याजवळ भरपूर संपत्ती आहे तो या जगातील सर्व सुख मिळवू शकतो

समाजात याचा फार मोठा दबदबा असतो. यास सर्वजण मानतात. 'धनवंता लागी । सर्व मान्यता असे जगी ।।' तु.म.

२) **सत्तेचे बळ** - ज्याच्या हातात सत्ता असते त्याचे समाजावर वर्चस्व असते. सत्तेच्या जोरावर संपत्तीसुद्धा मिळते. म्हणून समाजामध्ये सत्तेकरिता स्पर्धा चालू आहे.

३) **शक्तीचे बळ** - ज्यांच्या अंगात ताकद आहे तो मोठी मोठी कामे करतो, कुस्त्या खेळतो. याचा पण समाजात पगडा असतो. पूर्वी हत्तीचे बळ मोजत होते. भीमास दहा हजार हत्तीचे बळ होते. आता घोड्याचे बळ मोजतात. नंतरच्या काळात कुत्र्याचे बळ मोजतील.

४) **संघाचे बळ** - कलियुगात संघ शक्तिस फार महत्व आहे. 'गाव करील ते राव करीत नाही.'

**अल्पानामपि वस्तुनां संहतिः कार्यसाधिका ।**
**तृणैर्गुणत्वमापन्नैर्बध्यन्ते मत्तदन्तिनः ।। सुभा.**

**अर्थ** - अल्प ताकद असणाऱ्या वस्तुंचा संग्रह केला तर मोठे कार्य साधले जाते. छोट्या छोट्या गवताची मोठी दोरी बनविली तर मदोन्मत्त हत्तीससुद्धा बांधता येते.

**दृष्टांत** - एका जंगलात एक सिंह व बरीच डुकरे रहात होती. सिंह एकटा होता. तो नेहमी एकएक डुक्कर खात असे. बरेच दिवस हा प्रकार चालला होता. एक म्हातारा डुक्कर तरुण डुकरांना म्हणाला, 'अरे हा एकटा सिंह आपले कुळच संपवतो आहे. तुम्ही मात्र हा आला की पळून जाता. एखादा सापडतो व त्यास सिंह घेऊन जातो.' तरूण डुकरांनी विचारले, 'आम्ही काय करायला हवे ?' म्हाताऱ्या डुकराने सांगितले, 'सिंह गुहेत झोपला असताना सर्वांनी त्याच्यावर एकदम हल्ला करा. 'एकीचे बळ' वापरा.' अनेक डुकरे धीर करून सर्व शक्तिनिशी सिंहावर तुटून पडली. सिंहास समजेना काय होते आहे. सिंह घाबरला व दुसऱ्या जंगलात पळून गेला. गावात पाच-सहा भाऊ एकीने वागल्यास त्यांचा गावात दबदबा निर्माण होतो.

५) **बुद्धीचे बळ** - समाजात ज्यांच्याजवळ बुद्धी आहे ते श्रम न करता चांगले जीवन जगतात. श्रमजीवी वर्गापेक्षा बुद्धिजीवी वर्ग सुखात असतो. 'विचारिली वाट उसंती शितळ । बुद्धीपुढे बळ तृणतुल्य ।।' तु.म.

**दृष्टांत** - एका शेटजीकडे एक मॅनेजर होता व एक सामान्य नोकर होता. मॅनेजरला पगार होता दरमहा तीन हजार रुपये व नोकरास पगार होता दरमहा सहाशे रुपये. एक दिवस नोकर शेटजींना म्हणाला, 'मी एवढा राबतो आहे. हा मॅनेजर फक्त खुर्चीवर बसून माझ्यापेक्षा पाचपट पगार घेतो. हा मला अन्याय वाटतो. शेटजी शांत होते. रस्त्यावरून वरात चालली होती. नोकरास सांगितले, 'कोणाची वरात चालली आहे ते पाहून ये.' नोकर गेला व चौकशी केली. शेटजींनी नोकरास परत जाऊन मुलगा कोणत्या गावचा आहे ते विचारून येण्यास सांगितले. नोकर पळत गेला व मुलाचे

गाव विचारून आला. शेटजी पुन्हा म्हणाले, 'मुलगी कोणत्या गावची आहे विचारून ये.' नोकर गेला व मुलीचे गाव विचारून आला. वरातीचा बँड वाजत होता. शेटजी म्हणाले, 'बँड कोणता आहे विचारून ये.' नोकर बँडवाल्याचे गाव विचारून परत आला. शेटजी म्हणाले, 'वरातीत अंदाजे किती माणसे आहेत ते चौकशी करून ये.' त्याने माणसे मोजली व सांगितली. शेटजी म्हणाले तू इथे बैस. शेटजींनी मॅनेजरला बोलाविले व म्हणाले, 'रस्त्यावरून वरात चालली आहे. जरा बघून या व मला सांगा. दहा मिनिटात मॅनेजर आले. नोकर ज्या माहितीकरिता पाच वेळा गेला त्यापेक्षा जास्त माहिती मॅनेजरनी शेटजींना सांगितली. शेटजी नोकरास म्हणाले, 'म्हणून तुला सहाशे रुपये व मॅनेजरला दरमहा तीन हजार रुपये पगार आहे'. हे झाले व्यावहारिक बळ. या बळाने परमात्म्याची प्राप्ती मात्र होत नाही. बालकाचे बळ मात्र रडण्यात असते. 'बालकानाम् रोधनं बलं ॥'

२) **पारमार्थिक बळ -** या बळाचे अनेक प्रकार आहेत.

**न साधयति मां योगो न सांख्यं धर्म उद्धव ।**
**न स्वाध्याय तपो त्यागो यथा भक्ति ममोर्जिता ॥ भागवत.**

**अर्थ -** मी, योगाने, ज्ञानाने, धर्माने, स्वाध्यायाने, तपाने, त्यागाने साध्य होत नाही. फक्त भक्तीच्या मापांनी मोजला जातो. पण यात काहीच बळ नाही असे मात्र नाही. तपाच्या बळाने विश्वामित्रांनी प्रतिसृष्टी निर्माण केली. तपाच्या बळाने दुर्वासांनी इंद्राची सर्व संपत्ती सागरात बुडविली. विश्वामित्र जेव्हा वसिष्ठांकडे गेले होते तेव्हा वसिष्ठांनी कामधेनुच्या सहाय्याने विश्वामित्राच्या सैन्यास इच्छा भोजन दिले. विश्वामित्र चकीत झाले व म्हणाले, 'ही कामधेनु मी घेउन जातो. वसिष्ठ म्हणाले 'ती कामधेनु माझ्या सेवेकरिता आहे.' सत्तेच्या, ताकदीच्या बळावर जेव्हा कामधेनु घेऊन जाऊ लागले तेव्हा कामधेनुने दिव्य सैन्य निर्माण करून विश्वामित्रास सैन्यासह पळवून लावले. विश्वामित्रांनी स्वतःचा धिक्कार केला व म्हणाले 'धीक् बलं क्षत्रीयबलं, ब्रह्मतेजो बलं बलम् ॥' माझ्या क्षत्रिय बलाचा धिक्कार असो. ब्रह्मबळ हेच खरे बळ आहे. ज्ञानाच्या बळावर बऱ्याच जणांनी मठ उभे केले आहेत. योगाच्या बळाने काहींनी मोठा समुदाय आपला शिष्य बनविला. चांगदेव योगी यांचे चौदाशे शिष्य होते. अनेकांनी धार्मिक संस्था काढून सत्ता हस्तगत केली. पांडुरंग शास्त्री आठवले यांनी स्वाध्यायाच्या माध्यमाने समुदायाची मोठी क्रांती घडविली. पारमार्थिक बळात काही बळ आहे. पण या बळाने देवाची प्राप्ती होइल की नाही याची खात्री देता येत नाही. विवेक, वैराग्याचे बळ मात्र परमार्थास अतिशय पोषक आहे. 'विवेकासहित वैराग्याचे बळ । धगधगीत ज्वाळ अग्नि जैसा ।' तु.म. 'सहस्त्रनामाचे हतियार । शंखचक्राचे शृंगार । अति बळ वैराग्याचे थोर । केला मार्ग षड्वर्गा ॥' ज्ञान. देवाची प्राप्ती मात्र भावबळाने होते. 'भावबळे आकळे एऱ्हवी नाकळे । करतळी आवळे तैसा हरी ॥' ज्ञान. भक्ताच्या भावबळापुढे देवाचे बळ फिके पडते. जगात देव बळवंत आहे. 'बळिया माझा पंढरीराव । जो या देवांचाही देव ॥' तु.म. देवाकडे सर्व प्रकारचे सर्वांपेक्षा जास्त बळ आहे. प

भावबळाने हा भक्तांचा अंकित होतो. 'भावबळे विष्णुदास । नाही नाश पावता ॥' तु.म.' 'भावाचिया बळे । आम्ही निर्भर दुबळे ॥' तु.म. 'भावापुढे बळ । नाही कोणाचे सबळ ॥' तु.म. भावबळावर, भक्त देवावर सत्ता गाजवितात.

**बळियाचे अंकित । आम्ही झालो बळिवंत ॥ तु.म.**

**बळीयाच्या आम्ही झालो बळिवंता । करू सर्व सत्ता सर्वांवरी ॥ तु.म.**

**बळिवंत आम्ही समर्थाचे दास । घातली या कास कळीकाळासी ॥ तु.म.**

**बळिवंत जेणे रचिले सकळ । आम्हा त्याचे बळ अंकितासी ॥ तु.म.**

जेव्हा अर्जुनाचा श्रीकृष्ण पाठीराखा होता तेव्हा अर्जुनाचा नेहमी विजय होत असे. पण श्रीकृष्णांनी अवतार संपविला. द्वारकेहून येताना अर्जुन भिल्लाकडून पराजित झाला व भिल्लांनी गोपीका हरण केल्या.

**पुरुष नहीं बलवान है समय बडा बलवान । भिलन लुटी गोपीका वोहि अर्जुन वोंहि बान ॥**

भक्त मात्र देवाच्याच बळावर देवापेक्षा मोठे होतात, ज्या प्रमाणे एखादे बालक बापाच्या खांद्यावर बसले म्हणजे बापापेक्षा उंच दिसते. ज्ञानोबांनी तीन दृष्टांत सांगून अर्जुनाची स्तुती केली आहे.

**आणि समुद्राचा मेघु । उपयोगे तयाहूनि चांगु ।**
**तैसा पार्थी आजि लागु । आहे तये ॥ ज्ञाने.१८/१६४८**

**कनकत्व दिक्षागुरू । लोहा परिसु होय किरू ।**
**परी जगा पोसिता व्यवहारू । तेंची जाणें ॥ ज्ञाने.१८/१६४९**

**येथ गुरुत्वा येतसे उणें । ऐसे झणें कोणही म्हणे ।**
**वन्हि प्रकाश दिपपणें । प्रकाशी आपला ॥ ज्ञाने.१८/१६५०**

**तैसा देवाचिया शक्ती । पार्थु देवासीचि बहुती ।**
**परी माने इये स्तुती । गौरव असे ॥ ज्ञाने.१८/१६५१**

**अर्थ -** मेघ समुद्रापासून निर्माण होतात. पण उपयोगाच्या दृष्टीने समुद्रापेक्षा पावसाचा उपयोग जास्त होतो. परिसापासून लोखंडाचे सोने होते. पण जगाचा व्यवहार सोन्यामुळे चालतो. अग्निचाच दिवा होतो पण प्रकाशासाठी अग्निपेक्षा दिव्याचा जास्त उपयोग होतो. तद्वत देवाच्याच शक्तिने अर्जुन देवापेक्षा मोठा वाटतो. देव म्हणतात मी मोठा आहे पण भक्तापुढे माझे काही चालत नाही. नाथ महाराज, ज्ञानोबाराय व तुकोबाराय एकच म्हणजे 'भ्रमराचा' दृष्टांत देतात. नाथराय व तुकोबाराय पुन्हा बालकाचा दृष्टांत देतात.

**भगवंत महा अतुर्बळी । अदट दैत्याते निर्दळी ।**
**तो कोंडिला हृदय कमळी । हे गोष्टी समूळी मिथ्या म्हणती ॥ भा २/७८१**

**जो शुष्क काष्ठ स्वये कोरी । तो कोवळ्या कमळा माझारी ।**
**भ्रमर गुंतला प्रितीवरी । केसर माझारी कुचंबो नेदी ।। भा २/७८२**

**तेवी भक्ताचिया प्रेमप्रिती । हृदय कोंडिला श्रीपती ।**
**तेथ खुंटल्या सामर्थ्य शक्ति । भावार्था प्रती बळ न चले ॥ भा २/७८३**

**बाळ पालवी घाली पिळा । तेणे बापु राहे धोकला ।**
**तरी काय निर्बळ झाला । ना तो स्नेहे भुलला ढळेना ॥ भा २/७८४**

**जैसे भ्रमर भेदी कोडें । भलतैसें काष्ठ कोरडें ।**
**परि कळिकेमाजीं सांपडे । कोंवळिये ॥ ज्ञाने १/२०१**

**तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । परी तें कमळदळ चिरूं नेणे ।**
**तैसें कठीण कोंवळेंपणें । स्नेह देखा ॥ ज्ञाने १/२०२**

**नाहीं कष्टाचा गुमान । गोवी भ्रमरा सुमन ॥१॥**
**प्रेम प्रितीचे बांधले । ते न सुटे कांही केलें ॥२॥**
**पदरी घाली पिळा । बाप निर्बळ साठी बाळा ॥३॥**
**तुका म्हणे भावे । भेणें देवें आकारावे ॥४॥**

**प्रितीचा हेकळ । पदरासी घाली पिळ ।**
**सरों नेदी बाळ । मागे पुढे पित्यासी । काय लागे त्यासी बळ ॥ तु.म.**

**तात्पर्य** - सर्व बळापेक्षा भावाचे बळ श्रेष्ठ आहे.

**बुद्धी व बळ**

१) काही लोकांकडे बुद्धीही नसते व बळही नसते. - बलहीन दुबळे

२) काही लोकांकडे बळ असते पण बुद्धी नसते. - बुद्धु पैलवान

३) काही लोकांकडे बुद्धी असते पण बळाचा अभाव असतो. - अशक्त बुद्धीवान

समाजामध्ये काही अशी बुद्धीवान श्रीमंत माणसे असतात. शंभर गोणी घेऊ शकतात पण एक गोणी (शंभर किलोची) उचलता येत नाही. काही एवढे गरीब असतात की दिवसा शेकडो गोणी उचलतात पण एक शंभर किलोची गोणी घेण्याइतके त्यांच्याकडे पैसे नसतात.

४) काही बुद्धीवान असतात व त्यांच्याकडे बळही असते असे भक्त. उदा. हनुमंतराय. संतांची मात्र

बळ, बुद्धी जगाच्या उपयोगाकरिताच असते. 'बळ बुद्धी ज्याची उपकारासाठी । अमृत ते पोटी साठविले ॥' तु.म.

('अपबल तपबल और बाहुबल चौथा बल हे दाम । सूर किसोर कृपा तें सब बल हारेको हरीनाम ॥')

**पक्षिणां बळमाकाशम मत्स्याणां उदकं बलम् ।**
**निर्बलाणाम् बलम् राजा बालकं रोधनम् बलम् ॥ सुभा.**

★★★★★

## (४०) कुळ

युद्धाच्या प्रारंभी अर्जुनास समोर आपल्या कुळातील लोक दिसले. त्यास मोठा मोह झाला. या मोहाच्या भरात सर्वज्ञ परमात्म्यास अर्जुनाने गीतेच्या पहिल्याच अध्यायात बराच मोठा उपदेश केला आहे. देवा कुळ चांगल्या पुत्राची इच्छा करते त्यांचे पुत्रच जर त्यांचा वध करायला लागले तर त्यांना काय वाटेल ?

**पुत्रातें इप्सी कुळ । तयाचें कायि हेंचि फळ ।**
**जे निर्दाळिजे केवळ । गोत्र आपुलें ॥ ज्ञाने १/२१५**

वास्तविक पृथ्वीवरील राजांचा पराभव करून कुळातील लोकांना समाधानात ठेवणे हे पुत्राचे कर्तव्य आहे.

**आम्ही दिगंतींचे भूपाळ । विभांडूनि सकळ ।**
**मग संतोषविजे कुळ । आपुले जे ॥ ज्ञाने १/२१८**

देवा, कुळाचा वध केला तर मला पातक लागेल. मग मी तुला कसा पाहीन ?

**कुळहरणीं पातकें । तियें आंगीं जडती अशेखें ।**
**तये वेळीं तूं कवणें कें । देखावासी ॥ ज्ञाने १/२२९**

**कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।**
**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ गीता १/४०**

अर्थ - कुलक्षय झाला असता सनातन असे कुलधर्म नाश पावतात. धर्माचा नाश झाला असता, अधर्म सर्व कुळ व्यापून टाकतो.

**तैसा गोत्रींचि परस्परें । जरी वधु घडे मत्सरें ।**
**तरी तेणें महादोषें घोरें । कुळचि नाशे ॥ ज्ञाने १/२४४**

**म्हणवूनि येणें पापें । वंशजधर्मु लोपे ।**
**मग अधर्मुचि आरोपे । कुळामाजी ॥ ज्ञाने १/२४५**

अर्जुन देवास सांगतात, 'कुळाचा क्षय झाल्यानंतर धर्माचा नाश होईल. धर्माचा नाश झाला तर पापाशिवाय काय आहे ? यमनियम नाहीसे होतील. इंद्रिये सैरावैरा धावतील. कुळस्त्रियांशी व्यभिचार होतील. उत्तम, अधम एकत्र येतील. वर्णधर्म, जातीधर्म नाहीसे होतील. मग महापापे कुळात प्रवेश करतील.

**जैसी चोहटाचिये बळी । पाविजे सैरा काउळीं ।**
**तैसीं महापापें कुळीं । प्रवेशती ॥ ज्ञाने.१/२५१**

याचा परीणाम सर्व कुळ नरकात जाईल.

**मग कुळा तया अशेखा । आणि कुळघातकां ।**
**येरयेरा नरका । जाणें आथी ॥ ज्ञाने.१/२५२**

या प्रकारे कुळ धर्माबद्दल अर्जुनाने देवास उपदेश केला आहे. कुळास महत्व दिले आहे. व्यवहारात कुळाला महत्व आहेच. लग्न करताना कुळ पहावे असे तुकोबाराय सांगतात. 'द्रव्य आणि कन्या । येथे कुळ कर्म शोधण्या ॥' काही कुळाचार, कुलदैवते, कुळपरंपरा यांचे काटेकोरपणे पालन करतात. पण परमार्थात जो भक्त आहे त्याच्या कुळाचा देवही विचार करित नाही व संतही करित नाही. अंतःकरणांत भक्ती नसेल तर कुळाला काही अर्थ नाही असे माऊली सांगतात.

**अगा कुळाचिया चोखटपणा नलगा । आभिजात्य झणीं श्लाघा ।**
**व्युत्पत्तीचा वाउगा । सोसु कां वाहावा ॥ ज्ञाने ९/४३१**

या पवित्र कुळात माझा जन्म झाला आहे हा खोटा अभिमान बाळगू नये. अर्थात जर भक्ती नसेल तर ! 'जळो ते समूळ । धनसंपत्ती उत्तम कुळ ॥' तु.म.

**विद्यावित्तविहीनेन कीं कुलीनेन देहीनाः ।**
**अकुलीनोऽपि यो विद्वान् दैवतैरपि पूज्यते ॥ सुभा.**

**अर्थ -** चांगल्या कुळात जन्म आहे पण विद्या, वित्त नसेल तर काय उपयोग ? या उलट अकुलिन आहे पण विद्वान आहे, त्याची देवसुद्धा पूजा करतात. एक म्हण आहे. ऋषीचे कुळ, नदीचे मूळ आणि पुढाऱ्याचे खूळ पाहू नये. देवांनी प्रल्हादाचे, शबरीचे कुळ पाहिले नाही. जो देवाचा भक्त आहे त्याचे सर्वच पवित्र आहे.

**कुलं पवित्रं जननी कृतार्था वसुंधरा पुण्यवती च तेन ।**
**अपारसंवित्सुखसागरेऽस्मिन् लीनं परब्रह्मणि यस्य चेतः ॥ रामायण, सुंदरकांड ३५/४**

**अर्थ -** ज्याचे चित्त अपार परब्रह्मसुखसागरात निमग्न झाले आहे अशा महात्म्याचे कुळ पवित्र आहे, जननी कृतार्थ आहे व त्याच्या वास्तव्याने पृथ्वी पवित्र झाली आहे. हा श्लोक रामायणात लक्ष्मणाविषयी आहे.

**यत्र यत्र कुले चैव एको भवति वैष्णवः ।**
**कुलं तस्य तदा पापैर्मुक्तं तन्मोक्षगामि वै ॥ ब्रह्मपुराण**

**अर्थ -** एखाद्या कुळात एखादा वैष्णव जरी निर्माण झाला तरी त्याच्या पुण्याईवर सर्व कुळ पापमुक्त होउन मोक्ष मार्गास जाते. 'ज्ञानदेव म्हणे नाम जपा हरिचे । परंपरा त्याचे कुळ शुद्ध ॥' 'पवित्र ते कुळ पावन तो देश । जेथे हरिचे दास जन्म घेती ॥' तु.म. मागे भरपूर पाप केले, अनाचार केला पण शेवटी पश्चाताप होऊन देवाची उपासना केली तर देव सर्व माफ करतो असे ज्ञानराज म्हणतात.

**तरि आतां पवित्र तयाचेंचि कुळ । अभिजात्य तेंचि निर्मळ ।**
**जन्मलेयाचे फळ । तयासीच जोडले ॥ ज्ञाने ९/ ४२१**

'धन वित्त कुळे । अवघियांने ते आगळे ।। ज्यांचे नारायण गाठी । भरला हृदय संपुष्टी ॥' या उलट ज्याच्या कुळात एकही वैष्णव नाही त्याचे सर्व कुळ अधोगतीस जाते. 'जये कुळीं नाहीं एकही वैष्णव । त्याचा बुडे भवनदी ताफा ॥' तु.म. देव जसे कुळ पहात नाही तसे संत सुद्धा कुणाचे कुळ पहात नाहीत. 'न पाहे याती 'कुळाचा' विचार । भक्त करूणाकर ज्ञानाबाई ॥' नाथ.

१) **वारकऱ्यांचे कुलदैवत** - विठ्ठल.

**विठ्ठल कुळीचे दैवत । विठ्ठल वित्त गोत चित्त ।**
**विठ्ठल पुण्य आणि पुरूषार्थ । आवडे मात विठ्ठलाची ॥ तु.म.**

**तुका म्हणे ज्याते सनकादीक ध्यात । ते आमुचे कुलदैवत पांडुरंग ॥**
**कुळीची ही कुळदेवी । केली ठावी संतांनी ॥ तु.म.**

२) **वारकऱ्याचा कुळाचार -** पंढरीची, आळंदीची, देहूची, पैठणची वारी व वद्य, शुद्ध एकादशी, सोमवार उपवास.

३) **वारकऱ्यांचा कुळधर्म -** सतत नामस्मरण 'हाचि कुळाचार हाचि कुलधर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥' तु.म. वारकरी सदाचारी व सेवाधारी असावा.



# (४१) जीवन

जन्मापासून मरेपर्यंत जे आयुष्य जाते त्यास जीवन म्हणतात. माणसाच्या जीवनात सामान्यपणे चार प्रकार पडतात. १) धीक् जीवन २) निंद्य जीवन ३) स्तुत्य जीवन ४) धन्य जीवन.

१) **धीक् जीवन** - ज्यांचे आयुष्य व्यसनात, दुसऱ्यांना त्रास देण्यात अथवा देव विन्मुख जाते.

**धिक्कुलं धिक्कुटुंबं च धिग्गृहं धिक् सुतंच धिक् ।**
**आत्मानं धिक् शरीरं च श्रीगोपालं पराङ्गमुखम् ॥ सुभा.**

**अर्थ** - जे देवास विन्मुख आहेत, त्याचे कुल धिक्, कुटुंब धिक्, घर धिक्, पुत्र धिक्, शरीर धिक् व आत्मा (अंतःकरण) सुद्धा धिक् आहेत.

**येषां श्रीमद्यशोदासुत पदकमले नास्ति भक्तिर्नराणां ।**
**येषांमभिरकन्या प्रियगुणकथने नानुरक्तारसज्ञा ।**
**येषां श्रीकृष्ण लीला ललीतरस कथा सादरं नैव कर्णो ।**
**धिक् तान् धिक् तान् धीगेतान् कथयति सततं कीर्तनस्तो मृदंगः ॥ सुभा.**

**अर्थ** : यशोदासुत श्रीकृष्ण चरणकमलावर ज्यांची भक्ती नाही, ज्यांची जीभ गोपकन्या प्रिय असणारा कृष्ण कथा गाण्यात रस घेत नाही, जो श्रीकृष्णाच्या ललीत कथा सादर कानांनी ऐकत नाही, कीर्तनातील मृदंग सतत सांगतो त्याचे जीवन धिक् आहे, धिक् आहे, धिक् आहे.

काहींचे जीवन यापेक्षा खालच्या दर्जाचे आहे.

**धिग् जिणें जों बाईले आधीन । परलोक मान नाही दोन्ही ॥१॥**

**धिग् जिणें ज्यांचे लोभावरी मन । अतीत पूजन घडेचिना ॥२॥**

**धिग् जिणें आळस निद्रा जया फार । अमीत आहार अघोरिया ॥३॥**

**धिग् जिणें नाही विवेक वैराग्य । झुरे मानालागी साधूपणा ॥४॥**

**तुका म्हणे धिग् ऐसे झाले लोक । निंदक वादक नरका जाती ॥५॥**

२) **निंद्य जीवन** - आयुष्य कुटुंबाच्या पालनाकरिता घालविणे, समाजात प्रतिष्ठा प्राप्त होईल अशी कामे करणे, गाढवासारखे सर्वांचा भार वाहण्यात आयुष्य घालविणे यास निंद्य जीवन म्हणतात.

**कारे दास होसी संसाराचा खर । दुःखाचे डोंगर सोसावया ॥ तु.म.**

३) **स्तुत्य जीवन** - ज्यांचे जीवन परमार्थात जाते, असे या जीवनाचे तुकाबाराय वर्णन करतात.

**जोडोनिया धन उत्तम वेव्हारें । उदास विचारे वेंच करी ॥१॥**

**उत्तमचि गति तो एक पावेल । उत्तम भोगील जीव खाणी ॥२॥**

**परउपकारी नेणें परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणी माया ॥३॥**

**भूतदया गायी पशूंचे पालन । तान्हेल्या जीवन वनामाजी ॥४॥**

**शांतीरूपे नव्हे कोणाचा वाईट । वाढवी महत्त्व वडिलांचे ॥५॥**

**तुका म्हणे हेचि आश्रमाचे फळ । परम पद बळ वैराग्याचे ॥६॥**

अर्थ सोपा आहे. तुकोबांनी परमार्थ करणाऱ्या मुलांची व त्यांच्या आईवडिलांची स्तुती केली आहे.

**आपुलिया हिता जो असे जागता । धन्य माता पिता तयाचिया ॥१॥**

**कुळी कन्या पुत्र होती जे सात्विक । तयाचा हरिख वाटे देवा ॥२॥**

**गीता भागवत करिती श्रवण । अखंड चिंतन विठोबाचे ॥३॥**

**तुका म्हणे मज घडो त्यांची सेवा । तरी माझ्या दैवा पार नाही ॥४॥**

रोज भजन करतात. वारी करतात. सतशास्त्राचे पठण करतात. परोपकाराकरिता देह झिजवतात. त्यांचे जीवन स्तुत्य आहे.

४) **धन्य जीवन** - धन्य जीवन मात्र संताचे आहे. जे खास जीवांच्या उद्धाराकरिता अवतार घेतात.

**धन्य तेचि जन्मा आले रे एक हरीचे दास । धिग् ते विषयी गुंतले केला आयुष्या नाश ॥ तु.म.**

ज्ञानोबा, नाथ महाराज, नामदेवराय, तुकोबा, निळोबा यांचे जीवन धन्य.

**धन्य ते संसारी । दयावंत जे अंतरी ॥ तु.म.**

**नारायण पंकजलोचनः प्रभुः । केयुरहारं परीशोभायमानः ।**
**भक्त्या युतो येन सुपूजितो नहि । वृथा गतं तस्य नरस्य जीवनम् ॥ सुभा.**

**अर्थ** - ज्याचे डोळे कमलासारखे आहेत, ज्याच्या गळ्यात केयुर हार शोभतो आहे अशा प्रभुचे, नारायणाचे भक्त होऊन जो पूजन करीत नाही त्याचे जीवन व्यर्थ गेले.

कोणाचे जीवन सफल झाले ?

**वाणी रसवती यस्य, यस्य श्रमवती क्रीया ।**
**लक्ष्मी दानवती यस्य, सफलं तस्य जीवनम् ॥ सुभा.**

**अर्थ** - ज्याची वाणी रसवती आहे त्यांची क्रिया श्रमवती आहे. त्यांची लक्ष्मी दानाकरिता उपयोगी आहे. तयांचे जीवन सफल झाले.

**चिंतन :** १) निरुपयोगी जीवन - दुष्टाचे-मुर्खांचे
२) उपभोगी जीवन - संसारी लोकांचे
३) उपयोगी जीवन - साधकाचे
४) निष्कामयोगी जीवन - संतांचे

सुखी जीवनाची गुरू किल्ली - लग्नाअगोदर जय हनुमान लग्नानंतर जय श्रीराम.

★★★★★

## (४२) नमस्कार

नमस्कार करणे माणसांचा एक उत्तम गुण आहे. यातून नम्रता; विनय, आदर, मान, श्रद्धा, सेवा, अनन्यता, व शरणांगती असे अनेक भाव प्रगट होत असतात. एका हाताने नमस्कार करणे शास्त्रात निषिद्ध मानले आहे. दोन हातांनी वाकून नमस्कार करावा. हातात सामान असेल तर मान वाकवावी. पण सगळ्यात नमस्काराचा उत्तम प्रकार म्हणजे साष्टांग दंडवत घालणे. ज्ञानदेव म्हणतात, 'गुरू, देव, संत यांना या प्रकारे दंडवत घालावे. ज्या प्रमाणे काठी पडते तसे आडवे पडावे. त्यांच्या चरणावर आपले डोके असावे.'

**लिंग का प्रतिमा दिठीं । देखतखेंवों अंगेष्टीं ।**
**लोटिजे कां काठी । पडली जैसी ॥ ज्ञाने १७/२०४**

वृद्धांना (मोठ्यांना) नमस्कार करण्यामुळे चार फायदे होतात.

**अभिवादनशिलस्य नित्यं वृद्धोपसेविनः ।**
**चत्वारि तस्य वर्धन्ते आयुर्विद्या यशो बलम् ॥ सुभा.**

**अर्थ -** वृद्धांना नित्य नमस्कार केल्यास चार फायदे होतात. या चारात वाढ होते. १) आयुष्य २) विद्या ३) यश ४) बल

**दृष्टांत -** महामुनी मार्कंण्डेय जेव्हा पाच वर्षाचे होते तेव्हा एक महात्मा त्यांच्या वडिलांना म्हणाला, 'याचे आयुष्य फक्त सहा महिने उरले आहे.' त्याचे वडिल मृकण्डु चिंतेत पडले. मार्कंण्डेयाचे वेळेच्या अगोदरच यज्ञोपवित केले व सांगितले जो कोण दिसेल त्यास नमस्कार करायचा. अर्थात विनयपूर्वक ! एकदा त्यांच्याकडे सप्तऋषी आले होते. सर्वांना मार्कंण्डेयांनी लोटांगण घातले. सर्वांनी त्यास आशिर्वाद दिला 'आयुष्यमान भव'. पण वसिष्ठांनी अंतर्ज्ञानानी पाहिले याचे आयुष्य सहा महिने आहे. ऋषींचे शब्द खोटे कसे होतील ? सप्तऋषींनी मार्कंण्डेयास ब्रह्मदेवाकडे नेले. नेहमीच्या सवयीप्रमाणे मार्कंण्डेयांनी ब्रह्मदेवास साष्टांग नमस्कार घातला. ब्रह्मदेवांनीसुद्धा आशीर्वाद दिला

'आयुष्यमान भव'. वसिष्ठ म्हणाले, 'आम्हीपण यांस हाच आशीर्वाद दिला व आपण पण हाच आशीर्वाद दिला आहे. पण आपण लिहिलेले याचे भविष्य सांगते याचे आयुष्य फक्त सहा महिने राहिले आहे. ब्रह्मदेव म्हणाले, 'नमस्काराच्या जोरावर याने काळाला जिंकले आहे. हा बालक चिरंजीव होणार. परिणाम मार्कंण्डेय कल्पकल्पांत जिवंत राहिले.

**दृष्टांत** - महाभारतात अशी कथा आहे. युद्ध चालू होणार, एवढ्यात धर्मराजाने मुगुट व कवच काढून रथावर ठेवले व अनवाणी कौरव सैन्यात निघाले. ते निघाल्याबरोबर चौघे भाऊसुद्धा अनवाणी युधिष्ठिराच्यामागे निघाले. धर्मराज, मोठे सैन्य पाहून घाबरला व शरण आला आहे हे पाहून कौरवांना आनंद झाला. पण हे पाच जण प्रथम द्रोणाचार्यांकडे गेले. धर्मराज म्हणाला, 'गुरुजी माफ करा, आम्हाला आपल्याविरुद्ध लढावे लागत आहे.' सर्वांनी साष्टांग दंडवत घातला. द्रोणाचार्यांचे हृदय कळवळले व म्हणाले, 'मी तुम्हास आशीर्वाद देतो तुमचा विजय होईल.' वर्म सांगितले, 'जो पर्यंत माझ्या हातात शस्त्र आहे तो पर्यंत मला कोणीही जिंकू शकत नाही. पण मला एखादी दुःखाची बातमी समजली तर माझ्या हातातून शस्त्र गळेल मग मला कोणीही मारू शकेल.' या पाचांच्या मागे नटवर श्रीकृष्ण परमात्मा होताच. नंतर हे पाच पांडव भिष्माचार्यांकडे गेले व म्हणाले, 'आम्ही आपल्याविरुद्ध युद्ध करीत आहोत. आम्हास आपले आशीर्वाद हवे आहेत.' सर्वजण काठीसारखे आडवे पडले. भीष्माचार्यांचे हृदय द्रवले व म्हणाले, 'आपला विजय निश्चित आहे.' धर्मराज म्हणाले, 'हे कसे शक्य आहे ?' पितामह म्हणाले, 'तुम्ही मला नमस्कार केला नसता तर तुम्ही पराजित झाला असता पण तुम्ही मला नमस्कार केला त्यामुळे तुमचा विजय निश्चित आहे. वेळेवर तुम्हास माझ्या मरणाचे वर्म सांगेन.' तद्नंतर हे पाच पांडव कृपाचार्यांकडे गेले व त्यांना साष्टांग दंडवत घातला. कृपाचार्यांनी 'विजयी भव' असा आशीर्वाद दिला.' देवव्रत म्हणाले हे कसे शक्य आहे ?' 'आपण आमच्या विरुद्ध आहात.' 'मी चिरंजीव आहे. पण रोज सकाळी देवास प्रार्थना करणार आहे, 'या विनयी पांडवांचा विजय होवो.' शेवटी पांडव स्वतःचे सख्खे मामा शल्य यांच्याकडे गेले व आशीर्वाद मागितला. मामा म्हणाले, 'मी आपल्या मदतीकरिता येत होतो. पण मी येताना वाटेत दुर्योधनाने धूर्तपणाने माझी व माझ्या सैन्याची सेवा केली. म्हणून मला त्याच्या बाजूस जावे लागत आहे. पण माझे आशीर्वाद तुमच्या पाठीशी आहेत.' श्रीकृष्णानंतर सारथ्यामध्ये माझा नंबर आहे. कर्णाच्यावेळी मलाच सारथ्य करावे लागेल. पण मी सांगेन, मी बोलेन ते कर्णाने सहन केले पाहिजे तरच मी सारथ्य करीन. तो नाईलाजाने कबूल होईल. ऐन युद्धाच्या वेळी कर्णास वाट्टेल ते बोलून त्याचे धैर्य हनन करीन व अर्जुन त्यास मारेल आणि तुमचाच विजय होईल. सर्वांना नमस्कार करून पांडव आले. अठरा दिवस युद्ध झाले. नमस्कारामुळे पांडवांचाच विजय झाला. अर्जुनाने देवास विश्वरूप दाखविल्यानंतर हजारवेळा पाठीमागून, पुढून नमस्कार केला.

**नमो नमस्तेऽस्तु सहस्त्रकृत्वः । पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ।**
**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते । नमोऽ स्तुते सर्वत एव सर्व ॥ गी. ११/३९-४०**

सज्जनापेक्षा दुर्जनास प्रथम नमस्कार करावा. दुष्टास नमस्कार केला नाही तर राग येतो. पण सज्जनास नमस्कार केला नाही तरी राग येत नाही. 'दुर्जनं प्रथमं वंदे सज्जनं तद् नंतरम् । मुख प्रक्षालनात् पूर्व गुदप्रक्षालनम् यथा ॥' मुखा अगोदर गुद प्रक्षालन करावे. सापाला, विंचवाला नमस्कार करावा पण लांबून. 'तुका म्हणे विंचू सर्प नारायण । वंदावे दुरून शिवो नये ॥' कितीही दुष्ट माणूस असला व त्याचे पाय धरले तर तो हात वर करणार नाही. किंबहुना नमस्कारामुळे विरघळून जाईल. 'तुका म्हणे कळ । पाय धरील्या न चले बळ ॥' कोणत्याही देवास नमस्कार केला तर तो केशवास पोचतो. ज्याप्रमाणे आकाशातून पडलेले पाणी सर्व सागरास जाते.

**आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरम् ।**
**सर्व देव नमस्कारः केशवं प्रतिगच्छति ॥ सुभा.**

तुकोबाराय सांगतात ज्यांची जशी पात्रता असेल तसा त्यांना नमस्कार करावा. मात्र संतांना, देवास सर्वभावाने नमस्कार करावा.

**भूतदया परत्वे जया तया परी । संत नमस्कारी सर्व भावे ॥ तु.म.**

देवाच्या, संतांच्या चरणावर डोके ठेवले तर ते आपल्या डोक्यावर हात ठेवतात. व त्यांनी हात ठेवला तर जीवाचा उद्धार होतो.

**दृष्टांत** - श्रीराम-सीता लग्न सोहळा सोळा दिवस चालला होता. काही दिवसांपूर्वी लग्न तीन दिवसात होत होते. हळदी, लग्न व पाठवणी. पण सध्या लग्न एक दिवसावर आले आहे. सकाळी धामधुम दुपारी टामटुम व संध्याकाळी सामसुम. यापुढे काय होईल हे काळच ठरवेल. सर्व विधी संपले फक्त एकमेकांच्या गळ्यात हार घालायचा राहिला. प्रभू व सीता एकमेकांसमोर उभे राहिले. रामाने सीतेच्या गळ्यात हार घातला. प्रभू उंच होते. पण सीतामाई ठेंगू असल्यामुळे लोकांनी सांगितले, 'प्रभू थोडे वाका.' पण राम म्हणाले, 'सासुरवाडीत व पत्नीच्यापुढे अजिबात वाकणार नाही.' प्रश्न निर्माण झाला. सीता कुलवान असल्यामूळे लाजून हातात हार घेऊन उभी होती. लक्ष्मणाने बाका प्रसंग ओळखून रामाच्या पायाला मिठी मारली. पाय सोडत नाही पाहून रामप्रभू वाकले. लक्ष्मणाच्या डोक्यावर हात ठेवला. लक्ष्मण म्हणाले, 'वहिनी संधीचा फायदा घ्या.' सीतामाईंनी पटकन गळ्यात हार घातला व विधी संपन्न झाला.

तात्पर्य - देवाच्या, संतांच्या चरणावर साष्टांग दंडवत घालावा. संत, देव आशीर्वाद देतात व जीवाचा बेडा पार होतो. सर्वत्र परमात्मा आहे म्हणून सगळीकडे नमस्कार करावा.

**खं वायुमग्निं सलिलं महिं च । ज्योतिषि सत्वानि दीशो द्रुमादीन् ।**
**सरित्समुद्रांश्च हरेः शरीरं । यत किञ्चभूतं प्रणमेदनन्यः ॥ भा. ११/२/४१**

**अर्थ** - आकाश, वायू, अग्नि, पाणी, पृथ्वी, सूर्य, सर्व दिशा, झाडे, सरिता, समुद्र हे सर्व

देवांचेच शरीर आहे असे समजून त्यांना अनन्यतेने प्रणाम (नमस्कार) करावा.

**आकर चारी लाख चौरासी । जाति जीव जल थल नभ वासी ।**
**सीय राममय सब जगजानी । करऊ 'प्रनाम' जोरी जुग पानी ।। तुलसी.**

**अर्थ -** आकारास आलेले चौऱ्यांशी लक्ष योनीतील, कोणत्याही जातीतील जीव मग ते जळातील, स्थलातील अथवा आकाशातील असो, ते सर्व सीताराममय आहेत असे समजून दोन्ही हातांनी त्यांना नमस्कार करावा.

**तूं मन हें मीचि करीं । माझिया भजनीं प्रेम धरीं ।**
**सर्वत्र नमस्कारीं । मज एकातें ।। ज्ञाने. ९/५१७**

या ओवीत माऊलींनी नमन म्हणजे नम्रता, अर्थात भक्तीचे वर्म सांगितले आहे.

★★★★★

## (४३) आत्मा

शास्त्रामध्ये, गीतेमध्ये जो अविनाशी आहे त्यास आत्मा म्हणतात. जे नाशिवंत आहे त्यास शरीर म्हणतात. आत्मा हा परमात्म्याचा अंश आहे. उपाधी भेदाने त्याचे आठ प्रकार पडतात.

१) **जीवात्मा -** विटाळलेला आत्मा (मायेमुळे) त्यास जीवात्मा म्हणतात. विकार गेले, संकल्प नाहीसा झाला, जीव ब्रह्मच आहे.

**जैसा किडाळाचा दोषु जाये । तरी पंधरें तेंचि होये ।**
**तैसे जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्प लोपीं ।। ज्ञाने.६/८२**

**श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथ कोटीभिः ।**
**ब्रह्म सत्यं जगन् मिथ्या जीवो ब्रह्मैव नापराः ।। शंकाराचार्य**

रुपक करायचे ठरवले तर महाभारतातील इतर सर्व जीवात्मे.

२) **पापात्मा -** पापामुळे जन्मभर दुःख भोगणारा. उदा-धृतराष्ट्र

३) **दुष्टात्मा -** दुरात्मा-सर्वांना त्रास देणारा. उदा-दुर्योधन

४) **हुतात्मा -** अभिमन्यू हा महाभारतात हुतात्मा ठरला. स्वातंत्र्य संग्रामात भारतात बाबुगेनू हुतात्मा ठरला.

५) **पुण्यात्मा -** अर्जुन - अनेक जन्माच्या पुण्यामुळे देवाची संगती लाभली.

**प्रभु आघवेनि येणें जन्में । जियें पुण्यें केलीं मियां उत्तमें ।**
**तयांची न ठकतीचि अंगीं कामें । सद्गुरु तुवां ॥ ज्ञाने १०/ १६६**

६) **धर्मात्मा** - धर्मराज-कोणत्याही संकटाच्या प्रसंगी आपला धर्म सोडला नाही. अर्ध सत्य बोलले पण स्वर्गास जाताना अंगठा गळून पडला. तेही देवाने सांगितले म्हणून. 'वदविले मुखे नारायण धर्मा । अंगुष्ट त्या कर्मासाठी गेला ॥' तु.म. या प्रसंगावरून एक सिद्धांत निर्माण झाला. धर्मराज स्वर्गास गेले त्यांच्याबरोबर सर्व धर्म वर गेला आता राहिला तो अंगुष्ठाएवढा. मात्र एवढ्या धर्मावर जगाचा कारभार चालला आहे.

७) **महात्मा** - महाभारतात विदूरजींना महात्मा संज्ञा आहे. ज्यांनी आपल्या अंतःकरणातील विकार विषय दूर केले आहे त्यांना विदूर म्हणतात. श्रीकृष्णांनी दुर्योधनाच्या छप्पन्न भोगाचा त्याग केला, विदूराच्या कण्या खाण्याकरिता गेले.

**दासीपुत्र कन्या विदूराच्या भक्षी । दैत्याघरी रक्षी प्रल्हादासी ॥ तु.म.**

८) **परमात्मा** - जगाचा चालक. जो सर्वांना सांभाळतो त्याला परमात्मा म्हणतात. श्रीकृष्ण हे महाभारतातील परमात्मे आहे. महात्म्याची शास्त्रामध्ये लक्षणे सांगितली आहेत.

१) **विपदि धैर्यमथाभ्युदये क्षमा सद्सि वाक्पटुता युधि विक्रमः ।**
**यशसिचाभिरुचिर्व्यसनं श्रुतौ प्रकृतिसिद्धमिदं हि महात्मनाम् ॥ सुभा.**

**अर्थ** - संकटात धैर्य खचत नाही, भाग्योदय असला तरी क्षमाशील वृत्ती असते. सभेमध्ये वाक्चातुर्य असते. युद्धात पराक्रम असतो. यशाने भारावून जात नाही. शास्त्राचे व्यसन असते. असे प्रकृतीसिद्ध गुण महात्म्यात असतात.

२) दुरात्म्याची लक्षणे शास्त्रात सांगतात

**अकरुणत्वमकारण विग्रहः परधने परयोषितिच स्पृहा ।**
**सुजनबंधुजनेष्व सहिष्णुता प्रकृतिसिद्धमिदं हि दुरात्मनाम् ॥ सुभा.**

**अर्थ** - ज्याच्या अंतःकरणात करुणा नसते. अकारण भांडण करतो. परधन व परस्त्रीविषयी आसक्त असतो. आपले जन अथवा बंधुविषयीसुद्धा सहिष्णुता दाखवत नाही. अशी दुष्टाची, दुरात्म्याची प्रवृत्ती असते.

३) **मनसि अन्यत् वचसि अन्यत्, कार्यमन्यद् दुरात्मनाम् ।**
**मनसि एकं वचसि एकं कार्यमेकं महात्मनाम् ॥**

**अर्थ** - दुरात्म्याच्या मनात अन्य, वाचेत अन्य व कार्यात अन्य असते. मात्र महात्म्याचे मन, वाचा, कार्य याबद्दल एकरूपता असते.

गीतेमध्ये महात्म्यांची लक्षणे असणारे तीन श्लोक आहे.

**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।**
**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ गी.७/१९**

**अर्थ -** अनेक जन्म झाल्यानंतर (सत्संस्कार) सर्व (विश्व) वासुदेव होय. असे ज्ञान प्राप्त होऊन ज्ञानी मला शरण येतो. असा महात्मा अत्यंत दुर्लभ आहे.

**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।**
**नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ गीता ८/१५**

**अर्थ -** श्रेष्ठत्व प्राप्ती झालेल्या या महात्म्यांना मजप्रत आल्यानंतर दुःखाचे आगर असलेला, व नश्वर असा पुनर्जन्म प्राप्त होत नाही.

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।**
**भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ गीता ९/१३**

**अर्थ -** हे पार्थ दैवी स्वभावाचा आश्रय करणारे महात्मे, भूतांचे आदिकारण व क्षयरहित अशा मला जाणून अनन्य होऊन, माझी भक्ती करतात. तात्पर्य - ज्यांना सर्व जगात देव दिसतो, ज्यांना जन्म-मरण नाही, ज्यांच्याकडे दैवी संपत्ती आहे, देवास जाणून त्याची अनन्य भक्ती करतात त्यांना महात्मे म्हणावे.



## (४४) ज्ञान अज्ञान

१) **अज्ञानात-अज्ञानी -** काही लोकांना आपणास स्वरातील, तालातील काही कळत नाही हेसुद्धा कळत नाही. एकदा सरदारजींची सभा बोलावली होती. त्यांचा अध्यक्ष पान खाण्याकरिता खाली आला होता. पानपट्टीवाल्या भैयाने विचारले, 'सभा कशाकरिता बोलाविली आहे ?' तो म्हणला, 'लोक आम्हास मूर्ख समजतात. आम्ही खरोखर मूर्ख आहोत का ? याचा विचार करण्याकरिता सभा बोलाविली आहे.' भैया म्हणाला, 'मी एक प्रश्न विचारतो. त्याचे उत्तर बरोबर दिले तर आपण शहाणे आहात असे मी समजेन.' सरदारजी म्हणाला, 'विचारा प्रश्न ?' भैया म्हणाला, 'आम्ही तीन भाऊ आहोत. एक न्युयॉर्कला आहे. दुसरा इंग्लंडला आहे. तिसरा कोठे असावा ?' सरदारजींच्या अध्यक्षाने खूप डोके खाजवले पण उत्तर देता आले नाही. शेवटी तो भैयास म्हणाला, 'तुम्हीच उत्तर सांगा.' भैया म्हणाला, 'अरे तिसरा मी.' सरदारजीस वाटले हाच प्रश्न सभेत विचारू. सभा भरली होती. अध्यक्षांची वाट पहात होते. अध्यक्ष खुशीत आले व म्हणाले, 'सर्वांसमोर मी एक प्रश्न

विचारतो. त्याचे उत्तर आपण दिले तर आपण शहाणे आहोत, नाही तर मूर्ख आहोत.' सर्व म्हणाले, 'विचारा प्रश्न.' अध्यक्ष म्हणाले, 'आम्ही तीन भाऊ आहोत. एक न्युयॉर्कला आहे. दुसरा इंग्लंडला आहे. तिसरा कोठे असावा ?' कोणालाच उत्तर देता आले नाही. सर्वांनी सांगितले, 'आम्हास उत्तर देता येत नाही. आपणच उत्तर द्यावे.' अध्यक्ष म्हणाले, 'तिसरा खालचा पानपट्टीवाला भैया.' हे आहे अज्ञानाचे अज्ञान.

२) **अज्ञानात ज्ञानी -** यांना 'वासरात लंगडी गाय शहाणी असे म्हणतात.' अथवा 'अंधोमे काना राजा असे म्हणतात.' चांगदेव महाराज योगी होते. चौदाशे वर्षे यमास फसवून हे जिवंत राहिले. पण ज्ञानदेव मुक्ताबाई यांच्यासमोर हे कोरेच राहिले. हे अज्ञानी लोकात ज्ञानी होते.

३) **ज्ञान्यात अज्ञानी -** संतांची सभा भरली असता, मुक्ताईने गोरोबा काकांच्या हातात थापटणे दिले. कच्चे व पक्के मडके शोधण्यास सांगितले. या संतांच्या परीक्षेत नामदेवराय कच्चे ठरले. हे ज्ञान्यात अज्ञानी होत.

४) **ज्ञान्यात ज्ञानी -** ज्ञानोबाराय हे सर्व ज्ञान्यात ज्ञानी आहेत. 'ज्ञानियांचा शिरोमणी । वंद्य जो का पूज्यस्थानी । चिंतकाचा चिंतामणी । ज्ञानोबा माझा ॥' नाथ. 'ऐके ज्ञानचक्रवर्ती । तू तव ज्ञानाचिच मूर्ती । परी पुससी जे आर्ती । ते कळली मज ॥' असे देव नामदेरायांच्या मुखातून ज्ञानोबाविषयी म्हणतात. ज्ञानोबाराय हे उपजतच ज्ञानी आहेत. त्यांच्याच शब्दात सांगायचे तर

**तैशी दशेची वाट न पाहातां । वयसेचिया गांवा न येतां ।**
**बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ॥ ज्ञाने.६/४५३**

ज्ञानोबाराय हे सर्वज्ञ आहेत.

★★★★★

## (४५) ज्ञानदेव महिमा

**एक कोटी -** व्यक्ती, शक्ती, युक्ती, संपत्ती, नीति, विरक्ती, भक्ती, अनुभूती या सर्व आठ गोष्टी ज्ञानोबांच्या बाबतीत सार्थ ठरतात.

१) **व्यक्ती -** ज्ञानदेव हे व्यक्ती नाहीत ते आहेत विभूती. ज्या व्यक्तिंमध्ये विशेष गुण, सामर्थ्य असते त्यांना विभूती म्हणतात. 'गेले दिगंबर ईश्वर 'विभूती' । राहिल्या त्या किर्ती जगामाजी ॥' नाम.

२) **शक्ती -** ज्ञानोबांची शक्ती किती ? 'अंगी ऐसे बळ रेडा बोले ॥'तु.म. देवाच्या कृपेमुळे मुका

माणूस बोलू शकेल, पांगळा माणूस चालू शकेल. 'मुकं करोति वाचालं पंगु लंघयते गिरीम् । यत् कृपा तमहं वंदे परमानंदमाधवम् ॥' पण माऊली कृपेमुळे रेडा बोलतो, जो सर्व प्राण्यात निर्बुद्ध आहे. सर्कशीत यास प्रवेश नाही. रस्त्यावर आला तर सर्व ट्रॅफिक एकटा रोखून धरतो. एखाद्या नदीत रेडा बसला व वरून पूर आला तर रेडा बाहेर येत नाही. तो पुराबरोबर वाहत जातो. त्यास वाटते बरे आहे बिन चाकाची गाडी. दोन मैल गेल्यानंतर बाहेर येतो. तो पर्यंत इकडे शोधाशोध होते. असा रेडा याच्या मुखातून मराठी अभंग नाहीत, ते सोपे आहेत. पुराणाचे, शास्त्राचे, श्लोक नाहीत, तेपण सोपे आहेत. गीता नाही. वेदातील श्लोक जे अतिशय अवघड आहेत ते मुखातून वदविले आहेत. 'होता कृपा तुमची पशु बोले वेद ॥' निळो. ही ज्ञानोबांची शक्ति.

३) **युक्ती** - युक्तिने सांगण्यात ज्ञानोबांचा हात कोणी धरू शकत नाही. नऊ हजार ओव्यांमध्ये साडेतीन हजार दृष्टांत देऊन गीता समजविली आहे. 'तुका म्हणे नेणो युक्तिचिया खोली । म्हणूनि ठेविली पायी डोयी ॥' मराठीत ग्यानबाची मेख म्हणतात ती हीच !

४) **संपत्ती** - ज्ञानोबाराय किती श्रीमंत आहेत ? ते ज्ञानाचे चक्रवर्ती आहेतच. पण ज्यांच्या दारात सोन्याचा पिंपळ आहे. 'जयाचिये द्वारी सोन्याचा पिंपळ ॥' तु.म. याचा अर्थ असा आहे ज्ञानोबारायांचा भक्त गरीब रहात नाही.

५) **नीति** - ज्ञानोबारायांची नीति जगाने आचरावी अशी आहे. त्यांच्या शब्दात,

**जयां भक्तीची येतुली प्राप्ती । जे कैवल्यातें परौतें सर म्हणती ।**
**जयांचिये लीलेमाजीं नीति । जियाली दिसे ॥ ज्ञाने ९/१९२**

ज्याचे जीवनच निष्कलंक आहे. 'नमो ज्ञानेश्वरा निष्कलंका । जयाची गीतेची वाचितां टीका । ज्ञान होय लोकां । अति भाविक ग्रंथार्थिया ॥' नाथ.

६) **विरक्ती** - यांच्या सारखे वैराग्य कोणाचे नाही.

**जन्मतेनि प्रसंगें । स्त्रीदेह शिवणें अंगें ।**
**तेथूनि जन्म आघवें । सोंवळें कीजे ॥ ज्ञाने १७/ २११**

सोळाव्या वर्षी ज्ञानेश्वरीसारखा अलौकिक ग्रंथ लिहिला व जे आमचे बिघडण्याचे वय त्या बावीसाव्या वर्षी संजीवन समाधी घेतली.

७) **भक्ती** - जग देवाची भक्ती करते पण देव (विठोबा) ज्ञानोबारायांची भक्ती करतात. 'संतांचा महिमा वर्णावा तो किती । अलक्ष लक्ष मूर्ती ज्ञानोबा माझा ॥' नाथ. 'नामा म्हणे याने तारीले पतीत । भक्ती केली ख्यात ज्ञानदेवे ॥' अर्जुनाचे भाग्य मोठे. युद्धाच्या वेळी मागे-पुढे हरिहर होते.

**ध्वजस्तंभावरी वानरु । तो मूर्तिमंत शंकरु ।**

**सारथी शार्ङ्गधरु । अर्जुनेंसीं ॥ ज्ञाने १/१४१**

अर्जुनास विजयाचा गर्व झाला होता. देवास गर्व आवडत नाही. देव, डोंगरावर अठरा दिवस युद्ध पाहणाऱ्या बब्रूवानाकडे अर्जुनास घेऊन गेले व विचारले, 'पांडवांचा विजय कोणामुळे झाला?' बब्रूवानाने एका वाक्यात सांगितले, 'हरिहरामुळे.' अर्जुनाचा गर्व नाहीसा झाला पण अर्जुनाच्या अंतःकाळी हे दोघेही नव्हते. ज्ञानोबारायांचे भाग्य असे समाधीस बसवताना एक हात हरिच्या खांद्यावर व एक हात हराच्या खांद्यावर. देव व गुरू यांनी ज्ञानोबारायांना समाधीस बसविले. काय यांची भक्ती असेल ! काही हरिचे भक्त आहेत. काही हराचे भक्त आहेत. पण हर व हरि नेहमी ज्ञानोबारायांना आठवितात. त्यांचे ध्यान करतात. 'म्हणती चौघेजण भाग्याचे । जे निधान ब्रह्मादिकांचे। ते निजध्यान शंकराचे । सकळ जीवांची जीवनकळा ॥' नाम.

**८) अनुभूती -** ज्यांचा अनुभव विश्वात्मक आहे. 'एका जनार्दनी अनुभव । समाधी ठाव अलंकापुरी ॥' नाथ. 'ऐसा ज्याचा अनुभव । विश्व देव सत्यत्वे ॥' तु.म.

चमत्कारामुळे महात्मा ठरविणे हे अधम लक्षण आहे.
आचरणामुळे महात्मा ठरविणे हे मध्यम लक्षण आहे.
अनुभवामुळे महात्मा ठरविणे हे उत्तम लक्षण आहे.

आई-वडिलांना समाजाने देहांत प्रायाश्चित्त घ्यायला भाग पाडले. या चार भावंडांना समाजाने खूप त्रास दिला. पण एवढ्या सर्व वाङमयात ज्ञानोबारायांचा याबद्दल एकही शब्द आलेला नाही. कारण सर्व देवरूप असल्यामुळे रागवायचे कोणावर ? जगाने काम करावे व आपला फायदा व्हावा. अशा या जगात माऊलींनी स्वसामर्थ्याने अलौकिक कार्य केले पण 'पसायदान' जगाकरिता मागितले.

मदर तेरेसा नावाची जागतिक किर्तीची सेवाधारी स्त्री जेव्हा वारली तेव्हा त्यांचे शिष्य मंडळ पोपकडे गेले व सांगितले, 'आमच्या मदर तेरेसाला संत म्हणून पदवी द्या.' त्यांनी सांगितले, 'ज्यांच्या जीवनात कमीतकमी दोन चमत्कार घडले आहेत त्यांना संत म्हणतात.' ज्ञानोबारायांचे आठ चमत्कार जे सर्व वारकऱ्यांना माहीत आहेत. १) सोळाव्या वर्षी गीतेवर टीका (हा चमत्कार मोठा, कारण सातशे वर्षे पारायणे होत आहेत. २) रेड्याच्या मुखातून वेद वदविले ३) जड भिंत चालविली ४) मशीद बोलविली ५) पितर जेवावयास घातले ६) स्त्रीचा पुरुष केला ७) मेलेला माणूस जिवंत केला ८) पाठीवर मांडे भाजले

हे चमत्कार ज्ञानोबारायांनी लोकांना दाखविण्याकरिता केले नाहीत तर प्रसंगानुरूप ते चमत्कार त्यांच्याकडून घडले गेले म्हणून ज्ञानोबाराय महान संत आहेत.

★★★★★

# (४६) नामदेव महाराज

महाराष्ट्रामध्ये अनेक संत होऊन गेले. एक अख्यायिका सांगितली जाते. महाराष्ट्रातील एक साधक तुकाराम महाराजांच्या वेळी कांची कामकोटी मठात शंकराचार्यांची भेट व्हावी म्हणून अनुष्ठानास बसला. दोन महिन्यांनी शंकाराचार्य स्वप्नात आले व साधकास विचारले, 'आपण कुठून आलात ?' साधकाने सांगितले, 'मी महाराष्ट्रातून आलो आहे.' आचार्यांनी विचारले, 'कशाकरिता ?' साधकाने सांगितले, 'आपल्या सारखे आचार्य महाराष्ट्रात नाहीत.' शंकाराचार्य म्हणाले, 'मी आचार्य आहे पण महाराष्ट्र ही संतांची भूमी आहे. संत हे आचायपिक्षा श्रेष्ठ आहेत. प्रथम दर्शनकारांना श्रेष्ठत्व होते. नंतरच्या काळात आचार्यांना महत्त्व आले. मात्र त्यानंतर संतच सर्व श्रेष्ठ ठरले.' तो साधक म्हणाला, 'असे कोण आहे ?' शंकाराचार्यांनी स्वप्नात श्लोक सांगितला तो असा,

**ज्ञानेशं ज्ञानमूर्तिंच साक्षात्प्रेमस्वरूपिणीम् । नामदेवं च दयामूर्तीं नाथं वंदे पुनः पुनः ।**
**वैराग्यस्य परामूर्ती देहूक्षेत्रनिवासीणाम् । तुकाराम महाराष्ट्र भक्तराज चतुष्टकम् ॥**

**अर्थ -** ज्ञानोबाराय हे ज्ञानाची मूर्ती आहेत. नामदेवराय हे प्रेमाची मूर्ती आहेत. एकनाथ महाराज हे दयेची मूर्ती आहेत व तुकाराम महाराज प्रत्यक्ष वैराग्य मूर्ती आहेत. साधक महाराष्ट्रात आला व तुकोबारायांचा अनुग्रह घेतला. या चार संतापैकी नामदेवराय यांना प्रेमाचा पुतळा म्हणतात. 'नाम' हेच ज्यांचे जीवन म्हणून यांचे नाव नामदेव आहे. ज्ञानोबारायांनी २२व्या वर्षी समाधी घेतली. तुकोबारायांनी ४२व्या वर्षी वैकुंठगमन केले. नाथ महाराजांनी ६२व्या वर्षी जलसमाधी घेतली मात्र नामदेवरायांना ८० वर्षाचे प्रदीर्घ आयुष्य लाभले.

नामदेवराय यांचे आई-वडील नरसीबामणी (मराठवाडा) या गांवचे. त्यांच्या आई-वडिलांचे नाव दामाशेट व गोणाई. कापड विकणे हा त्यांचा व्यवसाय पण विठोबारायांचे निष्ठावंत वारकरी. पहाटे उठून भजन, काकड आरती, स्नान, देवास रोज नैवेद्य दाखविल्याशिवाय जेवत नव्हते व रात्री शेजारती झाल्यांनतरच झोपत. बरेच दिवस दामाशेट व गोणाईला पुत्र प्राप्ती नव्हती. त्यांनी विठोबास सांकडे घातले व शके ११९२ ला कार्तिक शुद्ध एकादशीला यांना पांडुरंगाचा प्रसाद मिळाला. दामाशेटचे कुळ पावन झाले. संतकवी महिपतीच्या मताप्रमाणे नदीत स्नान करताना दामाशेटना एक शिंपला मिळाला. त्यात बालक होते. तेच हे उद्धवांचे अवतार नामदेवराय.

दामाशेट देवास नैवेद्य दाखविण्याकरिता जात असत. एक दिवस हे बाहेरगावी गेले व गोणाईने नामदेवास नैवेद्य दाखविण्यास विठ्ठल मंदिरात पाठविले. नामदेवांनी देवासमोर नैवेद्य ठेवला व देव खातील म्हणून वाट पाहू लागला. पण त्यास काय माहीत देवास फक्त नैवेद्य दाखवायचा असतो. अजाण नामदेव म्हणाले, 'देवा मी लहान म्हणून नैवेद्य खात नाहीस का ? जर खाल्ला नाहीस तर मी तुझ्या पायावर डोके आपटून प्राण त्याग करीन.' नामदेवांच्या अट्टाहासाने देव प्रगट होऊन नैवेद्य

खाल्ला. नामदेव रिकामे ताट घेऊन घरी आला. गोणाईस आश्चर्य वाटले. दामाशेट तर चकितच झाले. पण दुसऱ्या वेळी नामदेवाबरोबर देव जेवतांना दामाशेटनी पाहिले व त्यांची खात्री पटली की आपला मुलगा असामान्य आहे. 'नोहे हा सामान्य महिमा संतांचा । नैवेद्य हातीचा मूर्ती जेवी ॥' निळो.

नामदेवांना लौकीक जीवनात रस नव्हता. देवाचे भजन यामध्येच यांचा वेळ जात होता. आई-वडिलांनी संसारात लक्ष देण्यास सांगितले. एकदा तर कापड घेऊन दिले. पण यांनी उधार देऊन टाकले व साक्षीसाठी एक दगड आणला. दगड पाहून दामाशेट खवळले. नामदेवराय गणोबा नावाच्या गिऱ्हाईकाकडे गेले. तो म्हणाला, 'माझा दगड आणून द्यावा.' नामदेवराय घरी आले. देव्हाऱ्यात दगड होता. रागाने दामाशेटनी गल्लीत टाकला. पण तो सोन्याचा झाला. मग मात्र दामाशेट चकित झाले. गणोबास ही बातमी समजली. तो उधारी भागविण्यास आला. पण दामाशेट दगड द्यायला तयार नव्हते. नामदेवराय म्हणाले, 'बाबा पैसे घ्या व त्याचा दगड त्याला देऊन टाका.' सोन्याचा दगड गणोबास दिला पण त्याचा हात लागताच तो परत होता तसा दगड झाला.

नामदेवरायांच्या जीवनात जनाबाईचे आगमन झाले. अर्थात हा भगवत् संकेत होता. मराठवाड्यातील गंगाखेडमधील दमा व त्याची पत्नी करुंड यांना मुलगी झाली व देवाने स्वप्नात सांगितले ही सामान्य मुलगी नाही. ही मुलगी कृत युगात पद्मिनी, त्रेता युगात मंथरा व द्वापार युगात कुब्जा होती, तीच ही आहे. या मुलीस दामाशेटकडे ठेवा. अशाप्रकारे जनाबाईचे आगमन झाले. दोघे भगवत्भक्त भावंडांप्रमाणे वागत होते. संसारात लक्ष लागावे म्हणून नामदेवरायांचे आईवडिलांनी लग्न करून दिले पण यांचे संसारात लक्ष लागले नाही. त्यांची पत्नी राजाई ही पण नामदेवरायांच्यावर रागावली होती.

लहानपणीच नामदेवरायांच्या हातचा नैवेद्य विठोबांनी खाल्ला म्हणून सगळीकडे त्यांची किर्ती झाली. ज्ञानोबाराय वगैरे संत मंडळी पंढरपूरला आली होती. देवाचे आवडते भक्त म्हणून निवृत्तीनाथ, ज्ञानोबाराय, सोपानकाका यांनी नामदेवरायांचे दर्शन घेतले. पण मुक्ताईने दर्शन घेतले नाही. कारण नामदेवराय कोणाचे दर्शन घेत नव्हते. त्यांना देव माझ्याबरोबर जेवतो हा अहंकार होता. शेवटी चिमुरडी मुक्ताई म्हणाली, 'अखंड जयाला देवाचा शेजार । कां रे अहंकार नाही गेला ? ॥' नामदेवरायांच्या ह्रदयाला हे शब्द झोंबले पण त्यांचा अहंकार कमी झाला नाही. त्यांचा अहंकार घालविण्यासाठी नामदेवरायांना आळंदीस बोलाविले. संतांची सभा घेतली. गोरोबाकाकांच्या हातात थापटणं दिले व सांगितले, 'कच्चे मडके, पक्के मडके शोधा'. गोरोबांनी सर्वांच्या डोक्यात थापटणं मारलं. सर्व गप्प बसले. काका म्हणाले, 'ही सर्व पक्की मडकी आहेत.' पण नामदेवरायांच्या डोक्यात थापटणं मारल्यावर ते विव्हळले. काका म्हणाले, 'एवढे एकच कच्चे मडके आहे.' संतांच्या सभेत अपमान झाल्यानंतर नामदेवराय सरळ पंढरपूरला आले. विठोबास म्हणाले, 'तू माझ्याशी बोलतोस, मग मी कच्चा कसा ?' विठोबा म्हणाले, 'नामदेवा, मी एकदेशी नाही, सर्व व्यापक आहे. तुला अजून ही दृष्टी नाही.

तू विसोबा खेचरांना भेट.' नामदेवराय औंढ्यानागनाथांच्या शिवमंदिरात आले. तिथे एक म्हातारा शिवलिंगावर पाय ठेवून झोपला होता. नामदेवरायांना राग आला व म्हणाले, 'शिवलिंगावर पाय ठेवून झोपायला तुला काही वाटत नाही कां ?' म्हातारा म्हणाला, 'पिंड नाही अशा ठिकाणी माझे पाय उचलून ठेव. माझ्या अंगी ताकद नाही.' नामदेवांनी रागाने पाय उचलून दुसरीकडे ठेवले. पण तिथे पिंड तयार झाली. नामदेवराय चकित झाले. मनात म्हणाले शिवालाच यांचे पाय आवडत असावेत. 'चरणीचे रज वंदी शूळपाणी ॥' तु.म. ओळख पटली. नामदेवराय विसोबांना शरण गेले. विसोबांनी समदृष्टी दिली व नामदेवराय ज्ञानी भक्त झाले. 'नामा म्हणे निकी दावियेली सोय । न विसरावे पाय विसोबाचे ॥'

नामदेवराय एकदा औंढ्यानागनाथासमोर कीर्तन करीत होते पण तिथल्या कर्मठ ब्राह्मणांना हे आवडले नाही. ब्राह्मण म्हणाले, 'देवळाच्या मागे जाऊन कीर्तन करा.' नामदेवराय मागे पश्चिमेस गेले. कीर्तन चालू झाले पण आश्चर्य ! शिवमंदिरच फिरले. 'फिरविले देऊळ जगामाजी ख्याती । नामदेव हाती दूध प्याला ॥' तु.म.

परीक्षा पाहण्याकरिता एकदा वाळवंटात नामदेवरायांची एक भाकरी कुत्र्याने पळविली पण नामदेवराय कुत्र्याच्यामागे तुपाची वाटी घेऊन धावले. पंढरीनाथच कुत्रा झाले होते. नामदेव परीक्षेत पास झाले. एकदा एकादशीस देव ब्राह्मणाचा वेश घेऊन नामदेवरायांच्या घरी भिक्षा मागण्यासाठी आले. नामदेवराय म्हणाले, 'आज हरिदिन आहे. 'फराळ' मिळेल. अन्न मिळणार नाही.' ब्राह्मण म्हणाले, 'मला अन्नच पाहिजे, नाहीतर मी मरून जाईल.' नामदेवराय म्हणाले, 'तुम्ही मरा, मीपण मरतो पण एकादशीस अन्न मिळणार नाही.' देवांनी मेल्याचे सोंग केले. देव मेले असे समजून नामदेवरायांनीसुद्धा मरण पत्करले. नेम सोडला नाही. शेवटी देव हरले.

नामदेवरायांच्या कीर्तनात देव नाचत होते व ज्ञानोबाराय चालीत भजन म्हणत होते. यांच्या कीर्तनात गोरोबाकाकांचा पुत्र जीवंत झाला व गोरोबाकाकांनी तोडून घेतलेले हात पूर्वी होते तसे झाले. नामदेवरायांनी महाराष्ट्रात कीर्तन माध्यमातून नामाचा व प्रेमाचा महिमा वाढविला.

देवाच्या सांगण्यावरून नामदेवरायांनी ज्ञानोबारायांच्या बरोबर भारत यात्रा केली. सर्व देशातील तिर्थे पावन केली. बादशहानी मारलेली गाय नामदेवरायांनी तीन दिवसांनी जिवंत केली. यात्रेमध्ये तहान लागल्यानंतर एका खोल विहिरीत लघीमा सिद्धीचे रूप घेऊन ज्ञानोबाराय पाणी पिऊन आले. पण नामदेवरायांनी देवाचा धावा केला. ती विहीर उचंबळून आली. 'तव गडगडीत कूप उदके वोसंडला । कल्पांती खवळला सिंधू जैसा ॥' नाम. यात्रा झाल्यानंतर गंगापूजनाच्या वेळी देवांनी यांची सर्व कामे केली. विठोबांनी ब्राह्मणांना पण नामदेवरायांच्या सांगण्यावरून दर्शन दिले. भक्तीच्या जोरावर विठोबास अंकित केले. ज्ञानोबांनी समाधी घेतली. नामदेवांना हा माऊलीचा विरह सहन झाला नाही. ते बारा वर्षे पंजाबात राहिले. तिथे भक्तिचा प्रचार केला. हिंदी अभंग रचना केली.

पंजाबात यांना फार मानाचे स्थान आहे. आयुष्याच्या शेवटी पंढरपूरला आले व देवाच्या पायरीजवळ समाधी घेतली. 'नामा म्हणे आम्ही पायरीचे चिरे । संत पाय हिरे वरी देती ।।' नामदेवरायांचा विरह सहन झाला नाही म्हणून त्यांच्या कुटुंबातील चवदा जणांनी एकत्र संजीवन समाधी घेतली. पण त्यांच्या वंशाचा सांभाळ विठोबा अद्याप करीत आहेत. समाधी घेतली त्यांची नावे. १) नामदेवराय २) राजाई (पत्नी) ३) गोणाई (आई) ४) दामाशेट (वडील) ५) श्रीनारायण (पुत्र) ६) श्रीविठ्ठल (पुत्र) ७) श्रीगोविंद (पुत्र) ८) श्रीमहादेव (पुत्र) ९) गोदाई (सून) १०) येसाई (सून) ११) साखराई (सून) १२) लिंबाई (मुलगी) १३) आऊबाई (बहीण) १४) संत जनाबाई (संत नामदेवरायांची दासी)

**समाधी समय - शके १२७२, आषाढ वद्य त्रयोदशी, ३ जुलै इ.स. १३५० रोजी.**

★★★★★

## (४७) एकनाथ महाराज

वारकरी सांप्रदाय मंदिराचे पाया ज्ञानेश्वर महाराज, मंदिराचा विस्तार करणारे नामदेवराय, कळस तुकोबाराय, पण मजबूत खांब आहेत एकनाथ महाराज ! 'जनार्दन एकनाथ । खांब दिला भागवत ।।' बहिणाबाई. नामदेवराय, माऊलीनंतर वारकरी सांप्रदायास यवनांच्या स्वाऱ्यांमुळे उतरती कळा प्राप्त झाली होती. निखारा होता, पण त्यावर राख साचली होती. राख काढून तो निखारा परत नाथ महाराजांनी प्रज्वलित केला. हे भानुदासांच्या कुळीत अवतीर्ण झाले. भानुदास, चक्रपाणी, सूर्यनारायण व एकनाथ महाराज अशी यांची परंपरा आहे. मात्र हे मूळ नक्षत्रावर जन्माला आल्यामुळे यांच्या बालपणीच यांचे आई-वडील निवर्तले. आजी-आजोबांनी यांना सांभाळले. भानुदास महाराजांनी, विजयनगरचे राजे, कृष्णराय यांनी सत्ताबळावर पंढरपूरची विठ्ठल मूर्ती आपल्या राजधानीत नेली होती. ती भावबळावर परत पंढरपूरला आणली. अशी यांची भक्तिची परंपरा आहे. भानुदास महाराजांना विठ्ठलांनी असा वर दिला, 'मी तुझ्या घराण्यात अवतार घेईन.' ते हे विष्णूचे अवतार एकनाथ महाराज. ब्राह्मण घराणे, भक्तिची परंपरा असल्यामुळे नाथ महाराज लहानपणापासून बुद्धिमान होते.

**तैशी दशेची वाट न पाहतां । वयसेचिया गांवा न येतां ।**
**बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ।। ज्ञाने ६/४५३**

या ज्ञानोक्तिप्रमाणें नाथ महाराजांनी ७-८ वर्षाच्या वयातच सर्व आध्यात्मिक ग्रंथांचे अवलोकन केले. वैराग्य निर्माण होऊन गुरूच्या शोधात फिरू लागले. एका साधूनी यांना गुरूचा पत्ता सांगितला. नाथ महाराज आजी-आजोबास न विचारता देवगिरीवर जनार्दन पंतांना भेटले. अलौकिक तेज पाहून जनार्दन स्वामींनी त्यांना आपल्याकडे ठेवून घेतले. गुरूंची सेवा केली. एका अधेलिच्या हिशोबाकरिता रात्रभर जागले. टाळी वाजविली. पंत उठले व म्हणाले, 'एवढा कसला आनंद झाला ?' नाथ म्हणाले,

'हिशेबात अधेली सापडत नव्हती ती सापडली.' गुरूंनी आशीर्वाद दिला. तुझे पुढचे जीवन असेच बिनचूक होईल. गुरू एकदा ध्यानस्थ बसले होते. परचक्र आले. नाथांनी स्वामींचे कपडे चढविले व तलवार चालवून सैन्यास परत पाठविले. जनार्दन स्वामी आश्चर्यचकीत झाले. नाथांना घेऊन एकांत स्थळी गेले. तिथे मलंग वेशात दत्तात्रय आले होते. दोघांच्या जेवणाची भांडी धुण्यास नेली. त्यातील उचिष्ट प्राशन केले. दत्तात्रयांनी प्रत्यक्ष दर्शन दिले. देवगिरीपासून जवळच शूलभंजन नावाचा पर्वत आहे. तिथे नाथांनी अध्यात्म साधना केली. ते एवढे विदेह अवस्थेत असायचे की एक मोठा भुजंग त्यांना कवटाळून त्यांच्यावर छाया धरायचा. दूध देणाऱ्या शेतकऱ्याने ते पाहिले व तो घाबरला. नाथांना मात्र त्याची भीती वाटली नाही. साधना संपल्यानंतर नाथांना प्रत्यक्ष सावळ्या परब्रह्मांचे दर्शन झाले. जनार्दन स्वामींनी सांगितले, 'आपले काम झाले. तिर्थयात्रा करून यावे.' नाथांनी तिर्थयात्रा केल्या व ज्ञानेश्वर महाराज भेटले. फार आनंद झाला. पैठणमध्ये अध्यात्माचा सोहळा चालू झाला. एकदा जनार्दन स्वामी पैठणला आले. त्यांनी एकनाथ महाराजांना सांगितले, 'तुम्ही गृहस्थाश्रमामध्ये प्रवेश करावा.' नाथांचे लग्न झाले. अत्यंत सद्गुणी पत्नी मिळाली. तिचे नाव गिरिजाबाई. नाथांची भक्ती पाहून श्रीखंड्या नावाने परमात्मा त्यांच्या घरी ३६वर्षे राहिला व सर्व प्रकारची सेवा केली. नाथ 'शांतीब्रह्म' म्हणून ओळखले जातात. त्यांना राग येण्याकरिता काही कुटाळ लोक एका ब्राह्मणास म्हणाले, 'जर नाथांना क्रोध आणलास तर २०० रुपये देतो.' ब्राह्मण सरळ चप्पल न काढता देवघरात गेला. पण नाथ म्हणाले, 'बरेच लोक माझ्याकडे येतात पण माझ्यावर आपले एवढे प्रेम आहे की आपण चप्पल काढण्यास पण विसरलात !' नाथांना राग आला नाही म्हणून जेवताना गिरजाबाईंच्या पाठीवर उडी मारली. नाथ म्हणाले, 'गिरजे सांभाळ !' ती त्यांचीच पत्नी होती. म्हणाली, 'हरिपंडितास कडेवर घेऊन वाढण्याची सवय आहे मला !' ब्राह्मण खजील झाला. नाथांचे पाय धरले. नाथांनी त्यास २०० रुपये दिले.

**काम क्रोधा नाही चाली । भूती झाली समता ॥ तु.म.**

नाथांच्या शांतीची परीक्षा पाहण्याकरिता एक यवन एक दिवसात एकवीस वेळा थुंकला. (आख्यायिका १०८ वेळा थुंकला) पण नाथ शांत होते. शेवटी यवन शरण गेला. नाथ म्हणाले, 'तुमच्यामुळे मला एकाच दिवसात २१ वेळा गंगेचे स्नान झाले.

**यवन अंगावरी थुंकला । प्रसाद देऊनी मुक्त केला ॥ निळो.**

गावातील शास्त्री, पंडितांनी नाथांवर बहिष्कार घातला. नाथांनी गंगेतील वाळूमध्ये हरिजनाचे मूल आपल्या अंगावर उचलून घेतले. एका हरिजनाच्या घरी जेवावयास गेले. हरिजनांना ब्राह्मणांच्या अगोदर जेवावयास घातले. सर्व ब्राह्मण खवळले. पण नाथांनी त्यांच्या पितरांना जेवायला घातले. असे अलौकिक कार्य केले. नाथांच्या घरी लक्ष्मी दासी होती व दत्तात्रय द्वारपाल म्हणून काम पाहत होते. नाथ हे श्रीमंत होते. पण सर्व मिळकत परमार्थात खर्च करीत. एवढा खर्च करून त्यांना कर्ज

झाले. अर्थात अध्यात्मिक उत्सवात ! ते देवांनी फेडले.

**एकोबाचे ऋण फेडी ऋषीकेशी । अंबऋशीचे शोसी गर्भवास ॥ तु.म.**

नाथांनी मोठे कार्य केले ते म्हणजे ज्ञानेश्वरीचे शुद्धीकरण, भागवताच्या एकादश स्कंदाव मराठीत टीका ! ज्या ग्रंथाची काशीमध्ये पालखीतून मिरवणूक काढली व तिथे शास्त्री पंडित पालखीचे भोई झाले. भारूडरूपी अभंग, इतर अभंग, भावार्थ रामायण, आनंद लहरी वगैरे पुष्कळ वाङ्मय लिहिले. मात्र यांचे व मुलांचे पटले नाही कारण हरिपंडीत हे पंत होते पण नाथ मात्र संत होते. यांना जावई पण प्रथम बरोबर मिळाले नाहीत. पण नंतर सुधारले. इहलोकीचे कार्य साधून, जीवांचा उद्धार करून, लोकांना सन्मार्गाला लावून नाथ ही यात्रा संपविण्याच्या तयारीस लागले. प्रथम देह सोडला. त्यांची अंत्ययात्रा निघाली. ब्राह्मण म्हणाले, 'एवढा मोठा महात्मा पण शेवटी आमच्या खांद्यावरून निघाला.' तिरडीवर नाथ उठून बसले व म्हणाले, 'मला आज मरायचे नाही.' मरण पुढे ढकलले. दुसऱ्यांदा नाथांनी देह ठेवला. अंत्ययात्रा निघाली पण एका बाईची मुलगी प्रथमच सासरला जात होती. तिला अपशकून झाला व म्हणाली, 'यांना आत्ताच मरायला वेळ मिळाला का ?' नाथ परत उठून बसले व म्हणाले, 'आपल्यास अपशकून नको. आपली मुलगी आनंदाने सासरला जाऊ दे. मी नंतर मरतो.' शेवटी मात्र नाथ महाराज कोणालाही न कळू देता गोदावरीत गेले व जलसमाधी घेतली. त्यांचा देह कोणास मिळाला नाही. ते जलात समाविष्ट झाले. ६२ वर्षाचा प्रदीर्घ काळ परमार्थ करून इहलोकिची यात्रा संपविली. असे हे नाथांचे अतिसंक्षिप्त चरित्र आहे.

**तेही प्राणापरौते । आवडती हें निरुतें ।**
**जे भक्तचरित्रातें । प्रशंसिती ॥ ज्ञाने १२/२२७**

म्हणून हा प्रयत्न.

★★★★★

## (४८) तुकाराम महाराज

जगद्गुरु तुकोबारायांचे संक्षिप्त जीवन चरित्र - पाच मुद्यात.

**१) संसारी जीवन** - तुकोबांचे घराणे प्रतिष्ठित असल्यामुळे लहानपणीचे जीवन सुखात गेले. घरात सावकारी होती. मोठा भाऊ सावजी व लहान बंधू कान्होबा. वडील बोल्होबा व आई कनकाई, दोघेही साधुवृत्तीचे होते. बोल्होबांची परंपरेने पंढरीची वारी, देवाची निरपेक्ष सेवा म्हणून त्यांच्या पोटी तुकोबारायांनी जन्म घेतला. 'शुद्ध बिजापोटी । फळे रसाळ गोमटी ॥' तु.म. अशी आख्यायिका आहे. ज्ञानोबाराय, नामदेवराय वगैरे संतमंडळी यात्रेनिमित्त देहूस आली होती. विश्वंभरबाबांची

किर्ती ऐकून नामदेवरायांना वाटले यांच्या घरी आपला जन्म व्हावा. अर्थात आठव्या पिढीत त्यांनी जन्म घेतला. 'जगद्गुरू तुका अवतार नामयाचा । सांप्रदाय सकळांचा येथोनिया ॥' निळो.

२) **संकटग्रस्त जीवन** - जीवनात सगळेच दिवस सारखे राहत नाहीत. लवकरच आई-वडिलांनी इहलोकीची यात्रा संपवली. वयाच्या १३व्या वर्षीच तुकोबारायांवर संसाराची जबाबदारी पडली. चार वर्षे संकटांनी हैराण केले. दोन वर्षे सतत दुष्काळ पडला. तुकोबारायांची पहिली पत्नी रखुमाई अन्न अन्न करता मेली. थोड्याच दिवसात मोठा मुलगा संतोबा निवर्तला. मोठा भाऊ सावजीची पत्नी वारली. अगोदरच संसारात उदास असणाऱ्या सावजींनी संसाराचा त्याग केला व तीर्थयात्रेस निघून गेले. चार वर्षात पाचजण निवर्तले. किती दुःख सोसायचे ? देणेकरी पैसे देत नव्हते. खाण्या-पिण्याची आबाळ होत होती. समाजातील पत निघून गेली. संसारतापाने तुकोबाराय हैराण झाले. मग मात्र वैराग्य निर्माण झाले. रानात, डोंगरात जाऊ लागले. 'संसार तापे तापलो मी देवा । करीता या सेवा कुटुंबाची ॥' तु.म.

३) **साधक जीवन** - कर्माला दोष देत, संसाराचा गाडा चालवत तुकोबाराय भजन करू लागले. ज्ञानेश्वरीची पारायणे केली. नामदेवरायांचे अभंग पाठ केले. भंडारा डोंगरावर जाऊन भागवताची असंख्य पारायणे केली. (आख्यायिका एक हजार पारायणे केली.) संसार सांभाळून रात्रौ कीर्तनास जाऊ लागले. प्रथम टाळकरी होऊन धृवपद म्हणू लागले. दुसरी पत्नी जीजाई मात्र स्वभावाने रागीट होती. पैसे कर्जाऊ आणून व्यापार करण्याचा प्रयत्न केला. पण ज्यांचे चित्त विठ्ठल भजनात रममाण झाले आहे त्यांना व्यापारात काय रस वाटणार ? तुकोबारायांना मुले मात्र सहा. मुलगे - महादेव, विठोजी, नारायण (नारायण वैकुंठ गमनानंतर जन्मास आले.) मुली - काशीबाई, भागिरथी व शेवटची मुलगी गंगाबाई. तुकोबारायांनी तीन मुलींची लग्ने एकदमच करून टाकली, अर्थात साध्या पद्धतीने.

४) **सिद्ध जीवन** - हे मुळचेच अवतारी पुरुष असल्यामुळे देवाचे ध्यान करीत डोंगरात राहत होते. एकदा सात दिवस घरी आलेच नाहीत. त्यांचे भाऊ कान्होबा शोधत होते. शेवटी त्यांना हे भामचंद्र पर्वतावर सापडले. पण प्रत्यक्ष पांडुरंग त्यांच्या बरोबर होते. देवाचा साक्षात्कार झाला. जीवन सफल झाले. स्वतःच्या वाट्याच्या, वसुलीच्या वह्या इंद्रायणी डोहात बुडवल्या, अर्ध्या कान्होबास दिल्या.

५) **संत जीवन** - तुकोबारायांनी सर्व आयुष्य कीर्तनात घालवले. 'हरि भजने हे धवळले जग । चुकविला लाग कळिकाळाचा ॥' तु.म. नामस्मरणाच्या माध्यमातून भक्तिचा प्रचार, प्रसार केला. 'तुका म्हणे आता । उरलो उपकारा पुरता ॥' महाराजांच्या जीवनात अनेक घटना घडल्या. त्यात प्रमुख १) शिवाजी महाराजांचा नजराणा न स्विकारणे. २) तेरा दिवस पाण्यात राहिलेल्या अभंगांच्या वह्या कोरड्या राहणे. ३) चिंचवडच्या मोरया गोसावी यांच्याबरोबर गणपती बाप्पा व विठोबास जेवावयास लावणे. ४) मंबाजीबुवांच्या काट्याच्या काठीने मार खाऊन क्षमा प्रगट करणे. ५) कीर्तनात

शिवाजी राजे बसले असता परचक्र परतवून लावणे. अर्थात हे सर्व विठोबांनी केले. ६) स्वत:बरोबर शिंगणापुरी शंकरास भोजन घालणे. ७) शिवबा कासारांच्या बायकोने उकळते पाणी अंगावर टाकले पण महाराजांनी सहन केले. सोमल विष पचवले. ८) सर्वात महत्त्वाची घटना म्हणजे कलीयुगात वयाच्या बेचाळीसाव्या वर्षी सदेह वैकुंठगमन केले ! 'मानव देह घेऊनी निजधामा गेले ॥' निळो. तुकोबांनी वैकुंठगमन केले तरी त्यांच्या भेटीकरिता निळोबारायांनी ४२ दिवस अनुष्ठान केले. प्रत्यक्ष देव भेटावयास आले पण निळोबांनी देवास सांगितले, 'तुकयाचा धावा करतो आहे.' तुकोबारायांनी निळोबांना प्रत्यक्ष भेट दिली व प्रसाद दिला. तुकोबारायांचे बंधू कान्होबा यांना स्वप्नात भेट दिली. सुंदउंबऱ्याचे एक कानडी वाणी, गवरशेट यांनी तुकोबांची सेवा केली होती. गवरशेटने सांगितले, 'मला आपली अंतकाळी भेट हवी.' तुकोबानी त्यांना वैकुंठगमनानंतर भेट दिली. बहिणाबाईंना पण तुकोबानी स्वप्नात भेट दिली. संताजी जगनाडे यांच्या अंतकाळी प्रेतास मूठ-माती दिली. तुकोबारायांची एक मुलगी भागिरथी वैकुंठगमन झाल्यानंतर अत्यंत व्याकुळ झाली. तिला पण तुकोबारायांनी भेट दिली. वासकरांचे मूळ पुरुष मल्लाप्पा वासकर महाराज यांना मंचर गावी ग्रंथाचा प्रसाद दिला. सर्व गावकऱ्यांच्या समोर खिडकीत ठेवलेल्या ग्रंथातून एक वही हवेतून मल्लाप्पांच्या हाती आली तीच वही म्हणजे वासकर घराण्यांची 'मंचरी' होय. ज्ञानी-अज्ञानी बऱ्याच लोकांना तुकोबारायांनी स्वप्नात प्रत्यक्ष भेट दिली. अद्याप भेट देतात. पण आपला अधिकार वाढला पाहिजे. तळमळ वाढली पाहिजे. वारकरी सांप्रदायाचे संत हे मरके नाहीत. सर्वांची संजीवन समाधी आहे व तुकोबारायांचे सदेह वैकुंठगमन आहे. एक म्हण आहे, 'मरका गुरू रडका चेला । दोहीचा बोध वाया गेला ॥' ज्ञानोबाराय, तुकोबाराय, नाथ महाराज, नामदेवराय हे सर्व आपणास सध्या भेटू शकतील, पण आपली साधना, उपासना तेवढीच पाहिजे. राम आपणास भेटण्यास येतील पण आपण शबरी झाले पाहिजे. कृष्ण आपणास भेटतील पण विदुर झाले पाहिजे. तसे संत आपणास भेटतील पण आपण त्यांचे खरे भक्त व्हावयास हवे.

संतांना 'महाराज' ही पदवी आहे. महाराज कोणास म्हणावे ? शंकराचार्य राजाची व्याख्या अशी करतात -

**अकृत्वा शत्रूसंहारमगत्वाऽखिल भूश्रियम् ।**
**राजाहमिति शब्दान्नो राजा भवितुमर्हति ॥ वि.चु.**

**अर्थ -** जो शत्रूचा संहार करतो व संपूर्ण पृथ्वीचे राज्य भोगतो, त्यास राजा म्हणतात. या उलट जो शत्रूचा संहार करत नाही, पृथ्वीचा उपभोग घेत नाही, त्यास राजा कसे म्हणावे ? रामदास स्वामींनी शिवाजींना राजे म्हटले आहे. 'यशवंत किर्तीवंत । सामर्थ्यवंत वरदवंत । पुण्यवंत नीतिवंत । जाणता राजा ॥' यावरून 'महाराजांची' व्याख्या अशी होते की ज्यांनी आतल्या सहा शत्रूंना जिंकले आहे व जे स्वानंद साम्राज्यांचा उपभोग घेतात त्यांना 'महाराज' म्हणतात. तुकोबाराय

ज्ञानोबांना महाराज म्हणतात.

**करील ते काय नोहे महाराज । परी पाहे बीज शुद्ध अंगी ॥ तु.म.**

**क्षमा करा अपराध । महाराज तुम्ही सिद्ध ॥ तु.म.**

तुकोबारायांना निळोबाराय महाराज म्हणतात.

**महाराज हा जन्मला मृत्यूलोकीं । दुजी उपमा नाढळे ईहलोकीं ।**
**भवसिंधूसीं बांधला सेतू जेणे । अनाथा दीना कारणें तुकयानें ॥ निळो.**

तु.म. म्हणतात दीनास महाराज म्हणू नका.

**म्हणवितां हरिदास कां रे नाहीं लाज । दीनासी 'महाराज' म्हणसी हीना ॥**

★★★★★

## (४९) व्यास

**नमोऽस्तुते व्यास विशालबुद्धे, फुल्लारविन्दायतपत्रनेत्र ।**
**येन त्वया भारत तैलपूर्णः प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः ॥**

**अर्थ -** ज्यांची बुद्धी विशाल आहे, ज्यांचे कमलनेत्र प्रफुल्ल व विस्तृत आहेत, ज्यांनी महाभारत रूपी परिपूर्ण तेलयुक्त, ज्ञानमय श्रेष्ठ दिवा प्रज्वलित केला, अशा व्यासांना नमस्कार असो.

"व्यासो नारायणः" अशी उक्ति आहे. यांची परंपरा अशी आहे, ब्रह्मदेवाचे मानसपुत्र वसिष्ठ मुनी, वसिष्ठांची १०० मुले विश्वामित्रांनी मारली. पण यांना क्रोध आला नाही. त्यांचा एक मुलगा शक्ती, त्याची पत्नी गरोदर होती. शक्तीचा मुलगा पराशर व पराशराचे पुत्र व्यास व व्यासांचे पुत्र शुकाचार्य (शुक) मात्र ब्रह्मचारी राहिले. मत्स्यगंधेपासून पराशर ऋषींचा हा मुलगा बेटात जन्मला, म्हणून व्यासांचे द्वैपायन असेही नाव आहे. यांनी वेदांचे चार भाग केले. अठरा पुराणे निर्माण केली. महाभारता-सारखा अद्वितीय ग्रंथ निर्माण केला. या ग्रंथांचे लेखक गणपती बाप्पा होते. वाल्मिकी ऋषीनंतर यांच्या नावावर 'शतकोटी' वाङ्मय आहे.

**म्हणऊनि महाभारतीं जें नाहीं । तें नोहेचि लोकीं तिहीं ।**
**येणें कारणें म्हणिपे पाहीं । व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥ ज्ञाने.१/४७**

व्यासांना तीन देवांची उपमा आहे.

**अचतुर्वदनो ब्रह्मा द्विबाहुरपरो हरिः । अभाललोचनः शंभुर्भगवान बादरायणः ॥**

**अर्थ -** चार मुख नाहीत पण ब्रह्मदेव आहेत. चार भुजा नाहीत पण हरि आहेत. तिसरा डोळा नाही पण शंकर आहेत. असे, हे भगवान बादरायण आहेत. चिरंजीवामध्ये यांचा क्रमांक आहे. म्हणून यांची जन्मतिथी साजरी केली जाते. आषाढ पौर्णिमा ही गुरुपौर्णिमा म्हणून ओळखली जाते. अर्थात या पौर्णिमेस व्यास पौर्णिमा म्हणतात. या दिवशी व्यास पूजा केली जाते. ज्ञानोबाराय म्हणतात यांचे जगावर उपकार आहेत.

**म्हणौनि श्रीव्यासाचा हा थोरु । विश्वासि जाला उपकारु ।**
**जे श्रीकृष्णउक्ती आकारु । ग्रंथाचा केला ॥ ज्ञाने.१८/१७०७**

श्रीकृष्णांनी अर्जुनास रणांगणात दोन घटका गीता सांगितली. त्याचे ७०० सुंदर, सोपे श्लोक व्यासांनी लिहिले.

**आणि कृष्णार्जुनीं मोकळी । गोठी चावळिली जे निराळीं ।**
**ते श्रीव्यासें केली करतळीं । घेवों ये ऐसी ॥ ज्ञाने.१८/१६९६**

भरपूर वाङ्मय निर्माण करून व्यासांचे समाधान झाले नाही. म्हणून नारदांनी त्यांना श्रीकृष्ण लीला लिहिण्यास सांगितले. या लीला म्हणजे अठरावे महापुराण 'भागवत'. हे लिहिल्यानंतरच त्यांचे समाधान झाले. हे भागवत प्रथम विष्णूंनी आपल्या पुत्रास, ब्रह्मदेवांस सांगितले. ब्रह्मदेवांस त्यांच्या सनकादिक पुत्रांनी प्रश्न विचारला होता. चित्तात विषय का विषयात चित्त ? ब्रह्मदेवांना उत्तर देता आले नाही. आपल्या पुत्राची विवंचना जाणून श्रीहरिंनी हंसरूप धारण केले व चतुःश्लोकी भागवत सांगितले. 'हंसरूपी ब्रह्मा उपदेशी श्रीहरि । चतुःश्लोकी चारी 'भागवत' ॥' निळो. हेच भागवत ब्रह्मदेवांनी नारदांना सांगितले. नारदांनी व्यासांना सांगितले. व्यासांनी १८००० श्लोकांत भागवत लिहिले. (एकनाथ महाराजांनी एकादश स्कंदावर १८००० मराठी ओव्या लिहिल्या) व्यासांचे पुत्र शुकाचार्य जन्मताच संसारास घाबरून जंगलात पळून गेले. व्यासांना वाटले, भागवताचा अधिकारी कोण निवडावा ? त्यांना शुकाचार्यासारखा दुसरा कोणी वक्ता दिसेना. व्यासांनी, ज्या ठिकाणी शुकाचार्य तपश्चर्या करीत होते तेथे आपले दोन शिष्य पाठविले व भागवतातील फक्त दोन श्लोक उच्चारण्यास सांगितले ते श्लोक -

१) **बर्हापीडं नटवरवपुः कर्णयोः कर्णिकारं ।**
**बिभ्रद् वासः कनककपिशं वैजयन्तीं च मालाम ।**
**रन्ध्रान् वेणोरधरसुधया पूरयन् गोपवन्दै ।**
**वृन्दारणं स्वपदरमणं प्राविशद् गीतकीर्तिः॥ भा.१०/२१/५**

**अर्थ -** ज्यांनी मोर मुगूट धारण केला आहे, ज्यांचे शरीर नरश्रेष्ठ आहे, दोन्ही कानांमध्ये कुंडलं धारण केली आहेत, ज्यांनी सुवर्णमय पीतवस्त्र धारण केले आहे, गळ्यात कणेरची पिवळी फुले,

वैजयंती माला धारण केली आहे, आपल्या अमृतरूपी अधरांनी वेणुचे छिद्र झाकले आहे, गोपसमूहाकडून ज्यांची कीर्ती गायली जात आहे व ज्यांचे रमणीय चरणकमळ वृन्दावनामध्ये प्रवेश करीत आहेत.

२) **अहो बकी यं स्तनकालकूटं जिघांसयापाययदप्यसाध्वी ।**
**लेभे गतिं धात्र्युचितां ततोऽन्यं कं वा दयालुं शरणं व्रजेम ॥ भा.३/२/२३**

**अर्थ -** अहो, जी पुतना स्तनात विष भरून श्रीकृष्णास मारण्यास आली, ज्या पुतनेस श्रीकृष्णांनी उत्तम गती दिली, अशा दयाळू श्रीकृष्णास आपण का शरण जात नाही ?

हे श्लोक ऐकल्यानंतर शुकांची समाधी उतरली. शिष्यांना विचारले, 'हे श्लोक कोणाचे आहेत ?' शिष्य म्हणाले, 'आमचे गुरू व्यास यांचे भागवतातील श्लोक आहेत. असे १८००० सुंदर श्लोक आहेत.' शुकाचार्य भागवत ऐकण्याकरिता व्यासांकडे आले. भागवत ऐकले, तृप्त झाले. विषयांना जिंकूनच उदराच्या बाहेर येणारे शुक श्रीकृष्णांच्या विषयांचे वर्णन करू लागले. हेच भागवत शुकाचार्यांनी परिक्षितीला सांगून सात दिवसात त्यांचा उद्धार केला. व्यासांनी सामान्य लोकांकरिता मौल्यवान ग्रंथ लिहिले - 'गीता' व 'भागवत'. कलीयुगातील लोकांच्या उद्धाराकरिता हे महत्त्वाचे ग्रंथ आहेत. नाथ महाराजांनी मराठी लोकांकरिता भागवत लिहिले. 'तुका म्हणे भागवत । केले श्रुत सकळा ॥' अशा विशाल बुद्धी व्यासांना साष्टांग दंडवत !

★★★★★

## (५०) दत्तात्रय

दत्तात्रय योगी आहेत. शंकर योगीराज आहेत. श्रीकृष्ण आहेत योगेश्वर व ज्ञानोबाराय आहेत, योग्यांची माऊली !

ज्ञानोबा - **ज्ञानराज माझी योग्यांची माऊली। जेणे निगम वल्ली प्रगट केली ॥ नाम.**

श्रीकृष्ण - **यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ गीता १८/७८**

शंकर - **कैलाशीचा देव भोळा चक्रवर्ती । पार्वतीचा पती योगीराज ॥ नाम.**

दत्तात्रय - **पैल मेंरूच्या शिखरी । एक योगी निराकारी ।**
**मुद्रा लावुनी खेचरी । प्राणायामी बैसला ॥१॥**

**तेणे सांडियेली माया । त्यजीयेली कंथा काया ।**
**मन गेले विलया । ब्रह्मानंदा माझारी ॥२॥**

**अनुहत ध्वनी नाद । तो पावला परमपद ।**
**उन्मनी तुर्या विनोदे । छंदे छंदे डोलतुसे ॥३॥**

**ज्ञान गोदावरीच्या तिरी । स्नान केले पांचाळेश्वरी ।**
**ज्ञान देवाच्या अंतरी । दत्तात्रय 'योगीया' ॥४॥**

यांचा जन्म अत्रि जे त्रिगुणातीत आहेत व माता अनुसया जिच्याकडे एकही दोष नाही, यांच्या उदरी झाला. दत्तात्रय याचा तात्विक अर्थ आहे दत्त म्हणजे दान, त्रय म्हणजे तिघांनी दिलेले. ब्रह्मा विष्णू, महेश, आपापल्या पत्नींच्या आग्रहावरून जेव्हा अनुसयेची परीक्षा पाहण्याकरिता आले तेव्हा तिच्याकडे विवस्त्र जेवण मागितले. अनुसयेस धर्मसंकट पडले. तिने अत्रिंना विचारले काय करावे ? अत्रिंनी सांगितले त्यांना आत बोलव. मंत्रांच्या सहाय्याने त्यांच्यावर पाणी शिंपड. ते तिघे लहान बालक होतील. नंतर स्तनपान कर. पाळण्यात घालून झोके दे. तुला दोष लागणार नाही अनुसयेने तसे केले. ब्रह्मा विष्णू महेश बालक झाले. त्यांना तीन पाळणे तयार केले. झोके देऊन गीत म्हणू लागली. ब्रह्मदेवास म्हणाली, 'सृष्टी उत्पन्न करून आपण थकला आहात, आता माझ्या कुशीत विश्रांती घ्या.' विष्णूंना म्हणाली, 'जगातील सर्व जीवांची काळजी करता करता आपणास फार त्रास झाला आहे. आपण माझ्याजवळ शांतता अनुभवावी.' शंकरांना सांगितले, 'आपण संहार करून दुःख भोगले आहे. इथे सुखरूप रहा.' खरं म्हणजे सती व संत यांच्या सानिध्यात देवांना खरी विश्रांती मिळते. आपले पती बरेच दिवस परत आले नाहीत म्हणून सरस्वती, लक्ष्मी, पार्वती अनुसयेच्या आश्रमात आल्या, पाहतात तर आपले पती बालक झालेले आहेत. अनुसयास म्हणाल्या 'आमचे पती आम्हास परत द्यावे.' अनुसया म्हणाली, 'ओळखून घेऊन जा !' तिघींना आपले पती ओळखता येत नव्हते. अनुसया म्हणाली, 'एवढे दिवस संसार करून आपले पती ओळखता येत नाहीत, मोठे आश्चर्य आहे !' तिघींचा अहंकार गेला. तिघी अनुसयास शरण गेल्या. मंत्रांचे पाणी शिंपडल्यानंतर तिन्ही देव मूळ स्वरूपात आले. तिघांनी वर मागण्यास सांगितले. अत्रि, अनुसया म्हणाले, 'आपण आमचे पुत्र व्हावे.' तिघे पुत्र झाले. चंद्र हे ब्रह्मदेवाचे अंश, दत्तात्रय हे विष्णूचे अंश व दुर्वास हे शंकराचे अंश आहेत. दत्तात्रयात मात्र तिन्ही देवांचे अंश आहेत. म्हणून यांना तीन मुखे व सहा हात आहेत. ज्या प्रमाणे जगात सात चिरंजीव आहेत त्या प्रमाणे दत्तात्रय पण चिरंजीव आहेत. यांची पुण्यतिथी साजरी होत नाही पण जन्मतिथी साजरी होते. यांचा जन्म मार्गशीर्ष पौर्णिमेस दिवस मावळताना झाला आहे. हनुमंतांचा जन्म मात्र चैत्र पौर्णिमेस दिवस उगवताना झाला आहे दत्तात्रयांना अवधूत म्हणतात. सध्या पण बऱ्याच अधिकारी दत्तभक्तांना हे दर्शन देतात. हे रोज वाराणसीस स्नान करतात, कोल्हापुरला जप करतात, माहुरीपूरला भिक्षा मागतात व सह्याद्रिच्या कुशीत वास्तव्य करतात.

**वाराणसीपुर स्नायी कोल्हापुर जपादरः । माहुरीपुर भिक्षाशी सह्यशायी दिगंबराः ॥**

वारकरी सांप्रदाय तीन पंथांचा आहे. १) नाथ २) दत्त ३) चैतन्य. नाथ पंथाचे अध्वर्यू आहेत ज्ञानेश्वर महाराज, दत्त पंथाचे एकनाथ महाराज व चैतन्य पंथाचे तुकोबाराय. या सर्वांनी आपले पंथ वारकरी सांप्रदायामध्ये समाविष्ट केले आहेत. नाथांनी दत्तात्रयांचे वर्णन करणे साहजिकच आहे. कारण दत्तात्रयांनी त्यांना दर्शन प्रसाद दिला आहे. ज्ञानोबाराय दत्तात्रयांचे वर्णन करतात. तुकोबाराय पण दत्तात्रयांचे वर्णन करतात. 'तीन शिरे सहा हात । तया माझे दंडवत ॥' पण हा अभंग क्षेपक समजला जातो. जो देवडीकरांची गाथा आहे त्यात हा अभंग नाही पण तुकोबाराय नाव न घेता दत्तात्रयांचे वर्णन करतात.

**पाणीपात्र दिगंबरा । हस्त करा सारिखे ॥१॥**

**आवश्यक देव मनी । चिंतनीच सादर ॥२॥**

**भिक्षा कामधेनु ऐसी । अवकाशी शयन ॥३॥**

**पांघरोनी तुका दिशा । केला वास अलक्षी ॥४॥**

महाराष्ट्रामध्ये १) औदुंबर क्षेत्र २) नरसिंह वाडी ३) गाणगापुर (सध्या कर्नाटक) ४) माहुरगड. ही प्रसिद्ध दत्ताची तीर्थे मानली जातात. महाराष्ट्रातून अंबेजोगाईमध्ये दासोपंत नावाचे मोठे विद्वान दत्तउपासक होऊन गेले. यांच्या बरोबर दत्त सोंगट्या खेळत असत. त्यांचा सांप्रदाय पण चालू आहे व मोठ्या उत्साहात दत्तजयंती साजरी करतात. दत्तात्रयांनी केलेले चोवीस गुरू भागवतात प्रसिद्ध आहेत. नाथ महाराजांचा जन्मकालाचा अभंग देऊन दत्तात्रयांना साष्टांग नमस्कार.

**धरी अवतार विश्व तारावया । अत्रिची अनसूया गरोदर ॥१॥**

**ऋतू काळ हेमंत नक्षत्र रोहिणी । शुक्ल पक्ष दिनीं पूर्ण तिथी ॥२॥**

**तिथी पौर्णिमा मास मार्गशीर्ष । गुरू तो वासर उत्सव काळ ॥३॥**

**एका जनार्दनी पूर्ण अवतार । निर्गुण निराकार आकारले ॥४॥**

★★★★★

# (५१) विवेक - वैभव

**कथा -** एका गावात विवेक व वैभव दोन मित्र राहत होते. आई-वडील गरीब असल्यामुळे त्यांना शिकता आले नाही. २४-२५ वर्षांचे वय झाले. उपजीविकेकरिता काही तरी उद्योग करावा म्हणून दोघेजण जंगलात जाऊन लाकडे तोडून ती शहरात विकू लागले. दोघे मित्र एकत्र काम करीत होते पण विचार भिन्न होते. कधी कधी वैभव म्हणायचा, 'मला अचानक भरपूर संपत्ती मिळाली तर किती मजा येईल !' विवेक म्हणायचा, 'मला शिकण्यास मिळाले तर किती बरे होईल !' कर्मधर्म-

संयोगाने एकदा विवेक-वैभव जंगलात लाकडे तोडत असताना, जंगलातून आवाज आला, 'वाचवा वाचवा.' दोघांनी लाकडे तोडणे बंद केले व ज्या दिशेने आवाज आला तिकडे कुऱ्हाडी घेऊन धाव घेतली. पाहतात तो एक गोरा-गोमटा माणूस, वाघाच्या तडाख्यात सापडला होता. वाघाने त्यास रक्तबंबाळ केले होते व तो ओरडत होता. या दोघांनी वाघाला कुऱ्हाडीचे घाव घातले. वाघ घाबरला व पळून गेला. विवेक-वैभवने विचारले, 'आपण कोण व एकटेच निःशस्त्र कसे ?' तो म्हणाला, 'मी या राज्याचा राजा आहे. मी शिकारीस आलो होतो पण सैन्याची व माझी चुकामूक झाली. माझ्या हातात शस्त्र नव्हते. नेमका वाघाच्या तडाख्यात सापडलो. आपण आलात, माझी वाघाच्या तावडीतून सुटका केली. मी आपला अत्यंत आभारी आहे.' एवढ्यात चुकामूक झालेले सैनिक राजाचा शोध घेत राजाजवळ आले. राजानी विवेक-वैभवला सांगितले, 'आपण मला वाचविले. उद्या दरबारात यावे. मी आपला सत्कार करणार व आपले मनोगत पूर्ण करणार. कृपया आपण सकाळी १० वाजता वेळेवर यावे.' विवेक-वैभवच्या आनंदास पारावर राहिला नाही. दोघांना रात्रभर झोप आली नाही. राजाकडे काय मागावे हाच विचार. सकाळी दोघे उठून चांगले कपडे करून राजधानीकडे निघाले. राजवाड्यासमोर उभे राहून राजानी दोघांचे स्वागत केले. सभेमध्ये दोघांचा उत्कृष्ट सत्कार केला. सर्वांना सांगितले, 'या दोघांमुळे माझे काल प्राण वाचले. यांच्या इच्छेप्रमाणे मी यांना देणगी देणार आहे.' राजा वैभवास म्हणाला, 'तुला हवे असेल ते मागून घे.' वैभव म्हणाला, 'राजे सरकार मला दहा हजार सोन्याच्या मोहरा मिळाव्या.' राजाने सांगितले, 'आपल्या भांडारातून यास दहा हजार सोन्याच्या मोहरा द्या.' वैभवास मोहरा मिळाल्या. विवेकास विचारले, 'तुला काय हवे आहे ?' विवेक म्हणाला, 'मला ज्ञान मिळविण्याची तीव्र इच्छा आहे. चांगल्या गुरूकडे मला शिकण्याची व्यवस्था करावी.' वैभव विवेकवर वैतागला व म्हणाला, 'मूर्खासारखे काय मागतो आहेस ? शिकून कुणाचे भले झाले आहे ? माझ्यासारखे वैभव (संपत्ती) मागून घे.' विवेक म्हणाला, 'मला संपत्तीत रस नाही. मला शिक्षणात रस आहे.' राजाने विवेकच्या इच्छेप्रमाणे त्यास राजगुरूकडे शिकण्यास ठेवले. वैभव १० हजार सोन्याच्या मोहरा घेऊन गावी गेला. बरेच मित्र मिळाले व मजा करायला लागले. वैभव व्यसनाधीन झाला व दहा वर्षात १० हजार सोन्याच्या मोहरा संपवून परत दरिद्री झाला. होता त्या झोपडीत राहू लागला व लाकडे तोडून उपजीविका करू लागला. इकडे विवेक १० वर्षात राजगुरूकडे सर्व शास्त्र शिकला. गुरूंची सेवा करून, विनयाने वागून गुरूंची मर्जी संपादन केली. राजगुरू म्हातारे झाले होते. राजगुरूंनी एक दिवस राजास सांगितले, 'मी आता सेवा निवृत्त होतो. माझ्यानंतर या विवेकला राजगुरू पद द्या. तो त्या पदास अतिशय योग्य आहे. माझा मुलगा या पदाच्या पात्रतेचा नाही.' राजाने राजगुरूंच्या मनाप्रमाणे विवेकचा सत्कार करून राजगुरूची जबाबदारी त्याच्यावर टाकली. विवेक राजगुरू झाला. विवेकला वाटले वैभव कोणत्या परिस्थितीत आहे पाहावा म्हणून तो ५-६ शिष्यांना घेऊन जुन्या गावी पोहोचला. पण त्यास दिसले वैभव जुन्याच झोपडीत राहत होता. शिवाय लाकूडतोड्याचा धंदा करीत होता. विवेक त्याच्या समोर गेला व म्हणाला,

'वैभव मला ओळखले का ?' वैभव म्हणाला, 'नाही.' विवेक म्हणाला, 'आपण जुने मित्र. राजाकडे तू १० हजार सोन्याच्या मोहरा मागितल्यास व मी शिक्षण मागितले. तू धन व मी ज्ञान.' वैभवाने विवेकास मिठी मारली. डोळ्यातून घळघळा अश्रू वाहू लागले. विवेकने विचारले, '१० हजार सोन्याच्या मोहरा मिळून तू दरिद्री का ?' वैभवने उत्तर दिले, 'वैभव मिळाले पण विवेकाची संगत सुटली.' जीवनात वैभव महत्त्वाचे नाही, विवेक महत्त्वाचा आहे.

ज्ञानेश्वरी (गीता) म्हणजे विवेकाचे उद्यान आहे. उद्यानात अनेक प्रकारची झाडे असतात. तसे ज्ञानेश्वरीत अनेक विचार आहेत.

**आता अवधारा कथा गहन । जे सकळां कौतुकां जन्म स्थान ।**
**कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें ॥ ज्ञाने.१/२८**

गीता - ज्ञानेश्वरी म्हणजे विवेकाची गोठी आहे.

**आधींचि विवेकाची गोठी । वरी प्रतिपादी श्रीकृष्ण जगजेठी ।**
**आणि भक्तराजु किरीटी । परीसत असे. ॥ ज्ञाने ४/२**

ज्ञानोबाराय सांगतात ज्याच्या जीवनात विचार नाही त्याच्यात व कावळ्यात काही फरक नाही. कावळा कुठे विवेकी असतो काय ?

**अगा वांता कां वाढिलेया । साजुक कां सडलिया ।**
**विवेकु कावळिया । नाहीं जैसा ॥ ज्ञाने.१८/५५६**

ज्ञानोबाराय सांगतात संतांच्या जवळ विवेक असतोच

**चंद्र तेथे चंद्रिका । शंभु तेथें अंबिका ।**
**संत तेथें विवेका । असणें कीं जी ॥ ज्ञाने.१८/१६३२**

**कोटी -** १) काहींच्या ठिकाणी वैभव नाही व विवेकही नाही - दुष्ट दरिद्री लोक

२) काहींच्या ठिकाणी वैभव आहे पण विवेक नाही - व्यसनाधीन लोक

३) काहींच्या ठिकाणी वैभव नाही पण विवेक आहे - ही माणसे समाधानाने राहतात.

**वैभव सकळ । तुका मानितो विटाळ ॥**

(देव दुरावत असताना वैभव विटाळ समजतात.)

४) काहींच्या ठिकाणी वैभवही आहे विवेकही आहे - उदा. नाथ महाराज अथवा पूर्वीचे राजर्षि-दशरथ, भोजराजा, अंबऋषी, विक्रमराजा वगैरे.

१) **काही गोष्टी विचारपूर्वक कराव्या -**

**दृष्टांत** - उज्जयनी नगरीत एक ब्राह्मण जोडपे राहत होते. भिक्षुकी करून पोट भरत होते समाधानी होते. पत्नी महाकालीची भक्ती करीत होती. त्यांनी एक मुंगूस पाळले होते. सुदैवाने त्यां एक मुलगा झाला. एकदा ब्राह्मण पत्नी नवऱ्यास सांगून महाकालीच्या पूजेस गेली. ब्राह्मण असताना राजाचा निरोप आला म्हणून पूजेस निघून गेला. राजाकडून मोठी दक्षिणा मिळणार हो मुलाच्या संरक्षणाकरिता मुंगूसास ठेवले. घरात फक्त एक बालक व मुंगूस होते. एवढ्यात ए छिद्रातून काळा नाग आला. बालकाच्या संरक्षणाकरिता मुंगूसाने नागाचे तुकडे तुकडे करून टाक मालकाची वाट पाहत मुंगूस दाराजवळ थांबले. पूजा आटोपून ब्राह्मण घरी आला. दारात मुं पाहिले. त्याच्या तोंडास रक्त होते. त्याला वाटले मुंगूसाने बालकास मारले असावे. रागाच्या भर हातात पाण्याचा मोठा तांब्या होता तो मुंगूसाच्या डोक्यात घालून त्यास ठार मारले. लगबगीने अ गेला. त्यास दिसले बालक खेळत होते व बाजूस सापाचे तुकडे पडले होते. त्यास पश्चाताप झा पण वेळ निघून गेली होती.

२) एका मुलीचे लग्न झाले होते. पण पूर्वीचा तिचा प्रियकर तिला चोरून पत्र पाठवित होत नवऱ्याच्या भीतीने तिने सर्व पत्रे शेजारी असणाऱ्या मैत्रिणीकडे ठेवण्यास दिली होती. मात्र तिनेप नवऱ्यास कल्पना दिली नव्हती. एकदा सुट्टीच्या दिवशी, बायको घरात नसताना कपाटाच्या कप्प्या ही सर्व पत्रे मिळाली. त्यास वाटले, आपल्या पत्नीचाच प्रियकर असावा व तो चोरून पत्र पाठवि आहे. रागाच्या भरात हा दारूच्या अड्ड्यावर गेला. बायको घरी येऊन झोपली होती. नशेत घ आला व घरातील पाटा उचलून बायकोच्या डोक्यात घातला. त्यास अटक झाली. काही दिवसां शेजारची बायकोची मैत्रिण पत्रे मागण्यास आली तेव्हा त्यास सर्व प्रकार कळला. आता आयुष्या पश्चातापाशिवाय काहीच नव्हते. अविचाराने अशा गोष्टी घडतात.

३) **चांगल्या गोष्टींचा विचार ताबडतोब करा -**

**दृष्टांत** - एका श्रीमंताच्या मुलास एक मुलगी लग्नाकरिता दाखविण्यास आणली. त्याने मुल पाहिली. पण तो विचारवंत होता. खूप विचार केल्याशिवाय तो कोणतीच गोष्ट अमलात आण नसल्यामुळे त्याने सांगितले मी विचार करून सांगतो. सर्व चौकशी केली. खूप विचार केला व दो वर्षांनि तो त्या मुलीच्या घरी गेला व म्हणाला, 'मी विचार करून आलो आहे. माझी लग्नाची तयार आहे.' घरच्या लोकांनी सांगितले तिचे लग्न होऊन तिला एक मुलगासुध्दा आहे. काही गोष्टींच विचार ताबडतोब करावा. चांगल्या गोष्टी लवकर अमलात आणाव्या.

४) वाईट गोष्टींचा विचार करू नये. जरी डोक्यात वाईट विचार आला तर वेळ टाळावी. कदाचि विचार बदलेल व नुकसान टळेल.

**कथा :** एकदा एक अविचारी बाप रागाच्या भरात आपल्या मुलास म्हणाला, 'तुझ्या आईस जंगलात घेऊन जा व मारून टाक.' मुलाने आईस मामाकडे नेली व तिथेच राहिला. मुलाने वाईट विचार लवकर अमलात आणला नव्हता. चार दिवस गेले. घरात अडचण पडू लागली. मुलगा घरी आला. बाबाचा राग शांत झाला होता. पत्नीचे महत्त्व कळले होते. 'मुलास विचारले आईस मारली नाहीस ना ?' मुलगा म्हणाला, 'आई मामाकडे आहे.' वडील म्हणाले, 'बरे झाले, तुझी वाईट विचार लवकर अमलात आणायचा नाही ही सवय चांगली आहे. नाहीतर मी पत्नीस व तू आईस मुकला असतास. मराठीत म्हण आहे, 'आपला राग व भीक माग.'



## (५२) प्रारब्ध - पुरुषार्थ

**कथा -** एका गावात रोगाची साथ आली. एक रुग्ण एका वैद्याकडे गेला व म्हणाला, 'डॉक्टर माझ्या पोटात गडबड आहे. शिवाय डोळेसुद्धा खूपतात.'' डॉक्टरांनी त्यास तपासले. दोन औषधाच्या पुड्या दिल्या व म्हणाले, 'ही पिवळी पुडी रात्री झोपताना गरम पाण्यात मिक्स करून डोळ्यात टाकावी. वस्त्रात गाळून घेतली तर उत्तमच. ही दुसरी हिरवी पुडी आहे हे औषधसुद्धा रात्री झोपताना पाण्यातून घ्यावे. हे पोटाकरिता आहे.'

त्याच्यानंतर दुसरा रुग्ण (पेशंट) आला. त्यास तपासले व डॉक्टर म्हणाले, 'गावात साथ आहे. आपणास काय त्रास आहे ?' रुग्ण म्हणाला, 'माझे पोट व डोळे खूप दुखत आहेत.' डॉक्टरांनी त्या रुग्णालासुद्धा तेच औषध दिले. डोळ्याकरिता पिवळ्या पुडीतील व पोटाकरिता हिरव्या पुडीतील औषध गरम पाण्यातून घेण्यास सांगितले.

पहिला रुग्ण थोडा विसरभोळा होता. त्याने डॉक्टरांनी दिलेले औषध घेतले पण औषध घेतल्या बरोबर पोटात जास्त दुखायला लागले व डोळे जास्त खुपायला लागले. रुग्ण रात्रभर अंथरुणावर लोळत, विव्हळत राहिला व मनातल्या मनात डॉक्टरांना शिव्या देऊ लागला. कधी दवाखाना उघडतो व डॉक्टरांना भेटून त्यांची कान-उघाडणी करतो असे त्यास झाले. सकाळी ९ वाजता दवाखाना उघडल्याबरोबर हा पहिला रुग्ण डॉक्टरांकडे गेला व म्हणाला, 'डॉक्टर, मला मारून टाकण्याचा विचार आहे काय ? माझे आयुष्य बलवत्तर म्हणून मी सकाळपर्यंत जगलो. तुमचे औषध घेतले व उलटा परिणाम झाला. दुखणे बरे होण्याऐवजी वाढतच चालले आहे.' डॉक्टर म्हणाले, 'हे पहा मी २० वर्षे दवाखाना चालवितो आहे. माझ्या औषधामुळे कदाचित रोग बरा होणार नाही पण माझ्या औषधाचा उलटा परिणाम होईल हे शक्यच नाही.' रुग्ण म्हणाला, 'पण तसे झाले आहे.'

यांची ही चर्चा चालू असतानाच दुसरा रुग्ण आला. त्यालाही तसाच त्रास होत होता व डॉक्टरांनी पहिल्या रुग्णाला दिले तेच औषध दुसऱ्या रुग्णाला दिले होते. तो म्हणाला, 'डॉक्टर साहेब, आपण दिलेले औषध आपण सांगितले तसे घेतले व आता पोटात अजिबात गडबड नाही. डोळ्याचे खुपणेसुद्धा पूर्ण थांबले आहे. बऱ्याच दिवसांनी गाढ झोप लागली. आपले आभार मानण्याकरिता मी आलो आहे.'

डॉक्टर विचार करू लागले. दोन रुग्ण, एकच रोग व दोघांनाही सारखे औषध दिले असताना परिणाम उलटा का ? तर्क चालविला. पहिल्या पेशंटला विचारले, 'आपण थोडे उरलेले औषध आणले आहे का ?' तो म्हणाला, 'पिवळ्या पुडीतील थोडे औषध उरले आहे, जे तुम्ही पोटात घेण्याकरिता सांगितले.' डॉक्टरांच्या लगेच लक्षात आले. म्हणाले, 'मूर्खपणा तुमचा व दोष माझ्यावर ठेवता. तुम्हास मी सांगितले होते पिवळी पुडी डोळ्यांकरिता व हिरवी पुडी पोटाकरिता ! आपण उलटे औषध घेतले. परिणाम उलटा झाला. याला जबाबदार कोण ?' पेशंटच्या चूक लक्षात आली व खाली मान घालून घरी गेला.

तात्पर्य काय ? संसार हा प्रारब्धावर अवलंबून आहे. तुकोबाराय सांगतात -

**प्रारब्धेंचि जोडे धन । प्रारब्धेंचि वाढे मान ॥१॥**
**सोस करिसी वाया । भजें मना पंढरीराया ॥२॥**

परमार्थ मात्र प्रयत्नांवर (पुरुषार्थावर) अवलंबून आहे. माणसे उलटा विचार करतात. हे भजन, पूजन, वारी आमच्या नशिबातच नाही, असे म्हणतात. 'भजन घाली भोगावरी । अकर्तव्य मनी धरी ॥' तु.म. संसार मात्र दक्षतेने करतात. त्यामुळे दुःख भोगावे लागते. यावरून एक कोटी तयार होते.

१) काही प्रयत्न करीत नाहीत - प्रारब्धात नसते - मिळत नाही.

२) काही प्रयत्न करतात - प्रारब्धात नसते - मिळत नाही.

३) काही प्रयत्न न करता मिळते - प्रारब्धात असते - मिळते.

४) काही प्रयत्न करतात - प्रारब्धात असते - मिळते.

संसारात प्रयत्न करूनसुद्धा जेवढे नशिबात असते तेवढेच मिळते. परमार्थ मात्र प्रयत्नांवर अवलंबून आहे.

★★★★★

# (५३) शिव विष्णू ऐक्य

उत्तर प्रदेशात विष्णूपूर व शिवपूर अशी दोन नगरे जवळ-जवळ आहेत. विष्णूपूरातील सर्व लोक विष्णूनिष्ठ असतात. ते गंध उभे लावतात. त्यांच्या सर्व क्रिया उभ्या असतात. मात्र शिवपूरातील लोक शिवनिष्ठ असल्यामुळे ते भस्म आडवे लावतात. त्यांच्या सर्व क्रिया आडव्या असतात. विष्णूपूरातील लोक शिवपूरातील लोकांचे द्वेष करतात व शिवपूरातील लोक विष्णूपूरातील लोकांचा द्वेष करतात.

एकदा दोन्ही नगरे जवळ असल्यामुळे शिवपूरातील मुलगी विष्णूपूरात दिली. लग्न सोहळा आटोपल्यावर मुलगी विष्णूपूरात नांदावयास आली. शिवपूरातील मुलीस आडव्या गोष्टींची सवय होती. तिने घर सारवण्यास घेतले. पण नेहमीच्या सवयीप्रमाणे ती आडवे सारवू लागली. विष्णूपूरातील तिचा सासरा कट्टर विष्णूभक्त असल्यामुळे सुनेस म्हणाला, 'आम्ही विष्णूनिष्ठ आहोत. आम्हास आडव्या गोष्टी आवडत नाहीत. तरी तू घर उभे सारव.' सराव नसताना तिने सासऱ्याच्या म्हणण्या प्रमाणे घर उभे सारवले. कारण तिथेच नांदायचे होते.

दुसऱ्या दिवशी सकाळी सुनेचे सासऱ्यांवर लक्ष होते. सासऱ्याने दंतमंजन करावयास घेतले व दात आडवे घासू लागला. सून म्हणाली, 'मामंजी क्षमा करा पण आपण विष्णूनिष्ठ. दात आडवे का घासता ? उभे घासा.' सासरा काही बोलला नाही. सून म्हणाली, 'मामंजी साध्या साध्या गोष्टीत भेद आणू नका. शिव व विष्णू एकमेकांचे भक्त आहेत. शिव विष्णूचे ध्यान करतात व विष्णू शिवाचे ध्यान करतात.'

वास्तविक विष्णू सत्व गुणी आहेत, त्यांचा रंग शुभ्र हवा. ब्रह्मदेव राजस गुणी आहेत, त्यांचा रंग तांबूस हवा. शंकर हे तमोगुणी आहेत, त्यांचा रंग निळा हवा. पण विष्णू आहेत निलवर्णी व शंकर आहेत कर्पूरगौर. याचे काय कारण असावे ? नाथ महाराज भागवतात सांगतात, विष्णू शिवाचे ध्यान करत असल्यामुळे ते निळे झाले व शंकर विष्णूचे ध्यान करत असल्यामुळे ते शुभ्र झाले.

**शिव श्याम तमोगुणी । तो शुद्ध झाला विष्णूच्या ध्यानी ।**
**विष्णू श्याम शिवचिंतनी । विनटले गुणी येरयेरा ॥ भा.११/१२५९**

वारकरी सांप्रदायाचे देव आहेत विष्णू व गुरू आहेत शंकर. 'गुरू होऊनी शंकर । ज्ञान उपदेशी सत्वर ॥' नाथ. ज्ञानोबाराय यांनी समाधी घेतली शिवपीठाच्या ठिकाणी. 'शिवपीठ हे जुनाट । ज्ञानाबाई तेथे मुगूट ॥' नाथ. (आळंदी) निवृत्तीनाथांनी त्र्यंबकेश्वर येथे समाधी घेतली जे १२ ज्योतिर्लिंगापैकी एक आहे. शिवाय सोपान काकांनी समाधी घेतली ते ठिकाणसुद्धा शिवस्थानच आहे. तुकोबाराय कट्टर विठ्ठल-भक्त - विष्णू-भक्त, पण ते म्हणतात, 'तुका म्हणे हरिहर । ऐसा सांडूनिया धूर ॥' शिव-विष्णूच्या बाबतीत त्यांच्या मनात भेद नाही.



# (५४) आहे - नाही

मायेची सोपी व्याख्या तुकोबाराय करतात - जे प्रथम नाही व शेवटी राहत नाही, मध्ये भासते त्यास माया म्हणतात.

**येर ती मायीक दुःखाची जनीते । नाही आदी अंती अवसानी ॥**

उदा. मृगजळ सकाळी नसते, संध्याकाळी राहत नाही, मात्र दिवसा बारा वाजता वाळवंटात मृगास भासते.

**फुटोनि पडे तंव । मृग वाढवी हांव ।**
**परि न म्हणे ते माव । रोहिणीची ॥ ज्ञाने.१३/७०७**

**मृगजळ दिसे साचपणा ऐसे । खोटीयाचे पीसे उरफोडी ॥ तु.म.**

सर्व संसार असाच आहे. शरीर प्रथम नव्हते. नंतर राहत नाही. बायको अगोदर नसते. मरताना मागे पुढे होतात. (अपवाद वगळता) मुले अगोदर नसतात. शेवटी मरणाच्या वेळी असतीलच असे नाही.

रामायणातील सोनेरी हरीण (मारीच मामा) अगोदर नव्हते नंतर राहिले नाही पण फार मोठा गोंधळ करून गेले.

**न निर्मितः केनः न दृष्ट पूर्वो । न श्रूयते हेममय कुरंगः ।**
**तथापि तृष्णा रघुनंदनस्य । विनाशकाले विपरीत बुद्धि : ॥ सुभा.**

**अर्थ -** सोनेरी हरीण कोणी (ब्रह्मदेवाने अथवा विश्वामित्राने) निर्माण केले नाही. कोणी पाहिले नाही. याचे वर्णनपण कोणी ऐकले नाही. परंतु रामास त्यामागे धावण्याची इच्छा झाली कारण विनाश काल ओढवला की बुद्धी भ्रष्ट होते.

देव मात्र अगोदर आहे, मध्ये आहे व शेवटी राहतो.

**आदी मध्य अंती अवघा हरि एक । एकचि अनेक एक हरि ॥ नाथ.**

नामसुद्धा तिन्ही काळात आहे.

**आदी मध्य अंती निज बिज ॐकार । धृव प्रल्हाद अंबऋषी मानीला निर्धार ॥ ज्ञान.**

**दृष्टांत** - भोज राजाच्या पदरी पंडित कालिदास होते. ते न सांगता अज्ञात स्थळी निघून गेले. बाजूच्या राज्यातील पंडितांना समजले, कालिदास निघून गेलेत. अचानक चार पंडित आले. सभा घेतली व उपपंडितास चार प्रश्न विचारले. "१) प्रथम आहे, नंतर आहे असं काय आहे ? २) प्रथम

नाही, नंतर आहे असं काय आहे ? ३) प्रथम आहे, नंतर नाही असं काय आहे ? ४) प्रथम नाही, नंतर नाही असं काय आहे ?'' उपपंडित नवखा होता. तो घाबरला. उत्तरे देता आली नाहीत. भोज राजाने नवख्या पंडितास खडसावले. जर एक आठवड्यात प्रश्नांची उत्तरे देता आली नाहीत तर आपण सेवानिवृत्त व्हावे. आठवडाभर राजाने पाहुण्या पंडितांची सोय केली. नवखा पंडित घरी गेला. कपाळास हात लावून बसला. १५-१६ वर्षांची पंडिताची मुलगी म्हणाली, 'बाबा, काय समस्या आहे ?' मुलगी हुशार, स्वाध्याय करणारी, प्रवचन-कीर्तन ऐकणारी होती. पंडित म्हणाले, 'माझ्यावर धर्मसंकट आले आहे. कालिदास नसताना बाजूच्या राज्यातील पंडितांनी मला चार प्रश्न विचारले आहेत. राजाने आठवड्याची मुदत दिली आहे. मला काही सुचत नाही.' मुलगी म्हणाली बाबा, कोणते प्रश्न आहेत ?' पंडित म्हणाले, 'प्रश्न अवघड आहेत. तुला काय कळणार ! तू अद्याप शालेय शिक्षण घेत आहेस.' मुलगी म्हणाली, 'बाबा सांगा तरी.' पंडितांनी सभेत विचारलेले चारही प्रश्न मुलीस सांगितले. त्यावर मुलगी हसत म्हणाली, 'बाबा, या प्रश्नांची उत्तरे मी देईन. तुम्ही भरपूर जेवा व खुशाल शांत झोपा.' पहाटे ५ वाजता उठून, सकाळचे सर्व विधी उरकून पंडित व मुलगी रथात बसून भोजराजाकडे निघाले. वाटेत एक श्रीमंत माणूस सकाळी-सकाळी गरिबांना तुपातील शिरा वाटत होता. मुलगी म्हणाली, 'बाबा हा श्रीमंत गृहस्थ आपल्याबरोबर भोज राजाच्या भेटीस येईल काय ?' पंडितांनी श्रीमंत माणसास विनंती केली, 'आम्ही भोज राजाच्या भेटीस चाललो आहोत. आपण याल का ?' श्रीमंत माणूस 'येतोच' असे म्हणून शिरा नोकरास वाटण्यास सांगून रथात बसला. थोड्या अंतरावर एक तेजस्वी संन्यासी झाडाखाली बसला होता. त्याच्याजवळ फक्त कमंडलू व वळकटी होती. मुलगी म्हणाली, 'बाबा हा संन्यासी आपल्याबरोबर येईल का ?' पंडित म्हणाले, 'हे संन्यासी निस्पृही असतात. येतील का नाही शंका आहे. पण प्रयत्न करू.' पंडितांनी संन्याशास विनंती केली, 'आपण भोज राजाच्या भेटीस यावे अशी माझ्या मुलीची इच्छा आहे.' संन्यासी म्हणाले, 'माझे काही काम नाही, उगीच कशाला येऊ ?' पंडित म्हणाले, 'आमच्या रथास आपले पाय लागावे अशी आमची इच्छा आहे.' संन्यासी तयार झाले. रथ पुढे गेल्यावर एका गावच्या गल्लीतील वाटेवर एका माडीवर ढोलकी वाजत होती. मुलगी म्हणाली, 'बाबा वर कीर्तन वगैरे चालू आहे का ?' पंडित म्हणाले, 'कीर्तनात मृदंग असतो. येथे कोणी विलासी माणूस दिसतो. येथे नाचगाणे चालू आहे.' विलासी माणसे दिवसा झोपा काढतात व रात्री जागरणं करतात. मुलगी म्हणाली, 'बाबा हा माणूस आपल्याबरोबर येईल का ?' पंडित प्रयत्न करू म्हणाले. पंडित माडीवर गेले. विलासी माणूस घाबरला. नाचगाणे बंद झाले. 'आपण का आलात ?' त्याने विचारले. पंडित म्हणाले, 'आम्ही भोजराजाच्या भेटीस चाललो आहोत. आपण आमच्याबरोबर यावे अशी माझ्या मुलीची इच्छा आहे.' विलासी माणूस म्हणाला, 'येतो, पण माझ्याबद्दल राजास काही सांगू नका.' व तो रथात येऊन बसला. रथ पुढे चालला. एका तळ्याकाठी एक मच्छीमार आंघोळ न करता घाणेरड्या कपड्याने मासे पकडण्याकरिता गळ टाकून बसला होता. मुलीने त्या मच्छीमाराला सुद्धा

आपल्याबरोबर घेण्याची इच्छा पंडितांकडे व्यक्त केली. पंडितांनी त्या मच्छीमाराला भोजराजाच्या भेटीसाठी आपल्याबरोबर येण्याची विनंती केली. मच्छीमार हातातील काठी टाकून ताबडतोब रथात येऊन बसला. रथ राजवाड्यात आला. पंडित राजास म्हणतात की 'सभेत विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे माझी मुलगी देणार आहे तरी सभा भरवा.' राजांनी सभा भरवली. पंडितांनी हळूच मुलीस विचारले, 'प्रश्न तुझ्या लक्षात आहेत ना ?' मुलगी पटकन म्हणाली, 'हो माहीत आहेत. १) आहे - आहे २) नाही - आहे ३) आहे - नाही ४) नाही - नाही, हेच आपले प्रश्न नाही का ?' पंडितांनी मान डोलावली. मुलगी राजास म्हणाली, 'उत्तरे शब्दात देऊ का उदाहरणासह देऊ ?' राजा म्हणाला, 'उदाहरणासह उत्तरे लवकर पटतील.' निर्धाराने मुलगी पुढे आली. ''राजेसाहेब हा श्रीमंत माणूस सकाळी गरीबांना तुपाचा शिरा वाटत होता. आता याच्याकडे संपत्ती आहे आणि हा दानधर्म करतो आहे. पुढे पण यास संपत्ती मिळत राहणार. आता आहे, पुढे आहे. हा संन्यासी महात्मा. याच्याकडे आता काही नाही. पण पुढे दिव्य भोग भोगणार. पुढे याचे सुखाचे दिवस आहेत. आता नाही पण पुढे आहे. तिसरा हा श्रीमंत विलासी माणूस. आता याच्याजवळ आहे पण पैशाचा उपयोग व्यसनाकरिता करतो आहे. आता आहे पण पुढे राहणार नाही. हा चौथा मच्छीमार. आता हा दरिद्री आहे शिवाय मच्छीमारी करत आहे. सध्या याच्याकडे काही नाही, पुढेही राहणार नाही.'' मुलीकडून उत्तरे ऐकल्याबरोबर राजा, पंडित खूश झाले. बाजूच्या राज्यातील पंडित खाली मान घालून निघून गेले. राजाने मुलीस १० एकर जमीन बक्षीस दिली. शहरातून मिरवणूक काढली. पंडितास सांगितले, 'मुलगी जोपर्यंत शिकत आहे, तोपर्यंत तिच्या शिक्षणाचा खर्च राजकोशातून केला जाईल. अशा हुशार मुली म्हणजे राज्याचे भूषण आहेत.'

★★★★★

## (५५) शुभ-अशुभ

१) काही माणसे शुभ-अशुभ पाळत नाहीत.

**पाहीं सोनें चोरितां उंदीरु । न म्हणे थरविथरु ।**
**नेणे मांसखाईरु । काळें गोरे ॥ ज्ञाने.१८/५५४**

**नाना वनामाजीं बोहरी । कडसनी जेवीं न करी ।**
**कां जीत मेलें न विचारी । बैसता माशी ॥ ज्ञाने.१८/५५५**

**अगा वांता कां वाढिलेया । साजुक कां सडलिया ।**
**विवेक कावळीया । नाहीं जैसा ॥ ज्ञाने.१८/५५६**

**तैसें निषिद्ध सांडूनि द्यावें । कां विहित आदरें घ्यावें ।**
**हें विषयांचेनि नांवे । नेणेचि जें ॥ ज्ञाने.१८/५५७**

**अर्थ -** सोने चोरताना उंदीर थर विथर पाहत नाही. मास खाणारा काळे गोरे जनावर पाहत नाही. वनात लागलेली आग ओले-सुके पाहत नाही. माशी कशावरही बसते. जिवंत अथवा मेलेले शरीर पाहत नाही. कावळ्यास उलटी आहे कां वाढलेले आहे, चांगले आहे कां कुजलेले आहे याचा विचार नसतो. तद्वत काही माणसाना विषय भोगताना निषिद्ध, विहित याचा विचार नसतो. असे ऐकण्यात येते की चांगल्या जातीत, संस्कारात जन्मलेले, तीर्थाच्यासारख्या पवित्र ठिकाणी राहूनसुद्धा श्रावण पाळत नाहीत ते म्हणतात, कुत्रे, कावळे काही पाळतात का ? थोडक्यात असुरी प्रवृत्तीचे लोक शुभ-अशुभ पाळत नाहीत.

२) काही लोक शुभ-अशुभ पाळतात.

सोमवार, गुरुवार, शनिवार, एकादशी मद्य-मांसाहार वर्ज्य करतात. मुंगूस. कासव, गाय, सौभाग्यवती स्त्री दिसली तर शुभ समजतात. काळे मांजर आडवे गेले, कुत्रा रडला, धुमकेतू उगवला तर अशुभ मानतात.

**दृष्टांत -** अकबरच्या राज्यात एक मारवाडी होता. सकाळी त्याचे तोंड पाहिले तर दिवस वाईट जायचा. सर्वांनी राजाकडे तक्रार केली. राजानेसुद्धा एक दिवस सकाळी त्या मारवाड्याचे तोंड पाहिले. त्याचाही दिवस वाईट गेला. राजाने त्यास फाशी द्यायचे ठरविले. मारवाडी घाबरला व बिरबलला भेटला. बिरबलाने युक्ती सांगितली. फाशीचा दिवस उजाडला. राजाने विचारले, 'आपली शेवटची इच्छा काय आहे ?' तो म्हणाला, 'नगरवासियांची सभा भरवा. मला थोडे बोलावयाचे आहे.' राजाने सभा भरविली. मारवाडी म्हणाला, 'माझे तोंड सकाळी पाहिले तर दिवस वाईट जातो पण प्रजेला, लोकांना विनंती करतो, राजाचे तोंड कोणी सकाळी पाहू नये, कारण मी पाहिले व मला फाशीची शिक्षा होत आहे.' अकबरने त्याची फाशी रद्द केली.

३) हरिचे दास यांना सर्व काळ शुभ असतो.

**तुका म्हणे हरिच्या दासा । शुभ काळ अवघ्या दिशा ॥**

याचे कारण हरिचे दास मंगल नाम सतत गातात. त्यामुळे अमंगलता येऊ शकत नाही.

**मंत्र महामनी विषय व्यालके । मेटत कठीन कुअंक भालके ।**
**भाव कुभाव अनख आलसहू । नाम जपत मंगल दिशा दसहू ॥ तुलसी.**

**अर्थ -** नाम मंत्र असा आहे विषयरूपी विष उतरले जाते. कपाळावरची कुरेषा पुसली जाते. भावाने अथवा कुभावाने घेतले, न जाणून अथवा आळसात नाम जपले तरी दहा दिशा मंगलमय होतात.

४) वैष्णवांच्या, संतांच्या संगाने मात्र अशुभाचे शुभात रूपांतर होते.

**कोण पाहे तयाकडे । वीर विठ्ठलाचे गाढे । अशुभ त्यापुढे । शुभ होऊनिया ठाके ॥ तु.म.**

अ) उदा. जयपाल राजाची कन्या जी आत्महत्या करण्याकरिता जात होती तिचे पुरुषात रूपांतर झाले.

**जिही निमीष मात्रे देह पालटीला । स्त्रियेचा तो केला पुरुष उभा ॥ निळो.**

ब) सच्चिदानंद बाबाचे प्रेत चालले होते. ज्ञानोबारायांनी त्यांना जिवंत केले. घटना अशुभ पण त्याचे रूपांतर शुभामध्ये झाले.

क) कबीर व कमाल यांच्या घरी ज्ञानोबाराय वगैरे उतरले होते. संतांना विन्मुख पाठवू नये म्हणून कमालने आपले शिर समर्पण केले. धान्याची चोरी करताना भिंत फोडली. धान्य कबीरांनी घेतले. दुकानदारशेठ जागा झाला. कमालने सांगितले बाबा शिर कापा पण संत विन्मुख पाठवू नका. दुकानदारास शिर मिळाले नाही. म्हणून धडास सुळावर देण्याची राजाची आज्ञा झाली. जेव्हा माऊली गावाबाहेर पडली तेव्हा सुळावरचे धड हात जोडू लागले. ज्ञानोबांनी विचारले, 'शिर कुठे आहे ?' शिर आणले, धडास लावले व कमाल उठले. दुःखाचे रूपांतर सुखात झाले.

ड) तुकोबारायांच्या जीवनातील घटना सांगितली जाते. एक गरोदर स्त्री विहिरीत जीव देत होती. तुकोबाराय म्हणाले, 'जीव का देतेस ? आत्महत्या मोठे पाप आहे.' ती म्हणाली, 'पोटात अंकूर वाढतो आहे. तो व्यभिचारातून निर्माण झाला आहे. ज्याचे नाव घ्यावे तो दुष्ट आहे.' तुकोबा सहज म्हणाले, 'माझे नाव घ्यावे पण जीव देऊ नका.' गावात त्या स्त्रीने सांगितले, 'पोट वाढले तुकोबांमुळे' गावात लोकांनी तुकोबांची गाढवावरून धिंड काढली. तोंडाला काळे फासले. धिंड जेव्हा तुकोबांच्या दारात आली जिजामाता बाहेर आल्या म्हणाल्या, 'महाराज हा काय प्रकार आहे ?' तुकोबा हसत म्हणाले, 'आपली वरात निघाली नव्हती. तू माझ्याबरोबर गाढवावर बैस.' जिजाई म्हणाल्या, 'महाराज वरात गाढवावरून नसते. घोड्यावरून असते.' तुकोबा म्हणाले, 'यास घोडा बनवतो.' क्षणात गाढवाचे घोडे झाले. 'गाढवाचे घोडे । आम्ही करू दृष्टीपुढे ॥' तु.म. सर्व लोक आश्चर्यचकित झाले. नंतर खरा प्रकार समजला. घटना अशुभ होती पण रूपांतर शुभात झाले. साधकाने शुभ-अशुभ पाळलेच पाहिजे. एकादशी सोमवार पाळले पाहिजेत. स्वस्त्रीभोग पण वर्ज आहे.

**शेज बाज विलास भोग । करीती कामिनीचा संग ।**
**तया जोडे क्षय रोग । जन्मव्याधी बळीवंत ॥ तु.म.**

**एकादशी दिनी करील जो भोग । तया मातासंग घडतसे ॥ नाम.**

एका शास्त्रींच्या मुखातून ऐकले आहे - सोमवारी दाढी करू नये जो दाढी करतो, त्याचे अपत्य अल्पायुषी होते.

★★★★★

## (५६) सार-असार

१) **असारात असार -** संसार असार आहेच. 'त्रिगुण असार' ज्ञानोबाराय सांगतात. यात नाटक, तमाशा चित्रपट हे सर्व असार आहेत. 'जसे स्वप्नातील मृगजळ.'

२) **असारात सार -** या असार संसारात काही सार गोष्टी आहेत.

**असारे दुर्ग संसारे षड्पदी मुक्ती दायिनी ।**
**विष्णू एकादशी गीता तुलसी विप्र धेनवः ॥ गरुड पुराण.**

**अर्थ -** या असार संसारात सहा गोष्टी मुक्ती देणाऱ्या आहेत. अ) विष्णूची भक्ती ब) एकादशी व्रत क) गीतेचा अभ्यास ड) तुळशीची सेवा इ) विप्रांची सेवा फ) गोमातेची सेवा

**संसार विषवृक्षस्य द्वे फलेऽमृतोपमे ।**
**कदाचित् केशवे भक्तिस्तद्भक्तैर्वा समागमः ॥ गरुड पुराण.**

संसाररूपी विषवृक्षास दोन अमृतासारखी फळे आहेत. केशवाची भक्ती व केशव भक्तांचा समागम.

३) **सारात असार -** सर्व संतांनी संसार ब्रह्मरूप केला, सुखाचा केला.

**अवघाची संसार सुखाचा करिन । आनंदे भरीन तिन्ही लोक ॥ ज्ञान.**

**अवघाची संसार केला ब्रह्मरुप । विठ्ठल स्वरुप म्हणोनिया ॥ तु.म.**

ज्ञानोबाराय म्हणतात, एकदा माणूस म्हणाला, 'मी हापूस आंबा खात नाही.' कारण विचारल्यास म्हणतो, 'त्याची कोय व साल कडू असते.' अशा माणसास सर्व मूर्खात काढतात. कोय व साल काढली की आंबा अमृतासारखा मधुर आहे. तसे या संसारात दोन असार गोष्टी आहेत. १) अहं २) ममता या गोष्टींचा त्याग केला तर संसार ब्रह्मरूप आहे.

**आवडतिये फळीं । असारें साली आंठोळी ।**
**त्यासाठीं अवगळी । फळातें कोणही ॥ ज्ञाने १८/२०४.**

ज्ञानोबाराय म्हणतात, असार झाडे लावावी लागत नाही. मात्र सार झाडे लावावी लागतात.

**तरी आपैसी दांगीं डोंगर । झाडें लागती असार ।**
**तैसे लांबे राजागर । नुठिती ते ॥ ज्ञाने. १८/९४**

४) **सारात सार** - नाम मात्र साराचे सार आहे.

**नाम साराचेही सार । शरणांगत यमकिंकर ॥ तु.म.**

सर्व रसात अमृत सार आहे पण अमृताचे सार नाम आहे.

**अमृताचे सार निज तत्त्व बीज । गुह्याचे ते गुज रामनाम ॥ तु.म.**

नाम सर्वात सार असल्यामुळे सतत नामस्मरण करावे.

★★★★★

# (५७) गुण-अवगुण

गुण-अवगुणांत चार प्रकार पडतात.

१) जगात अशी काही माणसे आहेत ज्यांच्याकडे सद्‌गुणही नसतो व अवगुणही नसतो. ज्ञानोबाराय यांनी अनेक उदाहरणे दिली आहेत. ज्याप्रमाणे उसाची कणसे, शेळीचे स्तन (गळ्यातील) साबरीचे झाड, भेंडाचे झाड यांचा काहीच उपयोग नसतो.

**साबरी वाढिन्नल्या सरळा । वरी फळ ना आंतु पोकळा ।**
**कां स्तन जाले गळां । शेळिये जैसें ॥ ज्ञाने ९/१७४**

**कोरडा न वोला । उपेगा आथी गेला ।**
**तो वाढोनि मोडला । भेंडु जैसा ॥ ज्ञाने १८/५७५**

**नाना उसांची कणसे । कां नपुसके माणुसे ।**
**वन लागलें जैसें । साबरीचें ॥ ज्ञाने १८/५७६**

काही माणसे परमार्थाच्या नाहीच पण संसाराच्यापण कामाची नसतात. 'खादीस कहार धरणीस भार ॥' वै.ह.भ.प. माधव महाराज मगर अशा माणसांना शेळपट माणसे म्हणत. शेळीचे शेपूट मागची बाजू झाकण्यास उपयोगाचे नाही व माशा हाकलण्याकरिता पण उपयोगाचे नाही, फक्त उभे.

२) काही लोकांकडे एकही चांगला गुण नसतो. मात्र दुर्गुणांचा साठा असतो. यांना दुष्ट लोक म्हणतात. हे जन्मतात ते दुसऱ्यांना त्रास देण्याकरिताच. ज्ञानोबाराय म्हणतात, 'जंगलातील वणवा यामुळे स्थावर जंगम वस्तूंना आग लागते.' तसे ज्याचे आचाराने जगास दुःख होते.

**आणि वन्ही वनीं विचरे । तेथ जळती जैसी जंगमें स्थावरें ।**
**तैसें जयाचेनि आचारें । जगा दुःख ॥ ज्ञाने १३/६६१**

अशा माणसाच्या आईस तुकोबाराय दोष देतात.

**जाय तिकडे पीडी लोकां । जोडी भांडवल थुंका ।**
**थोर झाला चुका । वर कां नाही घातली ॥**

हे दुर्योधनाचे वंशज असतात.

३) काही लोकांकडे सद्गुण असतात पण अवगुणांचा त्याग नसतो. काही चांगले गातात पण अपेय पान केल्याशिवाय त्यांचा घसा चालत नाही. मी एके ठिकाणी कीर्तनास गेलो होतो. एका मृदंगमण्याने पखवाज एवढा चांगला वाजविला की मला बोलण्यापेक्षा नाचावेसे वाटले. त्याचे कौतुक केले. पण दुसरा माणूस म्हणाला, 'पखवाज चांगला वाजवितो पण गांज्या घेतल्याशिवाय त्याची थाप बरोबर पडतच नाही.' बरेच कलाकार व्यसनी असतात असे म्हटले जाते.

४) काहींकडे सद्गुणांचा साठा असतो पण दुर्गुण औषधाला सापडत नाही, यास तु.म. सज्जन म्हणतात

**तुका म्हणे तैसा सज्जनापासून । पाहता अवगुण मिळेचिना ॥**

**यमु म्हणे काय यमावें । दमु म्हणे कवणातें दमावें ।**
**तीर्थें म्हणती काय खावें । दोष ओखदासी नाहीं ॥ ज्ञाने ९/१९९**

**प्रेम सुखाचीया राशी । पाप नाही ओखदासी ॥ तु.म.**

गीतेत १६व्या अध्यायात सांगितलेले २६ गुण यांच्याकडे असतात. देवाने (विठ्ठलाने) ज्ञानोबारायांना सज्जन म्हटले आहे.

**उद्धवाते म्हणे पांडुरंग । या सज्जनाचा न व्हावा वियोग ।**
**हृदय होतसे दोन भाग । जाणा अंतरंग तुम्ही माझे ॥ नाम.**

ज्याच्या दर्शनाने पाप, ताप जातो तो सज्जन समजावा.

**डोळा देखीले सज्जन । निवारला भाग शीण ॥ तु.म.**

एका सुभाषितकाराने सज्जनाचे ११ गुण सांगितले आहेत.

**धर्मे तत्परता मुखे मधुरता दाने समुत्साहीता ।**
**मित्रेऽवंचकता गुरौ विनयीता चित्तेऽति गंभिरता ।**
**आचारे शुचीता गुणे रसिकता शास्त्रेऽति विज्ञानिता ।**

**रुपे सुंदरता हरौ भजनिता सत्स्वेव संदृश्यते ॥**

**अर्थ -** १) धर्मकार्यात तत्परता २) वाणीत माधुर्य ३) दान देण्याविषयी उत्साह ४) मित्राविषयी कापट्यरहित वागणे ५) गुरूजनांप्रति नम्रता ६) चित्तात गंभिरता ७) आचरणात पवित्रता ८) गुण ग्राहकतेत रसिकता ९) शास्त्रात विद्वत्ता १०) रूपात सुंदरता ११) हरि स्मरणात तल्लिनता हे सद्‌गुण सत् पुरुषाच्या ठिकाणी दिसतात. कोणत्या कुळात जन्मला या पेक्षा गुण किती आहेत हे महत्त्वाचे आहे.

**ज्येष्ठत्व जन्मना नैव गुणै र्ज्येष्ठत्वमुच्यते ।**
**गुणात् गुरूत्वमायाति, दुग्धं दधी घृतं क्रमात् ॥ सुभा.**

**अर्थ -** ज्येष्ठत्व जन्मावर नसते. गुणांमुळेच ज्येष्ठत्व येते. दुधापेक्षा दह्यास व दह्यापेक्षा लोण्यास जास्त भाव व सर्वात जास्त तुपाचा भाव असतो कारण गुण जास्त असतात. एक सुभाषित -

**नागुणी गुणीनं व्यत्ति गुणी गुणीषु मत्सरी ।**
**गुणी च गुणरागी च विरला सरला जनाः ॥**

**अर्थ -** ज्याच्याकडे गुण नाहीत तो गुणवानाची किंमत करू शकत नाही. काही जण गुणवान असतात पण दुसऱ्या गुणवानाचा मत्सर करतात. असा एखादाच असतो जो गुणवान असून दुसऱ्या गुणवाना बद्दल आदर बाळगतो. यास सज्जन म्हणण्यास हरकत नाही. माणसाने सद्‌गुणास किंमत द्यावी अवगुणास नाही. तणाची वाढ करू नये. भाताची (पीकाची) वाढ करावी.

**तुका म्हणे भूती साक्षी नारायण । अवगुणी दंडण गुणी पूजा ।**
**गुण अवगुण निवाडा । म्हैस म्हैस रेडा रेडा ॥ तु.म.**

देशात गुणवत्ता, बुद्धिमत्ता व नीतिमत्ता असणाऱ्यांना अधिकार द्यावेत तरच देशाची प्रगती होईल.

सज्जनांची व्याख्या -

**ईश्वरे कुलधर्मे च स्वधर्मणी ध्रुवा रतिः ।**
**निषिद्धाचार विहिनः स सज्जन इति स्मृताः ॥ म.स्मृ**

**अर्थ -** ईश्वराच्या, कुलधर्माच्या, स्वधर्माच्या ठिकाणी निश्चल प्रीती व निषिद्धाचरण न करणारा तो सज्जन म्हटला जातो.

★★★★★

# (५८) ताप - विश्रांती

तापाचे ९ प्रकार -

१) **थंडी ताप -** हा साध्या उपायामुळे जातो.

२) **हिंवताप -** हा डॉक्टरांच्या औषधाने जातो.

३) **संताप -** हा परिस्थिती बदलली असता मावळतो.

१) **मनस्ताप -** सामान्य माणसास होतो. काय केले व काय झाले !

२) **पश्चाताप -** साधकास होतो - अचानक घडलेल्या दोषामुळे होतो.

३) **अनुताप -** हा साधूस होतो - खडतर वैराग्य निर्माण होते (बिल्वमंगल)

१) **आधिभौतिक ताप -** माणसांपासून माणसांना होतो. यास आधिभौतिक ताप म्हणतात.

**भूतीं उपद्रव दिधला । ताडिला अथवा निस्तेजिला ।**
**तेणें चित्तीं दाहो झाला । आधिभौतिक बोलिला तो ताप ॥ निळो.**

सहा जण अग्निशिवाय जाळतात.

**कुग्रामवासः कुलहिनसेवा कुभोजनं क्रोधमुखश्च भार्या ।**
**विधवस्य कन्या मूर्खश्च पुत्रो विना अग्नि दहन्ति षड् ॥**

**अर्थ -** गावगुंड, कुलहीन माणसाची सेवा, वाईट जेवण, भांडकुदळ बायको, विधवा कन्या व मूर्ख पुत्र हे अग्निशिवाय जाळतात.

२) **आधिदैविक ताप -** निसर्गाच्या कोपामुळे जे नुकसान होते व दुःख होते त्यास आधिदैविक ताप म्हणतात. उदा. अतिवृष्टी अथवा अनावृष्टी, राजाने लुटणे, आगीमध्ये नुकसान होणे, वादळाने अथवा भुकंपाने नुकसान होऊन ताप होतो.

**दैवे अतिवृष्टी कां अनावृष्टी । राजिके लुटिले झाला कष्टी ।**
**आगीने जळता नावरे संकटी । तो आधिदैव ताप बोलिजे ॥ निळो.**

३) **आध्यात्मिक ताप -** शरीरात असाध्य रोग निर्माण होतात. बरेच प्रयत्न करूनसुद्धा बरे होत नाहीत. त्यामुळे दुःख होते, त्यास आध्यात्मिक ताप म्हणतात.

**देहीं प्रगटे रोग व्याधी । तेणें आहाळली तापें बुद्धी ।**
**लोळे न पुरे दुःखावधी । आध्यात्मिक त्रिशुद्धी तो ताप ॥ निळो.**

असे हे सगळे ताप नामस्मरणामुळे अथवा संतांच्या दर्शनामुळे नाहीसे होतात.

**वसो न शके पाप । जाय त्रिविध तो ताप ।। तु.म.**

**झाली पापा तापा तुटी । दैन्य गेले उठाउठी ।। तु.म.**

**पाप ताप दैन्य जाय उठाउठी । झालीया भेटी हरिदासांची ।। तु.म**

संसाराने तापलेल्या जीवास तीन विश्रांती स्थाने आहेत.

**संसारतापदग्धानां त्रयो विश्रांती हेतवः ।**
**अपत्यं च कलत्रं च सतां संगती एव च।। सुभा.**

१) मुले २) बायको ३) संतसंग - कामावरून आल्यानंतर बायकोने नवऱ्याचे हसतमुखाने स्वागत करावे. स्वतःस थोडे स्वच्छ शृंगारून राहिले पाहिजे. पती घरी आल्यावर त्याला पाणी, चहा, कॉफी दिली पाहिजे. त्यानंतर त्याच्या कामाबद्दल, प्रवासाबद्दल थोडी विचारपूस केली तर पतीस आनंद होतो. मुले जर अभ्यास करत असतील तर त्यास समाधान वाटते. पण या दोघांपासून आनंद मिळेलच याची खात्री नाही. काहीजण शहरात राहतात व त्यांचे कुटुंब गावी असते. पण नक्की विश्रांती मिळते संतसंगतीनेच. 'विश्रांती' हॉटेलमध्ये किंवा 'विश्रांती' नावाच्या बंगल्यात मिळत नाही. खऱ्या विश्रांतीची स्थाने दोनच आहेत. १) नामस्मरण २) संतसंग.

**आवडी विठ्ठल गायीजें एकांती । या परती विश्रांती आणिक नाही ।। नाम.**

**विश्रांतीचा ठाव । पायी संताचिया भाव ।। तु.म.**

**विश्रांती पावलो सांभाळी उत्तरी । वाढले अंतरी प्रेमसुख ।। तु.म.**

नामदेवराय देवास सांगतात, ' देवा, तुम्हास विश्रांती हवी ना ? मग आळंदीस चला. तुम्हास कल्पापर्यंत विश्रांती मिळेल.'

**नामा म्हणे देवा चला तया ठाया । विश्रांती घ्यावया कल्पवरी ।। नाम.**

★★★★★

# (५९) चिंता, चिंतन

सर्व जगात मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत चिंतेने कोणास सोडलेले नाही. ज्ञानोबाराय चिंतेचे व्यापकपण सांगतात -

**पाताळाहूनि निम्न । जियेचिये उंचिये सानें गगन ।**
**जें पाहतां त्रिभुवन । अणुही नोहे ।। ज्ञाने.१६/३३१**

**तैसी चिंता अपार । वाढविती निरंतर ।**
**जीवीं सूनि असार । विषयादिक ॥ ज्ञाने.१६/३३३**

काही मूर्ख, मी मेल्यानंतर आई-वडिलांचे, बायको-मुलांचे कसे होईल याचीच चिंता करतात.

**अहौ मे पितरौ वृद्धौ भार्या बालात्मजाऽऽत्मजाः ।**
**अनाथा मामृते दीनाःकथं जीवन्ति दुःखिताः ॥ भागवत ११/१७/५७**

**ऐसिया नाना अवस्था । आपुल्याहि मरणा परता ।**
**वाहे कुटुंबाची चिंता । ऐक आता सांगेन ॥ नाथ.**

प्रसिद्ध श्लोक -

**चिता चिंता समायुक्ता बिंदूमात्रेण विशेषता ।**
**सजीवं दहते चिंता निर्जिवं दहते चिता ॥**

**अर्थ -** चिता एकाच निर्जिव माणसास एकवेळ जाळते. पण चिंता सर्व सजीव माणसास सर्व काळ जाळीत असते. या शब्दात एकच बिंदूचा फरक आहे.

**दृष्टांत -** एक उमेदवार कार्यकर्त्यांना घेऊन निवडणुकीच्या प्रचाराकरिता एका गावी गेला होता. उमेदवार श्रीमंत होता. पण त्यास भाषण जमत नव्हते. पण गावच्या लोकांनी सांगितले, 'आम्हास उमेदवाराच्या मुखातूनच आश्वासन ऐकायचे आहे.' तो उठला. समोरची सभा बघून हात-पाय कापायला लागले. त्यास स्वामी विवेकानंद आठवले. विवेकानंदांसारखे त्यास माझ्या बंधू व भगिनींनो असे म्हणावयाचे होते. पण घाबरला असल्यामुळे त्याने 'ब' वरचा अनुस्वार न उच्चारता तो अनुस्वार 'भ' वर टाकला व म्हणाला, 'माझ्या बधु आणि भंगिनींनो.' सभेतील लोक पोट धरून हसले. बिंदूमुळे फार अनर्थ होतो. चिंता चांगले खाऊनसुद्धा माणसांचे सतत शोषण करीत असते.

**मातासमं नास्ति शरीरपोषणं, भार्यासमं नास्ति शरीरतोषणम् ।**
**विद्यासमं नास्ति शरीरभूषणं, चिंतासमं नास्ति शरीरशोषणम् ॥**

**अर्थ -** आईसारखे शरीराचे पोषण कोणीही करीत नाही. पत्नीसारखे शरीराचे तोषण कोणी करीत नाही. विद्येसारखे शरीराचे भूषण नाही व चिंतेसारखे शोषण कोणी करीत नाही.

**दृष्टांत -** माझा मित्र त्याच्या आईच्या राज्यात कंपनीत डबा आणत असे. आई पहाटे उठून चपात्या, भाजी, भात वगैरे सर्व पदार्थ देत असे. आंब्याच्या सुगीत हापूस आंबा. चिक्कूच्या सुगीत चिक्कू, पापड लोणचे वगैरे. पण जेव्हा लग्न झाले तेव्हा डबा बंद झाला. त्यास विनोदाने विचारले, 'अरे डबा का आणत नाहीस ?' तो म्हणाला, 'किचन बायकोच्या ताब्यात गेले. बायको उठत नाही. अंथरूणातूनच सांगते कंपनीत खा. संध्याकाळी चांगले जेवण करते.' कारण 'मातासमं नास्ति शरीर पोषणं व भार्यासमं नास्ति शरीर तोषणं.' चिंता असणाऱ्या माणसास झोप येत नाही व सुख मिळत नाही.

**अर्थातुराणां न पिताः न बंधुः । कामातुराणां न भय न लज्जा ।**
**क्षुधातुराणां न बलं न तेजः । चिंतातुराणां न सुखं न निद्रा ॥ सुभा.**

**अर्थ -** पैशाची आसक्ती असणारा माणूस वडील व बंधू यांस मानत नाही. कामातुरास भीती व लाज नसते. भुकेल्या माणसाच्या अंगात बल व तेज राहत नाही व चिंता असणाऱ्या माणसास सुख नसते व झोपही लागत नाही. सर्वांना चिंता असते, मात्र चिंतेचे विषय वेगवेगळे असतात. सामान्य लोकांना खाण्याची चिंता असते. 'हेचि चिंता काय खावे म्हणउनि । भले तुजहूनि पक्षिराज ॥' तु.म. श्रीमंत माणसास काय काय खावे याची चिंता असते. श्रीमंताच्या घरी रोगांची चांगली सोय होते. म्हणून ते तिथे जास्त वास्तव्य करतात. काही धनिकांच्या घरी छोटे मेडीकल स्टोअर असते. बऱ्याच गोळ्यांचा ते वापर करतात. भूक लागण्याकरिता एक गोळी, जेवल्यानंतर अन्न पचण्याकरिता एक गोळी, झोप लागण्याकरता एक गोळी, तरतरी येण्याकरिता एक गोळी. विनोदात बोलायचे तर या सगळ्या गोळ्या खाण्यापेक्षा बंदुकीची गोळी खाल्लेली चांगली कारण एकदम निकाल लागेल. वास्तविक माणसाने खाण्याची चिंता करू नये. देवाने जन्मास घातल्याबरोबर सर्व चिंता केली आहे. 'मातेचिया उदरी उपजलासी जेव्हां । चिंता तुझी तेव्हां केली त्याने ॥' तु.म. 'जभी दंत नही थे तभी दूध दिया । अभी दंत दिये तो अन्न न दे ?' कबीर 'प्रारब्ध पहले रचा पिछे रचा शरीर । तुलसी चिंता क्यों करें भज ले श्रीरघुवीर ॥' भोजन व वस्त्र याची चिंता वैष्णवाने करू नये. विश्वात भरलेला परमात्मा सर्वांची चिंता करतो. मग वैष्णवांची करणार नाही का ?

**भोजनाच्छादने चिंता वृथा कुर्वन्ति वैष्णवाः ।**
**योऽसौ विश्वंभरो देवः स भक्ताकिमुपेक्षते ॥ सुभा.**

**कथा -** एक माणूस दुसऱ्यास धीर देतो पण तोही चिंतेने व्यापलेला असतो. सागरातून मोठी बोट चालली होती. बोटीत जवळ जवळ २०-२५ कुटुंबे होती. नाव सागराच्या मध्यभागी आल्यानंतर अचानक जोरात वादळ उठले व बोट हेलकावे खाऊ लागली. एक मुलगा आईस म्हणाला, 'आई आपले कसे व्हायचे ?' आई म्हणाली, 'मी असताना कशाला घाबरतोस ?' मात्र आईपण मनातून घाबरली होती. ती नवऱ्यास म्हणाली, 'आपले कसे व्हायचे ? बोट जोरात हालते आहे.' नवरा म्हणाला, 'मी असताना तू कशाला घाबरतेस ?' पण तोही घाबरला होता. तो शेजारी गेला व मित्रांना म्हणाला, 'आपले कसे होणार ?' मित्र म्हणाले, 'आम्ही असताना तू कशाला घाबरतोस ?' सर्व मित्र पण घाबरले होते. ते कॅप्टनकडे गेले व म्हणाले, 'बोट खूपच जोरात हालते आहे. आपले कसे होणार ?' कॅप्टन म्हणाला, 'मी असताना आपण कशाला घाबरता ?' पण तोही घाबरला होता. सर्वांना जाऊ दिले व बोटीच्या वरच्या बाजूस जाऊन कॅप्टनने देवास प्रार्थना केली. 'प्रभू आतापर्यंत हजारो मैल सागराचा प्रवास केला. पण असे वादळ कधी अनुभवले नाही. आमचे प्राण आता तुझ्या हातात आहेत. सर्वांना चिंतेने ग्रासले आहे.' पण सर्वात मोठी चिंता कोणती ? तर ती आहे जन्म-मरणाची. जन्म व मरणामुळे बाकीचे सर्व दुःख आहे, ज्या प्रमाणे कॅप्सुलच्या दोन टोपणात अत्यंत

कडू औषध असते. ही जन्म-मरणाची चिंता सगळ्या चिंतेची जननी आहे. ही जन्म-मरणाची चिंता साधकास असते.

**ऐसी चिंता करी सदा सर्व काळ । रात्रं दिवस हेची तळमळ ।**
**तुका म्हणे नाही आपुले बळ । जेणे फळ पावेन निश्चयेशी ।**
**तुका म्हणे चिंता वाटे । कोण भेटे सांगेसा ॥**

ही चिंता देवाचे दर्शन झाले व त्याने कृपा केली तर नाहीशी होते.

**जन्म मरणाची कायशीं चिंता । तुझ्या शरणांगता पंढरीनाथा ॥ तु.म.**
**जन्म मरणाची विसरलो चिंता । तू माझा अनंता मायबाप ॥ तु.म.**

**चिंता करिता हरली नारायणे । अंगसंग मिनता दोघे जणे ।**
**सुखे निर्भर झालीया त्याचे गुणे । तुका म्हणे खुंटले येणे जाणे वो ।**
**हरिमुखी गाता हरपली चिंता । त्या नाही मागुता जन्म घेणे ॥ नाथ.**

संतांचे दर्शन झाले व त्यांनी बोध केला तर चिंता मरते.

**उजळले भाग्य आता । अवघी चिंता वारली ॥ तु.म.**
**आता निश्चिंतीने पावलो विसावा । खुंटलीया धावा तृष्णेचिया ॥ तु.म.**

**तुझिये संगती । झाली आमुची निश्चिंती ।। तु.म.**
**सापडला हाती । तरी हे झाली निश्चिंती ॥ तु.म.**

साधकांनी चिंता करू नये व चिंतन करावे. विषयांचे चिंतन अध:पतनास कारण ठरते. चिंतन सर्व साधारण चार प्रकारे होत असते - १) विषय चिंतन २) परदोष चिंतन ३) व्यर्थ चिंतन ४) भगवत् चिंतन

१) **विषय चिंतन -** विषयाचे चिंतन कामी माणसे जास्त करतात.

२) **परदोष चिंतन -** दुष्ट माणसे फक्त दुसऱ्यांचे दोष पाहण्यात आयुष्य खर्च करतात. परमार्थी माणसाने स्वतःचे दोष पाहावे.

३) **व्यर्थ चिंतन -** मूर्ख माणसे व्यर्थ चिंतन करतात. याचे कसे होईल व त्याचे कसे होईल ?

४) **भगवत् चिंतन -** साधक, भक्त मात्र देवाचेच चिंतन करतात. यांचा वेळ भगवत् चिंतनात, श्रवणात, मननात, वाचण्यात जातो. काळाची सार्थकता खरेतर भगवत् चिंतनात आहे.

**काळ सारावा चिंतने । एकांत वासी गंगा स्नाने ।**
**देवाच्या पुजने । प्रदक्षिणा तुळशीच्या ॥ तु.म.**
**म्हणोनी लाहो करा । काळ सारा चिंतने ॥ तु.म.**

**चिंतने सरे तो धन्य धन्य काळ । सकळ मंगळ मंगळाचे ॥ तु.म.**

चिंतन केव्हाही, कुठेही, कोणत्याही अवस्थेत करता येते. 'चिंतनासी न लगे वेळ । सर्व काळ करावे ॥' तु.म. परमात्म्याच्या, नामाच्या चिंतनाने संकटे टळली जातात. 'नामाच्या चिंतने । बारा वाटा पळती विघ्ने ॥' तु.म. 'तयाच्या चिंतने निरसेल संकट । तराल दुर्धट भवसिंधु ॥' तु.म. जेवताना देवाचे चिंतन केले तर ते अन्न पवित्र होते. 'पवित्र ते अन्न । हरि चिंतनी भोजन ॥' तु.म. परमात्मा चिंतनाचा भुकेला आहे. 'उदार हा जगदानी । पांडुरंग अभिमानी । तुळसीदळ पाणी । चिंतनाचा भुकेला ॥' तु.म. चिंतनाने सर्व लाभ होतातच. 'अवघे होती लाभ एका या चिंतने । नाम संकीर्तने गोविंदाच्या ॥' तु.म. 'तुका म्हणे सुख देह निरसने । चिंतने चिंतने तद्रुपता ॥' म्हणून साधकांनी चिंता सोडून सतत देवाचे चिंतन करावे. चिंता तीन गोष्टींची असते. देह, देहावर अवलंबून असणारे लोक व देहाकरिता, नातेवाईकांकरिता करण्यास लागणारे काम. उदा. नोकरी, शेती, व्यापार वगैरे पण देह हा जाणारा आहे. नातेवाईक पण राहणार नाहीत. आपला देह संपला की सर्वांचा, शेतीचा, व्यापाराचा, नोकरीचा संबंध संपतो. पण भगवत् चिंतनाने जो अविनाशी परमात्मा आहे, ज्याचा आपला कायमच संबंध आहे, त्याच्याशी संबंध जोडता येतो. चिंतनाने ताकद वाढते व श्रम होत नाहीत. मात्र चिंतेने ताकद कमी होते.

**दृष्टांत** - राजाचा हत्ती चालला होता. बाजूने सैन्य चालले होते. एक फक्कड साधू आला व हत्तीचे शेपूट धरले. हत्ती थांबला. त्यास पुढे जाता येईना. राजास मोठे आश्चर्य वाटले. साधूची वाहवा केली. दरबारात हजर राहण्यास सांगितले. राजा म्हणाले, 'महाराज मी हनुमान मंदिर बांधले आहे. तिथे व्यवस्था करण्यास कोणी नाही. आपली सर्व सोय बाजूच्या खोलीत करतो. आपण थांबावे. फक्त एकच काम, सकाळी ७ वाजता व संध्याकाळी ७ वाजता हनुमानासमोर बत्ती लावायची व आरती म्हणायची.' साधूने कबूल केले. मंदिरातील काम चोख होऊ लागले. हा फक्कड साधू कुठेही राहून मिळेल ते खाऊन चिंतन करीत होता. त्यामुळे काहीच चिंता नव्हती पण मंदिरातील आरतीची व बत्तीची चिंता लागली. दोन वर्षांनी राजांनी साधूस मिरवणुकीस बोलाविले व सांगितले, 'आपण हत्तीस शेपूट धरून थांबविले होते. आता परत तसेच थांबवा.' साधूने प्रयत्न केला पण हत्ती सरळ निघून गेला. चिंतनाची जागा चिंतेने घेतल्यामुळे हा फरक पडला.



# (६०) अस्थिर - स्थिर

या जगात दोन वर्ग आहेत. १) अस्थिर २) स्थिर - माया अस्थिर आहे. ब्रह्म स्थिर आहे. ज्या प्रमाणे तरंग अस्थिर, पाणी स्थिर (सागराचे), दागिने अस्थिर, सोने स्थिर. माऊली म्हणते.

**उपजें ते नाशे । नाशिलें ते पुनरपि दिसे ।**
**हे घटीका यंत्र जैसे । परिभ्रमे गा ॥ ज्ञाने २/१५९**

स्थिर अस्थिर कळण्याकरिता वेगवेगळे प्रकार.

१) देहात रोज बदल होत असतो. पण भ्रमामुळे आपल्या लक्षात येत नाही. या देहास तीन अवस्था आहेत. बालपण, तरूणपण व म्हातारपण.

**देहीनोऽस्मिन् यथा देहे कौमारं यौवनं जरा ।**
**तथा देहान्तर प्राप्तीर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ गीता २/१३**

**दृष्टांत** - एकदा एका अधिकारी ब्राह्मणाशी यमाची भेट होते. ब्राह्मण यमास विचारतात, 'माझे आयुष्य किती आहे ?' यम म्हणतात, 'असे आम्ही कोणास सांगत नाही. आपले आयुष्य संपण्याच्या अगोदर आपणास ३ पत्र पाठविन.' ७० वर्षानंतर अचानक यमदूत येतात. ब्राह्मणास म्हणतात, 'चला माझ्या बरोबर.' ब्राह्मण म्हणतात, 'आपण एकही पत्र पाठविले नाही.' यमदूत म्हणतात, 'आपणास पत्र पाठविली आहेत. पण वाचता आली नाहीत.' केस पिकणे पहिले पत्र. दात पडणे दुसरे पत्र. नजर कमी होणे तिसरे पत्र. माणसे मात्र केस पिकले तरी काळे करतात. दाताची कवळी बसवितात व डोळ्यांकरिता चष्मा वापरतात. पण हे फार दिवस टिकत नाही.

**चालले सोबती । काय मानिली निश्चिंती ॥१॥**

**काय करिसी एकला । काळ सन्निध पातला ॥२॥**

**कांहीं सावध तों बरवा । करी आपुला काढावा ॥३॥**

**चालिले आगळे । हळूच कान केश डोळे ॥।३॥**

**वोसरले दात । दाढा गडबडल्या आत ॥५॥**

**एकली तळमळे । जिव्हा भलतेंचि चावळे ॥६॥**

**तुका म्हणे यांनी । तुझी मांडिली घालणी ॥७॥**

२) नातेवाईकात कालानुरूप बदल होतो. लहानपणी आई-वडील आवडतात, आजी-अजोबा आवडतात, नंतर मित्रांशी जास्त संबंध येतो, तरुणपणी पत्नी व तिचे नातेवाईक आवडतात. मित्र

नेहमी बदलत असतात. नंतर मुले-मुली आवडतात. नंतर नातू-पणतू आवडतात. एक दिवस सर्वांचा संबंध संपतो.

**आजा मेला पणजा मेला बाप मसणा नेला ।**
**देखत देखत नातु-पणतू तोही तैसा जाला ॥ ज्ञान.**

**पुत्र पत्नी सहोदर । माय बाप गोताचा पसर ।**
**मिळती काष्टे लोटता पूर । आदरे दूर होती खल्लाळी ॥ तु.म.**

**दोन ओंडक्यांची होते सागरात भेट । एक लाट तोडी दोघा पुन्हा नाही गाठ ॥ ग.दी.मा.**

३) वृत्तीत नेहमी बदल होत असतो. मन, बुद्धी एका ठिकाणी स्थिर राहात नाही.

**मन स्थिर नाही माझीये हाती । इंद्रिये धावता नावरती ।**
**सकळ खुंटलीया युक्ति । शांती निवृत्ती जवळी नाही ॥ तु.म.**

**अनेक बुद्धीचे तरंग । क्षणाक्षणा पालटती रंग ।**
**धरू जाता संग । तंव तो होतो बाधक ॥ तु.म.**

माझ्याकडे अचानक एक माणूस हजार रुपये मागण्याकरिता आला. साधारण परिचय होता. माझ्याकडे तेवढे पैसे होते. पण त्याच्या व्यवहाराची कल्पना नव्हती. त्याने अडचण सांगितली. मनात आले यास हजार रुपये द्यावे. दुसऱ्या क्षणी विचार आला पाचशेच रुपये द्यावे. पण देताना मात्र दोनशेच रुपये दिले. पाच मिनिटात तीन वेळा विचार बदलला. बऱ्याच वेळा असे होते.

बालपणी खेळण्यात मन रमते. तरूणपणी स्त्रीमध्ये मन रमते. म्हातारपणी चिंतेत वेळ जातो.

**बालस्तावत्क्रीडासक्त स्तरुणस्तावत्तरुणीरक्तः ।**
**वृद्धस्तावश्चिंतामग्नः परे ब्रह्मणि कोऽपि न लग्नः ॥ शंकराचार्य**

**बालपण गेले नेणता । तारुण्यदशे विषय व्यथा ।**
**वृद्धपणी प्रवर्तली चिंता । मरे मागुता जन्म धरी ॥ तु.म.**

४) सृष्टीमध्ये रोज बदल होतो. पृथ्वी स्वतःभोवती फिरत सूर्याभोवती फिरते. ऋतूंमध्ये कायम बदल होतो. पूर्वी निरोप पाठवा असे म्हणत होते. नंतर पत्र पाठवा असे म्हणत असत. आता सर्वांच्या मुखात फोन करा असे वाक्य येते. पूर्वी प्रवासात तांब्या वापरत. त्यानंतर वॉटर बॅग आली आता बाटलीचा जमाना आहे. सध्या बाटलीचाच काळ आहे. लहानपणी दुधाची बाटली, तरुणपणी पाण्याची अथवा नवसागर पाण्याची बाटली व मरताना सलाईनची बाटली. आम्ही लहानपणी कीर्तन ऐकताना विषय डोक्यात ठेवत होतो. नंतर विद्यार्थी कीर्तन, प्रवचन लिहून घेऊ लागले आता तर विद्यार्थी वक्त्यासमोर वॉकमन ठेवतात, टेप करतात.

**दृष्टांत -** एक गुरू चार शिष्यांबरोबर पावसाळ्यात नदीचा पूर पाहत होते. समोर पूल होता, झाडे होती. शिष्य म्हणाले, 'गुरुजी, पाणी जोरात वाहत आहे.' गुरुजी म्हणाले, 'पाणी वाहत आहे, पूल वाहत आहे, झाडेसुद्धा वाहत आहेत.' पूल, झाडे स्थिर होती. शिष्य म्हणाले, 'गुरूजी असे कसे म्हणता ?' गुरुजी म्हणाले, 'अरे, पाणी वाहत आहे, त्याचा वेग जास्त आहे. पूल जुना होत आहे, एक दिवस तो पडणार. झाडे जुनी होणार. त्यांचा नाश होणारच आहे.' सेकंद काटा फिरताना दिसतो, मिनिट काटासुद्धा सूक्ष्म दृष्टीने पाहिले तर फिरताना दिसतो. मात्र तास काटा दिसत नाही पण तोसुद्धा फिरतो. परिवर्तन हा सृष्टीचा नियम आहे.

५) लक्ष्मी स्थिर राहत नाही. 'कमला स्थिर ना रहिम कहे ये जानत नही कोय । पुराण पुरुषकी बधू कस न चंचला होय ।।' काही करोडपती रोडपती होतात. काही रोडपती करोडपती होतात.

६) जीव अविनाशी आहे पण स्थिर राहात नाही. चार खाणी, तीन गुणी चौऱ्याऐंशी लक्ष योनीत जीव फिरत आहे.

**लक्ष चौऱ्याशी न चुके फेरा । गर्भवासी यातना थोरा ।**
**येउनि पडसी संदेह पुरा । ओळसा थोर मायाजाळी ।। तु.म.**

एक सुंदर सुभाषित -

**अस्थिरं जिवीतं लोके अस्थिरं धनयौवनं ।**
**अस्थिरं पुत्र दाराश्च धर्म किर्ती द्वयो स्थिरः ।।**

**अर्थ -** जीवन, धन, यौवन, पुत्र, दारा अस्थिर आहे. धर्म, किर्ती दोनच गोष्टी स्थिर आहेत.

हा जीव मात्र देवास मिळाला तरच स्थिर होतो. माऊली दोन दृष्टांत देते.

**घडतां महोदधीसी । गंगा वेगें सांडिजे जैसी ।**
**कां कामिनी कांतापासीं । स्थिर होय ।। ज्ञाने.१८/१०८१**

कबीर कमाल यांचे महत्त्वाचे दोन दोहे आहेत. कबीर जाते पाहून रडू लागले. 'चलती चक्की देखके दिया कबिरा रोय । दो पाटण के बिचमें साबूत बचा न कोय ।।' याचा अर्थ आहे, जन्म-मरणरूपी चाकात सर्व भरडत आहेत. पण कमाल जाते पाहून हसायला लागले. 'चलती चक्की देखके हंसा कमाल ठठाय । कील सहारे जो रहे बाल न बाका होय ।।' अर्थ असा आहे, सर्व दोन पाळ्यात भरडले जातात. पण जो खिळ्याजवळ राहतो त्याचा केसही वाकडा होत नाही. तात्पर्य - जे परमात्म्यास चिकटले ते स्थिर राहिले कारण देवाशिवाय, त्याच्या नामाशिवाय काही स्थिर नाही. 'तुजविण क्रांही । स्थिर राहे ऐसे नाही ।।' तु.म. 'अवघाची आकार ग्रासियेला काळे । एकचि निराळे हरिचे नाम ।।' तु.म. ज्ञानोबा-तुकोबा जोपर्यंत चंद्र सूर्य आहेत तोपर्यंत स्थिर आहेत. त्यांची किर्तीही स्थिर

आहे. 'जंववरी चंद्रसूर्य तववरी किर्ती घट स्थिरू ॥' ज्ञान. तात्पर्य - देवास चिकटून राहा. सतत त्याचे स्मरण करा.

**आयुर्नश्यति पश्यतां प्रतिदिनं याति क्षयं यौवनं ।**
**प्रत्यायान्ति गताः पुनर्न दिवसाः कालो जगद्भक्षकः ॥**

**लक्ष्मीस्तोयतरङ्गभंङ्गचपला विद्युच्चलं जीवितं ।**
**तस्मान्मां शरणागतं शरणद् त्वं रक्ष रक्षाधुना ॥ शंकराचार्य**

अर्थ - पाहता पाहता आयुष्य नित्य नष्ट होत आहे. तारुण्य प्रतिदिवस क्षीण होत आहे. गेलेले दिवस पुन्हा परत येत नाहीत. काल संपूर्ण जगास खात आहे. लक्ष्मी पाण्याच्या तरंगमालेप्रमाणे चपल आहे. जीवन बिजलीप्रमाणे चंचल आहे. म्हणून मला शरणागताला हे शरणागतवत्सल शंकरा ! आता क्षमा करा ! रक्षा करा !

सध्या जग फार वेगाने अस्थिरतेकडे चालले आहे. लोक म्हणतात लोकांप्रमाणे आपण बदललो नाही तर आपणास जगता येणार नाही. हे मात्र एवढे खरे नाही. काहींमध्ये बदलच होत नाही. माणूस पायानेच चालतो आहे. अद्याप डोक्याने चालणारा ऐकिवात नाही. माणूस कानानेच ऐकतो आहे. डोळ्यानेच पाहतो आहे. तोंडानेच जेवतो आहे. यामध्ये बदलाबदल झालेला नाही. हजारो वर्षे कानाचे काम डोळा करू शकत नाही व डोळ्याचे काम कान करू शकत नाही. माणसाचे मन, बुद्धी मात्र फारच चंचल म्हणजे अस्थिर होत चालली आहे. बाहेर सुधारणा दिसते आहे पण माणूस आतून मात्र पोखरत चालला आहे. याचा परिणाम अकाली वृद्धापकाळ अथवा मृत्यू !

**कथा -** एका राज्यात नवीन राजा झाला. त्याने थोडा राज्याचा विस्तार केला होता. त्यास अभिमान झाला की आजोबांच्या, वडिलांच्या राज्यापेक्षा माझ्या राज्याचा विस्तार वाढला आहे. त्याने एकदा सभा घेतली व लोकांना विचारले, 'माझ्या वडिलांचे, आजोबांचे राज्य ज्यांनी पाहिले आहे त्यांनी सांगावे कोणाचे राज्य श्रेष्ठ आहे ?'

एक म्हातारा उठला. त्याने तिघांचे राज्य अनुभवले होते. तो म्हणाला, 'सरकार, मोठ्या माणसांबद्दल आम्ही सामान्य माणसे काय ठरविणार ? पण आपल्या आजोबांच्या राज्यात मी २० वर्षांचा जवान होतो. जंगलात राहत असे. एकदा एक वऱ्हाड लग्नास चालले होते. लुटारूंनी वऱ्हाडास गाठले. नववधू पळत पळत माझ्या घरी आली. तिच्या अंगावर एक हजार रुपयांचे दागिने होते. मी तिला घरात लपविले. मात्र दुसऱ्या दिवशी त्या नववधूस दागिन्यांसह तिच्या आईबापाकडे सुखरूप पोहोचविले. त्यानंतर आपल्या वडिलांचे राज्य आले. त्यावेळी माझे वय ५० वर्षांचे होते. पण मला नेहमी वाटत होते, त्या नववधूचे दागिने घेऊन तिला तिच्या घरी सोडली असती तर माझे कोणी काहीही करू शकले नसते. शिवाय त्यावेळी माझी आर्थिक परिस्थिती बिघडली होती. त्यानंतर आपले राज्य आले. माझी बायको माझ्या वयाच्या ७०व्या वर्षी वारली. माझे वय आता ७५ वर्षे

आहे. पण आपल्या राज्यात मला असे वाटते, ती नववधू माझ्या घरी आयती चालून आली होती. माझी जवानी होती. तिच्या अंगावर दागिने होते. माझ्या बायकोपेक्षा सुंदर व वयांनी लहान होती. दुसरी बायको म्हणून ठेवली असती तर आता फार बरे झाले असते. तिघांच्या राज्यात माझ्या बुद्धीत असे बदल होत गेले. आपणच ठरवा कोणाचे राज्य श्रेष्ठ ते !



## (६१) आठव - विसर

आठव, विसर यावरून चार प्रकार पडतात.

१) या जगात काही असे लोक आहेत, ज्यांना संसाराची व परमार्थाची म्हणजे देवाची आठवण नाही. यांना वेडे म्हणतात. वेडीस सासर व माहेर सारखेच !

२) दुसरा संसारी लोकांचा वर्ग आहे. यांना देवाची कधी आठवण नसते. स्वतःचा, बायकोचा, मुलांचा, मुलीचा वाढदिवस आठवणीने साजरा करतात. देव स्वप्नातसुद्धा आठवत नाही. तुकोबाराय सांगतात - कां रें नाठविसी कृपाळू देवासी । पोसीतो जगासी एकलाची ॥' पण यांच्या जीवनात 'देव धर्म सांदी पडिले सकळ । विषयी गोंधळ गाजतसे ॥' वास्तविक ज्याने आपणास सर्व दिले आहे, त्याची सतत आठवण पाहिजे. 'जो कृपाल तन मन धन दीन्हो नैन नासीका मुख रसना । जाके रचत मास दस लागै ताहि न सुमिरो एक छिना ?॥' मीराबाई.

**कथा -** एकदा महात्मा कबिर प्रवास करताना एका विहिरीवर पाणी पिण्यास गेले. तिथे एक बाई नवऱ्याने पाठविलेली नथ बायकांना दाखवित होती. कधी नथीचे वर्णन तर कधी नवऱ्याचे तर कधी सोनाराचे वर्णन करत होती. कबिर म्हणाले, 'नथनी दी जिस यार ने उसको सुमरत बार बार । नाक दिया जिस यार ने उसको भूल गई नार ॥' माणसाचा जन्म प्राप्त होऊन जो देवास विसरला त्याची फार मोठी हानी होते.

***विसरली तया थोर झाली हानी । पचतील खाणी चौऱ्याशींच्या ॥ तु.म.***

***नारायण जे विसरले संसारी । तयासी अघोरी वास सत्य ॥ तु.म.***

३) तिसरा असा एक वर्ग आहे ज्यांना साधक म्हणावे. कधी देवाची आठवण तर कधी संसाराची आठवण. काही साधक तीन-चार तास देवपूजेस, भजनास देतात. वर्षातून वारीकरिता एक महिना देतात. देवाची आठवण होते पण संसाराचा विसर पडत नाही. पूर्ण संसारात रममाण झालेल्या माणसांपेक्षा हे बरे. हे देवाकडे मागणे मागतात, 'हेचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥' तु.म.

'तुका म्हणे तुझा न पडो विसर । दुःखाचे डोंगर झाले तरी ।।' अथवा, 'तुका म्हणे तुझ्या पाया विसर । नको वारंवार पडो देऊ ।।'

४) चौथा वर्ग मात्र संतांचा आहे. यांना संसाराचा विसर पण देवाची नेहमी आठवण अस गोपिका श्रीकृष्णांच्या आठवणीने सर्व गोष्टी विसरल्या होत्या.

**यापरी बुद्धी मदाकार । म्हणोनी विसरल्या घरदार ।**
**विसरल्या पुत्र भ्रतार । निजव्यापार विसरल्या ।। भागवत १२/१८३**

**विसरल्या विषय सुख । विसरल्या द्वंद्व दुःख ।**
**विसरल्या तहान भुक । माझेनी एक निदिध्यासे ।। भागवत १२/१८४**

**जेणे देहे पतिपुत्राते । आप्त मानिले होते चित्ते ।**
**ते चित्त रतले माते । त्या देहाते विसरोनी ।। भागवत १२/१८५**

**विसरल्या इहलोक परलोक । विसरल्या कार्यकारण निःशेख ।**
**विसरल्या नामरूप देख । माझे ध्यान सुख भोगिता ।। भागवत १२/१८६**

**जेवीं कां नाना सरिता । आलीया सिंधुते ठाकिता ।**
**तेथे पावोनी समरसता । नामरूपता विसरल्या ।। भागवत १२/१८८**

अर्थ सोपा आहे. वास्तविक जो संसार ज्याचा नित्य वियोग आहे त्याची आठवण व ज्याच नित्य संयोग (देवाचा) त्याचा विसर हे दुर्दैवाचे लक्षण आहे. एक गवळण दुसरीस सांगते, 'बऱ्याच दिवसांनी मला झोप लागली व श्यामसुंदर माझ्या स्वप्नात आला.' दुसरी म्हणते, 'तू भाग्यवा आहेस. पण त्याने माझी झोपच चोरून नेली आहे. त्याच्या आठवणीने मला निद्रा येतच नाही.' एक गवळण घरचे काम करताना एकही काम बरोबर करीत नाही कारण चित्तात श्रीकृष्ण असतो. सास म्हणते, 'आजी कांवो तु दिससी दुश्चिती । म्हणिये काम न लगे तुझ्या चित्तीं । दिले ठेवूं ते 'विसरसी' हाती । नेणो काय बैसला हरी चित्ती वो ।।' तु.म.

**कथा** - एकदा एक संन्यासी माधुकरी मागण्यास गेला. एका घरात तीन बायका गप्पा मारत होत्या. त्यांचे बाहेर लक्ष नव्हते. तिघींचे पती कामावर गेले होते. नवऱ्यांच्या विसराळूपणाच्या कथ सांगत होत्या. एक म्हणाली, 'माझे मालक एवढे विसराळू आहेत की दुसऱ्यांचे पैसे उसने घेतात पण वेळेवर द्यायला विसरतात. पगारानंतर सर्व माणसे घरी येतात. त्यांना हे एकच उत्तर देतात माफ करा विसरलो.' दुसरी म्हणाली, 'माझे पती एवढे विसराळू आहेत की त्यांना जेवलो की नाही याची आठवण नसते. मला सारखे विचारतात मी जेवलो का ? जर जेवण करायचा कंटाळा आला तर मी त्यांच्या कॉटखाली खरकटे ताट ठेवते. मी जेवलो का विचारल्यास मी सांगते आत्ताच जेवलात. हे पहा खरकटे ताट. त्यामुळे जेवण करण्याचा त्रास वाचतो.' तिसरी म्हणाली, 'हे काहीच नाही. माझे

पती फारच विसराळू आहेत.' त्या दोघी आतुरतेने विचारतात, 'ते कसे काय ?' तिसरी सांगते, 'माझे वय आता पन्नास वर्षांचे आहे. माझे मिस्टर पंचावन वर्षांचे आहेत. दोघांना चष्मे लागले आहेत. एकदा ते रात्री ९ वाजता जेवण करून पान खाण्याकरिता पानाच्या गादीवर गेले व तिथेच पान चघळत राहिले. साखर संपली म्हणून पानपट्टीच्या दुकानाजवळ किराणा मालाचे दुकान होते. तिथे साखर, चहा पावडर वगैरे पदार्थ खरेदी केले. त्यांनी माझ्याकडे पाहिले. मी तशीच उभी राहिले. आणखी जवळ येऊन निरीक्षण करू लागले. मी गप्प उभी होते. अगदी जवळ येऊन मला म्हणतात मी आपणास कुठे तरी पाहिल्यासारखे वाटते. आमच्या लग्नास या वर्षी २० वर्षे झाली आहेत. पण मला विसरले.' संन्यासी मनात म्हणाले, 'तुमचे पती भाग्यवान आहेत. संसारातील गोष्टी विसरतात पण मी प्रभूसच विसरलो.' तात्पर्य - देवास विसरू नका. त्याची वारंवार आठवण करा.

ओले लाकूड अग्नित टाकले तर जळत नाही उलट ते अग्निस विझवते. तसे काही मूर्ख स्वतः देवास आठवत नाहीत. कोण देवाचे भजन करीत असतील तर त्यात अडथळे निर्माण करतात. दुसरे, अर्धवट ओले लाकूड अग्नित टाकले तर जळते. पण त्यास सतत फुंकावे लागते. तसे मुमुक्षू आहेत. यांना मार्गदर्शन केले तर देवास आठवतात. तिसरे मात्र सुके लाकूड अग्नित टाकताच भराभर पेटत जाते. तसे महात्मे देवाची आठवण झाल्यास यांना समाधीच लागते किंबहुना अष्टसात्विक भाव जागृत होतात. हे देवरूपच होतात. 'तुका प्रेमे नाचे गाये । गाणीयात विरूनी जाये ॥' तु.म. देवाकडे मागतात, 'देवा आता ऐसा करी उपकार । देहाचा विसर पाडी मज ॥ तरीच हा जीव सुख पावे माझा । बरवे केशीराजा कळो आले ॥' देहाच्या विसरात व भगवंताच्या आठवणीत खरे सुख आहे. एकदा श्रीकृष्ण एकांतात राधेस विचारतात, 'हातावर जखम कसली ?' राधा म्हणते, 'दोन वर्षापूर्वी आपले नख लागले होते' श्रीकृष्ण म्हणाले, 'दोन वर्षात जखम कमी व्हायला हवी होती.' राधा म्हणाली, 'बरी व्हायला लागली तर मी खपली काढते. या जखमेमुळे मला नेहमी आठवण होते. माझा हात श्रीकृष्णाने धरला होता.'

**स्मरण :**

१) **बोधजन्य स्मरण -** देवच आपला आहे. बाकी आपले कोणी नाही असा बोध व सतत देवाचे स्मरण यास बोधजन्य स्मरण म्हणतात.

२) **संबंधजन्य स्मरण -** आपले शरीर व शरीरावर अवलंबून असणारे इतर आई, बाप, भाऊ, बहीण, मुलगा, मुलगी. वास्तविक यांचा तात्पुरता संबंध आहे व देवाचा कायमचा संबंध आहे याची आठवण सतत होते. यास संबंधजन्य स्मरण म्हणतात.

३) **क्रियाजन्य स्मरण -** क्रिया करत असताना देवाचे स्मरण ज्याप्रमाणे स्त्रिया घागर डोक्यावर घेऊन दुसऱ्याबरोबर गप्पा मारतात पण हे स्मरण असते की डोक्यावर घागर आहे. डोंबारी दोरीवर चालताना बोलत असतो पण लक्ष समोर खाली रस्त्याकडेअसते. याला क्रियाजन्य स्मरण म्हणतात. यात आणखी

तीन फरक आहेत, यास अभ्यासजन्य स्मरण म्हणतात.

१) क्रियेला महत्त्व - देवाचे स्मरण गौण

२) क्रियेला कमी महत्त्व - देवाचे स्मरण मुख्य

३) क्रिया देवाचे काम म्हणून करणे - काम पण होते. स्मरण पण सतत रहाते.

★★★★★

## (६२) शूर - धीर

१) काही लोक शूरही नाहीत व त्यांच्याकडे धैर्यही नसते.

एका गावात एक जवान नेहमी युद्धाच्या गोष्टी, आपला शूरपणा सांगायचा. लोकांना वाटायचे हा फारच शूर आहे. एकदा गावात मोठा दरोडा पडला. दरोडेखोर फटाके वाजवतच गावात आले. गावातील एक तरुण त्या जवानाकडे गेला व म्हणाला, 'आपण युद्धात कौशल्य गाजवले आहे. गावात दरोडेखोर घुसत आहेत. आपण बाहेर यावे 'त्याने आतूनच सांगितले, 'तिथली गोष्ट वेगळी व इथली गोष्ट वेगळी आहे.'

**वरीवरी बोले युद्धाचिया गोष्टी । पर सैन्या भेटी नाही झाली ॥१॥**

**पराव्याचे भार पाहुनिया दृष्टी । कापतसे पोंटी थरथरां ॥२॥ तु.म.**

एक जवान सांगत होता, 'मी लढाईत हजार हात छाटले.' गावातील एकाने विचारले, 'हजार हात कापण्यापेक्षा पाचशे माना उडविल्या असत्या तर अर्धी मेहनत वाचली असती.' त्याने सांगितले, 'त्या अगोदरच कापल्या होत्या.'

२) काही धैर्य करतात पण शूर नसतात.

उत्तर हा विराटाचा पुत्र. जेव्हा कौरवांची स्वारी झाली, तेव्हा हा (बहुबालिश बायकांत बडबडला) म्हणाला, 'जर मला उत्तम सारथी असता तर मी लढाई जिंकली असती.' त्यास बृहन्नडा (अर्जुन) सारथी मिळाला पण अफाट सैन्य पाहून घाबरला व पळू लागला.

**उत्तरू वैराटींचा राजा । पळतां तू कां निघालासि झुंजा ॥ ज्ञाने १८/१२९५**

(उत्तर न देता उत्तर उत्तर दिशेशी पळाला. मोरोपंत) मात्र अर्जुनाने प्रगट होऊन सर्वांना पळवून लावले. धैर्य केले पण शूर नसल्यामुळे उत्तर घाबरला. काही माणसे एसटी, ट्रेनमध्ये धैर्य (डेअरिंग) दाखवितात पण शूर नसल्यामुळे मार खाऊन घरी जातात.

३) काही शूर असतात पण आयत्या वेळी धीर सुटला जातो. वास्तविक विराटाच्या घरी असताना अकरा अक्षौहिणी सैन्यास एकट्या अर्जुनाने पळवून लावले होते.

**महावीर अकरा अक्षौहिणी । तुवां येकें नागविले रणांगणीं ।**
**तो स्वभावो कोदंडपाणी । जुंझवील तूतें ॥ ज्ञाने १८/१२९६**

ज्या अर्जुनाने युद्धात शंकराचा पराभव केला

**तुवां संग्रामीं हरु जिंकिला । निवातकवचांचा ठावो फेडिला ।**
**पवाडा तुवां केला । गंधर्वांसी ॥ ज्ञाने.२/१०**

अर्जुन हा महावीर होता. पण महाभारतीय युद्ध सुरू होणार, तेवढ्यात अर्जुनाचा धीर खचला. थर थर कापू लागला. याचा अर्थ अर्जुन शूर होता पण आयत्या वेळी नातलगांना पाहून धीर गेला व धीर येण्याकरिता मोह जाण्याकरिता श्रीकृष्णास १८ अध्याय गीता सांगावी लागली.

४) मात्र काही जण शूरही असतात व त्यांच्याकडे धीरही असतो. उदा. हनुमंतराय हे या कोटीतील आहेत. 'शूर आणि धीर । स्वामी काजी बळिया वीर ॥' तु.म. काही पाईक, सैनिक या कोटीतील असतात. 'पाईकांनी सुख भोगिले अपार । शूर आणि धीर अंतर्बाही ॥' तु.म. हनुमंतराय एकटेच लंकेत घुसले. रावणाच्या बागेचा विध्वंस केला. अक्षय कुमारास मारले. लंका जाळली. रावणाची दाढी जाळून आले.

**हनुमंत महाबळी । रावणाची दाढी जाळी ॥ तु.म.**
**जाळीयेली लंका । धन्य धन्य म्हणे तुका ॥**

★★★★★

## (६३) योग - क्षेम

'योग' या शब्दाचा अर्थ एखादी वस्तू प्राप्त होणे व ती वस्तू टिकून रहाणे यास 'क्षेम' म्हणतात. वस्तू प्राप्त होणे एवढे अवघड नाही पण ती टिकून राहणे मात्र अवघड आहे. तुकोबाराय सांगतात, 'कठीण योगाहूनी क्षेम । वोकलिया होतो श्रम ॥' जेवणे, खाणे सोपे आहे पण पचविणे अवघड आहे.

मिलिट्रीतील जवानांची खाण्याची शर्यत लागली. एका जवानाने मोठे रव्याचे सतरा लाडू खाल्ले. पण पचले नाहीत. रक्ताची उलटी होऊन गतप्राण झाला. लग्न होणे सोपे आहे पण दोघे मरेपर्यंत सुखाने संसार करणे अवघड आहे. मुलं होणे सोपे आहे पण त्यांचे पालन, पोषण, शिक्षण, संस्कार होणे फार अवघड आहे. नोकरी मिळणे सोपे आहे मात्र टिकविणे अवघड आहे. पैसा मिळणे

सोपे आहे पण व्यवस्थित मार्गी लावणे अवघड आहे. मी कामगार होतो. माझ्या जीवनात मी बरेच लोक पाहिले. दहा हजार पगार घेऊन कर्जबाजारी. कां ? याचे उत्तर तुकोबाराय देतात.

**तुका म्हणे ताळा । नाही त्याचि अवकळा ॥**

**एक घटना -** एकदा कांद्याचा भाव ४० रु. किलो झाला होता. सातार्‍याकडील एक कांद्याचा ट्रक घेऊन चार शेतकरी नाशिकला कांदा विकण्याकरीता आले होते. त्यांना २ लाख रुपये मिळाले. त्यांनी ठरविले जाताना मुंबईहून जाऊ. पैसे भरपूर मिळाल्यामुळे त्यांनी ट्रॅक्स जीप भाड्याने ठरविली. त्यात चौघे बसले. त्यांची चर्चा चालली. बर्‍याच दिवसांनी आपणास एवढे पैसे मिळाले आहेत. एक म्हणाला, 'मला शर्यतीत बैल घ्यायचा आहे.' एक म्हणाला, 'मी बोअर मारायचा विचार करतो आहे.' तिसरा म्हणाला, 'चार म्हशी घ्याव्याशा वाटतात.' चौथा म्हणाला, 'मी विहिर खोदण्याकरिता या पैशाचा विनियोग करणार आहे.' चौघांचे बोलणे ड्रायव्हर ऐकत होता. तो पुढे बघत होता पण त्याचे कान मात्र मागे होते. त्याने सर्व बोलणे ऐकले. कसारा घाटात गाडीस ब्रेक लावला. म्हणाला, 'मालक गाडी बिघडली आहे. धक्का मारावयास हवा.' दोघे उतरून धक्का मारू लागले, पण गाडी हालत नव्हती. ड्रायव्हर म्हणाला, 'चौघांनी धक्का मारावयास हवा.' चौघेही पैशाच्या बॅगा आत ठेवून खाली उतरले व गाडीस धक्का मारला. गाडी सुरू झाली. ती जी पळाली ती कल्याणलाच थांबली. या चौघांनी बर्‍याच गाडीवाल्यांना हात दाखवला. परंतु रात्रीची वेळ असल्यामुळे कोणीही गाडी थांबवली नाही. ड्रायव्हर २ लाख रुपये घेऊन पसार झाला व हे चौघेजण हात चोळीत कसेतरी घरी पोहोचले. पैसे मिळाले पण घरी येईपर्यंतसुद्धा सांभाळता आले नाहीत. म्हणून योगाहून क्षेम कठीण आहे. ज्ञानोबाराय म्हणतात, नहुष राजास शंभर यज्ञांमुळे स्वर्ग प्राप्त झाला पण उताविळ झाला. गादीवर बसल्यावर प्रथम त्याने शचीस (इंद्राची बायको) आमंत्रण पाठविले. ती म्हणाली, 'मला भेटण्याकरीता असे वाहन आणावे जे कोणीही वापरले नाही.' राजा कामातूर झाला होता. कामातूराचे चार दोष तुकोबाराय सांगतात 'कामातूरा, भय, लाज, ना विचार । शरीर असार तृणतुल्य ॥' त्याने सर्व वाहनांचा विचार करून एक पालखी ठरविली व त्या पालखीस ऋषी-मुनी भोई म्हणून लावले. ते राजास पालखीतून नेत होते पण यास घाई झाली होती. नहुष म्हणाला, 'झपाझप चला.' ऋषींना राग आला. त्यांनी विचार केला, हा काय चांगल्या कामाकरिता चालला आहे का ? ऋषिंनी राजास शाप दिला तू सर्प होशील. नहुष राजा सर्प झाला.

**नहुषु स्वर्गाधिपति जाहला । परी राहाटीं भांबावला ।**
**तो भुजंगत्व पावला । नेणसी कायी ॥ ज्ञाने १८/१४७९**

स्वर्गातील इंद्रपद मिळाले पण टिकवता आले नाही.

एका कंपनीतील एका सामान्य कामगारास त्याच्या कामाची चिकाटी, प्रामाणिकपणा पाहून मॅनेजरने त्यास बढती देण्याचे ठरविले. शुक्रवारी त्यास सांगितले, 'तुला सोमवारी लेटर देतो.' यास

आनंद झाला. त्याने आपला आनंद बिअर बारमध्ये मित्रांच्या समवेत साजरा केला. तिथे पिऊन मारामारी झाली. तिघांची डोकी फुटली. जेव्हा मॅनेजरला हे कळले तेव्हा त्याने विचार केला हा प्रमोशनच्या लायकीचा नाही. त्याची बढती रद्द केली. यासच देव देतो व कर्म नेते म्हणतात.

गीतेत मात्र देवानी आश्वासन दिले आहे माझा जो अनन्य भक्त आहे त्याचा मी योगक्षेम चालवितो.

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ गीता ९/२२**

व्यवहारात काही माणसे एखादी वस्तू हातावर देतात व कोपरावर मारतात म्हणजे दिलेली वस्तू पडून जावी. परमात्मा मात्र तसा नाही. तो देतो व सांभाळतो.

**कथा -** रामाने बिभीषणास लंका दिली. 'लंका राज्य बिभीषणा । केली चिरकाळ स्थापना ॥' तु.म. रामराज्य सुरू झाल्यानंतर लंकेत अशी घटना घडली. जेव्हा युद्ध चालू होते तेव्हा कुंभकर्णाची बायको गरोदर होती तिला मुळकासूर नावाचा मुलगा झाला. तो १०-१२ वर्षाचा झाल्यानंतर आईने सांगितले, 'तुझ्या या काकाने तुझ्या वडिलांना व दुसऱ्या काकांना (रावणास) रामाकडून मारून राज्य हस्तगत केले आहे.' त्यास राग आला. तो तपश्चर्येस गेला. अनेक वर्षे तपश्चर्या करून त्याने ब्रह्मदेवास प्रसन्न करून घेतले. अनेक वर मागितले व लंकेवर स्वारी केली. बिभीषण घाबरला. पळून रामाकडे आला व म्हणाला, 'मला लंकेचे राज्य दिले पण माझ्या पुतण्यानेच आपल्यासमोर ते हिरावून घेतले.' रामास आश्चर्य वाटले. रामाने अंतर्ज्ञानाने विचार केला, याने कोणकोणते वर मागून घेतले आहेत ? ब्रह्मदेवाकडून स्त्रीच्या हातून मृत्यू नको हा वर मागितला नव्हता. रामाने सितेस घेतले, रथ घेऊन गेले व सीतेने मुळकासूराचा वध करून लंका परत बिभीषणास दिली. याला म्हणतात योग-क्षेम.

यापेक्षा माऊली म्हणते परमात्मा भक्तास सायुज्यता मुक्ति देतो. ती आवडत नसेल तर प्रेम देतो व ते टिकवतो.

**तया माझिया सायुज्याची चाड । तरि तेचिं पुरवीं कोड ।**
**कां सेवा म्हणती तरी आड । प्रेम सुयें ॥ ज्ञाने.९/३४१**

**ऐसा मनीं जो जो धरिती भावो । तो तो पुढां पुढां लागें तयां देवों ।**
**आणि दिधलियाचा निर्वाहो । तोही मीचि करीं ॥ ज्ञाने.९/३४२**

**हा योगक्षेमु आघवा । तयांचा मजचि पडिला पांडवा ।**
**जयांचिया सर्वभावा । आश्रयो मी ॥ ज्ञाने.९/३४३**

**'योगक्षेम' त्यांचे जाणे जडभारी । वाट दावी करी धरुनिया ॥ तु.म.**

**त्यांचा भार वाहे माथा । करी 'योग क्षेम' चिंता ॥ तु.म.**

★★★★★

## (६४) खळ व संत

खळ या शब्दाचे चार अर्थ होतात. १) खळ म्हणजे कष्ट, मेहनत. 'आणिली ही रूपा बळें । करूनि खळें हरिदासीं ॥ तु.म., २) खळ म्हणजे एक चिकटविण्याचा पदार्थ, ३) खळ म्हणजे धान्य मळण्याची जागा, ४) खळ म्हणजे दुष्ट. या जगात खळही आहेत व सज्जन संतही आहेत. पण या दोघांचा अनादि वैराकार आहे. ज्याप्रमाणे मासे व धीवर, श्वापदे व पारधी तद्वत 'तुका म्हणे खळ । संता पीडिती चांडाळ ॥ खळांचे गुण आहेत चहाडी, चोरी, सिंदळकी 'तुका म्हणे संता पीडितील खळ । घेती तोंड काळे करूनिया ॥ ज्यांचे शरीर म्हणजे कुंभपाक नरक, ज्यांची वाणी म्हणजे निष्ठुरता, ज्यांची दृष्टी पापी व ज्यांचे चित्त मळयुक्त असते त्यांना खळ म्हणतात. त्यांचा भूमीस भार होतो. तुकोबाराय म्हणतात, तो माणूस निषिद्ध आहे. 'दुराचारी तो चांडाळ । पाप सांगाते विटाळ । तुका म्हणे 'खळ' । म्हणोनिया निषिद्ध तो ॥ सर्वांचा देह पंचमहाभूतांचा आहे. पण अवगुणांचा, विकारांचा साठा म्हणजे खळ. 'तीळ जाळिले तांदुळ । काम क्रोध तैसेचि खळ ॥ तु.म. सद्गुणांचा साठा म्हणजे सज्जन. तुलसी-रामायणात शंकर पार्वतीस खळांची व्याख्या सांगतात -

**बाढे 'खल' बहु चोर जुवारी । जे लंपट परधन परनारी ।**
**मानुहि मातु पितु नहीं देवा । साधुन्ह सन करवा वही सेवा ।**
**जिन्हके यह आचरण भवानी । ते जानेहु निसिचर सब प्रानी ॥**

**अर्थ** - चोर, जुगारी, परधन, परनारीशी लंपट, आई-वडील, देव यांना न मानणारे, साधूकडून सेवा करून घेणारे हे सर्व निशाचर, खळ आहेत. यांचे विचार राक्षसी असतात.

ज्ञानोबाराय वर्णन करतात - वास्तविक विश्व हे अनादी आहे. याचा नियंता ईश्वर आहे. पापपुण्याचा निवाडा वेद करतो पण असुर यास थोतांड समजतात. ते म्हणतात -

**यज्ञमूढ ठकिले यागीं । देवपिसे प्रतिमालिंगीं ।**
**नागविले भगवे योगी । समाधिभ्रमें ॥ ज्ञाने.१६/२९८**

**तेथ आपलेनि बळें । भोगिजे जें जें वेंटाळें ।**
**हें वांचोनि कें वेगळें । पुण्य आहे ॥ ज्ञाने.१६/२९९**

**ना अशक्तपणें आंगिकें । वेगळवेंटाळीं न टके ।**
**ऐसा गादिजे वीण विषयसुखें । तेंचि पाप ॥ ज्ञाने.१६/३००**

**प्राण घेपती संपन्नांचे । तें पाप जरी साचें ।**
**तरी सर्वस्व हाता ये तयांचें । हे पुण्यफळ कीं ॥ ज्ञाने.१६/३०१**

**बळी अबलातें खाय । हेंचि बाधित जरी होय ।**
**तरी मासयां कां न होय । निसंतान ॥ ज्ञाने.१६/३०२**

**आणि कुळे शोधूनि दोन्ही । कुमारेंचि शुभलग्नीं ।**
**मेळवीजती प्रजासाधनीं । हेतु जरी ॥ ज्ञाने.१६/३०३**

**तरी पशुपक्षादि जाती । जया मिती नाहीं संतती ।**
**तयां कोणें प्रतिपत्ती । विवाह केले ॥ ज्ञाने.१६/३०४**

**चोरियेचे धन आलें । तरी तें कोणासि विष जालें ।**
**वालभें परद्वार केलें । कोढी कोणी होय ॥ ज्ञाने.१६/३०५**

**अर्थ -** याज्ञीक, यज्ञाने देव वेडे प्रतिमा व लिंगांनी, संन्यासी व योगी समाधी भ्रमाने फसले. जगात आपल्या सामर्थ्याने जे मिळते ते भोगावे यापेक्षा वेगळे पुण्य काय आहे ? शरीराच्या अशक्तपणाने निरनिराळे भोग भोगता येत नाहीत हेच पाप आहे. श्रीमंतांचे धन हिरावून घेणे हे पाप आहे. पण धन प्राप्त होणे हे पुण्य नाही का ? बळी अबळांना खातात हे खरे असते तर माशांचे निःसंतान झाले नसते का ? दोन्ही कुळे शोधून मुहूर्त काढून लग्न करावे असे आहे तर पशु पक्षांना भरपूर संतती होते. त्यांची कुठे लग्ने होतात ? चोरीचे धन कोणास विष होत नाही. अथवा स्त्रीने परपुरुष गमन केले तर कोड फुटत नाही, असे हे खळांचे उलटे विचार असतात. ज्ञानोबाराय वर्णन करतात.

**काळिमा सांडील कोळसा । वरी चोखी होईल वायसा ।**
**राक्षसही मांसा । विटों शके ॥ ज्ञाने १६/२८५**

**परी आसुरां प्राणियां । शौच नाहीं धनंजया ।**
**पवित्रत्व जेवीं भांडिया । मद्याचिया ॥ ज्ञाने १६/२८६**

**अर्थ -** कोळसा काळिमा सांडिल, कावळा चोख होईल, राक्षसास मांसाचा वीट येईल पण असुरी प्रकृतीच्या लोकांना पवित्रत्व येणार नाही. ज्या प्रमाणे मद्याचे भांडे असते. शहाण्या माणसाने खळांची संगत करू नये. 'खळांची संगती उपयोगासी नये । आपणा अपाय त्यांचे संगे ॥' नाथ. खळांचा एवढा विचार करण्याचे कारण हे खळ संतांचा मात्र छळ करतात. किंबहुना तो त्यांचा उद्योगच असतो. 'खळा सदा क्षुद्र दृष्टी । करी कष्टी सज्जना ॥' तु.म. महाभारताचा खलनायक आहे दुर्योधन. याने पांडवांना संपविण्याचा प्रयत्न केला. भिमास विष घातले. लाक्षागृहात जाळण्याचा

प्रयत्न केला. साध्वी द्रौपदी सभेत उघडी करण्याचा प्रयत्न केला. कपटाने जुगार खेळून पांडवांना वनवासास पाठविले. पांडव वनात गेले तरी तिथेसुद्धा दुर्वास ऋषींना पाठवून छळ करण्याचा प्रयत्न केला. 'दुर्वास पातला धर्मा छळावया वनीं । धांवसी लवलाही शाखा देठ घेऊनि ॥' तु.म. पण सज्जनांचा कैवारी परमात्मा श्रीकृष्ण असल्यामुळे पांडव सर्व संकटातून बचावले. एवढा छळ करून धर्मराज मात्र कौरवांविषयी दया प्रगट करतात. याचे कारण 'दया संता भांडवल । वेचि बोल उपकार ॥' तु.म.

**दृष्टांत -** व्यासांचे अवतार जयदेव एकदा जंगलातून जात होते. थोडी संपत्ती जवळ असल्यामुळे चार चोरांनी लुटली व जयदेवांचे हात-पाय तोडून त्यांना विहिरीत टाकले. विहिरीत पाणी नव्हते. भजन करत राहिले. त्या देशाचा राजा जंगलात आला होता. त्याने जयदेवांना बाहेर काढले. तेज पाहून राज्यात नेले. जयदेव कथा करू लागले. राजानी त्यांना गुरू केले. एकदा राजाने विचारले, 'सर्वात मोठे पुण्य कोणते ?' जयदेवांनी सांगितले, 'साधूंचा सन्मान करणे यासारखे पुण्य नाही.' राज्यातील सर्व साधूंना बोलाविले. हे चौघे चोर साधूंचा वेश घेऊन आले. जेव्हा जयदेवांनी सांगितले, 'हे चार जण मोठे साधू आहेत. यांना विशेष दान देऊन यांची काळजी घ्या.' राजाने त्यांची सोय केली व विचारले, 'आमच्या गुरूंची आपल्यावर विशेष दया का आहे ?' ते खोटे बोलले. 'हे चोर होते. आम्ही यांना ठार न मारता यांचे फक्त हात-पाय तोडले. यांना जिवंत ठेवले म्हणून आमचे आभार मानतात.' पण या वेळी जमीन दुभंगली व या चार चोरांना पोटात घेतले. राजाने हा प्रकार जयदेवांना सांगितला. जयदेवांनी देवाचा धावा केला. देव प्रगट झाले. जयदेव म्हणाले, 'देवा, आपल्या शत्रूंना तू मोक्ष देतोस मग माझ्या शत्रूंना नरक का ? यांना सुद्धा मुक्त कर.' हा आहे साधूंचा स्वभाव. ज्ञानोबारायांचा विसोबा खेचरांनी फार छळ केला पण माऊलीने त्यांना मुक्त करून नामदेवरायांचे गुरू केले. नाथांच्या अंगावर थुंकणारा यवन यास नाथांनी प्रसाद देऊन मुक्त केले. 'यवन अंगावरी थुंकला । प्रसाद देऊनी मुक्त केला ॥' एवढा मोठा खळ वाल्या कोळी पण नारदांनी त्यास वाल्मिक ऋषी बनविले.

तात्पर्य - संतांचा स्वभाव खळांना निर्मळ करतो.

**तुका म्हणे खळ । करू समयी निर्मळ ॥**

**संत असंतनी कै असी करणी । जिमी कुटार चंदन आचरणी ।**
**काटई परसु मलय सुनू भाई । निजगुण देई सुगंध बसाई ॥ तुलसी.**

**अर्थ -** संत व असंत कसे असतात तर चंदन व कुऱ्हाडीसारखे. चंदन तोडण्याकरिता कुऱ्हाड वापरतात पण त्या कुऱ्हाडीस चंदन आपला सुगंध अर्पण करते. संतांना छळण्यास दुष्ट जातात पण ते सुष्ट होतात.

**अगा वरी फोडावयाचि लागीं । लोहो मिळो कां परिसाचे आंगीं ।**
**कां जे मिळतिये प्रसंगीं । सोनेंचि होईल ॥ ज्ञाने ९/४६४**

**अर्थ -** एखादा परीस फोडण्याकरिता घन व ऐरणीच्या मध्ये ठेवला तर परीस स्वतःच्या स्पर्शाने ऐरण व घन यांना सोने बनवितो. खळ संतांना छळतात पण संत खळांना संत बनवितात. माऊलींनी पसायदानात विश्वात्मक देवाजवळ मागणी मागितली आहे.

**जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रति वाढो ।**
**भूतां परस्परे पडों । मैत्र जीवाचें॥ ज्ञाने १८/१८९४**

देवाचा अवतार खळांच्या नाशाकरिता पण संतांचा अवतार खळांचा खळपणा घालविण्याकरिता असतो.

★★★★★

## (६५) संत आणि जन

संत व जन हे दिसण्यास जरी सारखे असले, त्यांच्या क्रिया एक सारख्या होत असल्या तरी जनामध्ये व संतांमध्ये फार मोठे अंतर आहे. त्यांना एक समजणे हा मोठा अपराध आहे. तुकोबाराय म्हणतात अधम माणसे संतांना सामान्य जन समजतात. तीर्थास जळ समजतात व मूर्तीस पाषाण मानतात. 'तीर्थ जळ देखे पाषाण प्रतिमा । संत ते अधमा माणसा ऐसे ॥' कल्पतरू झाडाची इतर झाडांशी कशी तुलना होऊ शकेल ? चिंतामणी अथवा हिरा याची तुलना इतर दगडांशी होणार नाही. कामधेनु व इतर गाई, म्हशी यांची तुलना करणे मूर्खपणाचे ठरेल. सरोवर, विहिरी, नदी यांची तुलना समुद्राशी होऊ शकत नाही. शहाणा माणूस, अनेक चांदण्या, चंद्र यांची तुलना सूर्याबरोबर करीत नाही. तद्वत संत व जन याची तुलना करू नये. तुकोबारायांच्या शब्दात,

**हिरा परीस मोहरा आणीक पाषाण । नव्हे परिजन संता तैशी ॥**
**सरिता ओहळ गंगा सागरा समान । लेखी तयाहून अधम नाही ॥**
**आणिक अमूप होती तारांगणे । रविंसी समान लेखू नये ॥**

जन व संत यांची तुलना सांगणारा एक अभंग.

**दह्याचिये अंगी निघे ताक लोणी । एका मोले दोन्ही मागों नये ॥१॥**
**आकाशाचे पोटी चंद्र तारांगणे । दोहोंसी समान पाहों नये ॥२॥**
**पृथ्वीच्या पोटी हिरा गारगोटी । दोहोंशी संवसाठी करू नये ॥३॥**
**तुका म्हणे तैसे संत आणि जन । दोहोंशी समान भजू नये ॥४॥**

हा विषय अतिशय महत्त्वाचा आहे. तुकोबारायांचा एक मोठा अभंग आहे.त्यामध्ये हा विषय मांडताना त्यांनी ३४ दृष्टांत दिले आहेत. विस्तार भयास्तव तो अभंग न देता फक्त दुसरे चरण देत आहे.

**समुद्र नदी नव्हे पैंगा । पाषाण म्हणो नये लिंगा ।**
**संत नव्हती जगा । माणसा त्या सारखे ।। तु.म.**

जगात काही सारखे दिसतात पण योग्य वेळी त्यांचे कर्म लक्षात येते. 'हिऱ्या ऐशा गारा दिसती दुरोन । तुका म्हणे घन न भेटे तो ।।

**१) हंसः श्वेतो बकः श्वेतः को भेदो बक हंसयोः ।**
**नीरक्षीर विवेके तु हंसो हंसो बको बकः ।। सुभा.**

**अर्थ** - हंस व बगळा हे दोन्ही पांढरेच आहेत. यांच्यात फरक काय ? पण जेव्हा पाणी व दूध यांचे मिश्रण होते तेव्हा हंस व बगळा ओळखला जातो.

**२) काकः कृष्णः पिकः कृष्णः को भेद पिक काकयोः ।**
**वसंत समये प्राप्ते काकः काकः पिकः पिकः ।। सुभा.**

**अर्थ** - कावळा व कोकिळ दोघे दिसायला सारखे पण वसंत ऋतू येताच आवाजावरून कावळा व कोकिळ यांची परीक्षा होते.

**दोन्ही दिसती सारखी । वर्म जाणे तो पारखी ।। तु.म.**

आई मुलांच्या गालावरून हात फिरवते व नाभीकपण दाढी करताना गालावरून हात फिरवतो. पण यांच्या भावात फरक असतो. आईचा वात्सल्य भाव आहे व नाभिकाचा पैशांचा भाव असतो. गीताकारांनी व ज्ञानेश्वर महाराजांनी महात्मा व सामान्य यांच्या क्रिया सारख्याच सांगितल्या आहेत.

**नैव किंञ्चित्करोमीति युक्तो मन्येत तत्ववित् ।**
**पश्यञ्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नच्छन्स्वपञ्श्वसन् । गीता ५/८**
**प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।**
**इन्द्रियाणीन्द्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन् ।। गीता ५/९**

जवळ जवळ १३-१४ क्रिया सारख्याच असतात. माऊलींच्या भाषेत,

**एऱ्हवीं आणिकांचिये परी । तोही एक शरीरी ।**
**अशेषींही व्यापारीं । वर्ततु दिसे ।। ज्ञाने ५/४०**

**तोही नेत्रीं पाहे । श्रवणीं ऐकतु आहे ।**
**परि तेथींचा सर्वथा नोहे । नवल देखें ।। ज्ञाने ५/४१**

**स्पर्शासि तरी जाणे । परिमळु सेवी घ्राणें ।**
**अवसरोचित बोलणें । तयाहि आथी ॥ ज्ञाने ५/४२**

**आहारातें स्वीकारी । त्यजावें तें परिहरी ।**
**निद्रेचिया अवसरीं । निदिजे सुखें ॥ ज्ञाने ५/४३**

**आपुलेनि इच्छावशें । तोही गा चालतु दिसे ।**
**पैं सकळ कर्म ऐसें । राहाटे कीर ॥ ज्ञाने ५/४४**

**हें सांगों काई एकैक । देखें श्वासोच्छ्वासादिक ।**
**आणि निमिषोन्निमिष । आदिकरूनि ॥ ज्ञाने ५/४५**

**पार्था तयाचे ठायीं । हें आघवेंचि आथि पाहीं ।**
**परी तो कर्ता नव्हे कांहीं । प्रतीतिबळें ।। ज्ञाने ५/४६**

संतांच्या, योग्यांच्या ठिकाणी 'मी' पणा हा भाव असत नाही. ते देहात वावरत असतात. पण देवच झालेले असतात.

**ते वर्तत दिसती देहीं । परि ते देहीं ना माझ्या ठायीं ।**
**आणि मी तयांच्या हृदयी । समग्र असे ॥ ज्ञाने ९/४०९**

वास्तविक सामान्य जनापेक्षा साधक मोठे, साधकापेक्षा सिद्ध मोठे, सिद्धापेक्षा संत मोठे असताना क्रियेवरून, पोषाखावरून संतांची तुलना जनाशी होऊ शकत नाही. काही जन लोकांना फसवून आपला स्वार्थ साधण्याकरिता संतांचा वेष घेतात. सामान्य लोक फसतात. पण संतांना देव व संतच ओळखतात. 'संत ते कवण संत ते कवण । हे जाणे खूण केशीराज ॥' ज्ञान. 'तुका म्हणे मज कळते चाचणी । बडबडीची वाणी अथवा सत्य ॥'

ज्ञानोबाराय सांगतात मनुष्यात संत हा माझाच अंश आहे, असे श्रीकृष्ण म्हणतात.

**तो पाषाणांमाजि परिसु । रसांमाजीं सिद्धरसु ।**
**तैसा मनुष्याकृति अंशु । तो माझाचि जाण ॥ ज्ञाने १०/७६**

**तो चालतें ज्ञानाचें बिंब । तयाचे अवयव ते सुखाचें कोंभ ।**
**येर माणुसपण ते भांब । लौकिक भागु ॥ ज्ञाने १०/७७**

**अगा अवचिता कापुरा । माजीं सांपडला हिरा ।**
**वरि पडिलिया नीरा । न निगे केवीं ॥ ज्ञाने १०/७८**

**तैसा मनुष्यलोकाआंतु । तो जरी जाहाला प्राकृतु ।**
**तऱ्ही प्रकृतिदोषाची मातु । नेणिजे तेथ ॥ ज्ञाने १०/७९**

**अर्थ -** तो पुरुष पाषाणामध्ये परीस, रसात अमृत, तसा तो मनुष्यात माझाच अंश आहे. तो चालते ज्ञानाचे बिंब आहे. त्याचे अवयव ते सुखाचे कोंब आहेत. त्यास लौकीक माणूस समजतात. अर्जुना, हिरा कापरात आहे. त्यावर पाणी पडले तर कापूर विरघळेल पण हिरा विरघळेल का ? त्या प्रमाणे तो जरी मनुष्य दिसला तरी जन्म-मृत्यू आदी प्रकृती-दोषांची गोष्ट त्यास माहीत नसते.

★★★★★

## (६६) देव ते संत

देव व संत यांच्यामध्ये भिन्नता नाही. देव व संत यांच्यामध्ये सारखेपण असलेले बारा मुद्दे मिळतात. यामध्ये श्रीकृष्ण व ज्ञानोबाराय यांची तुलना करण्याचा प्रयत्न आहे.

१) देव यांच्या स्वरूपामध्ये बदल नाही. देवच सांगतात,

**तेवीं आम्हां तयां परस्परें । बाहेरी नामाचींचि अंतरे ।**
**वांचूनि आंतुवट वस्तुविचारें । मी तेचि ते ॥' ज्ञाने ९/४११**

देव व संत यांचे देह दिव्य आहेत. देव मदनाचा पुतळा आहे. 'राजस सकुमार मदनाचा पुतळा । रवि शशी कळा लोपलिया ॥' तु.म. नाथ महाराजांना ज्ञानेश्वर महाराज भेटले, तेव्हा माऊलीचा देह कसा होता याचे ते वर्णन करतात - 'दिव्य तेजःपुंज मदनाचा पुतळा । परब्रह्म केवळ बोलतसे ॥' नाथ. देव अर्जुनास म्हणतात,

**संन्यासी तुवां होऊनि जनीं । चोरूनि नेली माझी भगिनी ।**
**तऱ्ही विकल्पु नुपजे मनीं । मी तूं दोन्ही 'स्वरूप' एक ॥ ज्ञाने १०/२९४**

**सख्यपणे अर्जुन नरनारायण । सृष्टी जनार्दन एकरूप ॥ ज्ञान.**

देवास सहा विकार नसतात. संतांनासुद्धा शरीराचे सहा विकार नसतात. १) गर्भात येणे, २) जन्मणे, ३) वाढणे, ४) तरूण होणे, ५) म्हातारे होणे, ६) मरणे.

सनकादिक संत हजारो वर्षांचे असले तरी त्यांचे शरीर पाच वर्षांच्या मुलासारखे असते. तुकोबारायांना मोरया गोसावी यांनी देहाची अवस्था विचारल्यानंतर मांडीतून कापसासारखा पदार्थ काढला व सांगितले, शरीरात रक्त, मास, हाडे, मज्जा राहिली नाही, तर काया ब्रह्मरूप झाली. कारण नामस्मरणाने, कीर्तनाने ही अवस्था होते.

**मग गोविंद ते काया । भेद नाही देवा तया ॥ तु.म.**

**ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनी । भाग्य तरी ऋणी देव ऐसा ॥ तु.म.**

**ध्यानी ध्याता पंढरीराया । मनासहीत पालटे काया ॥ तु.म.**

२) गुणांच्या बाबतीत दोघे सारखेच आहेत. देवाचे सहा गुण आहेत म्हणून त्यास भगवान म्हणतात.

**आइका यश श्री औदार्य । ज्ञान वैराग्य ऐश्वर्य ।**
**हे साही गुणवर्य । वसती तेथ ॥ ज्ञाने.६/३७**

ज्ञानोबारायांना नाथ महाराज भगवान म्हणतात. 'नररूपे अवतरला हा भगवान ॥'

रा) देवास कधी अपयश नाही - संतांनासुद्धा अपयश येत नाही.

म) लक्ष्मी देवाची दासी - लक्ष्मी संतांची दासी होते.

कृ) देव उदार आहे - संत अति उदार आहेत.

ष्ण) देव सर्वज्ञ आहे - संतसुद्धा सर्वज्ञ असतात.

ह) देव वैराग्यवान आहे - संतांकडेसुद्धा वैराग्य असते.

रि) देव ऐश्वर्यवान आहे - संतपण ऐश्वर्यवान असतात.

संतांच्या गुणांचे थोडक्यात वर्णन -

१) गीतेवर प्राकृत भाष्य करणे अवघड आहे. किती अवघड आहे हे माऊली सांगतात -

**जी कनकाचें निखळ । वोतूं येईल भूमंडळ ।**
**चिंतारत्नीं कुळाचळ । निर्मूं येती ॥ ज्ञाने.१८/१७७६**

**सातांही हो सागरातें । सोपें भरितां अमृतें ।**
**दुवाड नोहे तारांतें । चंद्र करितां ॥ ज्ञाने.१८/१७७७**

**कल्पतरूचे आराम । लावितां नाहीं विषम ।**
**परी गीतार्थाचें वर्म । निवडूं न ये ॥ ज्ञाने.१८/१७७८**

पण मला या बाबतीत यश आले असे माऊली म्हणतात.

**तेथ पुढा मी बापिया । मांडला आर्ती आपुलिया ।**
**कीं यासाठी येवढिया । आणिलों यशा ॥ ज्ञाने.१८/१७६२**

**मियां जैसजैसिया आशा । केला तुमचा भरंवसा ।**
**ते पुरवूनि जी बहुवसा । आणिलों सुखा ॥ ज्ञाने.१८/१७८५**

२) लक्ष्मी देवाची दासी आहे. 'चक्र गदा घेउनि हरि । उभा असे त्यांचे द्वारी । लक्ष्मी कामारी । ऋद्धी-सिद्धीसहीत ॥' तु.म.

**कथा -** नाथ महाराज एका श्रीमंत माणसास भेटण्यास गेले. त्याला धनाचा गर्व होता. तो लक्ष्मीचा दास होता. त्यामुळे लक्ष्मी प्रसन्न होऊन वैभव प्राप्त झाले होते. हे नाथ महाराजांना समजले. त्या श्रीमंत माणसास आपल्या घरी बोलाविले व अशा ठिकाणी बसविले की समोर न्हाणीघर (बाथरूम) दिसावे. मात्र त्याठिकाणी नाथांच्या घरी लक्ष्मी भांडी घासत होती. श्रीमंताचा अभिमान तात्काळ गेला. तो मनात म्हणाला, मी ज्यांचा दास आहे त्या आईसाहेब नाथांच्या दासी आहेत. 'वैष्णवा घरी लक्ष्मी कामारी । एका जनार्दनी देव दास्यत्व करी ॥'

३) संत अति उदार आहेत. देव उदार होऊन नाशिवंत पदार्थ देतो पण संत अविनाशी परमात्माच देतात. 'संत उदार उदार । भरले अनंत भांडार ॥' तु.म. 'या संतापरीस उदार । त्रिभुवनी नाही थोर । मायबाप सहोदर । इष्ट मित्र सोयरे ॥' ज्ञान.

४) संत हे सर्वज्ञ आहेत. ज्ञानोबांचे वर्णन त्यांच्याच भाषेत -

**मोटकी देहाकृती उमटे । आणि निजज्ञानाची पाहांट फुटे ।**
**सूर्यापुढां प्रगटे । प्रकाशु जैसा ॥ ज्ञाने.६/४५२**

**तैशी दशेची वाट न पाहातां । वयसेचिया गांवा न येतां ।**
**बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ॥ ज्ञाने.६/४५३**

**'उपजताची ज्ञानी' हे वर्म जाणोनि । आले लोटांगणी चांगदेव ॥ नाम.**

५) वैराग्य असे - ज्ञानोबाराय म्हणतात, जन्मानंतर स्त्रीदेह शिवणे नाही. तुकोबारायांचे वैराग्य 'जाई वो तूं माते न करीं सायास । आम्ही विष्णुदास तैसे नव्हों ॥' तु.म.

६) देवाच्या ऐश्वर्याएवढेच संतांचे ऐश्वर्य आहे. ज्ञानोबा - तुकोबा यांचा महाराष्ट्रात चालणारा सोहळा हे यांचे ऐश्वर्य दाखवितात.

३) संत व देव यांची शक्ती सारखी आहे. देव समर्थ आहेत, संतपण समर्थ आहेत - कर्तुम् अकर्तुम्. अन्यथा कर्तुम् शक्ती देवाकडे आहे. ती ज्ञानोबा तुकोबांकडे आहे. श्रीकृष्णाची १) कर्तुम् शक्ती - गीतेसारखा अलौकीक ग्रंथ दोन तासात सांगणे. २) सात औक्षहिणी सैन्याकडून अकरा औक्षहिणी सैन्याचा पराभव करणे ही अकर्तुम् शक्ती आहे. ३) सांदिपनी गुरूंचा मृत पुत्र आणून देणे ही अन्यथा कर्तुम् शक्ती आहे.

तुकोबारायांची १) कर्तुम् शक्ती - ज्या शिळेवर बसले ती शिळा परीस करणे. २) अकर्तुम् शक्ती - कोंडिबा लोहोकरे (साधारण सेवक) त्यांच्याकडून अलौकिक प्रवचन सेवा करून घेणे. ३) पाण्यात १३ दिवस वह्या तारणे - 'उदकामाजी वह्या ठेवुनि कोरड्या । दाखवणे रोकड्या विश्वजना ॥ निळो. (राम व माऊलीची शक्ती पहिल्या शतकोटीत दिली आहे.)

४) ज्या कार्याकरिता देव अवतार घेतो त्याच कार्याकरिता संत अवतार घेतात. देवाचे कार्य कोणते ?

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।। गीता ३/७**
**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्म संस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ गीता ३/८**

थोडक्यात धर्माची वाढ, अधर्माचा नाश, सज्जनांचे पालन व दुष्टांचा संहार या चार कारणांकरिता देव अवतार घेतो. साधूंचे हेच कार्य आहे. 'धर्माचे पालन । करणे पाखांड खंडण ।। हेचि आम्हा करणे काम । बीज वाढवावे नाम ॥' तु.म. मात्र देव दुर्जनांचा संहार करतात. संत मात्र दुर्जनांना सज्जन बनवितात.

५) देव जीवास जे फळ देतो तेच फळ संत देतात. अर्थात भुक्ती, मुक्ती, भक्ती. 'भुक्ति मुक्ति तूचि एक होसी सिद्धीचा दाता । म्हणोनि सांडवली शोक भय लज्जा चिंता । सर्वस्वें त्याग केला धांव घातली आतां । कृपादान देई देवा येऊनि सामोरा आता ॥' तु.म. पण संत भुक्ती, मुक्ती फुकट देतात. 'संतसज्जनीं मांडिली दुकानें । जे जया पाहिजे ते आहे रे । भुक्ति मुक्ति फुकाच साठी । कोणी तयाकडे न पाहे रे ॥' तु.म. पण संत भक्ती प्रेम देतात जे अतिशय दुर्लभ आहे. 'नामा म्हणे संत आहेत कृपासिंधु । देती भक्तीबोधु प्रेमसुख ॥'

६) व्यापकपणाच्या बाबतीत संत देवाची बरोबरी करतात. देव मोठ्यात मोठा आहे. संतही मोठ्यात मोठे आहेत. सगळ्यात मोठे आकाश आहे व सर्वात लहान अणू आहेत. देव व संत आकाशापेक्षा मोठे व अणूपेक्षा लहान आहेत. 'तुका म्हणे बहु मोठे । अणुरेणुया धाकुटे ॥ तुका म्हणे नभा । परता अणुचाही गाभा ॥ तुका म्हणे अणु तुजविण नाही । नभाहुनी पाही वाढ आहे ॥' हे देवाच्या बाबतीत आहे. तुकोबाराय म्हणतात मी पण तसा आहे. 'अणुरेणु या थोकडा । तुका आकाशा एवढा ॥ तुका म्हणे तैसे जाणा संतजन । सर्वत्र संपुर्ण गगन जैसे ॥'

७) देवाची सत्ता मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत आहे. चर-अचर यावर सत्ता आहे. 'वृक्षाचेही पान हाले ज्याची सत्ता । राहिली अहंता मग कोठे ॥' तु.म. 'सकळ सत्ता तया हाती । माझी किंव काकुलती ॥' तु.म. 'जेणे हे विश्व निर्मिले । महर्षी देवा संस्थापिले । एकविस स्वर्गाति धरिले । सत्ता मात्रे आपुलिया ॥' तु.म. संतांकडेपण ही सत्ता आहे. 'सकळ सत्ता आली हाता । नामयाचा खेचर दाता ॥' नाम. 'जगदाकारी झाली सत्ता । वारोनि गेली पराधीनता । अवघे आपुलेचि आता । लाज आणि चिंता दुरावली ॥' तु.म. किंबहुना जगावर ज्याची सत्ता आहे. त्याच्यावर संतांची सत्ता चालते. 'तुका म्हणे भावे । देवा सत्ता राबवावे ॥' देवाची काळावर सत्ता आहे. संताचीपण काळावर सत्ता आहे.

८) अधिकाराच्या बाबतीत दोघे सारखेच आहेत. 'मुकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरीम् । यत्कृपा तमहं वंदे परमानंद माधवम् ॥'

**अर्थ** - देवाच्या कृपेने मुका माणूस बोलतो व पांगळा डोंगर ओलांडतो पण ही माणसे आहेत. जो सर्वात निर्बुद्ध प्राणी रेडा त्याच्या मुखातून मराठी अभंग नाही, पुराणांतील, शास्त्रातील सोपे श्लोक नाही, तर वेदातील अवघड मंत्र, श्लोक माऊलीनी म्हैसी पुत्राच्या मुखातून वदविले. 'होता कृपा तुमची पशु बोले वेद ॥' निळो.

९) देवास जन्ममरण नाही. संतांनापण जन्ममरण नाही. 'कर्म नेणो धर्म नेणो नेणो आम्ही कांही । ज्ञानदेव म्हणे आम्हा येणे जाणे नाही ॥' 'बीज भाजोनि केली लाही । आम्हा जन्ममरण नाही ॥' तु.म.

१०) देवाची किर्ती त्रिभुवनात आहे. संतांची किर्तीसुद्धा त्रिभुवनात आहे. 'भक्तवत्सल दीनानाथ । तिही लोकी ज्याची मात ॥' तु.म. 'उभारिला ध्वज तिही लोकांवरी । ऐशी चराचरी किर्ती ज्याची ॥ निळो.

११) श्रीकृष्णाने बालक्रीडा केली. ज्ञानोबादि चार भावंडांनिही बालक्रीडा केली. 'धरुनि सगुण रुप केली बालक्रिडा । बोलविला रेडा निगम वाचे ॥ नाम.

१२) देवाचा स्वभाव कृपाळू आहे. 'तैसा नव्हे देव राव । याचा कृपाळु स्वभाव ॥' तु.म. पण देव निष्ठुरही आहे. 'हरि तू निष्ठुर निर्गुण । नाही माया बहु कठीण । नव्हे तें करीसी आण । कवणे नाही केले ते ॥' तु.म. देव निर्गुणपणात निष्ठुर आहे. सगुण रूपात मात्र कृपाळू आहे. पण संत मात्र नेहमी कृपाळू आहेत. 'कृपाळु सज्जन तुम्ही संतजन । एवढे कृपादान तुमचे मज ॥' तु.म. 'तुका म्हणे तुम्ही उदार कृपाळ । शृंगारीले बाळ कवतुके ॥' असे कृपाळू ज्ञानोबाराय आहेत. 'कृपाळु उदार माझा ज्ञानेश्वर । तया नमस्कार वारंवार ॥' नाथ.

तात्पर्य - १) स्वरूप २) गुण ३) शक्ती ४) फळ ५) कार्य ६) सत्ता ७) अधिकार ८) व्यापक ९) क्रीडा १०) कीर्ती ११) जन्म मरणातीत व १२) स्वभावात देव व संत सारखे आहेत. दोघात भेद समजू नये 'देव ते संत देव ते संत। निमित्त त्या प्रतिमा ॥' तु.म.

★★★★★

# (६७) कीर्तन चांग कीर्तन चांग

सर्व शास्त्रांनी, वेदांनी व संतांनी कलीयुगात कीर्तन साधनेस महत्त्व दिले आहे. देवास कीर्तन आवडते. तुकाराम महाराज म्हणतात, 'कोठे नका पाहो करा हरिकथा । तेथे अवचिता सांपडेल ॥' तुकोबांनी कीर्तन चांग द्विरुक्ती केली आहे त्याचा संतवाङमयाच्या माध्यामातून विचार.

१) कीर्तन अवांतर फळ देते व परम फळ देते. झाडाची सावली अवांतर प्रयोजन व झाडाचे फळ परम प्रयोजन. तसे कीर्तन संसारात असताना केले तर आनंद देते व शेवटी देवाची प्राप्ती होते.

२) कीर्तन आतून चांगले - बाहेरून चांगले

कीर्तन करणाऱ्यास आनंद होतो व श्रोत्यांनासुद्धा आनंद मिळतो.

३) कीर्तन अगोदर चांगले - नंतर चांगले

संसारात काही गोष्टी अगोदर चांगल्या वाटतात पण नंतर दुःख देतात.

**पहिले संवचोराचे मैत्र । हाट भेटीचे कलत्र ।**
**कां लाघवियाचे विचित्र । विनोद ते ॥ ज्ञाने १८/८९७**

पहिला संवचोराचा (सभ्य पण चोर) संगत चांगली पण नंतर तो लुटून जातो. कांही विष, खाताना चांगले पण त्याचे परिणाम वाईट. मात्र कांही औषधे प्रथम कडू नंतर परिणाम चांगला. पण नाम, कीर्तन दोन्ही वेळा चांगले.

४) कीर्तन साधनात चांगले - साध्यात चांगले. योग व विवेक (ज्ञान) मिळविणे अतिशय कठीण गोष्ट पण परिणाम चांगला.

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।**
**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ गीता १२/५**

**योगाचिया वाटा । जे निगाले गा सुभटा ।**
**तयां दुःखाचाचि वाटा । भागा आला ॥ ज्ञाने १२/६९**

ज्ञानोबाराय ज्ञानाचे कष्ट सांगतात.

**विवेकश्रवणें अतित्रासें । जेथ व्रताचरणें कर्कशें ।**
**करितां जाती भोकसे । बुद्धयादिकांचे ॥ ज्ञाने १८/७८३**

**जया ज्ञानालागीं । गगन गिळिताती योगी ।**
**स्वर्गाची आडवंगी । उमरडोनि । ज्ञाने १३/१६२**

कीर्तन करताना कष्ट नाही शिवाय परीणाम चांगलाच !

५) कीर्तनामुळे जिवाचे कल्याण - व देहाचे कल्याण होते. इतर साधनांनी जीव ब्रह्म होतो पण कीर्तनाने नासकी, कुजकी काया ब्रह्मरूप होते. 'ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनी । भाग्य तरी ऋणी देव ऐसा ॥' तु.म.

६) कीर्तन वक्त्यास चांगले - श्रोत्यास चांगले

'नित्य नवा किर्तनी कैसा ओढवला रंग । वक्ता आणि श्रोता स्वये झाला श्रीरंग ॥' नाथ

७) कीर्तन भक्तास चांगले व देवास चांगले

कीर्तन भक्तांना आवडते देवास पण आवडते 'तुका म्हणे यासी किर्तनाची गोडी । प्रेमे घाली उडी नामासाठी ॥'

८) कीर्तनामुळे व्यक्तिगत फायदा होतो व समाजाचा फायदा होतो.

९) कीर्तनामुळे व्यवहारिक फायदा होतो व अध्यात्मिक फायदा होतो.

१०) कीर्तन अज्ञानास चांगले, कीर्तन ज्ञान्यास चांगले.

११) कीर्तन दुःखात चांगले, कीर्तन सुखात चांगले. 'विठ्ठल सुखा विठ्ठल दुःखा । तुकया मुखा विठ्ठल ॥' कीर्तन बारशास चालते व कीर्तन तेराव्यास पण चालते.

१२) कीर्तन मनाकरिता चांगले व कीर्तन तनाकरिता चांगले.

१३) कीर्तन एकांतात चांगले व कीर्तन लोकांतात चांगले.

१४) कीर्तन इहलोकात चांगले व कीर्तन परलोकात चांगले.

१५) कीर्तन अनिष्ट निवृत्तीकरिता चांगले व कीर्तन इष्टप्राप्तीकरिता चांगले. म्हणून 'कलियुगामाजी करावे किर्तन । तेणे नारायण देईल भेटी ॥' तु.म.

**चिंतन -** कीर्तनाच्या तीन पद्धती

१) व्यास - कथा सांगणे, नामस्मरण करणे.

२) नारद - अनेक वाद्यांच्या सहायाने, संगिताच्या द्वारे देवाचे चरित्र, गुण गाणे.

३) हनुमान - नामस्मरण करता करता नाचणे.

मात्र वारकरी कीर्तनात या तीनही पद्धती वापरल्या जातात.

★★★★★

# (६८) मोह लोभ शोक

अर्जुनाचा मोह जाण्याकरिता भगवत् गीता निर्माण झाली. गीतेचा अलंकार म्हणजेच ज्ञानेश्वरी. 'गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंद लहरी प्रगट केली ॥' नाम. ज्ञानोबांनी हा ग्रंथ सहज लिहिला आहे.

**ज्ञानं मोह विनाशकं भगवता पार्थाय प्रोक्तं रणे ।**
**गुह्यं तत्परमं हिताय जगतो यस्यां च स्पष्टीकृतम् ।**
**ज्ञानेशेन सलिलया विकथिता देशिय भाषासु या ।**
**यावश्चंद्र दिवाकरौ विजयतां सा नाम ज्ञानेश्वरी ॥**

**अर्थ -** भगवंतांनी रणांगणामध्ये पार्थास मोह जाण्याकरिता जे ज्ञान सांगितले तेच गुह्य परम ज्ञान अगदी स्पष्ट रूपात (मातृ) मराठी भाषेमध्ये सहज लीलेने ज्ञानेश्वरांनी सांगितले. जो पर्यंत चंद्र सूर्य आहेत तो पर्यंत नेहमी विजयी राहणारी अशी ज्ञानेश्वरी आहे. मोह कशास म्हणतात ? विनाशी पदार्थाची अंतःकरणात आसक्ती करणे यास मोह म्हणतात. अर्जुनास नातेवाइकांचा सात्विक मोह झाला होता. द्रोणाचार्यांना मुलाचा राजस मोह होता व धृतराष्ट्रास मूर्ख मुलांचा तामस मोह झाला होता. हे सर्व मोह बंधनास कारण आहेत. माऊली म्हणते,

**मोह धरिलिया ऐसें होईल । जे असती प्रतिष्ठा जाईल ।**
**आणि परलोकही अंतरेल । ऐहिकेंसी ॥ ज्ञाने २/२७**

मोहाचा मुलगा आहे लोभ व लोभाचा मुलगा आहे शोक असे सर्व कुटुंबच आहे. माऊलींनी यास 'कुटुंब' शब्द वापरला आहे.

**मग अर्जुन म्हणे काय देवो । पुसताति आवडे मोहो ।**
**तरी तो सकुटुंब गेला जी ठावो । घेऊनी आपला ॥ ज्ञाने १८/१५५८**

नाथ महाराज आपल्या 'सर्प' या रुपकात मोहास भुजंग म्हणतात व लोभास साप म्हणतात. 'स्वरुप मंदिरी होते मी एकली । माया सांजवेळ अविद्येच्या बिळी । माझे तुझे चालता पाउली । मोह भुजंगे धरिली करांगुळी वो ॥' 'लोभ सर्प डंखला करू काय ॥' नाथ.

गीता एकाच वेळी तिघांनी ऐकली. १) धृतराष्ट्र २) अर्जुन ३) वानरु (शंकर). धृतराष्ट्राचा मोह गेला नाही. अर्जुनाचा थोडा राहिला कारण जेव्हा अभिमन्यू रणांगणात पडला तेव्हा अर्जुनास शोक झाला. शोक झाला म्हणजे मोह आहे असे अनुमान करता येते. हनुमंताचा मोह पूर्ण गेला. मुळात नव्हताच ! मोह जाणे तसे सोपे नाही.

**दृष्टांत - मोह -** एकदा नारद भ्रमण करीत होते. एक म्हातारा भेटला, ज्याचे वय साठ वर्षांचे होते. भक्ती करत होता पण कुटुंबाचा मोह सुटत नव्हता. नारद म्हणाले, 'आपले वय झाले आहे, माझ्याबरोबर चला, भजन करू, उरलेला वेळ भगवंताला देऊ.' पण म्हातारा म्हणाला, 'नंतर येतो.' काही दिवसांनी म्हातारा मरतो व बैल होतो. पण मोह असल्यामुळे त्यांच्याच घरी राबतो. नारद परत भेटतात म्हणतात, 'आता तरी चला.' बैल झालेला म्हातारा जात नाही. बैल मरून परत कुत्रा होतो. नारद परत आठवण देतात पण म्हाताऱ्यास कुटुंबाचा मोह सुटत नाही. कुत्रा मरून तो म्हातारा साप होतो, घराशेजारी राहतो. एक दिवस साप म्हाताऱ्याच्या नातवांना दिसतो. सगळे येतात व त्या सापास मारतात.

तात्पर्य - मोह सुटणे अवघड आहे. मोहामुळे लोभ निर्माण होतो. लोभसुद्धा माणसास मारून टाकतो.

**लोभ :**

१) प्राचीन काळात सृञ्जय नावाचा लोभी राजा होता. त्यास पुत्र नव्हता. म्हणून ब्राह्मणांची सेवा केली. नारद आले व म्हणाले, 'आपणास कसा पुत्र हवा आहे ?' त्याची विष्ठा, मुत्र सोन्याचे असावे. नारदांच्या आशीर्वादामुळे तसा पुत्र झाला. राजास भरपूर सोने मिळू लागले. संपूर्ण राजवाडा, पलंग, भांडी सर्व वस्तू सोन्याच्या करून घेतल्या. मुलाच्या संरक्षणाकरिता सैन्य ठेवले. ही बातमी सर्व राज्यात पसरली. एक दिवस जंगलातील डाकूंनी राजपुत्रास पळवून नेले. दहा पंधरा दिवस त्याच्याकडून सोने मिळवले. राजास समजल्यानंतर राजा आपल्यास मारील म्हणून डाकूंनी मुलास ठार मारले. राजास फार मोठा शोक झाला.

२) एका गावात एक दरिद्री ब्राह्मण राहात होता. उदर निर्वाहाकरिता शेती करीत असे. पण दुष्काळामुळे शेतात जास्त उत्पन्न मिळत नव्हते. असाच एकदा शेतात बसला असता वारूळातून नाग बाहेर आला. ब्राह्मण आस्तिक असल्यामुळे वाटीभर दूध ठेवले. नागाने दूध पिऊन वाटीत सोन्याची एक मोहर टाकली. ब्राह्मणास आनंद झाला. रोज नागदेवतेस तो दूध आणू लागला व रोज एक सोन्याची मोहर मिळू लागली. ब्राह्मणाची परिस्थिती सुधारली. सर्व व्यवस्थित चालले होते. पण ब्राह्मणाला महत्त्वाच्या कामाकरिता परगावी जायचे होते. मुलास सर्व गुह्य सांगितले व ब्राह्मण परगावी निघून गेला. मुलाने पहिल्या दिवशी वाटीत दूध ठेवले. नागदेवता दूध प्यायली व एक मोहर टाकली. मुलगा नास्तिक व लोभी होता. मुलास वाटले या वारूळात भरपूर मोहरा असाव्या. संध्याकाळी खोरे-पहार घेऊन आला व वारूळ उकरू लागला. नागदेवता संतप्त झाली व मुलाचा चावा घेतला. मुलगा गत:प्राण झाला. अर्थात हे अती लोभाचे फळ. लोभाचा मुलगा, शेवटी 'शोक' होणारच. मोह हा ज्ञानाने जातो. मोह असणे हे अज्ञानाचे लक्षण आहे. काही ज्ञानी म्हणविणारे पण त्यांनासुद्धा

मोह आवरत नाही. त्याचा परिणाम लोभ व शेवटी शोक म्हणजे दुःख आहेच. संतांना मात्र मोह नसतो.

**जया पुरुषांचें कां मन । सांडोनि गेले मोहमान ।**
**वर्षांतीं जैसें घन । आकाशातें ॥ ज्ञाने १५/२८५**

ज्याच्या उदरी ब्रह्मांडपती श्रीकृष्णाने जन्म घेतला त्या वसुदेवाची कंसाने निर्दयपणाने सहा बालके मारली. पण वसुदेवास शोक झाला नाही. 'धन्य त्याचे ज्ञान न करीच शोक । वधिता बालक नामा म्हणे ॥' नाम. शिवाजी महाराजांना जो उपदेश केला त्यामध्ये तुकोबाराय म्हणतात, 'गेला मोह आणि आशा । कळिकाळाचा हा फांसा ॥' मोहाचा कायमचा क्षय होणे यासच 'मोक्ष' म्हणतात.

**लोभाविष्टो नरोक्तिं वीक्षते नैव चापदम् । दुग्धं पश्यति माजरी यथा न लगुडाहतिम् ॥ सुभा.**

**अर्थ -** लोभी माणूस केवळ वित्त पाहतो. पण त्याच्या प्राप्तिची (परिणाम) संकटे पाहत नाही. ज्या प्रमाणे मांजर दूध तेवढे पाहते पण बडगा त्यास दिसत नाही.

राजा परिक्षिती भागवत कथा ऐकत होते. सहा दिवस झाले. पण सापाच्या भीतीने राजाचा शरीराचा मोह सुटत नव्हता. राजा चिंताग्रस्त दिसत होता. शुकाचार्यांनी एक कथा सांगितली. फार दिवसापूर्वी एक राजा शिकारीकरिता जंगलात गेला, पण रस्ता चुकला. रात्र पडली. वस्ती पाहू लागला. दूरवर एक दीपक दिसला व राजा तिथे पोहोचला. एका आजारी पारध्याची झोपडी होती. तो चालू शकत नव्हता. त्यामुळे मलमूत्राची व्यवस्था जवळच केली होती. खाण्यासाठी जनावरांचे मांस झोपडीत एका दांड्यास अडकविले होते. झोपडी घाणेरडी, अंधारयुक्त व दुर्गंधीयुक्त अशी होती. पारधी म्हणाला, 'राजा आपण इथे राहू शकणार नाही.' राजा म्हणाला सकाळी निघतो. मात्र राजा तिथेच थांबला. परिक्षिती म्हणाला, 'राजा मूर्ख दिसतो.' शुकाचार्य म्हणाले, 'तो राजा आपणच आहात. या मलमूत्राच्या पिशवीची अद्याप आपणास आसक्ती सुटत नाही.' परिक्षितीस ज्ञान झाले व शारीरिक बंधनातून मुक्त होण्यास तयार झाला.

**लोभ** - एका बालकाचा मृत्यू झाला. सर्व स्मशानात पोहोचले. पण खूप पाऊस पडत होता. काय करावे विचारात पडले. एवढ्यात एक कोल्हा आला व म्हणाला, 'या बालकास भूमीत पुरून टाका. धरणी माता याचा स्वीकार करेल.' एवढ्यात एक कासव आले व म्हणाले, 'या बालकास गंगेच्या पाण्यात सोडा. यापेक्षा श्रेष्ठ काय आहे ?' थोड्या वेळात गिधाड आले व म्हणाले, 'पाण्यात सडण्यापेक्षा, मातीत कुजण्यापेक्षा या बालकास हवेत, सूर्यप्रकाशात ठेवा.' तिघांचे स्वार्थी बोलणे ऐकल्यावर सर्वांनी पाऊस थांबल्यावर त्या बालकावर अग्निसंस्कार केला.



# (६९) दृष्टीची विविधता

प्रत्येक माणसास डोळे जरी सारखेच असले तरी त्यांच्या आतील वृत्तिमुळे जगाकडे पाहण्याची रीत वेगवेगळी असते. दृष्टीचे प्रामुख्याने तीन प्रकार पडतात. १) चर्मदृष्टी २) तत्त्वदृष्टी ३) समदृष्टी

१) **चर्मदृष्टी** - चामड्याच्या डोळ्यांनी जे दिसते तेवढेच खरे अशी समजणारी दृष्टी. यालाच माऊली स्थूलदृष्टीही म्हणतात. ही सामान्य लोकांची दृष्टी आहे.

**जे चामाचे डोळे दाविती । जें इंद्रियें गोडी लाविती ।**
**तेंचि साच हे प्रतीती । फुडी जया ॥ ज्ञाने १८/५७३**

**पैं स्थूलदृष्टी देखती मातें । तेंचि न देखणें जाण निरुतें ।**
**जैसें स्वप्नींचेनि अमृतें । अमर नोहीजे ॥' ज्ञाने ९/१४४**

२) **तत्त्वदृष्टी** - या जगात काही चांगले आहे, काही वाईट आहे. यामधून चांगले ग्रहण करणारी दृष्टी, जशी राजहंसाची दृष्टी. अशी दृष्टी साधकांची अथवा तत्त्वज्ञ लोकांची असते.

**या उपाधिमाजीं गुप्त । चैतन्य असे सर्वगत ।**
**तें तत्वज्ञ संत । स्वीकारिती ॥ ज्ञाने २/१२५**

**सलिलीं पय जैसें । एक होऊनि मीनलें असे ।**
**परी निवडूनि राजहंसे । वेगळें कीजे ॥ ज्ञाने २/१२६**

माऊलींनी अनेक दृष्टांत दिले आहेत. ज्या प्रमाणे बुद्धिवंत माणूस सोने अग्नित टाकून हिणकस बाजूस काढून शुद्ध सोने मिळवितो, किंवा हुशार माणूस दह्याचे मंथन करून लोणी, ताक वेगळे काढतो, अथवा शेतकरी भूस व बीज वाऱ्याच्या योगाने वेगळे करतो. तद्वत तत्त्वज्ञानी माणसे सार-असार निवडून सार ग्रहण करतात. अर्थात विवेकाने !

३) **समदृष्टी** - ही संतांची दृष्टी होय. यास ज्ञान दृष्टीही म्हणू शकतो. या संपूर्ण जगात देवाशिवाय काहीच नाही. सर्वत्र तोच भरला आहे अशी दृष्टी ती समदृष्टी होय. 'सर्वांभूती पाहे एक वासुदेव । पुसोनिया ठाव अहंतेचा ॥' नाथ.

**हें असो आणिक कांहीं । तया सर्वत्र मीवांचूनि नाहीं ।**
**जैसें सबाह्य जळ डोहीं । बुडालिया घटा ॥ ज्ञाने. ७/१३३**

**हें समस्तही श्रीवासुदेवो । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो ।**
**म्हणोनी भक्तांमाजीं रावो । आणि ज्ञानिया तोचि ॥ ज्ञाने ७/१३६**

**जयाचिये प्रतीतीचां वाखारां । पवाडु होय चराचरा ।**
**तो महात्मा धनुर्धरा । दुर्लभु आथी ॥ ज्ञाने ७/१३७**

**तोचि तो निरुता । समदृष्टि तत्वता ।**
**हरि म्हणे पंडुसुता । तोचि ब्रह्म ।। ज्ञाने ५/१०४**

अर्थात ही दृष्टी ज्ञानी भक्तांची आहे. आपली जशी दृष्टी असेल तशी सृष्टी दिसते. दुर्योधनास शोधून सज्जन सापडला नाही पण धर्मराजास मात्र शोधून दुष्ट सापडला नाही.

काही लोकांची कामी दृष्टी असते. यास तुकोबाराय पापी दृष्टी म्हणतात. 'श्वानाचियेपरी हिंडे दारोदारी । पाहे परनारी पापदृष्टी ।।' काही लोकांचे डोळे क्रोधाने ताबडतोब लाल होतात. ही क्रोधी दृष्टी. काही लोकांची लोभी दृष्टी असते जशी बगळ्याची नजर. कावळ्याची दृष्टी मात्र जिथे जखम तिथे चोच मारते. तशी काही माणसे वर्मावर दृष्टी (बोट) ठेवतात. खळांची दृष्टी मात्र नेहमी क्षुद्र असते. ती सज्जनांचे दोष काढण्याकरिताच असते. 'खळा सदा क्षुद्र दृष्टी । करि कष्टी सज्जना ।।' तु.म. मात्र सज्जनांची, संतांची, गुरूची दृष्टी ही कासवासारखी कृपाळू असते. 'कासवाचे बाळ वाढे कृपादृष्टी । दुधा नाही भेटी अंगसंग ।।' तु.म.

**विषयव्यालें मिठी । दिधलिया नुठी ताठी ।**
**ते तुझिये गुरुकृपादृष्टी । निर्विष होय ।। ज्ञाने १२/२**
**कृपाकटाक्ष न्याहाळिले । आपुल्या पदी बैसवीले ।। ज्ञान.**

ज्याप्रमाणे चष्मा त्याप्रमाणे दिसते - एक घोडा पावसाळ्यात धष्टपुष्ट असायचा. कारण त्यास हिरवे गवत मिळत होते. उन्हाळ्यात मात्र अशक्त होत असे. मालकाने घोड्यास जनावरांच्या डॉक्टरकडे नेले. डॉक्टरांनी ओळखून सांगितले, 'याच्या डोळ्यावर हिरव्या रंगाची काच लावा म्हणजे त्यास सुकलेले गवत पण हिरवे दिसेल व ते खाऊन त्याची तब्येत सुधारेल.'

तात्पर्य - जगात बदल होत नाही. आपल्या पाहण्यात बदल करावयास हवा.

**विवेकाचा चष्मा -** एक गरीब ब्राह्मण भिक्षा मागण्याकरिता, जिथे मोठे मोठे महाल असतात तिथे जातो. पण कोणी भिक्षा वाढत नाही. वाटेत एक महात्मा भेटतो. तो म्हणतो, 'आपण पशूकडे का भिक्षा मागता ? माणसाकडे मागा.' ब्राह्मण म्हणतो, 'मी माणूस कसा ओळखणार ?' महात्म्याने त्यास चष्मा दिला. ब्राह्मणाने चष्मा लावला तर त्याला सर्व माणसे पशू दिसू लागली. त्यास मोठे आश्चर्य वाटले. एका झाडाखाली एक चर्मकार चप्पल तयार करीत होता. तोच माणूस दिसला. ब्राह्मणाने त्याच्याजवळ भिक्षा मागितली. चर्मकाराने दुकानातून उत्तम मिठाई आणून ब्राह्मणास भिक्षा म्हणून दिली व म्हणाला, 'आज मी जोडा बनविणार आहे. त्याची किंमत आपणास दान देणार आहे.' जोडा एवढा उत्तम होता, राजास पसंत पडला. मोठी किंमत मिळाली पण ब्राह्मणास दान दिली. राजास आश्चर्य वाटले. चर्मकार म्हणाला, 'या ब्राह्मणाजवळ एक अलौकिक चष्मा आहे. तो चष्मा लावला तर त्यास माणसे पशू दिसतात अर्थात वृत्ती पशुची असली तर ! राजाने तो चष्मा

लावला. त्यास प्रधानजी कोल्हा दिसला. काही नोकर कुत्रे दिसले. काही माणसे मांजर दिसली. काही डुक्कर दिसली. राजाने आपले प्रतिबिंब आरशात पाहिले. त्याचा चेहरा त्याला सिंहाचा दिसला. राजास कळून चुकले आपल्यात व पशुत विशेष फरक नाही.

**दृष्टांत** - एक कोळी मुलास बरोबर घेऊन समुद्रात बोट चालवू लागला. खूप अंतर आत गेल्यानंतर शिडाचा कपडा बाजूस होऊन बोट डगमगू लागली. मुलास सांगितले, 'वर शिडावर चढ, कपडा बरोबर कर.' मुलगा शिडावर चढला त्यास वर पाहून खूप भीती वाटली. बाजूस अथांग समुद्र पसरला होता व विस्तिर्ण आकाश दिसत होते. कोळी हुक्का पित होता. एवढ्यात मुलगा वरूनच म्हणाला, 'बाबा मला भीती वाटते आहे.' बाबा म्हणाला, 'वर पाहू नको खाली माझ्याकडे पाहा.' त्याने खाली बघितले व त्याची भीती गेली. आपण जीवन जगताना श्रीमंत माणसांकडे पाहिले तर भीती म्हणजे दुःख होईल. पण आपल्यापेक्षा गरीब माणसाकडे पाहिले तर सुख होईल. वर पाहू नका खाली पहा. माणूस खाली बघून चालला तर दोष दिसत नाहीत. भिरभिरत्या नजरेने इकडेतिकडे पाहिले तर दोषच दोष दिसतील.

१) **गावः पश्यंति गन्धेन वेदैः पश्यंति वै द्विजः ।**
**चारैः पश्यंति राजानश्चक्षुर्भ्यामितरे जनाः ॥ सुभा.**

**अर्थ** - गाय वासावरून ओळखते. (पाहते) पंडित वेदाच्या डोळ्यांनी पाहतात. राजा गुप्तचराच्या सहाय्याने पाहतो. बाकीचे लोक डोळ्याने पाहतात.

२) श्रीकृष्ण परमात्मा जेव्हा कंसाच्या सांगण्यावरून मथुरेस आले, ते कुस्तीच्या मैदानात उतरले. तेव्हा जशी ज्याची दृष्टी होती तसा त्यांना दिसला.

**मल्लनामशनिर्नृणां नरवरः स्त्रीणां स्मरो मूर्तिमान् ।**
**गोपानां स्वजनोऽसतां क्षितिभुजां शास्ता स्वपीत्रोः शिशुः ।**
**मृत्युर्भोजपतेर्विराऽविदुषां तत्वं परं योगिनां ।**
**वृष्णीनां परदेवतेति विदितो रङ्गं गतः साग्रजः ॥ भाग.१०/४३/१७**

**अर्थ** - श्रीकृष्ण हा मल्लाना आपला काळ वाटला, नरांना सर्वांत श्रेष्ठ नर वाटला, स्त्रियांना हा मूर्तिमंत मदनाचा पुतळा भासला, गोपाळांना वाटले हा आपला सवंगडी आहे, राजांना वाटले हा शासक दिसतो, नंदाला वाटले हा आपला मुलगा आहे, कंसास भासले हा आपला मृत्यूच अवतरला आहे. सामान्य लोकांना वाटले हा विदूषक आहे, योग्यांना वाटले हे आपले परमतत्त्व आहे, यादवांना वाटले हे आपले परम दैवत आहे, ज्याची जशी दृष्टी - चित्त, त्याप्रमाणे श्रीकृष्ण दिसले.

३) **यस्य नास्ति स्वयं प्रज्ञा शास्त्रं तस्य करोति किम् ।**
**लोचनाभ्यां विहिनस्य दर्पणः किं करिष्यति ॥ सुभा.**

**अर्थ** - ज्याला बुद्धीचे डोळे नाहीत त्यास शास्त्राचा काय उपयोग ? ज्याला डोळे नाहीत त्यास दर्पणाचा काय उपयोग होईल ?

४) **न पश्यति च जन्मान्ध: कामान्धो नैव पश्यति ।**
**न पश्यति मदोन्मत्त: ह्यर्थी दोषं न पश्यति ॥ चाणाक्य**

**अर्थ** - जन्मांध आहे त्यास दिसत नाही, कामाने आंधळा झाला त्यास दिसत नाही, मदोन्मत्त (गर्वाने फुगलेला) आहे त्याला दिसत नाही व स्वार्थी माणसास आपले दोष दिसत नाहीत.

५) **दिवा पश्यति नोलूक: काको नक्तं न पश्यति ।**
**अपूर्व कोऽपि कामान्धो दिवा नक्तं न पश्यति ॥ सुभा.**

**अर्थ** - घुबडाला दिवसा दिसत नाही, कावळ्यास चांदण्या रात्री दिसत नाही, पण आश्चर्य हे आहे कामांध माणसास दिवसा व रात्रीपण दिसत नाही.

**माऊलीच्या समर्पक ओव्या :**

**पैं द्राक्षरसा आम्ररसा । वेळे तोंड सडे वायसा ।**
**कां डोळे फुटती दिवसा । डुडुळाचे ॥ ज्ञाने.१८/६८२**

**विश्वाचें आयुष्य जेणें उजळे । तो सूर्य उदेला देखोनि सवळे ।**
**पापिया फुटती डोळे । डुडुळाचे ॥ ज्ञाने.१६/२३९**

**पै चंद्रोदयाआरौतें । जयांचे डोळे फुटती असते ।**
**ते काउळे केवीं चंद्रातें । वोळखती ॥ ज्ञाने.४/२४**

जगाकडे कसे पाहावे ?

६) **मातृवत्परदारेषु परद्रव्येषु लोष्टवत् । आत्मवत्सर्वभूतेषु य: पश्यति स पश्यति ॥ सुभा.**

**अर्थ** - जगातील सर्व परस्त्रिया मातेप्रमाणे पाहाव्या. दुसऱ्याचे धन मातीसारखे समजावे व सर्वभूते आत्मस्वरूप, देवाची आहेत असे पाहावे. ही महान दृष्टी आहे.

**चुटका** - एका रविवारी एक चष्मा असणारा पुरुष सुट्टी असल्यामुळे साफसफाई करू लागला. कपाटाचा आरसा पुसू लागला. आरसा बराच पुसला पण डाग जाईना. बायको बाहेर आली. तिला आरसा साफ दिसला. तो म्हणाला, 'किती वेळ आरसा पुसतो आहे, डाग निघतच नाही.' तिच्या लक्षात आले. ती म्हणाली, 'थांबा', तिने त्याचा चष्मा काढला. चष्मा साफ केला व म्हणाली, 'आता पाहा.' त्याला आरसा स्वच्छ दिसला. ती म्हणाली, 'अहो तुमच्या चष्म्यावर डाग होता. त्यामुळे आरश्यावर डाग दिसत होता.'

तात्पर्य : चष्मा साफ करा म्हणजेच आपली दृष्टी साफ करा. सृष्टी साफ दिसेल.

**कथा :** अवंती नगरीचा राजा भोज अप्रतिम महालात राहात होता. तो स्वतः कवी होता, मात्र कवींचा सत्कार करीत असे. कविता करणाऱ्यास उत्तेजन देत असे. एकदा महालात रात्री जेवण झाल्यानंतर स्वतःच्या पत्नीबरोबर चांदण्यात गप्पा मारत होता. कविमन असल्यामुळे त्याने काव्य करण्यास सुरुवात केली.

**चेतोहरा युवतयः सुहृदोऽनुकूलाः ।**
**सत् बांधवाः प्रणतिगर्भश्च भृत्याः ।**
**गर्जन्ति दन्तिनिवहास्तरलस्तुरंगाः ।**

**अर्थ :** चित्ताला आकर्षित करणाऱ्या सुंदर युवती माझ्या समोर नाचतात. स्वभावानुकूल मित्र आहेत. प्रेम करणारे बंधू आहेत. दारासमोर चित्कारणारे हत्ती आहेत. वायू वेगाने पळणारे घोडे आहेत. राजा सुभाषिताच्या तीन ओळी लिहितो. मात्र चौथी ओळ सुचत नाही. एवढ्यात अवधूत विक्रांत भैरव (काहींच्या मते कालिदास) येतात व चौथी ओळ सांगतात.

**सम्मीलने नयनोर्नहिं किंचिदत्ती ॥**

**अर्थ :** हे सर्व डोळे उघडे आहेत तोपर्यंत आहे. डोळे झाकले की यातील काही नाही. या वाक्याने भोज राजा खरा जागा होतो.

★★★★★

# (७०) दूरदृष्टी

१) **कथा -** एका राज्याचा असा नियम होता, राजा निवडून त्यास ५ वर्षे सत्ता द्यायची. सर्व अधिकार बहाल करायचे पण ५ वर्षांनंतर शहराच्या पलिकडे जंगलात उर्वरित आयुष्य घालवायचे. बरेच राजे आले, राज्याचा उपभोग घेतला पण जेव्हा ५ वर्षे संपली तेव्हा नदीच्या पलिकडे रडत गेले. या सगळ्यांना एक नावाडी नदीच्या पलिकडे पोहोचवित होता. एक हुशार राजा राज्यावर आरुढ झाला. त्याने तातडीची सभा घेतली. सर्व प्रजाजनांस विचारले, 'खरोखर मला पाच वर्षांची सत्ता व अधिकार आहेत का ?' सर्व म्हणाले, 'पाच वर्षात आपण कराल ते सर्वांना मान्य असेल. हा राज्याचा नियमच आहे. पण पाच वर्षांनंतर आपणास राज्याच्या घटनेप्रमाणे नदीच्या पलिकडे आयुष्य घालवावे लागेल.'

पाच वर्षांच्या कालावधीत राज्य करता करता, सर्व उपभोग घेत असताना राजाने ज्या जंगलात पाच वर्षांनी जायचे आहे त्या जंगलात एक मैलातील परिसर विकास करण्याकरिता घेतला. प्रथम तिथे पिण्याच्या पाण्याची सोय केली. उत्तम बंगला बांधला. सुंदर बगिचा तयार केला. खास शेती

तयार केली. बाजूस एक धर्मशाळा बांधली. विजेची सोय केली. उत्तम रस्ते बनविले. दृष्ट लागेल असा परिसर सुधारला. यामध्ये ५ वर्षे गेली. मुदत संपली. राजाने राज्यातील लोकांचा निरोप घेतला व जंगलात पलिकडे जाण्याकरिता नावेत बसला. बरोबर कुटुंब होते. चेहऱ्यावर हास्य पाहून नावाड्याने विचारले, 'महाराज बऱ्याच राजांना मी पलिकडे पोहोचविले, पण सर्व रडत गेले. आपण हसत जात आहात.' राजा म्हणाला, 'मी हसत याकरिता आहे, या राज्याच्या सोयीपेक्षा मी पाच वर्षात जंगलात उत्तम सोयी केल्या आहेत व माझे आयुष्य तिथे आनंदात जाणार आहे.' तात्पर्य - माणसाने नीतीने संसार करता करता एक दिवस इहलोक सोडायचा आहे. त्याकरिता येथेच काही पुण्य-सामुग्री मिळवावी. जेणेकरून पारलौकिक प्रवास सुखाचा होईल.

तुकोबाराय सांगतात, **'ऐसे कां हो न करा कांही । पुढें नाहीं नाश ज्या ॥'**

२) माझ्या ३० वर्षांच्या नोकरीच्या काळात जितका वेळ मिळाला परमार्थात खर्च केला. जेवण्याची व झोपण्याची वेळ सोडून पाठांतर, चिंतन, श्रवण, वाचनात घालविला. आता नोकरी सोडली आहे. तरी बरेच लोक कीर्तन, प्रवचन सेवेकरिता बोलवितात व माझा वेळ आनंदात जात आहे. जर मी नोकरीच्या काळात गप्पा मारण्यात, पत्ते खेळण्यात, नाटक-सिनेमा पाहाण्यात, याला भेट, त्याला भेट यामध्ये वेळ घालविली असती तर हा पारमार्थिक आनंद मिळाला नसता.

३) भारताचे माजी अर्थमंत्री सी. डी. देशमुख यांचे कामगारवर्गावर फार मोठे उपकार आहेत. त्यांनी निर्णय घेतला, कामगारांचा प्रॉव्हिडंट फंड कापावयाचा. काहींनी विरोध केला पण त्यांनी कायदा अमलात आणला. आता कामगार जरी सेवानिवृत्त झाला तरी प्रॉव्हिडंट फंडाची रक्कम दिल्यामुळे मरेपर्यंत व्यवस्थित उपजीविका करतो. दुसऱ्यावर अवलंबून राहावे लागत नाही. हा देशमुखांचा दूरदृष्टीकोन नसता तर कामगारांजवळ निवृत्तीनंतर काही शिल्लक राहिले नसते व शेवटचे दिवस दुःखात गेले असते.

४) एका राजाचे चार मंत्री होते. तिघे पुढे पुढे करणारे (चमचे) व एक दूरदर्शी होता. राजा वारला. एका मंत्र्याने राजावरील प्रेम प्रगट करण्याकरिता चांगला दगड मागविला व मोठे स्मारक बनविले. दुसऱ्याने त्या दगडावर जडजवाहिर बसविले. तिसऱ्याने स्मारकाशेजारी सोन्याचे दिवे लावले. पण दूरदर्शी मंत्र्याने स्मारकाच्या बाजूस बगिचा लावला. तिघांचे पैसे वाया गेले कारण चोरांनी सोन्याचे दिवे, जडजवाहिर, स्मारकाचा एकएक दगड काढून नेला. बगिचा मात्र तसाच राहिला. एका माळ्याचे पोट भरू लागले. बगिच्यामधील झाडाची फुले व फळे मिळू लागली. लोकांना सावलीत बसून विश्रांती मिळू लागली. याला दूरदृष्टी म्हणतात.

५) इंग्लंडचे डॉक्टर सर थॉमस रो यानी खूप आजारी असणारी बादशहाची आवडती मुलगी औषधोपचाराने बरी केली. बादशहाने सत्कार केला व डॉक्टरांना विचारले, 'आपणास काय हवे ते माझ्याकडे मागा.' डॉक्टर म्हणाले, 'मला काही नको. आमच्या देशाचा (इंग्लंडचा) माल, कापड

भारतात येते. त्यावरील आपण लावलेला टॅक्स माफ करावा.' बादशहाने वचन दिले होते. टॅक्स माफ झाल्यामुळे सर्व वस्तू स्वस्त झाल्या. माल जास्त खपू लागला. व देशाचा मोठा फायदा झाला. वैयक्तिक मागणी केली असती तर एवढा फायदा झाला नसता.

★★★★★

## (७१) भ्रम

मायावी वस्तू सत्य वाटणे हे भ्रमाचे लक्षण आहे. 'भ्रमले चावळे । तैसे उचित नकळें ॥' तु.म. ज्याप्रमाणे मृगजळ हरणास पाणी वाटते, ते धावते पण शेवटी थकते व काहीच मिळत नाही. ज्ञानोबा, तुकोबा हाच दृष्टांत देतात.

**फुटोनि पडे तंव । मृग वाढवी हांव । परि न म्हणे ते माव । रोहिणीची ॥ ज्ञाने.१३/७०७**
**मृगजळ दिसे साचपणा ऐसें । खोटियाचें पिसें ऊर फोडी ॥ तु.म.**

आपण एसटीतून प्रवास करताना भ्रमामुळे झाडे पळतात असे वाटतात. वास्तविक आपण प्रवास करतो. झाडे स्थिर असतात. अतिशय वेगात फिरणारा भोवरा आपणास भ्रमाने स्थिर वाटतो. पण तो जोरात फिरत असतो. उदबत्ती जोरात फिरविली तर भ्रमामुळे गोलाकार दिसते. संसाराचे स्वरूपसुद्धा तसेच आहे. याचे ज्ञान झाले तर दुःख नाहीसे होते. पण आपणास अज्ञानामुळे सर्व खरे वाटते. म्हणून आपण संसारिक दुःखाने दुःखी व संसारिक सुखाने सुखी होतो. नाथ महाराज दृष्टांत देतात -

**कां अंधारी दोरू दिसे डोळा । म्हणे सर्प दंड कि सुमन माळा ।**
**नाना एकावळी मुक्ताफळां । कोण अबला विसरली ॥ भा.१०/६८७**

**दोर दोरपणे साचार । भ्रमे भासे नानाकार ।**
**काष्ट सर्प की मोत्याचा हार । ना हे जळधार जळाची ॥ भा.१९/२०२**

काही माणसे रात्री चालली असता समोर एक दोर दिसला. सर्व घाबरले. एक म्हणाला, 'हे लाकूड पडले असावे.' दुसरा म्हणाला, 'मोत्याचा हार दिसतो आहे.' तिसरा म्हणाला, 'जलाची धार दिसते.' चौथा म्हणाला, 'जमीन दुभंगलेली दिसते.' सर्वांची मते वेगवेगळी झाली. एक माणूस बाजूच्या घरातून बॅटरी घेऊन आला. बॅटरीच्या प्रकाशात पाहिले तर दोर पडला होता. तद्वत अज्ञानामुळे संसाराबद्दल लोकांची अनेक मते आहेत. ज्ञानी संत मात्र यास खोटे समजतात.

**भासला दोराचा सर्प थोर । तेथ जपता नाना मंत्र भार ।**
**करिता वाजंत्र्याचा गजर । मारिंता तिळभर ढळेना ॥ भा. २०/४५**

**दृष्टांत** - एक सेवा निवृत्त म्हातारा एका शहरात रहात होता. त्याने आपले मिळालेले पैसे

स्वतःच्या नांवावर सहकारी बँकेत ठेवले होते. चार मुलगे होते. चांगले शिकवले असल्यामुळे ते पण चांगल्या नोकरीवर होते. राहण्याकरिता स्वतंत्र बंगला होता व प्रत्येकास वेगवेगळी खोली होती. चारही मुलांची लग्ने झाले होती. सुना शिकलेल्या होत्या पण सर्व घरीच होत्या. एके दिवशी हा म्हातारा दुपारी बाजारात निघाला. मोठ्या मुलाचा मुलगा म्हणजे म्हाताऱ्याचा नातू आजोबांच्या मागे लागला, 'आजोबा मी बाजारात येणार !' म्हाताऱ्याने त्यास बरोबर घेतले. नातू आवडता असल्यामुळे व म्हाताऱ्याचा खिसा गरम असल्यामुळे आजोबा म्हणाले, 'बाळू तुला काय हवे आहे ? केळी, सफरचंद ?' नातू नको म्हणाला. 'हॉटेलमध्ये वडा सांबार, मसाला डोसा, पाव भाजी पाहिजे कां ?' तो नको म्हणाला. 'मग खेळण्याकरिता बॅट बॉल पाहिजे ?' तो म्हणाला, 'नको.' 'मग तुला काय पाहिजे ?' नातू म्हणाला, 'चला दाखवितो.' त्याने आजोबास खेळण्याच्या दुकानात नेले व एक प्लॅस्टिकचा साप दाखविला. म्हणाला, 'हा साप मला पाहिजे.' म्हाताऱ्याने विचारले, 'किंमत किती ?' दुकानदाराने जास्त किंमत सांगितली पण नातवाच्या हट्टामुळे तो प्लॅस्टिकचा साप विकत घेतला. सापास पुढे लहान दोरी होती. चालता चालता काहीं माणसे या मुलाने घाबरविली. आजोबा म्हणाले, 'तू घरी जा. मी रेल्वेच्या फलाटवर मित्रांशी गप्पा मारत बसतो. दोन तीन तासांनी घरी येईन.' नातू घरी गेला. तो थेट आजीच्या खोलीत गेला व आजीच्या छातीवर साप खेळवू लागला. आजी साधारण झोपेत होती. एवढ्यात शेजारचा एक मुलगा आला व म्हणाला, 'बाळू चल. माझ्या बाबांनी बाजारातून मोबाईल आणला आहे. तुला दाखवतो.' साप तसाच म्हातारीच्या अंगावर सोडून बाळू मित्राच्या घरी गेला. चहाची वेळ झाली म्हणून थोरली सून सासूस चहा घेऊन तिच्या खोलीकडे आली. पाहाते तर सासुबाईंच्या अंगावर साप. ती थरथर कापू लागली. कपबशी हातातून पडली. त्या आवाजाने म्हातारी जागी झाली. सून म्हणाली, 'आपल्या अंगावर साप आहे.' तिने साप पाहिला. ती पण थरथर कापू लागली. तसा तो सापपण हलू लागला. एवढ्यात सर्व सुना जमल्या. रडू लागल्या म्हणाल्या, 'म्हातारीचे काय खरे दिसत नाही.' एक सून बाहेर जाऊन सगळ्यांना बोलावू लागली. सर्व शेजारी जमले. म्हातारीच्या अंगावर साप दिसला. अद्याप दंश केला नव्हता. एक म्हणाला, 'मांत्रिकास बोलवा. मंत्राने साप बाजूला जाईल.' लगेच मांत्रिक आला. त्याने अनेक मंत्र म्हटले पण साप जागचा हलला नाही. काही लोक बाण, भाला, बंदूक वगैरे शस्त्र घेऊन आले. सर्वांनी विचार केला साप मारता मारता म्हातारी मेली तर आपण म्हातारीच्या मरणास कारणीभूत होऊ. कारण आपला नेम (अर्जुनासारखा) पक्का नाही. ते तिथेच शस्त्रे घेऊन बसले. एक म्हणाला, 'साप नादास लुब्ध होतो. आपण पुंगीवाला बोलवू.' पुंगीवाला आला. त्याने 'मन डोले रे तन डोले रे' गाणे वाजविले. पण साप काही जागचा हलला नाही. दुसरा म्हणाला, 'हा आधुनिक साप दिसतो आहे. यास डिस्को गाणे ऐकवले पाहिजे. उड्या मारतच बाहेर येईल. डिस्को कॅसेट टेपरेकॉर्डरवर वाजविली. पण साप जागचा हलला नाही. एवढ्यात म्हातारीची मुले ऑफिसमधून आली. घरात सर्वत्र गोंधळ होता. सुना रडत होत्या. मोठ्या मुलाचे आईवर प्रेम होते. तो बॅग ठेवून

आईच्या खोलीकडे निर्भयपणे साप बाजूस करण्यास निघाला. पण त्याच्या बायकोने पँट खेच... म्हणाली, 'त्यांचे दिवस संपले आहेत. आपलं आयुष्य पडलं आहे. जीव धोक्यात घालता की आ... आमचा काही विचार आहे की नाही ?' सर्व सुनांनी आपापल्या पतींना आत जाऊ दिले नाही. वेळ... म्हणून म्हातारा मित्रांशी गप्पा मारून घरी निघाला. वाटेत काही माणसे भेटली. विचारले, 'आपण... होता ?' 'म्हातारीच्या अंगावर साप बसला आहे.' म्हातारा भरभर निघाला. गर्दीतून पुढे गेला. म्हातारीच्या खोलीत जाऊ लागला. मुलांनी अडवण्याचा प्रयत्न केला. सुना मात्र काही बोलल्या नाहीत. त्यांना वा... दोघे एकदम गेले तर म्हाताऱ्याचे पैसे वाटून घेऊन मजा करता येईल. म्हातारा मुलांना म्हणाला, 'आयुष्यभर हिच्याबरोबर संसार केला. शेवटी वाचवता येईल की नाही ते पाहतो. नाहीपेक्षा दोघे एक... इहलोकाची यात्रा पुरी करतो. म्हातारा पुढे गेला. सर्व आश्चर्याने, घाबऱ्या नजरेने पहातात. म्हातारीच्या अंगावरचा साप हातात घेतला व खिशात घातला. सर्व आनंदित झाले. म्हाताऱ्याने सांगितले, 'हा सा... मी बाजारातून बाळूसाठी घेतला होता.' साप खोटा होता पण त्यामुळे कितीतरी गोंधळ झाला. तद्वत संसार असाच खोटा आहे, जर ज्ञान दृष्टीने पाहिले तर !

**दृष्टांत** - एक साप व एक सरडा एके ठिकाणी रहात होते. साप म्हणाला, 'माझे विष जहाल आहे म्हणून माणसे मला घाबरतात.' सरडा म्हणाला, 'माझेपण विष जहाल आहे. आपण प्रयोग करू, कोणाचे विष जहाल आहे ते पाहू. मात्र याकरिता एक शर्त आहे. मी माणसास दंश करून बिळात पळून जाणार. तू बिळाच्या बाहेर थांबायचे व माणसास दंश करून बिळात जायचे. मी बिळाच्या बाहेर थांबणार.' साप म्हणाला, 'ठीक आहे.' एक माणूस बिळाच्या जवळून चालला होता. त्यास सरड्याने दंश केला व तो पळाला. मात्र बिळाच्या बाहेर साप होता. तो माणसाने पाहिला. त्यास वाटले, मला सर्पाने दंश केला. तो चक्कर येऊन पडला. थोड्या वेळानी कसातरी तडफडत घरी गेला.   थोड्या वेळाने दुसरा माणूस त्याच वाटेने चालला होता. त्यास अचानक सर्पाने दंश केला व तो बिळात पळून गेला. माणसाने पाहिले समोर सरडा दिसतो आहे. त्यास वाटले, सरड्याने दंश केला आहे. याचा काही एवढा परिणाम होणार नाही. न घाबरता घरी गेला. सरड्याने सापास सांगितले, 'बघ, तुझ्या दंशाने माणूस घाबरला नाही. पण मी दंश केल्याबरोबर माणूस फार घाबरला. मग कोणाचे विष जहाल आहे ?' हा सगळा परिणाम भ्रमाचा आहे. तद्वत भ्रमामुळे संसारास घाबरतात व परिणाम - दुःख भोगावे लागते.

★★★★★

# (७२) जे कां रंजले गांजले

सामान्यपणे 'जे रंजले गांजले' म्हणजे गरीब, दरिद्री असणारे लोक त्यांना आपले म्हणतो तो साधू असा अर्थ लावला जातो. पण हा अर्थ संतवाङ्मयाचा अभ्यास केला तर संयुक्त वाटत नाही. खरं पाहता गरीब लोक साधूकडे जातात का नाही हा चिंतनाचा विषय आहे. ज्ञानोबाराय रंजले शब्दाचा अर्थ रंगले असा सांगतात.

**तैसा विषयसुखें रंजे । जो ज्ञानेंसींचि माजे ।**
**तो संशयें अंगीकारिजे । एथ भ्रांति नाहीं ॥ ज्ञाने.४/१९८**

**जिही आपणपें नाहीं देखिलें । तेचि इहीं इंद्रियार्थी रंजले ।**
**जैसें रंक कां आळुकैलें । तुषांतें सेवी ॥ ज्ञाने.५/११०**

या ओव्यांचा अर्थ जे विषयात, इंद्रियसुखात अर्थात संसारात रंगले आहेत असा होतो. प्रथम संसारात रंगून काही वाईट अनुभव आला, संकट आले तर ते गांजले जातात. म्हणजे दुःखी होतात. पश्चाताप होऊन साधूकडे येतात. त्यांना साधू आपले म्हणतात व त्यांचा उद्धार करतात. याकरिता तीन दृष्टांत समोर येतात.

१) वाल्याकोळी याने ब्राह्मणांना मारून सात रांजण (शाळीग्राम) भरले होते. 'ब्रह्महत्याराशी पातके अपार । वाल्मिक किंकर वंद्य केला ॥' तु.म. पण नारदांची भेट झाली. नारदांनी विचारले, 'ज्यांच्या करिता तू पाप करत आहेस ते तुझ्या पापात सहभागी आहेत का ?' वाल्या म्हणाला, 'जीवनात हा विचार कधी केला नाही.' नारद म्हणाले, 'मी इथेच थांबतो. तू सर्वांना विचारून ये.' कदाचित हा साधू फसविल म्हणून नारदांना बांधून ठेवले. घरी जाऊन आईवडिलांना विचारले, 'माझ्या पापात तुम्ही भागीदार आहात का ?' आई-वडील म्हणाले, 'तू मिळवता होईपर्यंत आम्ही तुला सांभाळले. आता मरेपर्यंत तू आमचा सांभाळ करायचा आहे. तू काय करतोस याच्याशी आमचे कर्तव्य नाही.' मुलांना विचारले, त्यांनी पण नकार दिला. शेवटी बायकोकडे गेला व म्हणाला, 'तू अर्धांगिनी आहेस. माझ्या पापात भागीदार आहेस की नाही ?' ती म्हणाली, 'मी एकले आहे. शास्त्र सांगते, पतीच्या पुण्यात बायकोचा अर्धा वाटा आहे, पापात नाही. याउलट स्त्रीने केलेल्या पापात पुरुषाचा अर्धा वाटा असतो.'

**राजा राष्ट्रकृतं पापं राज्ञः पापं पुरोहितः ।**
**भर्ता च स्त्रीकृत्य पापं शिष्य पापं गुरूस्तथा ॥ सुभा.**

**अर्थ -** लोकांनी केलेल्या पापास राजा कारण आहे. राजाने केलेल्या पापास पुरोहित जबाबदार आहे. स्त्रीने केलेल्या पापास पती व शिष्याने केलेल्या पापास गुरू जबाबदार आहे.

वाल्या कोळ्यास पश्चाताप होऊन तो नारदांच्या चरणी मिठी मारतो. विनंती करतो, 'आता तुम्ही कृपावंत । साधूसंत जिवलग ।।' 'गोंमटें तें करा माझे । भार ओझे तुम्हांशी ।। तु.म. नारद 'राम' नामाचा मंत्र देतात. 'मरा' म्हणणारा राम मंत्रामुळे आद्य कवी वाल्मिकी ऋषी झाले. रामायण लिहिले. रामास यांच्या लिखाणाप्रमाणे वागावे लागले. तात्पर्य - अगोदर संसारात रंगले होते नंतर गांजले. नारदांना शरण आले व उद्धार झाला. 'कोळियाची किर्ती वाढली गहन । केले रामायण रामा आधी ।।' तु.म.

२) राजा भर्तृहरी यास दोन पत्न्या होत्या. शामदेवी व पिंगला. हा राजा संसारात, दुसऱ्या बायकोच्या एवढा आहारी गेला होता की आपली पत्नी एका सेनापतीबरोबर अनैतिक संबंध ठेवते ही सत्य बातमी भावाने सांगितल्यामुळे त्यास राज्याच्या बाहेर हाकलून दिले होते. पण नंतर खरी वस्तूस्थिती समजली व भर्तृहरी राज्यावर लाथ मारून गोरक्षनाथांकडे आला. तथापि राजास गर्व होताच. गोरक्षनाथांना विचारले, 'माझ्यासारखे राज्याचा त्याग करून संन्यास घेणारे जगात किती राजे आहेत ?' त्याचा गर्वाचा फुगा फोडण्याकरिता गोरक्षनाथ म्हणाले, 'आपल्या अगोदर असे नव्याण्णव कोटी राजे राज्याचा त्याग करून संन्याशी झाले आहेत.' नाथ महाराजांच्या शब्दात 'आनंदलहरी'

**प्रपंची जरी सुख जोडे । तरी कां सेविती गिरीकडे ।**
**राज्य टाकूनि गेले थोडे । ते कां वेडे म्हणावे ।।**

**भर्तृहरीने राज्य टाकिले । तेणें गोरक्षनाथाते पुसिले ।**
**राज्य टाकूनि मुंडी झाले । कित्येक गेले भूपती ।।**

**मग गोरक्षनाथ बोलती । नव्याण्णव कोटी भूपती ।**
**इतर जनांची नाही गणती । योगा प्रति निघाले ।।**

प्रथम यांनी नीति शतक लिहिले. नंतर शृंगार शतक लिहिले व वैराग्य झाल्यानंतर वैराग्य शतक लिहिले. यांचे श्लोक फार प्रसिद्ध आहेत. नंतर हे राजे नाथ सांप्रदायामधे 'भरतरीनाथ' म्हणून ओळखले जाऊ लागले.

३) ज्यांनी विश्वविख्यात 'ज्ञानोबारायांचा पालखी सोहळा' चालू केला ते हैबत बाबा मूळचे सातारा जिल्ह्यातील आरफळ गावचे. परंपरागत विठ्ठलाची व ज्ञानोबा माऊलीची सेवा. पण हे ग्वाल्हेरचे महादजी शिंदे यांचे सेनापती होते. बराच पराक्रम गाजविल्यानंतर शिंदे सरकारने यांना बरीच संपत्ती देऊन आपल्या गावी जाण्याची अनुमती दिली. पण वाटेत सातपुड्याच्या पर्वतरांगात यांना भिल्लांच्या टोळीने गाठले. संपत्ती हिसकावून घेतली व डांबून ठेवले. बाबांनी ज्ञानोबामाऊलीचा धावा केला. माऊलींना साकडे घातले, 'जर या संकटातून वाचलो तर घरी जाणार नाही. उर्वरित आयुष्य तुझ्या सेवेत घालवीन.' योगायोगाने भिल्लांच्या प्रमुखास मुलगा झाला होता. त्या प्रमुखाने आपल्या पत्नीस विचारले, 'आपला पुत्र दैववान आहे. भरपूर संपत्ती मिळाली आहे. ज्यांना लुटले त्यांना मी मारणार

आहे.' पत्नी म्हणाली, 'या आनंदाच्या क्षणी त्यास सोडून द्यावे.' माऊलीच्या कृपेने तशी त्यास प्रेरणा दिली. बाबांची संपत्ती परत दिली. जीवदान दिले. बाबा परत संसारात रंगण्याकरिता गेले नाहीत. सरळ आळंदीस आले व माऊलींच्या समाधीवर डोके ठेवून निश्चय केला, 'येथुनिया नुठवू माथा । मरणावाचुनि सर्वथा ॥' तु.म. हैबत बाबा श्रीरंगात रंगले. असं म्हणतात बाबा भजन करताना माऊलीची समाधी डोलत असे. काही लोकांनी यांच्या भजनाचा त्रास होतो म्हणून सिद्ध बेटास जाण्यास सांगितले पण माऊलीनी सर्वांच्या स्वप्नात जाऊन सांगितले माझा भक्त माझ्या जवळ पाहिजे. पुन्हा समाधीजवळ त्यांना एक ओवरी दिली. माऊलीचा सोहळा यांनी चालू केलाच पण माऊलीच्या पायरीजवळ देह सोडला, कार्तिक वद्य अष्टमीस ! योगायोग असा आहे वासकरांचे मूळ पुरुष श्री.ह.भ.प. मल्लाप्पा वासकर यांची पुण्यतिथीपण कार्तिक वद्य अष्टमीस आहे. दोघांनी देह आळंदीतच ठेवले. महादजी शिंदे यांचे, हैबत बाबा सेनापती होते व महादजी शिंदे हे वासकरांचे अनुयायी होते. अद्याप माऊलीपुढे दिंडी नं.१ मध्ये वासकर व आरफळकर एकत्र चालतात.

तात्पर्य - हैबत बाबा संसारात न रंगता मध्ये गांजले व माऊलीकडे आले व माऊलींनी त्यांना आपले म्हटले व उद्धार झाला. तात्पर्य - संसारातून वैराग्य निर्माण झाल्यानंतर जे साधूकडे येतात त्यांचा उद्धार होतोच.

★★★★★

## (७३) षड्वर्ग

अ) **षड्विकार -** १) अस्ति-गर्भात येणे २) जायते-जन्मास येणे ३) वर्धते-वाढणे ४) विपरिणमते-तरुण होणे ५) अपक्षियते-म्हातारा होणे ६) नश्यति-मरणे हे विकार देवास व संतास नाहीत. 'उपाधी वेगळे तुम्ही निर्विकार । कांहीच संसार नाही तुम्हा ॥' तु.म.

ब) **षड्ऊर्मी -** मनाच्या दोन - हर्ष-शोक, प्राणाच्या दोन - क्षुधा तृषा, देहाच्या दोन - जन्म मरण या ऊर्मी देवास, संतास नाहीत.

क) **षड्वैरी -** काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर. जीवाचा घात करणारे हे सहाजण आहेत. यांना ज्ञानोबाराय, तुकोबाराय ऊर्मी म्हणतात. 'लाताळिला संसार । केला षड्उर्मीचा मार ॥' तु.म. 'षड्उर्मी हृदयात । यांचा अंत पुरऊनी ॥' तु.म. षड्उर्मी शत्रू जिंकिले अनंता । नामाचिया सत्ता बळें तुझ्या ॥' तु.म.

**जैसा काढिलिया मंदराचळु । राहे क्षीराब्धि निश्चळु ।**
**तैसा नुठी जयां सळू । कामोर्मींचा ॥ ज्ञाने.१५/३०२**

**परि धातयाही पायां पडतां । नुठी गतायु पंडुसुता ।**
**तैसा नुपजे उपजवितां । क्रोधोर्मी गां ॥ ज्ञाने.१६/१२९**

यांना माऊली विकार पण म्हणते.

**येऱ्हवी इंद्रियांचेनि मेळें । विषयावरी तरी लोळे ।**
**परि 'विकाराचेनि' विटाळे ॥ लिंपिजेना ॥ ज्ञाने.१३/४७९**

**जैसा अग्नीचा डोंगरू । नेघे कोणी बीज अंकुरू ।**
**तैसा मनी जया विकारू । उदयजेना ॥ ज्ञाने.१५/३०१**

रा) या षड्वैऱ्यांना गीता आसुरी संपत्ती म्हणते. (सहा)

**दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेवच ।**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ गीता १६/४**

**अर्थ -** हे पार्था, दांभिकपणा, मस्ती, अभिमान, क्रोध, निष्ठूरता व अज्ञान हे गुण आसुरी संपत्तीत जन्म पावलेल्या मनुष्यामध्ये असतात.

म) ज्ञानोबाराय गीतेचा आधार घेऊन या सहांना दोष वैरी म्हणतात.

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।**
**विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ गीता १८/५३**

**अर्थ -** अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध व परिग्रह हे सर्व टाकून ममत्व बुद्धी विरहित व शांत झालेला असा मनुष्य ब्रह्मरूप होण्यास योग्य होतो.

**तेथ आडवावया आले । दोषवैरी जे धोपटिले ।**
**तयांमाजीं पहिले । देहाहंकारु ॥ ज्ञाने.१८/१०५०**

कृ) यांना तुकयाबंधू उंदीर म्हणतात. 'वोले मृत्तीकेचे मंदिर । आत सहाजन उंदीर । गुंफा करिताती पोखर । याचा नका करू अंगीकार गा ॥' उंदीर विध्वंसक आहे. तसे हे सहाजण माणसाचे जीवनच उद्ध्वस्त करतात.

ष्ण) उपनिषदामध्ये या सहांना सहा प्राण्यांची उपमा दिली आहे.

**उलुक यातुं शुशुलूक यातुं जहिश्वयातुमुत कोकयातुम् ।**
**सुपर्णयातुमुत गृध्र यातुं दृषदेव प्रमृणरक्षइन्द्र ॥ अथर्व वेद**

१) घुबड - मोहाचे प्रतिक २) लांडगा - क्रोधाचे प्रतिक ३) कुत्रा - मत्सराचे प्रतिक ४) सारस पक्षी - कामाचे प्रतिक ५) गरूड - मदाचे (गर्वाचे) प्रतिक ६) गिधाड - लोभाचे

प्रतिक यापासून देवाने आमचे संरक्षण करावे अशी प्रार्थना आहे.

ह) नाथ महाराज मात्र यांना सहा सर्प समजतात. यांनी सहाजणांचा सत्यानाश केला. हे सांगतात

**सुनो संत सज्जन भाई । हम तो निराकारके गारुडी आया है ॥**
**हमारी उपर संतनकी नवाई । इस कलियुगमें पैदा हुये ॥**
**ये देखो खेल खेलते रस्तेमें । सब आलम दुनिया देखत है ॥**
**आबे चल अहां हांडी बाग । जरा प्रेमका ढोल बजाव ॥**
**लग लग लग लग । पहिले तो छ साप निकालु मैदान में ॥**
**बडे बडे अजगर उसके नाम बताऊ ॥**
**काम क्रोध मद मत्सर दंभ अहंकार । अबे चल ये सापने बडे बडे को डंक मारा ॥**
**भस्मासूर तो भसम कर दिया । पराशर तो ढिवरनकें पिछे लग गया ।**
**इंद्र की तो भगांकित हो गयी काया ॥**
**महादेव तो भिल्लीनके पिछे गया । विष्णू तो वृंदा देखकर घबराया ।**
**ब्रह्मदेवने तो सरस्वतीपर ख्याल किया ॥**
**ऐसे साप कठीण है ।**

री) राम कविक डिण्डिम भाष्यकार यांनी षड्रिपूंना सहा राक्षसांची उपमा दिली आहे.

१) मधू - काम २) कैटभ - क्रोध ३) महिषासूर - लोभ ४) रक्तबीज - मोह ५) शुम्भ - मद ६) निशुम्भ - मत्सर

थोडक्यात या सहांना सहा उपमा मिळतात.

१) असुरी संपत्ती २) वैरी ३) उंदीर ४) प्राणी-पक्षी ५) साप ६) राक्षस

तुकोबाराय त्यांना खळ म्हणतात. 'अंगी वैराग्याचे बळ । साही 'खळ' जिणावे ॥' या उर्मी केव्हा निर्माण होतील व जीवाचा सत्यानाश करतील हे सांगणे कठीण आहे.

**कथा -** एका शहरात एक म्हातारा-म्हातारी व त्यांचा उशिरा झालेला १० वर्षांचा मुलगा भीक मागत होते. गुप्तपणे शंकर-पार्वती त्या रस्त्याने जात होते. पार्वतीला म्हाताऱ्या जोडप्याची दया आली. शंकरास पार्वती म्हणाली, 'देवा, हे किती म्हातारे आहेत ! आपल्या मुलाकरिता भीक मागत आहेत. यांना काही तरी देऊन टाका.' शंकर म्हणाले, 'पार्वती, यांची लायकी तुला माहीत नाही. हे देण्याच्या पात्रतेचे नाहीत.' पार्वती म्हणाली, 'तुम्ही असे कसे म्हणता ?' शंकर म्हणाले, 'तुला

यांची लायकी दाखविते.' शंकर-पार्वती त्या तिघांसमोर प्रगट झाले व म्हणाले, 'मी शंकर व ही माझी पत्नी पार्वती. आपण आमच्याकडे तिघांनी तीन वर मागा.' म्हातारी पट्‌कन पुढे आली व म्हणाली, 'आपण प्रसन्न असाल तर मला २० वर्षाची तरुणी बनवा.' शंकरांनी 'तथास्तु' म्हटले व ती साठ वर्षांची म्हातारी तरुण बनली. पण म्हातारा भडकला व म्हणाला, 'मी तुला चांगले ओळखतो. मी म्हातारा व तू तरुण. तुझी 'चाल' माझ्या लक्षात आली. शंकर म्हणाले, 'आजोबा रागवू नका. आपणास एक वर आहे. आपण मागून घ्यावा.' म्हातारा म्हणाला, 'या वीस वर्षाच्या तरुणीस डुकरीण बनवा.' शंकर 'तथास्तु' म्हणाले व ती तरुणी डुकरीण झाली. म्हातारा शांत झाला पण मुलगा रडू लागला व म्हणाला, 'माझी आई डुकरीण बनली.' शंकर म्हणाले, 'अरे बाळ, तुला एक वर दिला आहे. तू पाहिजे ते माग.' मुलगा म्हणाला, 'माझ्यावर आपण प्रसन्न असाल तर माझ्या आईस होते तसे बनवा.' शंकर 'तथास्तु' म्हणाले. शंकर-पार्वती, जे जगाचे मालक आहेत ते भेटूनसुद्धा तिघेजण परत भीक मागू लागले. पार्वतीस शंकर म्हणाले, 'कळली का यांची पात्रता !' वास्तविक एका वराने आयुष्य, दुसऱ्या वराने आरोग्य व तिसऱ्या वराने संपत्ती मागून ते तिघे सुखी झाले असते. पण हे विकार जीवास सुख, आनंद भोगू देत नाहीत. हे जर नाहीसे झाले तर ब्रह्मस्वराज्य प्राप्त होते. सर्व जीव यांच्या ताब्यात आहेत. किंबहुना हे जीवास आपल्या तालावर नाचवतात. पण हे विकार मात्र संतांच्या ताब्यात असतात. म्हणून ते परमानंद भोगतात. 'काम क्रोध लोभ निमाले ठायीची । अवघी आनंदाची सृष्टी झाली ॥' तु.म.

नामाने हा षड्वर्ग नाहीसा होतो.

**हेचि भवरोगाचे औषध । जन्म जरा तुटे व्याध ।**
**आणिक काही नव्हे बाध । करील वध षड्वर्ग ॥ तु.म.**

**काम क्रोध लोभ दंभ मद मत्सर । षड्वैरी तत्पर हेचि एक ॥१॥**

**क्षुधा तृषा मोह शोक जरा मरण । षड्उर्मी पूर्ण देही हेचि ॥२॥**

**आशा मनिषा कल्पना इच्छा तृष्णा वासना । हे अठरा जाणा देहामाजी ॥३॥**

**एका जनार्दनी त्यजोनि अठरा । तोचि संसारामाजी शुद्ध ॥४॥**

★★★★★

# (७४) काय, किती, कोणाचे खावे

शिखांचे धर्मगुरू गुरुनानक देवाच्या, धर्माच्या प्रचाराकरिता फिरत होते. एकदा ते एमताबाद गांवात उतरले. ज्यांच्याकडे उतरले ते गरीब लालो सुतार होते. कष्टाने पैसे मिळविणारे व नीतीने वागणारे. त्याच गावात मलीक भागो नावाचे श्रीमंत गृहस्थ रहात होते. त्यांची अनेक दुकाने होती. पण लोकांची पिळवणूक करून त्यांनी पैसा मिळविला होता. लालो सुताराने विचारले, 'मी आपल्या जेवणाची व्यवस्था करतो. पण माझ्याकडे भाजी-भाकरी मिळेल.' गुरुनानक म्हणाले, 'ठीक आहे.' नानकांची प्रसिद्धी होती. त्यांना भेटण्याकरिता अनेक मंडळी आली. गुरुनानक आपल्या गांवी आले म्हणून संपूर्ण गावास मलिक भागो याने अन्नदान करण्याचे ठरविले. सर्व स्वयंपाक तयार झाला. मलिक भागोने नानकांना निरोप पाठविला, 'आपण माझ्याकडे जेवावयास यावे. आपण आमच्या गांवात आलात म्हणून मी अन्नछत्र उघडले आहे. शिवाय आपल्याकरिता उत्तम स्वयंपाक बनविला आहे.'

सेवक पाठवूनही गुरुनानक मलिक भागोकडे जेवावयास गेले नाहीत म्हणून प्रत्यक्ष मलिक भागो स्वतः सर्व प्रकारचे जेवण घेऊन लालो सुताराच्या घरी आला व म्हणाला, 'महाराज मी आपणाकरिता जेवण आणले आहे. माझे जेवण ग्रहण करावे अशी माझी विनंती आहे.' लालो सुतारास गुरू नानक यांनी भाजी-भाकरी आणण्यास सांगितली. दोन ताटे नानकांच्या समोर होती. नानकांनी मलिक भागोचे अन्न डाव्या हातात घेतले व लालो सुताराची भाजी-भाकरी उजव्या हातात घेतली. दोन्ही हाताच्या मुठी आवळल्या. लालो सुताराच्या अन्नातून दूध बाहेर पडले व मलिक भागोच्या अन्नातून रक्त बाहेर पडले. समोर बसलेल्या सर्व लोकांना नानकांनी विचारले, 'मी कोणत्या अन्नाचे भक्षण करावे ? पक्वानाचे का भाजी-भाकरीचे ?' मलिक भागो खाली मान घालून निघून गेला व सर्वांसमोर लालो सुताराची भाजी-भाकरी गुरू नानकांनी ग्रहण केली. लालोच्या डोळ्यातून अश्रू ओघळले. तात्पर्य - अन्नाचे तीन दोष टाळून अन्न ग्रहण करावे.

१) उपाय दोष २) स्वभाव दोष ३) क्रिया दोष

न्यायाने मिळविलेल्या पैशातून अन्न खावे. शुद्ध असावे शिवाय बनविणारा शुद्ध पाहिजे. पूर्वी प्रवासात शिदोरी नेत होते. ज्ञानोबाराय सांगतात,

**पैं शिळा कां सिदोरिया । दाटणें एक धनंजया ।**
**परी जें वाहतां विसांवया । मिळिजे तें घेपे ।। ज्ञाने.१८/९३८**

शाळेत पूर्वी मुले (२५ वर्षांपूर्वी) चटणी-भाकरी, लोणचं-भाकरी अथवा भाजी-भाकरी नेत. आता बराच बदल झाला आहे. शहरात काही ठिकाणी शाळेच्या बाजूस वडा-पावाची दुकाने असतात. घरून डबा आणण्याची गरज नसते. शिवाय हल्ली प्रवासात कोणीही शिदोरी नेत नाहीत.

कारण रस्त्यात पाच किलोमीटरच्या अंतरावर 'धाबा' (ढाबा) असतो. ते बनविणारे कोण आहेत, सात्विक, राजस का तामस याचा विचार होत नाही. 'धाबा'मुळे बुध्दीत 'बाधा' व्हायला लागली आहे.

शास्त्र सांगते आहे,

**आहारशुद्धौ सत्वशुद्धी सत्वशुद्धौ ध्रुवा स्मृतिः ।**
**स्मृतिलाभे सर्वग्रथीनां विप्रमोक्षः॥ छांदोक्य.७/२६/२**

**अर्थ** - शुध्द आहारामुळे अंतःकरण शुध्द होते. अंतःकरण शुध्द झाले तर बुध्दी स्थिर राहते. बुध्दी निर्मळ झाली की सर्व संशय मिटले जातात. संशय मिटले की मोक्ष - मुक्ती मिळणे सोपे होते.

**युक्ताहार विहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।**
**युक्तस्वप्नाव बोधस्य योगो भवति दुःखहा ॥ गी.६/१७**

**अर्थ** - ज्याचे खाणे, हिंडणे परिमित आहे, जो सर्व कार्यामध्ये परिमित काम करतो, ज्याची निद्रा व जागर परिमित आहेत, त्यालाच (संसाररूपी) दुःखाचा नाश करणारा योग साध्य होतो.

**आहार तरी सेविजे । परि युक्तीचेनि मापें मविजे ।**
**क्रियाजात आचरिजे । तयाचि स्थिती ॥ ज्ञाने.६/३४९**

**युक्त आहार विहार । नेम इंद्रियासी सार ।**
**नसावी बासर । निद्रा बहु भाषण ॥ तु.म.**

साधकांनी जास्त खाऊ नये व कमीपण खाऊ नये. सतत साधना करावी.

**दृष्टांत** - मगध देशाचा राजा 'श्रोण' हा प्रथम अतिशय विलासी जीवन जगत होता. कामिनी व मदिरा यांच्या आहारी गेला होता. अचानक त्याच्या जीवनात परिवर्तन घडले व हा राजा बुध्दांचा अनुयायी झाला. साधे जीवन जगायला लागला. संन्याशापेक्षा जास्त तपश्चर्या करायला लागला. खूप उपवास करू लागला. उपवासाचा अतिरेक होऊन श्रोण राजा आजारी पडला. पण त्यास वीणा वाजविण्याचा मोठा छंद होता. आजारपणात पण तो एकांतात वीणा वाजवित असे.

एक दिवस भगवान बुध्द त्यास भेटण्यास आले. त्याची सर्व अवस्था पाहून म्हणाले, 'आपण फार कडक उपवास करता. शरीर सुकले आहे. आपणास काय प्रास करून घ्यायचे आहे ?' तो म्हणाला, 'मला लवकर निर्विकल्प समाधी पाहिजे.' बुध्द म्हणाले, 'समाधी तनावर नाही तर मनावर अवलंबून आहे. आपण वीणा वाजविता, विण्याच्या तारा ढिल्या (सैल) असतील तर वीणा सुरात वाजणार नाही व फार ताणलेल्या असतील तर त्या तुटून जातील. त्या योग्य पाहिजेत. तद्वत जास्त खाणे अपायकारक आहे व कमी खाणेसुध्दा अपायकारक आहे. योग्य आहार ठेवून साधना करावी.

**दृष्टांत -** महर्षि चरकांनी एकदा विचार केला, मी जे मार्गदर्शन करतो आहे त्याचा शिष्यांवर किती परिणाम होतो ते पाहावे. त्यांनी कबुतराचे रूप घेतले व सर्व वैद्य जात असताना प्रश्न विचारला, 'को रुक ? को रुक ? को रुक ?' कोण स्वस्थ आहे ? कोण स्वस्थ आहे ? कोण स्वस्थ आहे ? उत्तर आले नाही. चरकांना वाटले यांनी ऐकून न ऐकल्यासारखे केले असावे. किंवा उपेक्षा केली असावी. परत तीन वेळा हाच प्रश्न विचारला असता वाग्भट तिकडून जात होते त्यांनी तुरंत उत्तर दिले, 'हितभूक्, हितभूक्, हितभूक्.' याचा अर्थ योग्य खातो तो. परत प्रश्न विचारला, त्यांनी उत्तर दिले 'मितभूक्, मितभूक्, मितभूक्.' अर्थात कमी खाणारा. तिसऱ्यांदा प्रश्न विचारला, अर्थात तोच प्रश्न. वाग्भटांनी उत्तर दिले, 'ऋतभूक्, ऋतभूक्, ऋतभूक्.' अर्थात पवित्र भोजन. पक्षी उडून गेला. याचे कारण त्याचे समाधान झाले होते.

जीवनात खाण्याच्या बाबतीत या तीन गोष्टी महत्त्वाच्या आहेत. १) शुद्ध सात्विक आहार - हितभूक २) कमी आहार - मितभूक ३) पवित्र मंगल आहार म्हणजे करणारी व्यक्ती शुद्ध हवी तरच तनावर, मनावर चांगला परिणाम होतो. हे ऋतभूक. साधकाच्या मित भोजनाविषयी माऊलींनी तीन पथ्ये सांगितली आहेत

**आणि आंगा बळ यावें । नातरी क्षुधा जावें ।**
**कां जीभेचे पुरावे । मनोरथ ॥ ज्ञाने.१८/१०२४**

**भोजन करितांविखीं । यया तिहींतें न लेखी ।**
**आहारीं मिती संतोषीं । माप न सूये ॥ ज्ञाने.१८/१०२५**

**अर्थ -** अंगात ताकद यावी, भूक जावी व जिभेचे लाड पुरवावे याकरिता भोजन करू नये. कलियुगात बाकीची साधने साध्य होणे अवघड आहे. कीर्तन, नामस्मरण करावे पण युक्त आहार मात्र पाहिजेच.

**युक्त आहार, नलगे आणिक साधने । अल्प नारायणे दाखविले ॥**
**कलियुगामाजी करावे कीर्तन । तेणे नारायण देईल भेटी ॥ तु.म.**

भोजनाच्या अगोदर म्हणावयाचा अभंग.

**केशवा माधवा गोविंदा गोपाळा ।**
**जेवितो कृपाळा पांडुरंगा ॥१॥**

**अच्युता वामना दशरथनंदना ।**
**जेवितो बा कृष्णा पांडुरंगा ॥२॥**

कृष्ण विष्णु हरी मधुसुदन मुरारी ।
जेविलो नरहरी पांडुरंगा ॥३॥

ऐसी ग्लानी करिता विठ्ठल पावला ।
नैवेद्य जेविला नामयाचा ॥४॥

★★★★★

## (७५) वासना

वासना म्हणजे इच्छा. या वासनेचे दोन प्रकार पडतात.

१) अशुभ वासना २) शुभ वासना

१) संसारात अनात्म पदार्थांची तीव्र इच्छा होणे यास अशुभ वासना म्हणतात. ही वास जन्म-मरण व दुःखास कारण आहे. मुक्ताबाईंनी वासनेस ओढाळ गायीची उपमा दिली आहे.

**वासना ओढाळ गाय गड्यानो ॥ धृ ॥**

**जिकडे जाऊ नये तिकडे जाय । जे खाऊ नये ते खाय । तिचा म्हणून मोडावा पाय ॥१॥**

**तिने मोहिले महासूरजन । ब्रह्मादिका लाविले ध्यान । तिने मारलासे बाण ॥ ॥२॥**

**ज्ञानदेवे चुकारिली । सोपान देवे पायपीठ केली । मुक्ताबाईने धार काढिली ॥३॥**

सगळ्यात मोठे उदाहरण, प्रत्यक्ष ब्रह्मदेव, ज्याने सृष्टीची उत्पत्ती केली, जो सर्वांचा पिताम आहे, ज्याला चतुरानन म्हणतात, जगात अद्याप एकासारखा एक देह निर्माण केला नाही, त्यां वासना स्वतःच्या मुलीवर गेली. सरस्वती म्हणाली, 'आपण शुद्धीवर आहात कां ?' पण ब्रह्मदे वासनेपुढे हतबल झाले. सरस्वतीने शाप दिला, 'आपले नाव कोणी घेणार नाही. शिवाय आप मंदिर कोणी उभारणार नाही.' विष्णू, शंकर यांची अनेक मंदिरे आहेत. सर्व लोक या दोघांचे नामस्म करतात. एवढे मोठे ब्रह्मदेव पण त्यांचे कोणी भजन करीत नाही. शिवाय त्यांचे मंदिर कोठे दिस नाही. (भारतात एके ठिकाणी आहे) काय वासनेचा प्रभाव आहे ? वासनेचे मूळ उपटून टाकल्याशिव तरणोपाय नाही. असे तुकोबाराय म्हणतात. 'वासनेचे मूळ छेदल्यावाचून । तरलोसें कोणी न म्हणावे ॥'

वासनेचा संग अंतकाळी झाला तर मोठ्या मोठ्यांना जन्म घ्यावा लागतो. वासनेचा 'संग हो अंतःकाळी । तरी तपो बळी जन्म धरी ॥' याची दोन उदाहरणे. एक म्हणजे भरत राजा, 'जडभ राजा हरणीगर्भा गेला । घाला तो घातला वासनेने ॥' व दुसरे संत रोहिदास महाराज. आज

जन्मात ब्राह्मण असून मरतांना चप्पलांवर वासना गेली. चर्मकाराच्या कुळात जन्म घ्यावा लागला.

**दृष्टांत -** एक फोटो ग्राफर एका माणसाचा फोटो काढत होता. समोर बसलेल्या माणसास फोटोग्राफर पुन्हा पुन्हा सूचना देत होता. सावधान, होशियार ! मात्र नेमका फोटो खेचताना त्याच्या नाकावर माशी बसली. त्याने तोंड वेडेवाकडे केले व फोटो तसाच विद्रूप खेचला गेला. जेव्हा फोटो हातात पडला तेव्हा तो आश्चर्यचकित झाला. म्हणाला, 'असा कसा फोटो ?' फोटोग्राफर म्हणाला, 'शेवटी जसा चेहरा केला तसा फोटो आला. माझा अथवा कॅमेऱ्याचा कांही दोष नाही.' तद्वत जशी शेवटी वासना होते त्याप्रमाणे जन्म घ्यावा लागतो.

**दृष्टांत -** गंगा किनारी एक ब्राह्मण तपश्चर्या करीत होता. त्याच ठिकाणी एकजण मासे मारून उपजीविका करीत होता. आपला धंदा करताना सतत देवाचे स्मरण करीत असे. पण आपल्या व्यवसायाविषयी तो उदास असायचा. पण तप करणारा ब्राह्मण मनांत विचार करीत असे हा किती भाग्यवान आहे मच्छी पकडतो, विकतो व खातो. दोघेही मरतात. पण चांडाळ राजा होतो. ब्राह्मणाचे मन माशांवर जाते व त्यास मच्छीमाराचा जन्म प्राप्त होतो.

एक दिवस या दोघांची भेट होते. एकमेकांना ओळखतात. मच्छीमार म्हणतो, 'मला मरताना मासे आठवले नाहीत. देव आठवला. मला देवानी राजा बनविले, आपण ब्राह्मण असून मरताना माशांवर वासना गेली म्हणून देवानी आपला जन्म मच्छीमार कुळात घातला. जसे शेवटी मन तसा पुढचा जन्म.'

पण हीच वासना जर शुभाकडे वळवली तर फायदाच फायदा होतो. ज्ञानोबाराय, निवृतीनाथ यात्रा करीत असताना पैठणला आले. पैठणला त्यावेळी भानुदास महाराज होते. माऊलींनी त्यांचे वैभव पाहिले व भक्तीही पाहिली. सहज मनात आले. अशांच्या कुळी आपला जन्म व्हावयास हवा. निवृत्तीनाथ म्हणाले, 'माऊली चला आपणास परत इथे यावे लागणार आहे.' तेच ज्ञानोबाराय, संत एकनाथ महाराज म्हणून आले, अर्थात संतांचे अवतार हे जगाच्या कल्याणाकरिताच आहेत. तुकोबारायांनी शुभ वासनेची देवाकडे मागणी केली आहे.

'ऐसे आवडते मना । देवा पुरवावी वासना ॥' संतांच्या संगाची वासना. 'तुका म्हणे माझी पुरवी वासना । कोण नारायणा तुजविण ॥' देवाविषयी वासना.

**लोकवासनया जन्तोः शास्त्रवासनयापि च ।**
**देहवासनया ज्ञानं यथावन्नैव जायते ॥**

**अर्थ -** लोक वासना, शास्त्र वासना, देह वासना यामुळे लोकांना योग्य ज्ञान मिळत नाही.

**चिंतन :** १) **वासना** - अविकसीत इच्छा

२) **स्पृहा** - अर्धविकसीत इच्छा

३) **कामना** - पूर्ण विकसीत इच्छा

४) **तृष्णा** - विपरीत इच्छा

★★★★★

# (७६) गुरु महात्म्य

मनुष्याने जीवनात गुरू करणे आवश्यक आहे. ज्याने गुरू केला नाही त्याचे जीवन गुरासारखे म्हणजे पशूतुल्य आहे. जगास मार्गदर्शन करण्याकरिता विष्णूने प्रत्येक अवतारात गुरू केले आहेत.

**१) मत्स - मांधाता** **२) कच्छ - सहजानंद** **३) वराह - कंकऋषी**

**४) नृसिंह - दुर्वास** **५) वामन - ब्रह्मदेव** **६) परशुराम - शंकर**

**७) राम - वसिष्ठ** **६) कृष्ण - सांदिपनी**

वास्तविक जगद्गुरुंना गुरू करण्याची काय आवश्यकता आहे ? पण सर्वांनी गुरू करावा यासाठी श्रीकृष्णांनी म्हणजे विष्णूंनी जगास धडा घालून दिला आहे.

**चिंतन** - गुरुजी, आचार्य, गुरू, सद्गुरू

**१) गुरूजी** - शाळेत प्रत्येक विषयाचे वेगवेगळे गुरुजी असतात. त्या-त्या विषयाचे ज्ञान करून देणारे त्यांना गुरुजी, मास्तर, शिक्षक किंवा टीचर म्हणतात.

**२) आचार्य** - आपल्या चांगल्या आचरणाने विद्यार्थ्यांना अथवा शिष्यांना योग्य वागण्यास लावतात. यांच्या आचरणाकडे पाहून विद्यार्थी स्वतः आचारशील बनतात. त्यांना आचार्य म्हणावे.

**३) गुरू** - जे जीवांना अथवा शिष्यांना परमार्थ मार्गास लावतात, भक्तीचा, ज्ञानाचा, वैराग्याचा उपदेश करून देवाकडे चित्त आकर्षित करतात, त्यांना गुरू म्हणावे.

**४) सद्गुरू** - शिष्याचा अधिकार वाढला, दीक्षेस पात्र झाला तर परमात्म्याची प्राप्ती करून देतात, त्यांना सद्गुरू म्हणावे.

गुरू सेवेने ज्ञान मिळते.

१) धौम्य ऋषींचा अरुणी नावाचा एक शिष्य, जो सेवेमध्ये तत्पर असतो. पावसाळ्याचे दिवस

असतात. ऋषी यास वाफ्याचे पाणी अडविण्यास पाठवितात. पाणी अडविले जात नाही म्हणून हा बांधाच्यामध्ये आडवा झोपतो. पाणी अडले जाते. रात्र झाली, शिष्य आला नाही म्हणून धौम्य ऋषी त्याला शोधत येतात. हा बेहोश झालेला असतो. गुरू त्यास उठवितात. विद्या देतात व कृतार्थ करतात.

२) धौम्य ऋषींचा दुसरा उपमन्यू नावाचा एक शिष्य. ऋषींनी यास गाई चारण्यास पाठविले. त्यास सूचना दिली की भीक मागायची नाही. जेवण तर ते देतच नव्हते. हा गाईचे दूध पिऊ लागला. गुरुजी म्हणाले, 'गाईचे दूधपण प्यायचे नाही.' नंतर हा फक्त दूधाचा फेस पिऊ लागला. त्याससुद्धा गुरुजींनी मनाई केली. एक दिवस फार भूक लागली म्हणून हा रुईच्या झाडाचा चीक प्यायला व आंधळा झाला. दिसत नसल्यामुळे एक दिवस तो विहिरीत पडला. ऋषी त्यास शोधत आले. त्याची सेवा, प्रामाणिकपणा पाहून गुरूंनी त्याचा उद्धार केला.

३) गोरक्षनाथांनी शिष्यांना सांगितलेली गुरूची कथा -

गोदावरीच्या काठी वेदधर्म नावाचे गुरू राहत होते. त्यांना अनेक शिष्य होते. त्यामधे एक संदीपक नावाचा सेवाधारी व बुद्धिमान शिष्य होता. एके दिवशी सर्व शिष्यांना बोलाविले व म्हणाले, 'माझ्या पूर्वकर्मानुसार मी आंधळा होणार आहे. कोड फुटणार आहे व शरीरातून दुर्गंधी येणार आहे. हे भोगण्याकरिता मी काशीच्या मणीकर्णिका घाटावर गंगेच्या काठी राहणार आहे. माझ्याबरोबर कोण येणार ?' सर्व शिष्यांनी माना खाली घातल्या. संदीपक म्हणाला, 'मी येतो.' गुरूंच्या बरोबर गेला. चार दिवसात सांगितल्याप्रमाणे गुरूंची अवस्था झाली. पण संदीपक न कंटाळता त्यांची सेवा करत राहिला. त्याच्या सेवेवर प्रसन्न होऊन शंकर प्रगट झाले. म्हणाले, 'संदीपक माझ्याकडे काहीही माग, मी देण्यास समर्थ आहे.' संदीपक वेदधर्म गुरूंकडे गेला व म्हणाला, 'मला शंकर प्रसन्न झाले आहेत. त्यांच्याकडे आपण निरोगी व्हावे असे मागू का ?' वेदधर्म म्हणाले, 'सेवेचा कंटाळा आला का ?' शंकर निघून गेले. काही दिवसांनी विष्णू प्रसन्न झाले. म्हणाले, 'बाळ मी तुझ्या गुरुसेवेवर प्रसन्न आहे. पाहिजे ते माग.' संदीपक म्हणाला, 'देवा माझ्या गुरूंच्या चरणावर जी श्रद्धा आहे ती तशीच राहू दे.' वेदधर्म प्रसन्न झाले. त्यास ज्ञानाचा खजिना दिला व त्याचा भवसागर पार झाला. तात्पर्य - गुरूंची सेवा सर्व साधनांचे सार आहे.

४) **उपनिषद कथा -** जाबालपुत्र सत्यकाम गौतम ऋषींकडे उपदेशाकरिता येतात. गौतम सत्यकामास ४०० अशक्त गायी देतात व सांगतात या जंगलात घेऊन जा. १००० गायी झाल्यानंतर परत माझ्याकडे ये. गायी सांभाळता-सांभाळता १ हजार गायी केव्हा झाल्या हे सत्यकामास समजले नाही. एका वासराने सांगितले 'आपण ऋषींकडे चलावे. आपली एक हजार संख्या झाली आहे.' सत्यकाम दुसऱ्या दिवशी गायी घेऊन निघाला. वासराने त्यास पहिल्या ब्रह्मपदाचा उपदेश केला. रस्त्याने जाताना अग्निने दुसऱ्या ब्रह्मपदाचा उपदेश केला. हंसाने तिसऱ्या ब्रह्मपदाचा उपदेश केला

व मद्गु (जळचर प्राणी) याने वाटेतच चौथ्या ब्रह्मपदाचा उपदेश केला. गुरूंकडे जाता जाता रस्त्यातच त्यास ब्रह्मज्ञान प्राप्त झाले. गुरू गौतम ऋषींकडे सत्यकाम पोहोचला. त्यांनी उपदेश घ्यायला सांगितले. प्रमाणपत्र तयार होते फक्त त्यावर गौतम ऋषींनी शिक्का मारला. सत्यकाम ब्रह्मज्ञानी होऊन मुक्त झाला.

तात्पर्य - गुरूची सेवा नाही तर फक्त आज्ञा पाळली तरीसुद्धा काम होते. (गौतम ऋषीऐवजी काही ग्रंथात महर्षि हरिद्रुम नाव आहे.) पण गुरू मात्र अधिकारी पाहिजे.

★★★★★

## (७७) संसार

वेद, शास्त्र, पुराण व संत वाङ्मयामध्ये संसाराच्या वेगवेगळ्या व्याख्या आहेत. 'संसरति इति संसारः' ज्यात नेहमी परिवर्तन होते त्यास संसार म्हणतात. शंकराचार्य म्हणतात, पुन्हा जन्मास येणे, पुन्हा मरणे हे संसाराचे स्वरूप आहे. 'पुनरपि जननं पुनरपि मरणं । पुनरपि जननी जठरे शयनम् । इह 'संसारे' खलु दुस्तारे । कृपया पारे पाहि मुरारे ॥' भज गोविंदं.

ज्ञानोबारायांनी देह व देवावर अवलंबून असणाऱ्या पदार्थांना संसार म्हटले आहे.

**तरी देहादिक हें संसारें । सर्वही मांडलेंसे जें गुंफिरें ।**
**तेथ नातुडे तो वागुरे । वारा जैसा ॥ ज्ञाने.१८/९५६**

माऊलींनी आणखी संसाराची वेगळी व्याख्या केली आहे. उपजणे - मरणे संसार नाही, तर हे खरे आहे असे समजणे म्हणजे संसार.

**अगा उपजणें निमणें । हे साचचि जे कां मानणें ।**
**तो जीवलोकु मी म्हणे । संसारू हन ॥ ज्ञाने.१३/३४७**

एका अभंगात ज्ञानोबारायांनी देहाला संसार म्हटले आहे. 'ये साते आलीया ओळंगा सारंगधरू । नाही तरी 'संसारू' वाया जाईल रया ॥' माऊलींनी पुन्हा 'जगाची ही यात्रा म्हणजे संसार' अशी व्याख्या केली आहे.

**संसार यात्रा भरली थोर । अहंभावे चळे हाट बाजार ।**
**काम क्रोध विके मदमत्सर । धर्म लोपे अधर्म व्यवहार ॥**
**यात्रा भरली जनी ।।धृ.॥**
**उपजोनी 'संसारी' आपुला आपण वैरी ।**
**मी माझे शरीरीं घेऊनि ठेला ॥**

**या देहाते म्हणे मी पुत्र दारा धन माझे ।**
**परी काळाचे हे खाजे ऐसे नेणतु गेला ॥ ज्ञान.**

या प्रमाणातसुद्धा माऊली जगास संसार म्हणतात.

तुकोबाराय अगदी खाली येऊन म्हणतात, घरदार, गाळगी-मळकी म्हणजे संसार. 'संसार'करिता म्हणती हा दोषी । टाकिता आळसी पोट पोसा ॥' तु.म. थोडक्यात देह, इतर नातेवाईक, वस्तू, सर्व जग म्हणजे संसार. ज्यात काही सार आहे असा संभ्रम होणे याचे नाव संसार. 'शीण झाला मज संसार संभ्रमे । शीतळ या नामे झाली काया ॥' तु.म.

या संसारास अनेक उपमा आहेत.

१) **संसारसिंधु हा दुस्तर । नुल्लंघे उल्लंघितां पार ।**
**बहुत वाहविले दूर । न लगेचि तीर पैल थडी ॥ तु.म.**

सागराचा जसा अंत लागत नाही, तसा संसाराचा अंत लागत नाही. स्वसामर्थ्याने ब्रह्मदेवासस्रुद्धा हा भवसागर पार करता येत नाही. म्हणून यास सागर म्हणतात.

२) **भवनदी** - संसारास नदी म्हणतात. नदीस दोन तीर असतात. तसे या संसाररूपी नदीस दोन तीर आहेत. प्रवृत्ती आणि निवृत्ती. प्रवृत्तीकडून निवृत्तीकडे परमार्थ मार्गाने जावयाचे असते.

३) **भवरोग** - संसारास रोग म्हटले आहे. रोग असलेली शक्ती नेतो व नसलेले दुर्बळपण आणतो. तद्वत जीव ब्रह्मरूप आहे. पण मायेमुळे त्यास जीवदशा प्राप्त झाली आहे.

४) संसारास गीताकार उलटा वृक्ष म्हणतात. 'उर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ॥' गी.१५/१ उलटे झाड व्यवहारात तसे नाही पण नदीच्या, तळ्याच्या, विहिरीच्या काठावर असणाऱ्या झाडाची सावली (प्रतिबिंब) मात्र उलटीच दिसते.

५) संसारास प्रकृतीसुद्धा म्हणतात. ही देवाची शक्ती आहे व तिने सर्व जगाचा विस्तार केला आहे. अशा प्रकारे या संसारास अनेक नावे आहेत.

हा संसार दुःखरूप, मायावी आहे. मायावी म्हणजे अगोदर नाही, नंतर नाही, मध्ये भासतो. 'येर ती माइकें दुःखाची जनितीं । नाही आदि अंती अवसानीं ॥' तु.म. उदा. शरीर अगोदर नव्हते, नंतर राहणार नाही. बायको अगोदर नव्हती व शेवटी मागेपुढे होणार. मुले अगोदर नसतात, मरताना असतीलच असे नाही मधे मात्र आहेत. घर शेती अगोदर नसते, नंतर सोडावी लागते. या सर्वांपासून दुःखच होते असा सर्वांचा अनुभव आहे.

**दुःख बांदवडी आहे हा संसार । सुखाचा विचार नाही कोठे ॥ तु.म.**

ज्ञानोबारायांनी या मायावी नदीचे असेच वर्णन केले आहे.

**अर्जुना ऐसेनि पाहीं । आद्यंतु ययासि नाहीं ।**
**माजीं स्थिती आभासे कांही । परी टवाळ ते गा ॥ ज्ञाने.१५/२३७**

**ब्रह्मगिरीहूनि न निगे । आणि समुद्रींही कीर न रिंगे ।**
**तरी माजीं दिसे वाउगें । मृगांबु जैसें ॥ ज्ञाने.१५/२३८**

**तैसा आद्यंतीं कीर नाहीं । आणि साचही नोहे कहीं ।**
**परि लटिकेपणाची नवाई । पडिभासे गा ॥ ज्ञाने.१५/२३९**

आपण संसार खरा समजतो म्हणून दुःख प्राप्त होते. संतसुद्धा संसार करतात. पण खोटा म्हणून करीत असल्यामुळे त्यांना दुःख होत नाही.

**दृष्टांत -** कोल्हापूरचे बरेच लोक मुंबईस गिरणी कामगार आहेत. शेती कमी असल्यामुळे नोकरीशिवाय पर्याय नाही. असाच एक बदली कामगार बैठकीच्या खोलीत रहात होता व खानावळीत जेवत असे. १० वर्षे नोकरी करीत होता. बायकोने पत्र पाठविले, 'आपण एवढी वर्षे मुंबईत आहात. एकदा मला मुंबई दाखवा तरी.' त्याने लगेच एक अकरा महिन्याच्या मुदतीची खोली घेतली व बायकोस बोलाविले. बिचारी अडाणी होती. राजा राणीचा संसार चालू झाला. हा कामावरून आल्यानंतर बायकोस मुंबईतील एक-एक प्रेक्षणीय स्थळ दाखवित असे. कधी राणीबाग, कधी गिरगाव चौपाटी, कधी बाबुलनाथ, कधी गेट वे ऑफ इंडिया, दादरची गर्दी, कधी टिटवाळा, बिर्ला विठ्ठल मंदिर, कधी एखादा मराठी सिनेमा. हे पाहता पाहता दहा महिने संपले. तो बायकोस म्हणाला, 'खोलीची मुदत संपत आली आहे. तुला गांवी जावे लागेल.' ती म्हणाली, 'गावी जाते पण एखादा दागिना घेतल्याशिवाय जाणार नाही.' बऱ्याच दिवसांनी बायकोने इच्छा प्रगट केल्यामुळे यास नकार देता आला नव्हता पण याच्याकडे पैसे नव्हते. याने डोके चालविले व बाजारात जाऊन ५० रुपयाचा खोटा लक्ष्मीहार आणला, अर्थात चार तोळ्याचा ! बायकोस इतका आनंद झाला की सांगता सोय नाही. मी रात्री सांगते काय, सकाळी दागिना येतो काय ? चाळीतील सर्व बायकांना सांगत सुटली, ४ तोळ्याचा लक्ष्मीहार यांनी आणला. नवरा म्हणाला, 'उद्या तुला विमानतळ दाखवितो व गाडीत बसवितो.' दोघे निघाले. तिने मुद्दाम नवी साडी व लक्ष्मीहार गळ्यात घातला. तो म्हणाला, 'मुंबईतील चोर फार हुशार आहेत. ट्रेनमध्ये गळ्यातील दागिना राहणार नाही.' ती म्हणाली, 'मी आपल्यापुढे दागिना घालणार नाही तर गावापुढे घालून मिरवू का ? (दुल्हन वही जो पिया मन भाये) स्त्रियांनी नवऱ्याच्या खुशीकरिता शृंगार करावा, गांवास दाखविण्याकरिता नाही.' तो काही बोलला नाही. दोघे लोकल-मधून शांताक्रूझला निघाले. गाडीत गर्दी होतीच. बाई अडाणी असल्यामुळे दोघेही पुरुषांच्या डब्यात चढले. शांताक्रूझ स्टेशनला उतरल्यानंतर बाईने गळ्यात पाहिले तर लक्ष्मीहार गायब झाला होता. या दुःखामुळे तिला चक्कर आली. फलाटावर पडली. नवऱ्याने थंड

पाणी आणले. तोंडावर शिंपडले. ती शुद्धीवर आली व ट्रेनखाली जीव द्यायला निघाली. त्याने तिला अडविले. तिची ही अवस्था पाहून तो थोडा गालात हसला. ती म्हणाली, 'तुम्ही म्हणत होता, दागिना घालू नको. मी घातला. चार तोळे नुकसान म्हणजे वीस हजार ! एवढे नुकसान झाले तरी तुम्ही खुशाल हसत आहात ? मला वाटले,तुम्ही मला माराल.' तो म्हणाला, 'जाऊ दे, तो हार फक्त पन्नास रुपयांचा होता.' हे ऐकल्याबरोबर ती गप्प झाली. याच्याकरिता की ती दागिना खरा समजत होती म्हणून बेशुद्ध झाली व हार खोटा होता म्हणून हा हसला. आपण संसार खरा समजतो म्हणून दुःख होते व साधू संसार खोटा समजून करतात. म्हणून आनंदी असतात.

**लटिका व्यवहार सर्व हा संसार । वाया येरझार हरिवीण ॥ ज्ञान. - महात्मे**

**पडिली हे रुढी जगा परिचार । चालविती व्यवहार सत्य म्हूण ॥ तु.म. - संसारी लोक**

**संसारा आलिया एक सुख आहे । आठवावे पाय विठोबाचे ।**

**येणे होय सर्व संसार सुखाचा । न लगे दुःखाचा लेश काही ॥ तु.म.**

संसार खोटा समजून करावा व देवाचे नाम खरे आहे, म्हणून ते घ्यावे व सुखरूप व्हावे.

**संसार - परमार्थ**

१) संसार उत्कृष्ट - परमार्थ निकृष्ट - रावण, हिरण्यकश्यपू

२) संसार निकृष्ट - परमार्थ निकृष्ट - सामान्य जीव

३) संसार निकृष्ट - परमार्थ उत्कृष्ट - तुकोबाराय वगैरे

४) संसार उत्कृष्ट - परमार्थ उत्कृष्ट - एकनाथ महाराज

**तुलसी इस 'संसारको' क्यो न त्यजेत निशंक । घटत घटत जात है जैसा आठका अंक ।**

**तुलसी इस रामको क्यो न भजत निशंक । आदी अंत में एक है जैसा नवका अंक ॥**

**कथा :** एक शिष्य गुरूकडे राहतो. पण अनुभूती येत नाही. गुरू त्या शिष्यास जनकाकडे पाठवितात. जनक त्याची पात्रता ओळखतात. शिष्यास आश्चर्य वाटते. एवढा मोठा यांचा पसारा असताना बोधाकरिता गुरुजींनी मला यांच्याकडे कसे पाठविले ? जनकांनी एका रात्री त्या शिष्याकडे मशाल दिली व सांगितले सर्व महाल पाहून ये, पण लक्षात ठेव मशाल विझता कामा नये. शिष्य सर्व महाल पाहून आला. जनकानी विचारले 'महालात कोणत्या कोणत्या वस्तू आहेत ?' तो शिष्य म्हणाला, 'महाल पाहिला, वस्तू दिसल्या, पण माझे लक्ष मशालीवर केंद्रित होते. त्यामुळे महाल पाहून गालिचे, नक्षीकाम यांच्याकडे लक्ष गेले नाही.'

त्या शिष्यास जनक उत्कृष्ट पक्वान्ने करून जेवावयास वाढतात. पण जेवावयास अशा ठिकाणी बसवितात की त्याच्या डोक्यावर एक मोठी शीळा लोंबकळत असते. तो जेवतो पण त्याचे लक्ष त्या

शिळेवर असते. कसे तरी जेवण करून शिष्य उठतो. जनक विचारतात, 'जेवण कसे काय होते ?' तो सांगतो, 'माझे लक्ष वर लोंबकळणाऱ्या शिळेवर होते. त्यामुळे जेवणात रस आला नाही.' जनक म्हणाले, 'मी संसार करतो आहे. माझा मोठा पसारा आहे. पण माझे चित्त सतत परमात्म्यावर असते. त्यामुळे संसाराची बाधा मला होत नाही.'

संसाराचे वर्म आहे मनाने परमार्थ व तनाने संसार. जगात सर्वश्रेष्ठ भक्त गौळणी आहेत. त्यांनी संसार केला पण श्रीकृष्णास कधी विसरल्या नाहीत.

**धन्य भाग्याच्या त्या जन्मल्या संसारी ।**
**ज्यांचे ध्यानीं मनी नित्यकाळ हरी ।**
**करीता काम काज दृष्टी त्याचे वरी ।**
**बोलता चालता जेवीता निरंतरी वो ॥ निळो.**

गौळणींचे शरीर संसारातील कामे करीत होते. मन मात्र श्रीकृष्ण प्रेमात सतत रत होते.

**होते तैसें तें उमटले वरी । बाह्य संपादणी अंतरींची चोरी ।**
**नाही मर्यादा निःसंग बावरी । 'मन हे गोविंदीं देह काम करी वो ॥ तु.म.**

**कथा :** कबीरांच्याकडे एक जिज्ञासू आला व म्हणाला, 'संन्यासी श्रेष्ठ कां गृहस्थी श्रेष्ठ ?' जनकांनी बायकोस दिवसा दिवा लावून आणण्यास सांगितले. तिने काही न विचारता दिवसा दिवा लावून आणला. पत्नीला सांगितले, 'पाहुणे आले आहेत. दूध घेऊन ये. पण खुणावले, दुधात साखर टाकू नकोस.' बायकोने दूध आणले. दोघे प्यायले. कबीर बायकोस म्हणाले, 'किती गोड दूध बनविले आहेस.' तो माणूस म्हणाला, 'कबीर किती खोटे बोलत आहेत.' कबीर म्हणाला, 'संसार असा असेल तर उत्कृष्ट आहे. बायकोने केलेल्या जेवणात दोष न पाहणे व बायकोने नवऱ्यास सहकार्य करणे, त्याच्यात दोष न पाहणे.' कबीर त्यास एका संन्याशाच्या भेटीस घेऊन गेले. संन्याशी शांत होते. कबीरांनी विचारले, 'आपले वय काय ?' त्याने सांगितले ६० वर्षे. परत जाताना विचारले, 'आपले वय किती ?' त्याने ६० वर्षे सांगितले. टेकडीवरून खाली उतरले. परत विचारले, 'आपले वय किती ?' त्याने तिसऱ्यांदा हसून सांगितले, ६० वर्षे. कबीर म्हणाले, 'संन्याशी असे पाहिजेत ज्यांना क्रोध येता कामा नये.'

**कथा :** कॉलेजमध्ये शिकतांना दोघांनी घरच्यांना डावलून प्रेमविवाह केला. दोघांना साधी नोकरी मिळाली. संसार सुरू झाला पण एकमेकांचे पटत नव्हते. एक दिवशी सकाळीच कडाक्याचे भांडण सुरू झाले. एक संन्याशी माधुकरी मागण्यास आला होता. मुलगी बाहेर आली व म्हणाली, 'बाबाजी अद्याप आमचा चहापण झाला नाही. भांडण चालू आहे.' संन्याशी म्हणाले, 'आपण शिकलेले दिसता मग भांडता कां ?' ती मुलगी म्हणाली, 'बाबाजी मी कॉलेजमध्ये असताना हा मला

म्हणायचा तू चंद्रमुखी आहेस. लग्न झाल्यानंतर हा म्हणतो आहे, तू सूर्यमुखी आहेस. आज सकाळीच मला म्हणतो तू 'ज्वालामुखी' आहेस. मी कसा याच्याबरोबर संसार करणार ?' मुलगा रागाने बाहेर आला व म्हणाला, 'बाबाजी ही कॉलेजमध्ये असताना मला प्राणनाथ म्हणायची, लग्नानंतर फक्त नाथ म्हणायला लागली. 'प्राण' गेला. आता तर मी सर्वांना सोडून हिच्या बरोबर लग्न करून 'अनाथ' झाल्यासारखे वाटत आहे.' हल्ली असेच संसाराचे चित्र दिसत आहे. कामाकरिता संसार केला तर हीच गत होते. पण रामांस मध्ये ठेवून संसार केला तर आरामच आराम आहे.

**दृष्टांत -** एक माणूस समुद्राच्या काठी कपडे काढून बसला होता. काही माणसांनी त्यास फार वेळ बसलेले पाहिले व जवळ जाऊन विचारले, 'अहो सद्गृहस्थ, आपण कशाकरिता कपडे काढून बसला आहात ?' तो म्हणाला, 'मला समुद्रस्नान करायचे आहे. लाटा कधी शांत होतात हे मी पाहतो आहे. लाटा शांत झाल्यानंतर मी आंघोळ करणार आहे.' लोक म्हणाले, 'इथे आयुष्यभर बसलात तरी तुम्ही आंघोळ करू शकणार नाही. कारण समुद्राच्या लाटा कधीही शांत होणार नाहीत व तुमची आंघोळ होणार नाही.' तो म्हणाला, 'मग मी काय करू ?' लोक म्हणाले, 'अशीच बुडी मारा व सांभाळून आंघोळ करून या.' काही माणसे म्हणतात, 'संसारात हे काम झाल्यानंतर परमार्थास सुरुवात करणार आहे. ते काम झाल्यानंतर ज्ञानेश्वरीचा अभ्यास करणार आहे.' संसारातील कामे कधी संपणार नाहीत. कामे करता करता वेळ काढून परमार्थ केला पाहिजे तरच जीवन सफल होईल.

**दृष्टांत -** एका व्यापाऱ्याकडे १०० बैल असतात. ते सांभाळण्याकरिता नोकर ठेवलेला असतो. दिवसा व्यापारी बैलाची काळजी घेतो व रात्री नोकराकडे बैलांची व्यवस्था ठेवतो. नोकर म्हणतो, 'मला रात्री झोप मिळत नाही.' मालक सांगतो, 'सर्व बैल बसल्यानंतर झोप घे.' कधी ८० बैल बसतात कधी ९० बैल बसतात. एकदा सर्व बैल बसले होते. फक्त एक बछडा उभा होता. नोकराला वाटले, यास बसवावे म्हणजे आपणास विश्रांती मिळेल. नोकर त्यास बसविण्यास गेला पण बछड्यास बसविता बसविता बसलेले १० बैल उभे राहिले व यास विश्रांती मिळाली नाही. संसारात असेच होते. एक समस्या सुटली तर दुसरी समस्या उभी राहते.



# (७८) संपत्ती

शास्त्रामध्ये व संतांनी संपत्तीचे सहा प्रकार सांगितले आहेत.

१) **आसुरी संपत्ती** - या संपत्तीची सहा लक्षणे आहेत.

**दम्भो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ सम्पदमासुरीम् ॥ गी.१६/४**

**अर्थ** - हे पार्था, १) दांभिकपणा, २) मस्ती, ३) अभिमान, ४) क्रोध, ५) निष्ठुरता व ६) अज्ञान (हे गुण) आसुरी संपत्तीत जन्म पावलेल्या व्यक्तिंमध्ये असतात. ही माणसे जगास त्रास देण्याकरिता जन्मलेली असतात.

**हें असो तयाच्या ठायीं । मिळोनि साही दोषीं इहीं ।**
**आसुरी संपत्ति पाहीं । वाढविजे ॥ ज्ञाने. १६/२६३**

मात्र या माणसांना शेवटी नरक भोगावा लागतो. किंबहुना नरकाची उत्पत्तीच यांच्याकरिता आहे.

२) **धन-संपत्ती** - या संपत्तीचे दोन प्रकार आहेत. स्थावर संपत्ती (घर, दुकान, जमीन वगैरे), जंगम संपत्ती (पैसा, शेअर, दागिने वगैरे) ह्या धनसंपत्तीमुळे माणूस जीवनात विषयाचा उपभोग घेऊ शकतो. जीवन सुखमय बनवितो. संपत्ती सतत साठविणे हे तामस लक्षण आहे. संपत्तीचा भोग घेणे हे राजस लक्षण आहे व दान करणे, परोपकार करणे हे सात्विक लक्षण आहे. ह्या संपत्तीचा योग्य विनियोग केल्यास उर्ध्वगती मिळू शकते. मात्र व्यसनात वापरली तर अधोगती मिळते.

३) **पुण्य संपत्ती** - या संपत्तीच्या जोरावर माणूस ब्रह्मलोकांपर्यंत जाऊ शकतो. जो शंभर यज्ञ करतो तो इंद्र होतो व स्वर्गसुख जे दिव्य भोग आहेत त्याचा उपभोग घेऊ शकतो.

**म्हणती संसारीं जन्मिजे । यज्ञादिक कर्म कीजे ।**
**मग स्वर्गसुख भोगिजे । मनोहर ॥ ज्ञाने.२/२४६**

(नहुष राजा यज्ञ करून इंद्र झाला.) मात्र पुण्य संपल्यानंतर मृत्यूलोकात परत जन्म मिळतो. माऊली दृष्टांत देतात -

**जैसा वेश्याभोगी कवडा वेंचे । मग दारही चेपूं न ये तियेचें ।**
**तैसें लाजिरवाणें दीक्षितांचें । काय सांगों ॥ ज्ञाने.९/३२९**

**अर्थ** - जोपर्यंत पैसे उधळतो आहे तोपर्यंत गणीका यास थारा देते. पैसे संपल्यानंतर हाकलून देते. तसे याज्ञिकांचे आहे.

४) **ज्ञान-संपत्ती** - काहीजण आयुष्यभर विद्या कमवितात. डॉक्टर, वकील, इंजिनियर वगैरे शिकतात व समाजात मान व धन कमवितात. या संपत्तीचे पाच फायदे आहेत.

**न चोरहार्यं नच राजहार्यं न भातृ भाज्यं न च भारकारी ।**
**व्ययेकृते वर्धते एव नित्यं विद्याधनं सर्वधनात् प्रधानम् ॥ भर्तृहरि.**

**अर्थ** - ज्ञान संपत्तीस चोर चोरू शकत नाही. राजा याच्यावर कर लादू शकत नाही. यात भाऊ वाटणी मागू शकत नाही. याचा भार होत नाही व ही संपत्ती दिल्याने वाढते म्हणून सर्व धनात विद्या धन श्रेष्ठ आहे. 'सरस्वती भांडारकी बडी अपूर्व बात । जो खर्चे त्यों त्यों बढे बिन खर्चे घट जात ॥'

५) **दैवी संपत्ती** - ही संपत्ती मोक्षास कारण आहे. या संपत्तीची सव्वीस लक्षणे आहेत.

**अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।**
**दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ गी.१६/१**

**अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शान्तिरपैशुनम् ।**
**दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ गी.१६/२**

**तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।**
**भवन्ति सम्पदं दैवीमभिजातस्य भारत ॥ गी.१६/३**

थोडक्यात १) निर्भयता २) शुद्ध सत्त्वाची बुद्धी ३) ज्ञान व योगाच्या ठिकाणी तत्परता ४) दान ५) दम ६) यज्ञ ७) स्वाध्याय ८) तप ९) सौजन्य १०) अहिंसा ११) सत्य १२) क्रोधराहित्य १३) अहंतेचा त्याग १४) शांती १५) दोष टाकून गुण घेण्याची दृष्टी १६) भूतमात्रांच्या ठायी दया १७) अनासक्ती १८) मृदूता १९) लज्जा २०) कर्माच्या ठिकाणी इंद्रियांची गती खुंटणे २१) तेज २२) क्षमा २३) धैर्य २४) शौच २५) अद्रोह २६) स्वतःच्या मानाचा अभाव.

माऊलींच्या भाषेत -

**नाना हे संपत्ति दैवी । या गुणतीर्थांची नीच नवी ।**
**निर्विण्णसगरांची दैवी । गंगाचि आली ॥ ज्ञाने.१६/२०८**

**कीं गुण कुसुमांची माळा । हे घेऊनि मुक्तिबाळा ।**
**वैराग्यनिरपेक्षाचा गळा । गिंवसीत असे ॥ ज्ञाने.१६/२०९**

**कीं सव्विस गुणज्योती । इहीं उजळूनि आरती ।**
**गीता आत्मया निजपती । नीरांजना आली ॥ ज्ञाने.१६/२१०**

या दैवी संपत्तीमुळे मुक्ती मिळते. पण संतांनी मुक्तीचाही त्याग केला आहे. माऊली म्हणतात, ार मुक्ती फुकट दिल्या तरी नको. (बाळ छंद)

**दान देगा उदार श्रेष्टा । परब्रह्म तू वैकुंठा ।**
**मुक्ति मार्गीचा चोहटा । फुकटा नेघे तया ॥ ज्ञान.**

किंबहुना दया, क्षमा, शांती यासुद्धा मला उपाधी वाटतात.

**शांती क्षमा दया ऋद्धी । हेहि पहाता मज उपाधी ।**
**तुझीया नामाची समाधी । कृपानिधी मज द्यावी ॥ ज्ञान.**

६) **नाम संपत्ती** - वरील माऊलीच्या प्रमाणावरून सर्व संपत्तीत नाम संपत्ती श्रेष्ठ आहे. याचाच साठा संत करतात.

**नारायण घरी सांठविले धन । अवघेचि वाण तया पोटी ॥ तु.म.**

**हेचि ज्याचे धन । सदा हरिचे चिंतन ॥ तु.म.**

**धन वित्त कुळे । अवघीयाने ते आगळे ।**
**ज्यांचे नारायण गांठी । भरला हृदय संपुष्टी ॥ तु.म.**

**कबिरा सबजन निर्धन धनवंत नहीं कोय ।**
**धनवंत सो जानिये राम नाम धन होय ॥**

या धनाचा साठा केल्यास परमात्मा मागेपुढे उभा राहतो. भक्त या धनाचा साठा करतात म्हणून देव त्यांच्या मागे-पुढे उभा राहतो. 'मागेपुढे उभा राहे सांभाळीत । आलीया आघात निवाराया ॥' तु.म.

ज्ञानोबाराय संपत्तीचे लक्षण सांगतात. एकमेकास पोषक असे पदार्थ एकत्र असतात त्यास संपत्ती म्हणतात.

**जेथ एक एकातें पोखी । ऐसे बहुत पदार्थ येकीं ।**
**संपादिजती ते लोकीं । संपत्ति म्हणिजे ॥ ज्ञाने १६/६६**

कोणती संपत्ती साठवायची हे मात्र प्रत्येकाच्या हातात आहे. मात्र परिणाम वेगवेगळे आहेत. थोडक्यात :

१) आसुरी संपत्तीमुळे - नरक

२) धन संपत्तीमुळे - भोग
(व्यवहारीक)

३) ज्ञान संपत्तीमुळे - धन-मान

४) पुण्य संपत्तीमुळे - स्वर्गातील दिव्य भोग

५) दैवी संपत्तीमुळे - मुक्ती
६) नाम संपत्तीमुळे - प्रत्यक्ष देवाची प्राप्ती,
देवास ताब्यात ठेवण्याची ताकद

यास साठवा, आठवा, प्रसंग पडला तर वटवा.

**सांठविणे - कथा -** एका राजाचे तीन पुत्र होते. राजा म्हातारा झाला होता. त्यास वाटले आपण संसारातून निवृत्त व्हावे. पण कारभार कोणत्या मुलाच्या हाती द्यावा ? प्रधानजीस सल्ला विचारला. प्रधानजी दूरदर्शी, हुशार होता. महाराजांना सल्ला दिला. आपण मुलांकरिता तीन महाल उभारले आहेत. त्यांना शंभर रुपये देऊन सांगा, दहा दिवसात या रुपयात जो महालात जास्तीत जास्त वस्तू साठविल त्यास राज्याचा उत्तराधिकारी नेमण्यात येईल. तिघांनी शंभर रुपये घेतले. एकाने विचार केला, एवढ्या कमी पैशात महाल कसा भरता येईल ? तो जुगाराच्या अड्यावर गेला. पण पहिल्या दिवशीच हरला. जुगारी कधी श्रीमंत होतो का ? दुसऱ्याने विचार केला शंभर रुपयात स्वस्त काय मिळणार ? त्याने गावचा कचरा महालात भरला. तिसरा हुशार, उत्तम, सात्विक होता. त्याने ५० रुपयांच्या मेणबत्या व ५० रुपयांच्या अगरबत्त्या आणल्या. वडील यायच्या अगोदर पंधरा मिनिटे महालाच्या सर्व कोपऱ्यात मेणबत्या पेटविल्या व शेजारी सुगंधी अगरबत्त्या लावल्या. राजा महाल पाहण्याकरिता आले. पहिल्याने सांगितले, 'मी पैसे मिळवून महालात पैसे भरणार होतो पण जुगारात हरलो. पैसे गेले.' दुसऱ्यास विचारले, 'तू काय महालात भरले आहेस ?' त्याने सांगितले, 'आत जाऊन पहा.' राजा आत गेले. दुर्गंध यायला लागला. राजाने विचारले, 'काय भरले आहेस ?' त्याने रागाने सांगितले, 'शंभर रुपयात कचऱ्याशिवाय काय स्वस्त मिळणार ? मी कचरा भरला आहे.' तिसरा वडिलांची वाट पहात होता. आल्याबरोबर नमस्कार केला व म्हणाला, 'आत यावे.' राजाने महालात प्रवेश करताच सगळीकडे प्रकाश दिसला व सुगंध दरवळत होता. राजा तृप्त झाला व यालाच अधिकारी नेमले. काही हृदयात काहीच सांठवत नाहीत. यांव करायचे त्यांव करायचे म्हणून जीवन असेच फुकट घालवितात. काही हृदयात कचरा साठवितात. 'चित्ती द्रव्य दारा पुत्रादि संपत्ती । समान ते होती पशु नर ॥' तु.म. मात्र भक्त हृदयात देवास साठवितात. त्यांच्या ज्ञानाचा प्रकाश जगात पडतो व भक्तीचा सुगंध सगळीकडे दरवळत रहातो. 'सांठविला हरि । जिही हृदय 'मंदिरी'॥' तु.म. 'सांठविला वाण । पैसे घातला दुकान ॥' तु.म.



# (७९) काम प्रभाव

पुरु नावांच्या, शर्मिष्ठिच्या मुलाने, स्वतःचे तारुण्य दिल्यानंतर हजारो वर्षे कामाचा उपभोग घेऊन ययाती राजाचा काम पूर्ण झाला नाही. त्या ययाती राजाचे उद्गार आहेत.

**यत्पृथिव्यां व्रीहियवं हिरण्यं पशवः स्त्रियः ।**
**न द्रुह्यन्तिमनः प्रीतिं पुंसः कामहतस्य ते भाग.९/१९/१३**

**न जातु कामः कामानां उपभोगेन शाम्यति ।**
**हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥ भाग.९/१९/१४**

**अर्थ -** पृथ्वीवरील सर्व धान्य, सर्व सोने, सर्व पशू, सर्व स्त्रिया एखाद्या मनुष्यास मिळाल्या तरी त्याच्या कामाची तृप्ती होत नाही. कामाचा उपभोग घेऊन तो शमन होत नाही. ज्याप्रमाणे अग्नित तूप टाकल्याने अग्नी भडकतो तसा विषयोपभोगाने काम वाढतो. माऊली म्हणतात -

**जैसा भोगीं कामु वाढे । कां इंधनें आगीसि हाकाक चढे ।**
**तैसीं खातखातांचि तोंडें । खाखातें ठेलीं ॥ ज्ञाने. ११/४३२**

तुलशीदास काम प्रताप सांगतात -

**कोपेऊ जबहिं बारिचर केतु । छन महूँ मिटे सकल श्रुति सेतु ।**
**ब्रह्मचर्य व्रत संजम नाना । धीरज धरम ग्यान विग्याना ।**
**सदाचार जप जोग विरागा । सभय बिबेक कटकु सबु भागा ॥**

**अर्थ -** जेव्हा काम कोपतो तेव्हा एका क्षणात सकळ श्रुति अभ्यासाचा सेतू कोसळतो. ब्रह्मचर्य व्रत, अनेक प्रकारचा संयम, धीर, धर्म, ज्ञान, विज्ञान, सदाचार, जप, योग, वैराग्य, विवेकासह सर्व सैन्य भीतीने पळून जाते.

**मत्तेभकुम्भदलने भुवि सन्तिशूराः । केचित् प्रचण्ड मृगराजवधेऽपि दक्षाः ।**
**किन्तु ब्रवीमि बलिनां पुरतः प्रसह्य । कन्दर्पदर्पदलने विरला मनुष्याः ॥ सुभा.**

**अर्थ -** मदोन्मत्त हत्तीचा कळप एखादा शूर माणूस पार करू शकेल. कदाचित प्रचंड असणारा जंगलाचा राजा, सिंह याचा दक्षतेने वध करू शकेल. पण कंदर्प म्हणजे कामाच्या पुढे बळी ठरणारा, अर्थात कामास जिंकणारा माणूस विरळा आहे. तुकोबाराय सांगतात, 'कामातुरा भय लाज ना विचार । शरिर असार तृणतुल्य ॥' काम-लंपट मनुष्यास समाजाची मुळीच लाज वाटत नाही. आपल्या भविष्याची भीती वाटत नाही. तो कसलाच विचार करत नाही. किंबहुना ज्या माध्यमाने काम उपभोगायचा त्या शरीराची, जीवाचीसुद्धा कामातूर माणसास पर्वा नसते.

शंकरांनी मात्र या कामाचा कोळसा केला. जाळून टाकला.

**ऐसिया पैजा महेशा । पांघुरणें दाही दिशा ।**
**लांचकरू म्हणोनि कोळसा । कामु केला ॥ ज्ञाने.१३/२५**

**दृष्टांत** - आपण काम जिंकला असा नारदांना अभिमान झाला. ते शंकराकडे गेले व म्हणाले, 'आपण काम जाळला. पण मी जिंकला.' शंकर म्हणाले, 'आपण फार मोठे काम केले आहे. ही गोष्ट मला सांगितली हे ठीक आहे पण विष्णूंना सांगू नका.' नारदांना वाटले, 'यांना माझा उत्कर्ष पाहवत नाही.' ते वैकुंठात गेले व विष्णूंना म्हणाले, 'मी काम जिंकला !' विष्णू म्हणाले, 'जो कोणालाच जिंकता येत नाही असा काम आपण जिंकला. आपण परम श्रेष्ठ आहात. पण हा अभिमान बाळगू नका.' मात्र नारदांना अभिमान झाला. देवास भक्तांचा अभिमान खपत नाही. नारदांच्या वाटेतच मायेच्या प्रभावाने एक लोक तयार केला. तिथे शिलनिधी राजा उत्पन्न केला व त्याची सुंदर मुलगी विश्वमोहिनी होती. नारदाचे आगमन झाल्यानंतर राजाने विचारले, 'माझी ही मुलगी कोणास द्यावी ?' विश्वमोहिनीचे रूप पाहिल्यानंतर नारद कामातूर झाले. म्हणाले, 'हिचे स्वयंवर रचा व जगातील सुंदर पुरुषाशी हिचे लग्न करा.' राजा म्हणाला, 'ठीक आहे.' स्वयंवर रचले. सर्वत्र दवंडी पिटली. सर्व राजे आले. नारद विष्णूकडे गेले व विष्णूचे रूप मागितले. म्हणाले, 'मला आपले सुंदर, हरिरूप द्या.' देवाने हरिरूप दिले. नारद लग्न मंडपात हजर झाले. विश्वमोहिनी वरमाला घेऊन आली. नारदांना वाटले, आपल्यालाच वरणार ! पण तिने नारदाकडे कुत्सित नजरेने पाहिले. तिथे विष्णू ब्राह्मण रूप घेऊन आले होते. ब्राह्मणाच्या गळ्यात विश्वमोहिनीने माळ घातली. ब्राह्मण त्या सुंदरीस घेऊन गेले. इकडे नारदांचा क्रोध वाढला. कारण काम पूर्ण झाला नाही तर क्रोध निर्माण होतो व पूर्ण झाला तर लोभ निर्माण होतो. नारदांनी पाण्यात रूप पाहिले. ते माकडाचे दिसले. कारण हरि या शब्दाचा माकड असा एक अर्थ होतो. नारदांनी देवास शाप दिला. मी स्त्री विना वेडा झालो, तसा तू होशील व त्यावेळी ही माकडे कामास येतील. देव म्हणाले, 'मला याकरिता अवतार घ्यावयाचा आहे.' राग शांत झाल्यावर नारदास पश्चाताप झाला. नारदांनी देवाची क्षमा मागितली. देव म्हणाले, 'तुझे मला कल्याण करायचे होते. कामामुळे कुणाचे चांगले झालेले नाही. म्हणून मी हा प्रकार केला.' शंकराचार्य सांगतात - कामापेक्षा यम बरा

**यमस्य कामस्य च तारतम्यं विचार्यमाणे महदस्ति लोके ।**
**हितं करोत्यस्य यमोऽप्रियः सन कामास्त्वनर्थं कुरूते प्रियः सन ॥**

**अर्थ** - यम व काम यांचा विचार करून महात्मा लोकांनी सांगितले आहे. यम हा सर्वांना अप्रिय वाटतो पण शिक्षा देऊन सुधारतो. मात्र काम प्रिय वाटत असला तरी जीवनात अनर्थ घडवितो.

**दृष्टांत** - एकदा एक म्हातारा व म्हातारी रस्त्यातून हातात हात घालून आनंदात चालले होते. रस्त्यात रथावरून राजा चालला होता. राजास थोडे नवल वाटले. प्रधानजींना म्हणाला, 'या म्हातारा-

म्हातारीस उद्या दरबारामध्ये येण्यास सांगा.' प्रधानजींनी तसे त्या दोघांना सांगितले. म्हातारा-म्हातारी घाबरले. आम्ही काही गुन्हा केला नाही. राजाने का बोलाविले असावे ! म्हातारा हुशार होता. त्याने राजाचे मनोगत ओळखले. सकाळी उठून स्नान करून चांगले कपडे घातले. स्वतःकडे एक तांदुळाची पुडी घेतली. म्हातारीस राखेची पुडी दिली. राजवाड्यात हजर झाले. राजाने दोघांचे स्वागत केले. त्यांना बसायला सांगून विचारले, 'येवढे वय झाले तरी आपण रस्त्यातून हातात हात घालून चालला होता. मला थोडे आश्चर्य वाटले. मला हे विचारायचे आहे, आपल्या या शृंगाराचे रहस्य काय आहे ?' म्हाताऱ्याने आपली पुडी राजासमोर ठेवली व म्हातारीस तिची पुडी ठेवण्यास सांगितले. राजाने विचारले, 'हा काय प्रकार आहे ?' म्हातारा म्हणाला, 'हे आपल्या प्रश्नाचे उत्तर आहे.' राजाने दोन्ही पुड्या उघडल्या. एका पुडीत तांदूळ व एका पुडीत राख होती. राजा म्हणाला, 'मला उत्तर समजले नाही.' म्हातारा म्हणाला, 'महाराज, जोपर्यंत मी तांदूळ खात आहे व म्हातारीची राख होत नाही तोपर्यंत आमच्या जीवनातून 'काम' नाहीसा होणार नाही.' बरेच म्हातारे बिघडतात व साठाव्या वर्षी लग्नास तयार होतात. असा काम-प्रभाव आहे.

मग या कामाचा प्रभाव नाहीसा होऊन राम भेटेल की नाही ? याचे उत्तर आहे, रामनामाजवळ कामाचा प्रभाव टिकत नाही.

**दृष्टांत -** मीराबाईच्या पदरी एक भंगीण काम करीत असते. एकदा तिचा तरुण मुलगा कामासाठी आला व मीराबाईचे सौंदर्य पाहून विव्हळ झाला. एक भगवत्भक्त, तरुण व राजकन्या ! घरी गेला व आईस म्हणाला, 'बायको असावी मीराबाईसारखी.' आई म्हणाली, 'मूर्खा, असे कसे बोलतोस ? आपण सेवक, ती राजकन्या ! परत शब्द काढू नकोस.' पण तो अशक्त होत गेला. ध्यानीमनी मीराबाई ! मुलगा अशक्त म्हणून आईपण अशक्त होत गेली. एक दिवस मीराबाई म्हणाली, 'आपणास चांगला पगार देते, चांगले खायला देते, तरी तुमची अशी अवस्था का ?' ती म्हणाली, 'जीवनात एक शल्य आहे.' मीराबाई म्हणाली, 'कोणते दुःख आहे ?' आई म्हणाली, 'ते मी सांगितले तर तुम्ही आम्हाला फाशी द्याल.' मीराबाई म्हणाली, 'मी रागावणारसुद्धा नाही.' 'दया संता भांडवल । वेची बोल उपकार ॥' तु.म. माझ्या मुलाने जेव्हांपासून आपले रूप पाहिले आहे तेव्हापासून तो खंगत गेला आहे.' मीराबाई हसून म्हणाली, 'त्यास घेऊन या. मी तुमच्या मुलाबरोबर लग्न करण्यास तयार आहे.' भंगीण आश्चर्याने पाहू लागली. घरी गेली, मुलास म्हणाली, 'मीराबाई तुझ्याशी लग्न करण्यास तयार आहे.' त्याला वाटले आपण ऐकले ते स्वप्न तर नाही ना ! दुसऱ्या दिवशी मुलगा राजवाड्यात गेला. मीराबाई समोर उभा राहिला. ती म्हणाली, 'माझ्याशी लग्न करणार का ?' तो होय म्हणाला. मीराबाई म्हणाली, 'ठीक आहे, पण माझी एक अट आहे. समोर पिंपळाचा पार आहे. सात दिवस अन्न-पाणी न घेता, न झोपता सतत 'श्रीकृष्ण गोविंद हरे मुरारे । हे नाथ नारायण वासुदेव॥' या मंत्राचा मनापासून जप करायचा. आठव्या दिवशी 'वरमाला' आपल्या गळ्यात घालण्याकरिता येते. माझे व माझ्या नोकरांचे लक्ष आपल्याकडे असेल. यात कुचराई झाली तर मोठी शिक्षा होईल.'

मुलास वाटले, एक सप्ताह नामस्मरण करून मीराबाईसारखी सुंदर राजकन्या मिळणार असेल तर नामस्मरण करण्यास काय हरकत आहे ? त्याने प्रामाणिकपणे नामस्मरणास सुरुवात केली. झोपला नाही. अन्न-पाणी नाही. आठव्या दिवशी मीराबाई हार घेऊन गेली तेव्हा त्याच्या डोळ्यात अश्रू आले. त्याने तिला साष्टांग दंडवत घातले व म्हणाला, 'आपण माझे गुरुमहाराज आहात. माझी कामदृष्टी नामामुळे समूळ नष्ट झाली आहे.

**एका जनार्दनी गाता हरिचे नाम । निमाली इंद्रिये विषय विसरली 'काम' ॥**

**तुका म्हणे नाम । ज्याचे नाशी क्रोध काम । हरी भवश्रम । उच्चारितां वाचेंसी ॥**

★★★★★

## (८०) काळ प्रभाव

काळ ही देवाची विभूती आहे. मृत्यू हा माणसाचा ठरलेला शेवट आहे. मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत काळाच्या घशात जातात. पंचमहाभूतेपण काळाच्या तडाख्यातून सुटलेली नाहीत. ज्ञानोबाराय काळाचा प्रभाव सांगतात -

**पैं गा समासांमाझारीं । द्वन्द्व तो मी अवधारीं ।**
**मशकालागोनि ब्रह्मावेरीं । ग्रासिता तो मी ॥ ज्ञाने.१०/२७०**

**मेरुमंदरादिकीं सर्वीं । सहित पृथ्वींतें विरवी ।**
**जो एकार्णवातेंही जिरवीं । जेथिंचा तेथें ॥ ज्ञाने.१०/२७१**

**जो प्रळयतेजा देत मिठी । सगळिया पवनातें गिळी किरीटी ।**
**आकाश जयाचिया पोटीं । सामावलें ॥ ज्ञाने.१०/२७२**

**ऐसा अपार जो काळु । तो मी लक्ष्मीलीळु ।**
**मग पुढती सृष्टीचा मेळु । सृजिता तो मी ॥ ज्ञाने.१०/२७३**

**न्याहाळा पां केव्हडा । पसरलासे चवडा ।**
**जो करूनियां माजिवडा । आकारगजु ॥ ज्ञाने.१३/६४**

बऱ्याच लोकांनी काळास हुलकावणी देण्याचा प्रयत्न केला पण शेवटी पराजित झाले.

**कथा -** एका गावात एक अधिकारी ब्राह्मण रहात होता. दुपारच्या प्रहरी एक श्रीमंताचा मुलगा विहिरीवर स्नान करीत होता. ब्राह्मण थोड्या अंतरावर उभा होता. अचानक एक पिवळा धमक नाग आला. श्रीमंताच्या मुलास दंश केला. ब्राह्मणासमोर मुलगा तडफडून मेला. नाग मात्र बाजूच्या

डोंगरात घुसला. ब्राह्मणाने दिव्य नाग असल्यामुळे पाठलाग केला. नागाने वाघाचे रूप घेतले. जंगलातील दोन प्राणी मारले. कोल्हा व एक ससा ! नंतर पलिकडे जाऊन यमदूताचे रूप घेतले. पळत पळत ब्राह्मण पुढे आले. म्हणाले, 'माफ करा आपण प्रथम नाग नंतर वाघ व आता यमदूत झाला. असे का केले ?' यमदूताने सांगितले, 'श्रीमंताच्या मुलाचा मृत्यू नागामुळे होता. कोल्ह्याचा, सशाचा मृत्यू वाघामुळे होता. म्हणून मी नाग व वाघ झालो. माझे काम संपले. मी निघालो.' ब्राह्मण म्हणाले, 'माझा मृत्यू कशामुळे आहे ?' यमदूत म्हणाले, 'असे आम्ही कोणास सांगत नाही. पण आपण पाठलाग केलात म्हणून सांगतो. आपला मृत्यू पाण्यातील मगरीमुळे आहे. मगर आपणास गिळंकृत करणार आहे.' यमदूत गेले. ब्राह्मण घाबरला. महाराष्ट्र सोडला. कारण महाराष्ट्रात नद्या, तलाव आहेत. राजस्थानात गेला व एका राजाच्या पदरी कारकुनाची नोकरी पत्करली. १० वर्षे नोकरी झाली. राजस्थानच्या राजाचा मुलगा व महाराष्ट्रीयन राजाची मुलगी यांचे लग्न ठरले. राजा म्हणाला, 'काका आपणास महाराष्ट्रात जायचे आहे.' ब्राह्मण म्हणाला, 'मी येणार नाही. मला पाण्यापासून भीती आहे.' राजा म्हणाला, 'मग हिशेब कोण लिहिणार ? तुम्हाला यावेच लागेल. आम्ही आपणास पाण्याजवळ ठेवणार नाही. आपण घाबरू नये.' काका कसे तरी तयार झाले. वऱ्हाड निघाले. तिसरा मुक्काम महाराष्ट्रातील नदीच्या काठी पडला. नदीला खूप पाणी होते. राजाने ब्राह्मणास दूर राहुटी बांधून दिली. सकाळी वऱ्हाड निघणार येवढ्यात एक श्रीमंत माणूस १० तोळे सोने घेऊन आला. राजास भेटला व म्हणाला, 'माझा असा नियम आहे, मी ब्राह्मणास रोज दहातोळे सोने दान देतो. आपल्याकडे कोण ब्राह्मण आहेत कां ?' राजा म्हणाला, 'आमचे कारकून ब्राह्मण आहेत. चला त्यांच्याकडे जाऊ.' श्रीमंत माणूस व राजा काकाकडे आले. राजा म्हणाला, 'हा श्रीमंत माणूस आपणास दहा तोळे सोने दान देत आहे. घ्या.' काका म्हणाले, 'घेतो पण यांची काही अट आहे कां ?' श्रीमंत म्हणाला, 'एवढीच अट आहे, छाती एवढ्या पाण्यात दान देतो.' ब्राह्मण घाबरला. नको म्हणाला. राजा म्हणाला, 'दहा तोळे सोने सोडू नका. मी आपल्या संरक्षणासाठी १०० सैनिक ठेवतो. मगर आली तर तोडून टाकू.' काका घाबरत तयार झाले. श्रीमंत माणूस व काका नदीत छातीएवढ्या पाण्यात आले. बाजूला तलवारी घेऊन सैनिक उभे होते. श्रीमंत माणसाने एकदा हातातील १० तोळे सोन्याकडे पाहिले व काकांकडे पाहून म्हणाले, 'काका आठवते का आपली १० वर्षापूर्वी भेट झाली होती.' एकाकी श्रीमंत माणसाचे रूपांतर मगरीत झाले. मगरीने काकास गिळले. मगर कुठे गायब झाली हे एकाही सैनिकाच्या लक्षात आले नाही. तात्पर्य - काळ कोणास सोडत नाही. जीवांची कथा सोडली तरी देवासपण काळ प्रभाव दाखवितो. रामप्रभूंनी ११ हजार वर्षे राज्य केले. एक दिवस यमराज आले व म्हणाले, 'महाराज आपली मुदत संपली आहे. अवतार संपवा. देव आपली वाट पाहात आहेत.' रामाने यमराजाचे ऐकून अवतार संपविला.

मात्र संतांच्या बाबतीत थोडी वेगळी बाब आहे. अशी आख्यायिका आहे, ज्ञानोबारायांना आठवण देण्याकरिता सोळाव्या वर्षी यमराज आले. यमराजांना निवृत्तीनाथांनी दोन बोटे दाखविली.

यमराज परत गेले व दोन वर्षांनी आले. आता सोपान काकांनी दोन बोटे दाखविली. यमराज समजले, सोपान काकांना ज्ञानेश्वर महाराजांचा दोन वर्षे सहवास हवा आहे. दोन वर्षांनी येऊ. पुन्हा दोन वर्षांनी आले. मुक्ताईने दोन बोटे वर केली. यमराज परत निघाले. पण मुक्ताई कडाडल्या. म्हणाल्या, 'यम्या इकडे ये.' यमराज कापत कापत आले. म्हणाले, 'काय म्हणता ?' मुक्ताई म्हणाली, 'तुझी बुद्धी बिघडलेली दिसते. दोन बोटे म्हणजे दोन वर्षे नाहीत. दोन बोटे म्हणजे जो पर्यंत चंद्र-सूर्य दोघे उगवतात व मावळतात तो पर्यंत इकडे फिरकू नये.' यमराज खाली मान घालून निघून गेले.

**निवृत्ती सखा माझा दीन दयाळु श्रीगुरु ।**
**अलंकापुरी स्थापियेले दिधला विठ्ठल उच्चारु ।**
**समाधीजीवन माझे वरी अजानवृक्ष तरु ।**
**जंववरी चंद्रसुर्य तववरु किर्तीघट स्थिरू ।। ज्ञान.**

**जगा काळ खाय । आम्ही माथां दिले पाय ।। तु.म.**

निळोबाराय गौळणीच्या रूपाने सांगतात, 'येता जाता नेणो काळाचा अडदरा। देखता सन्मुख तो पळतसे माघारा । रंग श्रीरंगाचा उमटला शरीरा । तेणे वाताहत जन्म दुःख जरा वो ।।' निळो. ज्यांची काळावर सत्ता असते त्यांना 'बळी' म्हणतात. संत हे बळिया आहेत. 'बळियाचे अंकित । आम्ही झालो बळिवंत ।।' तु.म. 'बळिवंत आम्ही समर्थाचे दास । घातली या कास कळिकाळासी ।।' तु.म. काळावर फक्त संतांची सत्ता असते.

**हरिचे विद्यावंत झालो रे । आम्ही जाऊन पंढरपुरी राहिलो रे ।**
**कळिकाळाच्या माथा पाय देऊनिया । वैकुंठ भुवनासी गेलो रे ।। ज्ञान.**

★★★★★

## (८१) अधिकार - कर्तव्य

**कथा -** राजा शतवाहन विजय संपादन करून राजधानीत येतो. त्याला समजते महामंत्र्याचा मृत्यू झाला आहे. राजा विचार करतो महामंत्री कोणास नेमावा ? राजा युक्ती करतो. पाच गूढ प्रश्न निर्माण करून जाहिरात करतो. माझ्या पाच प्रश्नांची उत्तरे देणाऱ्यास महामंत्रीपद दिले जाईल. प्रश्न १) जगात सर्वात कठीण काय आहे ? २) जगात सर्वात कोमल काय आहे ? ३) शत्रूवर कोण विजय मिळवितो ? ४) कोणाचे जीवन सफल झाले ? ५) कोणाचे जीवन असफल झाले ? बरीच विद्वान माणसे येतात. उत्तरे देतात पण शतवाहन राजास पटत नाहीत. ही बातमी एक १५-१६ वर्षाच्या भिकाऱ्याच्या मुलाच्या कानावर जाते. त्याला या ५ प्रश्नांची उत्तरे येत होती. बाबास सांगतो, 'आपण राजास भेटू.' बाबा म्हणाले, 'आपणास राजास भेटता येणार नाही. आपण भिकारी.'

मुलगा म्हणाला, 'प्रयत्न करू.' दोघे राजवाड्याजवळ गेले पण रक्षकांनी दोघांना हाकलून दिले. बिचारे नाराज झाले. मुलाने राजाची सर्व चौकशी केली. महाराज कुठे, केंव्हा फिरावयास निघतात. त्यास समजले, महाराज संध्याकाळी ६ वाजता बागेत फिरण्यास येतात. भिकाऱ्याचा मुलगा संध्याकाळी ६ वाजता लपून बसला. राजा नेहमीप्रमाणे बागेत फिरण्यास आला. संरक्षकांची नजर चूकवून भिकाऱ्याचा मुलगा राजा समोर आला व म्हणाला, 'महाराज आपल्या ५ प्रश्नांची उत्तरे मी आपणास देऊ शकतो. मी आपणास भेटण्यास आलो होतो पण भेट होऊ शकली नाही म्हणून बागेत भेटण्याचे धाडस केले. महाराजांनी क्षमा करावी.' राजास आनंद झाला. राजा म्हणाला, '५ प्रश्न माहीत आहेत तर !' राजा समोर बसला. मुलाने सांगितले, 'आपला पहिला प्रश्न आहे, जगात कठीण काय आहे ? महाराज जगात सर्वात कठीण अहंकार आहे.' राजा खूष झाला. महाराज आपला दुसरा प्रश्न आहे, जगात कोमल काय आहे ? जगात सर्वात कोमल नम्रता (दीनता) आहे. आपला तिसरा प्रश्न आहे, शत्रुवर कोण विजय मिळवितो ? तर शत्रूच्या, हिताची, सोयीची काळजी घेणारा शत्रुवर विजय मिळवितो. आपला चौथा प्रश्न आहे कोणाचे जीवन सफल झाले ? महाराज ज्याच्या जीवनातील इच्छा पूर्ण झाल्या त्याचे जीवन सफल झाले. आपला पाचवा प्रश्न आहे, कोणाचे जीवन असफल झाले ? अर्थातच ज्याच्या इच्छा अपूर्ण राहिल्या त्याचे जीवन असफल झाले.' ५ प्रश्नांची उत्तरे ऐकून राजा आनंदीत होतो. मुलाला स्वतःबरोबर राजवाड्यात आणतो. त्याची सर्व सोय करून एक वर्ष पूर्ण शिक्षण देऊन त्याला महामंत्र्याचे पद देतो. राजाने त्याच्या भिकारीपणाकडे पाहिले नाही. बुद्धिमत्ता व गुण पाहिले व पद बहाल केले. कोणाला अधिकार द्यावा तर ज्याच्याकडे बुद्धिमत्ता व गुणवत्ता असेल त्यालाच पदाधिकार द्यावा.

**कोटी** - अधिकार व कर्तव्य

१) कर्तव्य करीत नाहीत अधिकार गाजवत नाहीत त्यास मूर्ख म्हणावे.

२) कर्तव्य करीत नाहीत अधिकार मात्र गाजवतात त्यास धूर्त म्हणावे.

३) कर्तव्य करतात व अधिकारही गाजवतात त्यांना शहाणे म्हणावे.

४) कर्तव्य करतात पण अधिकार गाजवित नाहीत त्यांना साधू म्हणावे.

**कैवल्याचा अधिकारी । मोक्षाची सोडि बांधी करी ।**
**कीं जळाचिये परी । तळवटु घे ॥ ज्ञाने. १२/२२०**

**वाचस्पतीचेनि पाडें । सर्वज्ञता तरी जोडे ।**
**परि वेडीवेमाजीं दडे । महिमे भेणें ॥ ज्ञाने. १३/१९०**



# (८२) स्नान

माणसाने जीवनात स्नानास महत्त्व दिले पाहिजे. अशी आख्यायिका आहे, ब्रह्मदेवाने सृष्टी उत्पन्न केल्यानंतर सत्यलोकांतून मृत्यूलोकात बैलास पाठविले व निरोप दिला, एक वेळ जेवा व दोन वेळा आंघोळ करा असे सांग. पण बैलाने दोन वेळा जेवा व एक वेळ आंघोळ करा असे उलट सांगितले. उलट निरोप दिल्यामुळे ब्रह्मदेवाने बैलास सांगितले, 'आता तू माणसाकरिता कष्ट करीत रहा.'

आंघोळ शक्यतो सूर्योदयाच्या अगोदर झाली पाहिजे. एक म्हण आहे, 'लवकर झोपे लवकर उठे तया ज्ञान, संपत्ती, आरोग्य भेटे' आंघोळ करून सूर्यदर्शन घेतले तर तब्येत चांगली राहते.

**आदित्यस्य नमस्कारं ये कुर्वन्ति दिने दिने ।**
**जन्मांतरसहस्त्रेषु दारिद्र्यं नोपजायते ॥ सुभा.**

**अर्थ -** जे लोक दररोज सूर्याला नमस्कार करतात त्यांना हजारो जन्मात दारिद्र्य प्राप्त होत नाही.

स्नानाचे पाच प्रकार आहेत.

१) **ब्रह्मस्नान -** देवाच्या चिंतनात पहाटे आंघोळ करणे.

२) **देवस्नान -** देवनदीत सूर्योदयापूर्वी स्नान करणे.

३) **ऋषीस्नान -** आकाशात तारे असताना आंघोळ करणे. यामुळे बुद्धी तेज होते.

४) **मानवस्नान -** सूर्योदयापूर्वी आंघोळ करणे.

५) **दानवस्नान -** चहा, नाष्टा, वडापाव खाऊन सकाळी ९,१० वाजता आंघोळ करणे.

काहीजण तर आंघोळ न करता तोंड, हात-पाय धुऊन सुगंधी द्रव्ये (सेंट) अंगावर मारून घराबाहेर पडतात. पण स्नानाशिवाय पवित्रता नाही.

**दानेन पाणीः न तु कंकनेन स्नानेन शुद्धीः न तु चंदनेन ।**
**मानेन तृप्ती न तु भोजनेन ज्ञानेन मोक्षः न तु मुंडनेन ॥ सुभा.**

**अर्थ -** हाताची शोभा कंकणांनी नाही, दानाने होते. शरीराची शुद्धी चंदनाने नाही, स्नानाने होते. मानाने तृप्ती होते, भोजनाने नाही. ज्ञानाने मोक्ष मिळतो, मुंडण करून नाही.

तिर्थावळी प्रकरणात नामदेवराय यांनी स्नानाचे पाच प्रकार सांगितले आहेत.

१) **उत्तमाहुनि उत्तम सत्य वाक् स्नान । या परते पावन आणिक नाही ।**
**काया वाचा मनें हे दृढ धरिजे । हेळाचि तरिजे भवसागरु ॥**

२) **बाहेजु भितरी शुद्ध सर्वकाळ । हे दुजे निर्मळ शुद्ध स्नान ।**
**हे जया सदैव घडे भाग्य योगे । मग तया न लगे साधन कांही ॥**

३) **सकळ इंद्रियाचा करोनि निग्रहो । दंडावा विग्रहो वासनेचा ।**
**हे तिजे निर्मळ घडे जया स्नान । न लगे अनुष्ठान करणें त्यासी ॥**

४) **सर्वाभूति करुणा हेचि पै चवथे स्नान । साधितो सज्जन विरळा कोणी ।**
**त्याचेने दर्शने जळती पापराशी । तो सर्वा तिर्थासी तिर्थरूप ॥**

५) **पांचवे स्नान काया प्रक्षाळावी जळी । करणे ते आंघोळी लौकीकार्थ ॥**

थोडक्यात सत्यवचन, आत-बाहेर शुद्ध, सर्व इंद्रियांचा निग्रह, सर्वाभूती करुणा, काया प्रक्षाळणे असे हे स्नान प्रकार आहेत.

ज्ञानोबाराय म्हणतात, साबणापेक्षा माती आणि पाण्याने स्नान करावे. त्यांनी हे मत वेदाचा पुरावा देऊन सांगितले आहे ती ओवी -

**मृतिका आणि जळें । बाह्य येणें मेळें ।**
**निर्मळु होय बोलें । वेदाचेनि ॥ ज्ञाने. १३/४६४**

स्नान करताना म्हणावयाचा श्लोक -

**गंङ्गा सिंधु सरस्वती च यमुना गोदावरी नर्मदा ।**
**कावेरी सरयू महेन्द्र तनया चर्मण्वती वेदिका ॥**

**क्षिप्रा वेत्रवती महासुरनदी ख्याता जया गण्डकी ।**
**पूर्णाः पूणजलैः समुद्रसहिताः कुर्वन्तु वो मंगलम् ॥**

जर श्लोक उच्चारता आले नाहीत तर नामस्मरण करत स्नान करावे.

**नामे स्नान संध्या केले क्रियाकर्म । त्याचा भवश्रम निवारला ॥१॥**

**आणिक दुराविली करिता खटपट । वाउगा बोभाट वर्माविण ॥२॥**

**राम नाही जिहीं धरिला विश्वास । तिहीं भवपाश तोडीयेले ॥३॥**

**तुका म्हणे केले कळिकाळ ठेंगणें । नामसंकीर्तनें भाविकांनी ॥४॥**

**मलनिर्मोचनं पुंसां जलस्नानं दिने दिने ।**
**सकृद्गीताम्भसि स्नानं संसारमल नाशनम् ॥**

**अर्थ -** रोज शरीरावरचा मळ काढण्याकरिता जलाचे स्नान आहे. पण संसारमल नाशाकरिता (गीतेच्या अभ्यासाची कास धरली पाहिजे) गीतारूपी पाण्यात एकदा स्नान पुरे आहे.

★★★★★

# (८३) भ्रष्टाचार

या कलियुगात तिघांचे राज्य चालले आहे. हिंसाचार, व्यभिचार व भ्रष्टाचार. अर्थात यामागे आहेत अनुक्रमे क्रोध, काम व लोभ. हल्ली एकही क्षेत्र असे राहिले नाही, ज्या क्षेत्रात भ्रष्टाचार नाही. शिक्षण क्षेत्र, परमार्थ क्षेत्र पवित्र आहे. यात पण भ्रष्टाचाराने धुमाकूळ घातला आहे. पूर्वी पैसे न देता काम होत असे. मधला काळ असा गेला, पैसे देऊन काम होत असे पण हल्ली असे वातावरण निर्माण झाले आहे, पैसे देऊनही काम होत नाही. भ्रष्टाचार करणारी माणसे फारच लोभी बनली आहेत.

**कथा -** चीनमध्ये एक राजा होऊन गेला. तो प्रजेच्या सुखाकरिता निरनिराळ्या योजना राबवित असे. मात्र अधिकारी वर्ग स्वतःचा फायदा करून थोडीशी रक्कम प्रजेकरिता खर्च करीत असे व राजास खूश ठेवीत. एकदा एक शेतकरी राजाकडे आला. राजाने विचारपूस केली. शेतकऱ्याने सांगितले, 'प्रजा दुःखी आहे.' राजा म्हणाला, 'मी प्रजेच्या सुखाकरिता निरनिराळ्या योजना राबवितो. आपण दुःखी कसे ?' शेतकरी म्हणाला, 'आपल्या योजना प्रजेपर्यंत पोहचतच नाहीत.' राजा म्हणाला, 'अधिकारी वर्गाचा अहवाल आहे, प्रजा सुखात आहे.' शेतकऱ्याने राजास सभा भरविण्यास सांगितले. वीस अधिकारी बोलाविले. त्यांना पाच पाच फुटावर उभे केले. ५ किलो बर्फाचा खडा मागविला. शेतकऱ्याने सांगितले, '५ मिनिटे एका अधिकाऱ्याच्या हातात बर्फ द्या. नंतर दुसऱ्या अधिकाऱ्याकडे फेकण्यास सांगा. त्याच्याकडे ५ मिनिटे राहू द्या. तिसऱ्याकडे फेकण्यास सांगा.' राजाने तसे केले. एक ते दीड तासात जो बर्फाचा खडा ५ किलोचा होता तो शेवटच्या अधिकाऱ्याच्या हातात येईपर्यंत ५०० ग्रॅमचा राहिला. साडेचार किलो बर्फ वितळून गेला. शेतकऱ्याने सांगितले, 'आपल्या योजनेचा असा विनियोग होत आहे.' बहुतेक आपल्या राज्य सरकार व केंद्र सरकारची अशीच अवस्था आहे.

काही वेळा प्रसंगानुसार माणूस भ्रष्टाचारी बनतो.

**कथा -** एका राजाने आपल्या शहरातील मुले सुदृढ होण्याकरिता एक योजना राबविण्याचे ठरविले. राजाने विचार केला, मुले गुटगुटीत होण्याकरिता त्यांना सकस आहार दिला पाहिजे. सर्व जीवनसत्त्वे दुधात असतात. म्हणून राजाने १०० एकर जमीन ताब्यात घेतली. प्रत्येकी १० लिटर दूधदेणाऱ्या १०० म्हशी घेतल्या व या कामाकरिता एक गवळ्याचे कुटुंब ठेवले. गवळ्यास महिना ५०० रुपये पगार ठरला. प्रथम गवळी दररोज एका गाईंचे १० लिटरप्रमाणे १०० गाईंचे १००० लिटर दूध आणून देऊ लागला. राजा शहरातील मुलांना ते दूध नोकर ठेवून वाटू लागला. मुलांची तब्येत सुधारली. हा प्रयोग नंतर राज्यभर करण्याचे राजाने ठरविले. राजा मुलांना पाहून आनंदीत होत असे. दोन वर्षे गेली. थोडी महागाई वाढली. म्हणून गवळी म्हणाला, '५०० रुपये पगार माझ्या

कुटुंबास पुरत नाही. कृपया माझा पगार आपण वाढवून द्यावा.' राजा गवळ्यावर रागावला. आहे तो पगार जास्तच आहे असे म्हणाला. गवळी जास्त भांडू शकला नाही. कारण त्याची युनियन नव्हती. बिचारा एकटाच काम करीत होता. राजाने लक्ष न दिल्यामुळे त्याने १० लिटर दुधातून एक लिटर दूध बाजूस काढून त्यात एक लिटर पाणी मिसळू लागला. प्रथम ही गोष्ट कोणाच्याही लक्षात आली नाही. पण राजास संशय आला. पगार न वाढवतासुद्धा गवळी आनंदी दिसतो आहे. राजाने गवळ्यावर लक्ष ठेवण्याकरिता अधिकारी नेमला. गवळ्याची लबाडी अधिकाऱ्याच्या लक्षात आली. पण गवळी म्हणाला, 'जर आपण मला सामील होत असाल तर आपला पगार तसाच राहील व आपल्या घरी १०० लिटर दूध पोहचविले जाईल.' अधिकाऱ्याचा दुप्पट फायदा होत असल्यामुळे अधिकारी गप्प राहिला. अधिकारी नेमून दुधाचा प्रकार (क्वालिटी) सुधारण्याऐवजी बिघडू लागली. राजाने परत गवळी व अधिकाऱ्यावर सुपरवायझर नेमला. सुपरवायझरच्या घरात १०० लिटर दूध जाऊ लागले शिवाय राजाच्या सुविधा मिळतच होत्या. मुलांची तब्येत बिघडू लागली. दूध आणखी पातळ येऊ लागले म्हणून गवळी, अधिकारी, सुपरवायझर यांच्यावर एक इन्स्पेक्टर नेमला. इन्स्पेक्टरला हे तिघे म्हणाले, 'जर तुम्ही आमच्या कटात सामील झालात तर आपल्या मुलांना रोज बासुंदी मिळेल.' अर्थात इन्स्पेक्टरमुळे दुधाचा प्रकार सुधारण्याऐवजी बिघडला. कारण १० लिटरमागे ४ लिटर दूध बाजूस जाऊन त्यात ४ लिटर पाणी मिसळत होते. राजाने हा प्रकार प्रधानजीला सांगितला. प्रधानजी हुशार होता. जमिनीच्या, म्हशीच्या दुधाच्या प्रकारात राजाने प्रधानजीचा सल्ला घेतला नव्हता. पण शेवटी विचारावे लागले. प्रधानजी प्रामाणिक होता. राजाच्या हिताची कळकळ अंतःकरणात होती. तो राजास म्हणाला, 'त्या चौघांवर आणखी ६ माणसांची कमिटी नेमा. म्हणजे दुधाऐवजी शुद्ध पाणी मिळेल.' सर्व प्रकार राजाच्या लक्षात आला व त्याने गवळ्याच्या मागणीप्रमाणे पगार वाढविला. सर्व अधिकाऱ्यांना काढून टाकले. त्यांच्या सुविधा राज्यात जमा केल्या. पुन्हा गवळी आनंदी झाला. मुलांना चांगले दूध मिळून त्यांचे आरोग्य सुधारले. कधी कधी अविचारानेसुद्धा असा भ्रष्टाचार होतो.

★★★★★

## (८४) ताठा

ज्ञानोबाराय अहंकारास लाटण्याची उपमा देतात. लाटणे मोडेल पण वाकणार नाही तशी काही माणसे आहेत. काही क्षुल्लक व्यक्तींना मोठे पद दिले तर ते गर्वाने फुगतात. कसे फुगतात तर अजगराने जसे खांबाचे लाकूड गिळले तर ते त्याच्या पोटात तसेच राहते. त्याप्रमाणे काही व्यक्ती नेहमी ताठ राहतात. माऊलीच्या शब्दात -

**अंत्यजु राणिवे बैसविला । आरे धारणु गिळिला ।**

**तैसा गर्वे फुगला । देखसी जो ॥ ज्ञाने.१३/७२४**

**जो लाटणें ऐसा न लवे । पाथरू जेवीं न द्रवे ।**
**गुणीयासी नागवे । फोंडसे जैसें ॥ ज्ञाने.१३/७२५**

विशेषतः तरूणपणी ताठा जास्त राहतो. ज्यास गधे पंचविशी म्हणतात. मानवी जीवनात ज्याने १६ ते २५ वर्षे सांभाळली, विषयांच्या, विकारांच्या आहारी गेला नाही, संतसमागमात राहिला, तो म्हातारपणी सुखी राहतो. पण गर्व जवानीत सतावतो. तुकोबाराय तरूणपणाचे वर्णन करतात -

**तारुण्याच्या मदे न मानी कोणासी । सदा मुसमुसी धुळी जैसा ॥१॥**

**अठोनि वेठोनि बांधला मुंडासा । फिरतसे म्हैसा जनामधीं ॥२॥**

**हाती दीड पान वरती करी मान । नाहीं तो सन्मान भलियांसी ॥३॥**

**श्वानाचिया परी हिंडे दारोदारी । पाहे परनारी पापदृष्टी ॥४॥**

**तुका म्हणे ऐसी थोर हानी झाली । करिता टवाळी जन्म गेला ॥५॥**

**ताठोनिया मान राहिली वरती । अहंकारा हाती लवो नेदी ॥ तु.म.**

सगळ्या ताठ्यात ज्ञानाचा ताठा लवकर नरकास नेतो.

**दृष्टांत -** भोज राजाच्या पदरी माघ नावाचे कवी होते. पण त्यांना आपल्या कवित्वाबद्दल फार अभिमान होता. एकदा भोज राजा व माघ कवी जंगलामध्ये फिरण्यास गेले होते. अचानक ते वाट चुकले. त्यांना एक झोपडी दिसली. झोपडीसमोर एक म्हातारी चरख्यावर सूत काढत होती. माघ कवींनी ऐटीत विचारले, 'म्हातारे हा समोरचा रस्ता कुठे जातो ?' दोघांकडे न पाहताच म्हातारी म्हणाली, 'महाशय हा रस्ता कुठेच जात नाही. यावरून माणसे, पशू ये-जा करतात.' माघ चपापले. म्हातारीने विचारले, 'आपण दोघे कोण आहात ?' आम्ही दोघे यात्रेकरू आहोत असे ते म्हणाले. म्हातारी म्हणाली, 'जगात चंद्र-सूर्य हे दोघेच यात्रेकरू आहेत.' 'काहे चंदा सुरज खावे फेरा । खिन एक बैठ न पावत घेरा ॥' तु.म. असे संत सांगतात. आपण कोण दुसरेच आहात. माघ स्वतःस सावरत म्हणाले, 'आम्ही क्षणभंगूर जीव आहोत.' म्हातारी म्हणाली, 'क्षणभंगूर दोनच आहेत. 'अस्थिरं जीवित लोकं । अस्थिरं धन यौवनम् ॥' सुभा. धन, यौवन या दोन गोष्टी अस्थिर आहेत. आपण कोण आहात ?' थोडा अभिमान जागृत झाला व माघ म्हणाले, 'आम्ही दोघे राजे आहोत. म्हातारी म्हणाली, 'राजे शास्त्रात दोनच सांगितले आहेत. देवराज इंद्र व यमराज. आपण दुसरेच दिसता.' थोडा ताठा कमी झाला व माघ म्हणाले, 'आम्ही क्षमा करणारे आत्मे आहोत.' म्हातारी म्हणाली, 'जगात क्षमा करणाऱ्या दोनच आहेत. पृथ्वी व आई. पृथ्वी सर्वांना क्षमा करते, आइ मुलाच्या दोषांकडे पाहत नाही असे शास्त्रात वर्णन आहे.' माघ कवी आता त्या म्हातारीस म्हणाले 'आई आम्ही दोघे आपल्या ज्ञानासमोर हरलो. म्हातारी तशी सोडणार नव्हती. ती म्हणाली, 'जगात

दोघेच हरतात. जे कर्जबाजारी आहेत व चारित्र्यहीन आहेत.' आता माघ बोलण्याचे बंद झाले. म्हातारी म्हणाली, ' मी आपणास ओळखते. माघ-कवी, ज्ञानाचा अभिमान बरोबर नाही. हा नरकास नेतो. 'तुका म्हणे नरकी घाली अभिमान । जरी होय ज्ञान गर्व ताठा ॥' ज्ञान विनयामुळे शोभते.

**शीलेन शोभते रूपं क्षमया शोभते बलं । विनयेन यथा ज्ञानं दानेन शोभते धनं ॥**

**अर्थ -** रूपाची शोभा शीलामुळे, बळाची शोभा क्षमेमुळे, ज्ञानाची शोभा विनयाने व धनाची शोभा दानामुळे आहे.

**दृष्टांत -** एकदा महात्मा कबिरांकडे एक रोगी आला. कबिराने कमालास सांगितले, यास बरा कर. कमालाने त्यास गंगेच्या काठी नेले. गंगेत बुडी मारून राम म्हणण्यास सांगितले. त्याने बुडी मारली, राम म्हटले तरी रोगनिवृत्ती झाली नाही. कमाल म्हणाले, 'अरे विश्वासाने राम म्हण व बुडी मार.' पण त्या रोग्याचा गंगेवर व रामनामावर विश्वास नव्हता. कमालास राग आला व हातातील दांडके त्याच्या डोक्यात मारले. तो रोगी कळवळला व अंतःकरणपूर्वक राम म्हणून गंगेत बुडी मारली. वर आल्यावर रोगमुक्त झाला. कमालांच्या पाया पडून घरी गेला. पण कमालास गर्व झाला व बाबांना म्हणाला, 'बाबा, दांडके मारून रोग कोणी बरे करू शकतो का ?' कबिराने ओळखले आपल्या बाब्यास 'ग'ची बाधा झाली आहे. अधिकाराचा अभिमान झाला आहे. हा परमार्थास घातक असल्यामुळे कबीर कमालास म्हणाले, 'आपण संतांची संगत करावी. जवळच तुलसीदास राहतात, त्यांना भेटून ये.' कमाल तुलसीदासांना भेटण्यास गेले. तुलसीदासांकडे शेकडो रोग्यांची रांग लागली होती. तुलसीदास एका भांड्यात पाणी घेऊन त्यात तुळशीचे रोप बुडवत होते. ते तुळशीचे पाणी रोग्यावर शिंपडत होते. तुळशीचे पाणी शिंपडल्याबरोबर रोगी रोगमुक्त होत होता. कमालास कमाल वाटली. आपण एका रोग्यास दांडके मारून बरे केले पण हा महात्मा तुळशीचे पाणी शिंपडून शेकडो रोगी बरे करतो आहे. अभिमान कमी झाला. रोगी संपल्यानंतर तुलसीदासांनी कमालांचा पाहुणचार केला. म्हणाले, 'आलाच आहात तर गंगेच्या काठी सुरदास महात्मा राहतात त्यांना भेटून जा.' कमाल गंगेच्या काठी गेले. एका झोपडीत सुरदास राहत होते. सुरदास म्हणाले 'बाळ गंगेतून एक प्रेत वाहते आहे, ते घेऊन येशील का ?' कमाल ताबडतोब गेले. त्यास आश्चर्य वाटले, गंगेतून वाहणारे प्रेत सुरदास आंधळे असून त्यांना कसे दिसले ? प्रेत झोपडीजवळ आणले सुरदास प्रेताजवळ आले. प्रेताच्या कानात मंत्र म्हटल्याबरोबर प्रेत उठले व पळून गेले. कमाल म्हणाले, 'या महात्म्याची कमालच झाली. मी एक रोगी बरा केला, तुलसीदासांनी शेकडो रोगी बरे केले. यांनी मेलेला माणूस जीवंत केला.' सुरदासांना साष्टांग नमस्कार करून कमाल माघारी फिरले. शहाण्या माणसाच्या चूक लगेचच लक्षात येते. घरी येऊन म्हणाले, 'बाबा मला अधिकाराचा अभिमान झाला होता, हे घरी का सांगितले नाही ?' कबीर म्हणाले, 'बाळ कान सोनाराने टोचावे लागतात. घरी टोचले तर दुखतात.' कमाल विनयाने राहू लागले.

तात्पर्य - नम्र झाला भूता । तेणे कोंडिले अनंता ॥ तु.म.

**कथा :** लाहोरमध्ये दुलीचन्द नावाचे एक शेठ राहत होते. त्यांना आपल्या संपत्तीचा फार मोठा अहंकार होता. मी वीस करोडचा मालक आहे हे दाखविण्याकरिता त्यांनी आपल्या घरासमोर वीस पताका लावल्या होत्या. एकदा गुरू नानक लाहोरमध्ये आले होते. दुलीचन्दांना ही बातमी समजली व ते नानकांना भेटण्याकरिता आले व त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवले. गुरू नानकांना भेट म्हणून सुवर्णमुद्रांची एक थैली दिली व विचारले मी आपली काय सेवा करू ? गुरू नानकांनी जाणले, यांना धनाचा फार मोठा अहंकार आहे. नानकांनी त्या शेठना एक सुई दिली व म्हणाले, 'आपण मला ही पुढच्या जन्मी परत द्यावी.' दुलीचन्द महात्म्याचा प्रसाद म्हणून सुई घेऊन घरी गेले व देव्हाऱ्यावर ठेवली. रात्री झोपताना त्यांच्या डोक्यात विचार आला, नानकांनी दिलेली सुई आपण पुढच्या जन्मी कशी काय परत करणार ? दुसऱ्या दिवशी सकाळीच दुलीचन्द नानकांना भेटण्यास गेले व म्हणाले, 'महाराज, पुढच्या जन्मी ही सुई मी कशी काय परत करणार ! कारण माणूस मरताना रिकाम्या हातांनी जातो.' गुरुदेव नानक म्हणाले, 'मरताना जर तू साधी सुई घेऊन जाऊ शकत नाहीस तर सर्व संपत्ती कशी काय घेऊन जाणार ?' दुलीचन्दांचे डोळे उघडले व त्यांनी सर्व संपत्ती गरिबांना व गरजूंना वाटली व ते नानकांचे परमशिष्य बनले.

★★★★★

## (८५) नम्रता

सर्व गुणांचे लीनता (विनय) हे भूषण आहे.

**नभो भूषापूषा कमलवनभूषा मधुकरो ।**
**वचो भूषा सत्यं वरविभवभूषा वितरणम् ।**
**मनो भूषा मैत्री विमलकुलभूषा सुचरितं ।**
**सदा भूषा सूक्तिः सकल गुणभूषाच विनयः ॥ सुभा.**

**अर्थ -** आकाशाचे भूषण सूर्य, कमलवनाचे भूषण भ्रमर, वाचेचे भूषण सत्य, श्रीमंतीचे भूषण दान, मनाचे भूषण सर्वांशी मैत्री, चांगल्या कुळाचे भूषण चांगले चरित्र, चांगले बोलणे वाणीचे भूषण, मात्र 'विनय' सर्व गुणांचे भूषण आहे. विनयशील माणूस जगाच्या पाठीवर कुठेही राहतो. जीवाने माणसांशी नम्र असावे. जीवाने देवाशी नम्र असावे. 'तो हा न करी जे काही । कां रे लीन व्हा ना पायी ॥' तु.म. पण विशेषतः साधूशी जास्त नम्र असावे. 'चंचल चित्तासी ठेवुनिया ठायी । संताचिया पायी लीन व्हावे ॥' तु.म.

**दृष्टांत** - एकदा गंगेमध्ये स्नान करण्याकरिता एक नगरशेठ आले होते. तेव्हाच एक अधिकारी महात्मा गंगेमध्ये स्नान करीत होते. नगरशेठना ओळखत असल्यामुळे लांबून म्हणाले, 'नगरशेठ राम राम.' पण नगरशेठनी ऐकून न ऐकल्यासारखे केले. श्रीमंत माणसांना मागणाऱ्यांची भीती वाटते. मुलांचीसुद्धा भीती वाटते. किंबहुना आता गुंडांची भीती वाटायला लागली आहे. महात्मा सरळ स्वभावाचा असल्यामुळे विचार केला, शेठना ऐकू गेले नसावे. म्हणून जवळ जाऊन नमस्कार केला. पण शेठनी दुर्लक्ष केले. अगदी जवळ येऊन रामराम केला पण शेठजी भडकले व म्हणाले, 'बाजूला हो.' महात्म्यास काही मागायचे नव्हते. फक्त परत रामराम म्हणण्याची अपेक्षा होती. नगरशेठनी धिक्कारल्याबरोबर महात्मा विचार करू लागला याला धडा शिकविला पाहिजे. महात्मा नगरशेठच्या अगोदर सिद्धीच्या द्वारे त्याचे रूप घेऊन त्याच्या घरी गेला. नोकरास सांगितले, 'एक बहुरूपी माझा वेश घेऊन येईल. त्यास बंगल्यात घेऊ नकोस.' मुलांना, शेठच्या बायकोस हीच गोष्ट सांगितली. आपण देवघरात जाऊन बसले. नगरशेठ स्नान करून हातात तांब्या व धोतराचा पिळा खांद्यावर टाकून बंगल्यात प्रवेश करू लागले. वॉचमन म्हणाले, 'वो' कुठे निघालात ? शेठ म्हणाला, तू माझा नोकर, मला विचारतो कुठे निघालात. शरम वाटते का ? नोकर म्हणाला, 'पुढे पाऊल टाकले तर तंगडी मोडून टाकीन. मी तुम्हास चांगला ओळखतो.' नोकराने घरात घेतले नाही म्हणून मुलांना म्हणाला, 'राम - शाम, अरे आपला नोकर मला घरात घेत नाही.' मुले म्हणाली, 'चालते व्हा ! आम्हाला फसवू नका.' शेवटी बायकोस म्हणाला, 'तू तरी मला घरात घेशील की नाही ?' बायको म्हणाली, 'तोंड काळे करा. माझे पती देवपूजा करीत आहेत.' बायको, मुले, नोकर या कुणीही घरात घेतले नाही म्हणून नगरशेठ राजाकडे गेले. राजा यांना ओळखत होता. पण शेठ वेगळ्या अवस्थेत होते. शेठ म्हणाले, 'माझ्या घरात माझा वेश, रूप घेऊन कोण बसला आहे. माझ्याच घरात माझा नोकर, मुले, बायकोसुद्धा घरात घेत नाही. मला न्याय द्या.' राजा चक्रावून गेला. त्याने काय करावे म्हणून प्रधानजीला विचारले. प्रधानजीने नोकराला पाठवून जो कोणी नगरशेठच्या घरात बसला आहे, त्यास बोलाविणे पाठविले. महात्मा राजाने बोलाविणे पाठविले म्हणून रथातून निघाला. अर्थात चांगले कपडे करून, नोकर बरोबर घेऊन, महात्मा नगरशेठच्या वेशात राजवाड्यात आला. राजा, प्रधानजीस मोठे आश्चर्य वाटले. दोघे दिसण्यात सारखे आहेत. यात खरा कोण व खोटा कोण शेठ आहे - 'दोन्ही दिसती सारखी । वर्म जाणे तो पारखी ॥' तु.म. प्रधानजींनी एक तोडगा काढला. राजाला कानात सांगितले, 'घरातून हिशोबाची एक वही मागवू. घरचा हिशोब जो खरा शेठ आहे त्यास बरोबर माहीत असणार. दुसऱ्याचे पितळ आपोआप उघडे पडेल.' राजास हे पटले व नगरशेठच्या घरी एका नोकरास पाठवून घरचा हिशोब लिहिलेली वही मागविली. वही राजवाड्यात आणल्याबरोबर महात्मा सर्वज्ञ असल्यामुळे सांगू लागला. 'नोकरांचा खर्च वीस हजार, बागेचा खर्च दहा हजार, नवीन जमीन खरेदी पन्नास हजार' सर्व उत्तरे ऐकून खरा नगरशेठ म्हणाला, 'माझ्या घरची माहिती माझ्यापेक्षा यास जास्त पाठ दिसते.' राजाने जो खरा शेठ होता त्यास डुप्लिकेट म्हणून हाकलून दिले

व महात्म्यास सन्मानाने घरी पाठविले. आपणास त्रास दिल्याबद्दल क्षमा असावी असा राजाने महात्म्यासमोर विनय प्रगट केला. राजाने आपणास न्याय दिला नाही, घरात कोणी घेत नाही म्हणून नगरशेठने गंगेत जीव द्यायचे ठरविले. एक रात्र झाडाखाली कुडकुडत राहिला व सकाळी जीव देण्याकरिता सहा वाजता गंगेवर आला. महात्म्याने ओळखले, याची मस्ती जिरली आहे. महात्मा बरोबर सहा वाजता गंगेवर आला व जीव देणाऱ्या शेठजींना म्हणाला, 'राम राम शेठजी !' शेठजींनी आवाज ओळखला. हे सर्व प्रकरण यांचेच आहे असे समजून महात्म्यास साष्टांग दंडवत घातला. महात्मा म्हणाला, 'शेठजी माझी आपल्याकडून काहीच अपेक्षा नव्हती. फक्त रामराम करावा इतकीच इच्छा होती. परंतु आपल्याला श्रीमंतीचा गर्व झाला होता तो मी नाहीसा केला. मला क्षमा करा.' नगरशेठ म्हणाले, 'येथून पुढे मी साधूंचा अपमान करणार नाही. तर त्यांची सेवा करीन व माझा उद्धार करून घेईन.

**कथा -** सीतेच्या शोधाकरिता हनुमान लंकेत गेले. सीतेचा शोध घेण्याकरिता गुप्त रूपात लंकेत फिरू लागले. फिरता फिरता लंकेत त्यांना तुळशी वृंदावन दिसले. हनुमानास आश्चर्य वाटले. घरात प्रवेश केला. एकजण 'श्रीराम जयराम जयजयराम' मंत्राचा जप करीत होता. हनुमान प्रगट झाले व विचारले, 'आपण रामाचे भजन करणारे कोण आहात ?' जप करणारे म्हणाले, 'मी बिभिषण आहे. रामाचा भक्त आहे.' हनुमान म्हणाले, 'रावणाच्या राज्यात आपण रामाचे भजन कसे करता ?' बिभिषण म्हणाले ,'३२ दातात जशी जीभ राहते तसा राहतो आहे. दात नेहमी दादागिरी करतात. पण जीभ दातास मदत करते. दात हे अहंकाराचे प्रतीक आहे व जीभ नम्रतेचे प्रतीक आहे. 'दंत कहे जीभ को हम बत्तीस तू एकली वो माय ।' पण जीभ म्हणते मी एकटी असले तरी तुम्हास भारी आहे. 'फिर एक बार तेढी चलू तो बत्तिसही गिर जाय ॥' दात उशिरा येतात व लवकर जातात. जीभ जन्माबरोबर येते व मरेपर्यंत साथ करते. देवाने आईच्या उदरात सर्व अवयव तयार केले पण दात मात्र बाहेर आल्यानंतर निर्माण केले. याचे कारण असावे ? देवाने विचार केला जीवास आत दात निर्माण केले तर हा आईच्या उदरात आईची आतडी कुरतडल्याशिवाय राहणार नाही. बाहेर आल्यानंतर पाहिजे ते कुरतडत राहू दे. म्हणूनजन्मानंतर दाताची निर्मिती होते. हनुमंत म्हणाले, 'आम्ही अहंकाररूपी दात (राक्षस) पाडणार आहोत व जिभेचे राज्य आणणार आहोत.' त्याप्रमाणे सर्व राक्षसांना मारले व लंकाराज्य बिभिषणास दिले.



# (८६) द्वेष

ज्ञानोबाराय द्वेषाची व्याख्या करतात -

**आणि इच्छिलिया सांगडें । इंद्रियां आमिष न जोडे ।**
**ऐसा जो डावो पडे । तोचि द्वेषु ॥ ज्ञाने.१३/१२६**

**अर्थ -** आणि इच्छा केल्याप्रमाणे इंद्रियांना इच्छित विषय प्राप्त न होणे अशी स्थिती घडून आली असता तेथे उत्पन्न होणारी ही वृत्ती तिला द्वेष असे म्हणतात. सहाय्यक ओवी -

**आणि पसरिला अभिलाषु । अपूर्णु होय तोचि द्वेषु ।**
**एवं कामक्रोधाहुनि अधिकु । पुरुषार्थु नाहीं ॥ ज्ञाने.१६/३३९**

आठ जण एकमेकांवर जळतात (द्वेष करतात))

**ब्राह्मणो गणको वेश्या सारमेयश्च कुक्कटः ।**
**तुष्टेष्वन्येषु कुप्यन्ति नटो मंत्री च याचकः ॥ सुभा.**

**अर्थ -** १) ब्राह्मण (भटजी) २) ज्योतिषी ३) वेश्या ४) कुत्रे ५) कोंबडे ६) नट ७) मंत्री ८) भिकारी हे आठजण एकमेकांवर जळफळतात.

मराठीत म्हणतात दोन कुत्री, दोन शास्त्री व दोन मेस्त्री यांचे पटत नाही. दोन बुवा, दोन जावा, दोन आवा यांचेपण जमत नाही. माऊलींनी तिघांचे अनादि वैर सांगितले आहे.

**पतंगा नावडे ज्योती । खद्योता भानूची खंती ।**
**कां टिटिभेनें अपांपती । वैरी केला ॥ ज्ञाने.१६/२३४**

**अर्थ -** दिव्यावर झडप घालणारा पतंग यास दिवा आवडत नाही. काजव्यास सूर्य आवडत नाही व टिटवीने समुद्रास वैरी मानले आहे.

आणखी दोघांचे पटत नाही असे माऊली सांगतात -

**शीतजळाचिये भेटी । तातला तेलीं आगी उठी ।**
**चंद्रु देखोनि जळे पोटीं । कोल्हा जैसा ॥ ज्ञाने.१६/२३८**

**अर्थ -** तापलेल्या तेलाची व थंड पाण्याची भेट झाली असता त्या तापलेल्या तेलात जसा जाळ उत्पन्न होतो त्याप्रमाणे चंद्राला पाहून कोल्हा मनात जळत असतो.

दोन स्त्रियांचेसुद्धा जास्त पटत नाही. सवतीमत्सर प्रसिद्ध आहे.

**कथा -** शुक्राचार्य कन्या देवयानी व वृषपर्वा राजाची मुलगी शर्मिष्ठा या दोघी मैत्रिणी असतात.

एकदा जंगलात स्नानाला गेल्या असता कपडे तळ्याकाठी काढले होते. पुरुषाची चाहूल लागताच दोघी लगबगीने पाण्याच्या बाहेर आल्या व पटकन कपडे परिधान केले. थोड्याच वेळात लक्षात आले, कपड्यांची अदलाबदल झाली आहे. देवयानी म्हणाली, 'मी गुरुकन्या आहे. माझे कपडे वापरण्यास तुला लाज कशी वाटली नाही ?' शर्मिष्ठा म्हणाली, 'माझ्या बापाच्या अन्नावर तुम्ही जगता व माझा द्वेष करतेस ?' दोघींचे भांडण झाले. शर्मिष्ठा राजकन्या असल्यामुळे तिने देवयानीस एका पडक्या विहिरीत ढकलून दिले व राजवाड्यात पोहोचली. देवयानी विहिरीतून ओरडू लागली. बाहेर निघता येईना. ययाती नावाचा राजा शिकारीस आला होता. त्याने हात देऊन देवयानीस बाहेर काढले. देवयानी म्हणाली, 'प्रथमच मी पुरुषाचा हात धरत आहे. मी ब्राह्मण आहे, आपण क्षत्रीय आहात. पण मी आपल्याशीच लग्न करणार.' ययातीस घेऊन देवयानी शुक्राचार्यांकडे आली व म्हणाली, 'बाबा आपण वृषपर्वा राजाचे राज्य सोडून निघून जाऊया. मी यांच्यामुळे (ययाती) वाचले.' जेव्हा शुक्राचार्यांनी वळकटी गुंडाळली, तेव्हा ही बातमी वृषपर्वा राजाकडे गेली. राजा लोटांगण घालीत शुक्राचार्यांकडे आला. शुक्राचार्यांच्याजवळ संजीवन मंत्र होता. त्यामुळे राक्षसांचा नेहमी विजय होत असे. जर शुक्राचार्य गेले तर राज्य जाईल असा विचार करून राजा वृषपर्वा म्हणाला, 'गुरुवर्य काय चूक झाली ? आपण आम्हास सोडून का जाता ?' शुक्राचार्य म्हणाले, 'माझी एकुलती एक मुलगी, तिला ठार मारण्याचा प्रयत्न आपल्या मुलींने केला. कशाला राज्यात राहायचे ?' वृषपर्वा म्हणाला, 'माझ्या मुलीस आपण सांगाल ती शिक्षा करतो, पण आपण राज्य सोडून जाऊ नका.' देवयानी म्हणाली, 'माझे ययातीशी लग्न होणार आहे. तुमची मुलगी दासी म्हणून जर आली तर आम्ही राज्य सोडणार नाही.' राज्याच्या हिताकरीता वृषपर्वा राजाने शिक्षा कबूल केली. ययातीचे लग्न झाले व शर्मिष्ठा दासी म्हणून गेली. पुढे ययातीचे व शर्मिष्ठेचे सूत जमले. ययातीपासून तिलाही मुले झाली. देवयानिच्या फार उशिरा लक्षात आले. पुन्हा वडिलांकडे गेली. शुक्राचार्यांनी 'म्हातारा होशील' असा ययातीस शाप दिला. ययाती म्हणाला, 'आपण जावयास शाप दिला आहे.' परत उःशाप दिला, जर आपला एखादा मुलगा आपणास तारुण्य देत असेल तर तो म्हातारा होईल व आपण तरुण व्हाल.' प्रथम यदूस म्हणजे देवयानीच्या मोठ्या मुलाकडे तारुण्य मागितले. त्याने बापास फटकारले व म्हणाला, 'अशा लंपट बापास मी तारुण्य देणार नाही.' मात्र शर्मिष्ठेच्या पुरू नावाच्या मुलाने ययातीस तारुण्य दिले व आपण म्हातारपण घेतले. मात्र ययातीने पुरूस गादी दिली व यदूस शाप दिला तुमच्या वंशात राजा होणार नाही. हे सर्व 'महाभारत' घडले . कपडे बदलल्यामुळे नाही तर द्वेषामुळे. ज्ञानोबाराय म्हणतात राजाच्या मर्जीतील दासी मालकीण (राजमाता) झाली.

**पैं जीवाचे कसीं उतरली । ते दासी कीं गोसांवीण जाली ।**
**सिसे वेंचीं तया मविली । वही जेवीं ॥ ज्ञाने. १८/९१२**

मत्सर हा लाभाशिवाय माणसास दुःख देतो. 'मत्सराचा ठाव शरीरी नसावा । लाभेविण जीवा दुःख देतो ॥' तु.म. परमार्थ करणाऱ्या माणसाने कोणाचा द्वेष करता कामा नये. 'कोणाही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचें ॥' तु.म. भक्तांच्या अंतःकरणात मात्र द्वेष अजिबात नसतो. गीतेतील बाराव्या अध्यायात भक्ताष्टकांमध्ये भक्तांच्या ३९ लक्षणांत अद्वेष्टा हे पहिले लक्षण आहे.

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहङ्कार समदुःखसुखः क्षमी । गीता १२/१३**

**जो सर्व भूतांच्यां ठायीं । द्वेषातें नेणेंचि कहीं ।**
**आपपरु नाहीं । चैतन्या जैसा ॥ ज्ञाने.१२/१४४**

भक्ताष्टकामध्ये 'अद्वेष्टा' हा शब्द पुन्हा आला आहे.

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ गीता १२/१७**

मात्र माऊलीने या पदावर वेगळे भाष्य केले आहे.

**आपणाचि विश्व जाहला । तरि भेदभावो सहजचि गेला ।**
**म्हणोनि द्वेष ठेला । जया पुरुषा ॥ ज्ञाने. १२/१९१**

जो स्वतःच विश्व जाहला तो कोणाचा कसा द्वेष करणार ? 'जीभ दातांनी चाविली । कोणी बत्तीशी ताडिली ॥' मुक्ताबाई. एकमेकांचा द्वेष केला तर तो वाढत जातो. तो वेळीच संपविला पाहिजे.

**कथा -** एकदा श्रीकृष्ण, बळिराम दादा व सात्यकी हस्तिनापूराहून द्वारकेस जात होते. वाटेत जंगल लागले. सकाळी जायचे ठरले. शिदोरी खाल्ली. प्रत्येकाने तीन तास जागायचे ठरले. दोघांनी झोपायचे व एकाने पहारा द्यायचा. सात्यकी म्हणाला, 'मी लहान आहे. प्रथम मी ९ ते १२ जागतो.' श्रीकृष्ण व बळिराम झोपले. जंगलातील एक राक्षस आला व सात्यकीस म्हणाला, 'माझ्याशी मैत्री कर. या दोघांना मी खाऊन टाकतो.' पण सात्यकी म्हणाला, 'मी यांचे संरक्षण करीत आहे.' दोघांचे एका बाजूस युद्ध सुरू झाले. पण राक्षसाचा असा गुण होता तो मारल्यानंतर मोठा होत होता. सात्यकीने बराच मार खाल्ला. तीन तास संपले. हा राक्षस आपणास आटोपत नाही समजून सात्यकीने दादास उठविले व तो स्वतः झोपला. दादा नांगर घेऊन फिरू लागले. थोड्याच वेळात राक्षस आला व म्हणाला, 'एकाने माझा मार खाल्ला आहे. माझ्या मारातून आपणास वाचायचे असेल तर माझ्याशी दोस्ती करा.' बळिराम दादा भडकले. युद्ध सुरू झाले. पण राक्षसाचा गुण दादांना माहीत नव्हता. राक्षस मोठा होत होता. दादा मार खात होते. बळिराम दादाने भरपूर मार खाल्ला. तीन तास संपले. दादा कण्हत पडले व तीन वाजता श्रीकृष्णास उठविले. कृष्णांनी शेकोटी पेटविली. शेकत बसले. पण राक्षस आला व म्हणाला, 'माझा दोघांनी मार खाल्ला आहे. आपणास

वाचायचे असेल तर आपण माझ्याशी मैत्री करावी. या दोघांना मी खाऊन टाकतो.' परमात्मा म्हणाले, 'थंड हवा सुटली आहे. गप्पा मारू.' राक्षसाने ओळखले हे गप्पात मला रमवत आहेत. श्रीकृष्णास एक ठोसा मारला. देवाने तो ठोसा सहन केला. विनोदाने म्हटले, 'आपण पहिलवान दिसता.' दुसरा ठोसा मारला, तो चुकविला. श्रीकृष्ण म्हणाले, 'आपण कोल्हापूरी पहिलवान दिसता.' तिसरा ठोसा मारला. सहन करून म्हणाले, 'आपला वस्ताद तरबेज दिसतो. आपणास चांगले शिकविले आहे.' चौथा ठोसा मारला. देव म्हणाले, 'आपण बदाम पिस्ता खाता असे वाटते ? अंगात बरीच ताकद आहे.' देवाने सर्व सहन केले पण राक्षस स्तुती केल्यानंतर बारीक बारीक होत गेला. सकाळी सहाच्या दरम्यान राक्षस चेंडूएवढा झाला. श्रीकृष्णाने त्यास उपरणात बांधून ठेवला. सकाळी दोघेजण उठले पण परमात्म्याचा चेहरा प्रफुल्लीत होता. सात्यकी व दादांनी मार खाल्ला होता. कण्हत उठले व देवास म्हणाले, 'आम्हाला भेटलेला राक्षस आपणास भेटला नाही कां ?' श्रीकृष्ण म्हणाले, 'भेटला.' 'कुठे आहे विचारले ?' 'हे पहा उपरणात बांधून ठेवला आहे.' दोघांना आश्चर्य वाटले. आम्ही मार खाल्ला. आपण बांधून कसा ठेवला. श्रीकृष्ण म्हणाले, 'या राक्षसांचे वर्म तुम्हास माहीत नव्हते म्हणून मार खाल्ला. याला मारल्यानंतर हा मोठा होतो व स्तुती केल्यानंतर हा लहान होतो. द्वेष नावाचा राक्षस असाच आहे. भांडत राहिलो तर भांडण वाढत जाते. पैसा, वेळ याचा अपव्यय होतो. पण मैत्री केली तर हा द्वेष राक्षस कमी कमी होऊन नाहिसा होतो.

अनादि वैराकार -

**मृगमीनसज्जनानां तृणजलसंतोषविहित वृत्तीनाम् ।**
**लुब्धक धीवर पिशुना निष्कारिण वैरिणो जगति ।। सुभा.**

**अर्थ -** हरिण, मासा, सज्जन हे अनुक्रमे गवत, पाणी व समाधानात राहतात. पण पारधी, कोळी व दुष्ट हे यांच्याशी निष्कारण वैर करतात. याच आशयाचा तुकोबांचा अभंग आहे.

**काय केले जळचरीं । ढीवर त्यांच्या घातावरी ।।१।।**

**हा तों ठायींचा विचार । आहे याति वैराकार ।।२।।**

**श्वापदातें वधी । निरपराधें पारधी ।।३।।**

**तुका म्हणे खळ । संता पीडिति चांडाळ ।।४।।**

मत्सर -

**आकर्ण्याम्रफलं स्तुतिं जलमभूतन्नारिकेलान्तरं ।**
**प्राय: कण्टकितं तथैवशै पासं जातं द्विधोर्वारूकम् ।**
**आस्तेऽर्धामुखमेव कादलमगाद् द्राक्षाफलं क्षुद्रतां ।**
**शामत्वं बत जाम्बवं गतमहो मात्सर्य दोषादि: ।।**

**अर्थ -** आंब्याची कोणी तरी एकदा स्तुती केली. आत्मस्तुतीने आंबा सुखावला. पण ही परस्तुती ऐकून नारळाच्या काळजाचे मात्र पाणीपाणी झाले. फणसाच्या अंगावर काटे उभे राहिले. टरबूज तटकन फुटले. केळीच्या झाडाने मान खाली घातली. द्राक्षे (शहारून) आकुंचित झाली. आणि सर्वात कहर म्हणजे 'मत्सर' अग्निने जांभळे काळी पडली.

**कथा -** एकदा भोज राजा दोन ब्राह्मणांना जेवणाचे आमंत्रण देतो पण उतरण्याची व्यवस्था वेगवेगळी करतो. राजा वरिष्ठ ब्राह्मणाकडे जातो व विचारतो, 'आपल्या दोघापैकी विद्वान कोण आहे ?' पहिला म्हणतो, 'तो दुसरा गाढव आहे.' दुसऱ्यास विचारतो, 'तो म्हणतो तो बैल आहे.' भोज राजास यांची पात्रता समजते. राजा दोघांना ताटात जेवण वाढून आणतो. अन्नाचे ताट रुमालाने झाकलेले असते. स्तोत्रे होतात. रुमाल काढले जातात. एका ताटात पेंड असते व दुसऱ्या ताटात गवत असते. राजास ब्राह्मण विचारतात, 'हा काय प्रकार आहे ?' राजा म्हणातो, 'हे बैलाचे व हे गाढवाचे अन्न आहे.'



## (८७) आयुष्य

मनुष्याच्या आयुष्यास अतिशय महत्त्व आहे. हे अमूल्य आहे. गेलेला दिवस अथवा आयुष्य प्रत्यक्ष ब्रह्मदेवास शरण गेलो तरी परत मिळत नाही.

**परि धातयाही पायां पडतां । नुठे गतायु पंडुसुता ।**
**तैसा नुपजे उपजवितां । क्रोधोर्मी गा।। ज्ञाने. १६/१२९**

**कथा -** एक श्रीमंत आजारी पडला. डॉक्टरांनी सांगितले, 'आपले आयुष्य संपत आले आहे. आपली सर्व संपत्ती आपल्या वारसाच्या नावावर करा.' श्रीमंताची संपत्ती ५० लाखाची होती. दुर्दैवाने त्याची पत्नी अगोदर वारली होती. मुले नव्हती. त्याने पुतण्यास बोलविले व सांगितले, 'माझी संपत्ती तुझ्या नावावर करतो आहे. माझे आयुष्य संपत आले आहे. जर नावावर केली नाही तर सरकार जमा होईल.' पुतण्या खूष झाला. लगबगीने वकीलांकडे गेला. वकीलाने वारस पत्र तयार केले. वकील व पुतण्या दवाखान्याच्या पायऱ्या चढत होते. भिंतीवर लिहिले होते 'वर जाण्याचा मार्ग.' दोघे अति दक्षता विभागातील खोलीत आले. पण काकांची हालचाल थांबली होती. पुतण्या गडबडीने डॉक्टरांना बोलविण्यास गेला. डॉक्टर आले. नाडी तपासली व म्हटले, 'काका संपले आहेत.' पुतण्या म्हणाला, 'वकीलाकडून वारस पत्र लिहून आणले आहे. डॉक्टर आपण एक असे इंजेक्शन द्या की काका निदान सही करण्याकरिता तरी जिवंत होतील. वाटल्यास मी ५० लाखापैकी

२५ लाख रुपये आपणास देईन.' डॉक्टर म्हणाले, 'सर्व शहर जरी माझ्या नावावर केलेस तरी मी यांना उठवू शकत नाही. आयुष्य संपले म्हणजे संपलेच. शिवाय हे थांबत नाही.' 'आयुष्य जात आहे पहा । काळ जपतसे महा । स्वहिताचा घोर वहा । ध्यानी रहा श्रीहरीच्या ॥' नाम. बहुतेकजण आयुष्य विषयात खर्च करतात. 'विषयाच्या चर्वणी । केली आयुष्याची गाळणी ॥' तु.म. कांही, लोकांची स्तुती, निंदा करण्यात आयुष्य घालवितात व आयुष्याची माती करतात. 'स्तवोनिया नरा । केला आयुष्याचा मातेरा ॥' तु.म.

**कथा -** एकदा राजा जंगलात शिकारीस गेला असता रात्र झाली म्हणून जंगलातील एका शेतकऱ्याकडे उतरला. शेतकऱ्याने राजाची उत्तम व्यवस्था ठेवली. राजाने खूष होऊन चार एकराची चंदनाच्या झाडाची जमीन शेतकऱ्यास बक्षीस दिली. चंदनाच्या झाडाचे महत्त्व शेतकऱ्यास माहीत नव्हते. तो चंदनाची लाकडे तोडून त्याचे कोळसे करून शहरात विकत असे. कारण त्यास माहीत होते, लाकडापेक्षा कोळशास जास्त किंमत येते. जवळजवळ तीन एकरातील लाकडे संपली. एकदा पाऊस पडत होता व शेतकऱ्यास पैशाची गरज होती म्हणून चंदनाची लाकडे तोडून त्याने शहरात विकण्यास नेली. त्या लाकडांची किंमत कोळशापेक्षा १०० पट जास्त मिळाली. शेतकऱ्याने कपाळावर हात मारला. चंदनाचे कोळसे करून मी हजारो रुपयाचे नुकसान केले. मात्र बाकीची लाकडे विकून तो श्रीमंत झाला. या दृष्टांताप्रमाणे गेलेल्या आयुष्याची किंमत कळली नाही. निदान राहिलेले आयुष्य परमार्थात घालवावे. 'बरवे झाले आजीवरी । नाही पडिलो मृत्युचे आहारी । वाचोनि आलो येथ वरी । उरले ते हरी तुम्हा समर्पण ॥' तु.म. आयुष्य किती जगला यास महत्त्व नाही. कशासाठी जगला हे महत्त्वाचे आहे.

**कथा -** एका वारकऱ्याची मुलगी लग्न होऊन सासरच्या घरात आली होती. वडील निष्ठावंत वारकरी असल्यामुळे मुलीस जन्मताच बारशासच तुळशी माळ घातली होती. शालेय शिक्षणाबरोबर पंढरी, आळंदीची वारी वडिलांबरोबर चालू होती. हरिपाठ पाठ, ज्ञानेश्वरीचे नित्य वाचन होतेच. मुलगी ज्या घरात दिली होती ते पण वारकरीच होते पण दीक्षा उशिरा घेतली होती. सकाळीच गोसावी (नेहमीचा) पीठ मागण्याकरिता आला होता. मुलीस विचारले, 'नवी नवरी कां ?' ती म्हणाली, 'होय !' गोसाव्याने विचारले, 'तुझे वय किती ?' ती म्हणाली, '२० वर्षे.' 'नवऱ्याचे वय काय ?' ती म्हणाली, '१५ वर्षे.' 'सासऱ्याचे वय ?' '१० वर्षे आहे व सासूचे वय ५ वर्षे आहे.' हे सर्व सासू ऐकत होती. रागाने बाहेर आली व म्हणाली, 'अशी वर्षे कशी सांगितलीस ?' ती म्हणाली, 'सासुबाई माफ करा. माझ्या पतीने वारी घेऊन १५ वर्षे झाली. मामंजींनी वारी घेऊन १० वर्षे झाली व आपण आता ५ वर्षापूर्वी तुळशी माळ घातली आहे. दीक्षेचे, वारीचे, परमार्थाचे आयुष्य मी सांगितले यात काय चुकले ?' सासू गप्प बसली. कारण खरे होते. विषयात आयुष्य घालून नंतर पश्चाताप होतो. पण उपयोग होत नाही. 'आछे दिन पाछे गये, हरिसे किया न हेत । अब पछतावा क्या करे चिडिया चुग गई खेत ॥' कबिर

परमार्थात आयुष्य कसे घालवावे याचे मार्गदर्शन तीन दृष्टांतात नाथ महाराज करतात. दृष्टांतात तीन रस आहेत. अनुक्रमे, वीर, शृंगार, करुणा.

**छेदोनिया आळसासी । दवडूनिया निद्रेसी ।**
**आत्मचिंतन अहर्निशी । अविश्रमेसी साधावें ॥ भागवत. ९/३४०**

**रणी निघालिया शूरासी । न जिणता परचक्राशी ।**
**विसावा नाही क्षत्रियासी । तेणे वेगेसी साधावे ॥ भागवत. ९/३४१**

**साधावया आत्मलग्न । सावधान बिजवराचें मन ।**
**तेणे साक्षेपे आपण । सायुज्य लग्न साधावे ॥ भागवत. ९/३४२**

**रायाचे एकुलते एक । चुकल्या अवचटे बालक ।**
**तो जेवी शोधी सकळ लोक । तेवी निजसुख साधावे ॥ भागवत. ९/३४३**

**काळाचा चपेट घात । जंव वाजला नाही येथ ।**
**तंव साधावया परमार्थ । आयुष्य व्यर्थ न करावे ॥ भागवत. ९/३४४**

साधु-संतांनी मात्र आपले आयुष्य परमार्थातच घालविले.

'काळ सार्थक केला त्यानी । धरिला मनी विठ्ठल ॥' निळो. पुरुरव्याचे उद्गार भागवतात नाथ महाराज लिहितात.

**साधूचिया निजस्वार्था । साधुनि द्यावया उगवे सविता ।**
**निमेषोन्मेषे परमार्था । साधक तत्वता साधिती ॥ भागवत. २६/१२०**

**तोचि सविता सकामासी । आयुष्य हरी अहर्निशीं ।**
**हे न कळे ज्याचे त्यासी । नरक पातासी निजमूळ ॥ भागवत. २६/१२१**

परमार्थात वेळ न घालविता विषयात आयुष्य घालविणाऱ्या मनुष्याने कशी हानी केली, हे सहा दृष्टांताद्वारे नाथ महाराज सांगतात.

**जो अमृत विकुनि कांजी प्याला । रत्ने देऊनि कोंडा घेतला ।**
**पर्वत फोडूनि टोळ धरिला । गज विकिला इटेसाठी ॥ भागवत. २२/४९८**

**डोळे फोडूनि काजळ ल्याला । नाक कापून शिमगा खेळला ।**
**तैसा नरदेह नाडला । नाश केला आयुष्याचा ॥भागवत २२/४९९**

कोणास किती आयुष्य लाभले त्याचे गणित सांगणारा अभंग.

**अरे मना तू शोक करिसील किती । हे तव वायाची धन संपत्ति ।**

**आयुष्य भविष्य नाही तुझिये हाती । हे अवघे अंती जायीजेल ॥१॥**

**एक अर्बुद साठ कोटी देखा । तीस लक्ष दहा सहस्त्र देखा ।**
**सात शते नवमास मापा । तया हिरण्यकश्यपा काय झाले ॥२॥**

**चौदा चौकड्या लंकानाथा । नव्याण्णव सहस्त्र राया दशरथा ।**
**तेहि गेले मृत्युपंथा । मागे सर्वथा नुरलेची ॥३॥**

**चौदा कल्प मार्कंडेया पडे । तै लोम हर्षणाचा एक रोम झडे ।**
**बकदालभ्याचे निमिषे मोडे । गेले एवढे अरे मना ॥४॥**

**बकदालभ्याचे पुरे आयुष्य । तै वटहंसाचे उपडे एक पिच्छ ।**
**तयासी होता मृत्यु प्रवेश । तै एक श्वास भृशुंडीचा ॥५॥**

**मरणांत होई भृशुंडीचा । तै एक दिवस कूर्माचा ।**
**नामा विनवी केशवाचा । वेगी विठोबाचा पंथ धरा ॥६॥**

**कथा -** एक श्रीमंत पण कंजूस म्हातारा जमिनीत ४ कोटी रुपये पुरून ठेवतो व त्यावर कॉट टाकून झोपतो. आयुष्य संपल्यावर यमदूत येतो. म्हातारा म्हणतो, 'एक करोड रुपये घ्या पण एक वर्ष आयुष्य द्या.' पण यमदूत ऐकत नाही. तो म्हणतो, 'चारच्या चार करोड घ्या व थोडे आयुष्य द्या.' यमदूत म्हणतो, 'आम्ही रावणास सोडले नाही. तुला कसे सोडणार. हे सर्व सोडून आमच्या बरोबर यावेच लागेल.'

★★★★★

## (८८) सप्ताह फायदे

श्रीकृष्णांनी गोकुळातील लोकांना वाचविण्याकरिता गोवर्धन पर्वत सामान्य करंगळीने उचलून धरला. इंद्राने सात दिवस सतत शिळाधारी पाऊस पाडला. पण सर्व वाचले. 'शिळांचिया धारीं वरुषला आकांत । होता दिवस 'सात' एक सरे ॥' तु.म. हा पहिला सप्ताह असावा. त्यानंतर शुकाचार्यांनी सात दिवसात भागवत सांगून परिक्षिती राजाचा उद्धार केला. 'परिक्षीती मृत्यु साता दिवसांचा । मुक्त झाला वाचा उच्चारिता ॥' तु.म. 'श्रवणे परिक्षीती तरला भूपती । 'साता दिवसा' मुक्ती झाली तया ।। महाभागवत करूनि श्रवण । सर्वांगाचे कान केले त्याने ॥' नाथ. 'शुकसनकादिकीं उभारिला बाहो । परिक्षिती लाहो दिसां सातां ॥' तु.म. या मुळे सप्ताहाला जास्त महत्त्व आले. व्यवहारात एसटीचा 'सुरक्षा सप्ताह' साजरा होतो. बँकेचा बचत सप्ताह असतो. नगर पालिकेचा 'स्वच्छता सप्ताह' करतात. असे सप्ताहाचे बरेच प्रकार असले तरी या काळात वारकऱ्यांच्या अखंड

हरिनाम, ज्ञानेश्वरी, गाथा पारायण सप्ताहास आगळे वेगळे महत्त्व प्राप्त झाले आहे. सप्ताह कां करायचा ? यापासून काय फायदा होतो ? सप्ताहाचे सात फायदे लक्षात येतात.

१) ज्या गावात सप्ताह असतो त्या गावातील वातावरण मंगल राहते. ज्या ठिकाणी हरिकथा, हरिनाम होते तिथला परिसर पवित्र होतो. खाणारे पिणारे विचार करतात, गावात सप्ताह आहे. थोडा इंद्रियावर ताबा ठेवू या.

२) सप्ताहाच्या द्वारे तरुण वर्गावर संस्कार होतात. सध्या दूरदर्शनमुळे तरुण आपल्या चांगल्या संस्कारापासून दूर होत आहेत. पाश्चिमात्य भपकेबाजीस बळी पडत आहेत.

३) प्रवचन, कीर्तन माध्यमाद्वारे इहलौकीक ज्ञान मिळते. एका कॉलेज कुमारास विचारले, 'पांडवात मोठा भाऊ कोणता ?' त्याने उत्तर दिले 'अर्जुन.' पांडवांचा मोठा भाऊ धर्मराज हेसुद्धा त्याला सांगता आले नाही. इतिहास, पुराण, वेद, संत वाङमय याचे ज्ञान मिळते.

४) कथेमुळे, पुण्य पदरात पडते. 'कथा देवाचे ध्यान । कथा साधन मुंडण । कथे ऐसे 'पुण्य' । आणिक नाही सर्वथा ॥' तु.म. जे कथा आयोजित करतात, मेहनत घेतात त्यांना फार पुण्य प्राप्त होते.

५) सप्ताहामुळे आपली हिंदू संस्कृती जतन होते.

६) सप्ताहामुळे धर्म जागृती होते.

७) ज्या ठिकाणी हरिकथा, सप्ताह असतो त्या ठिकाणी सगळी तीर्थे वास करतात.

**तत्रैव गंगा यमुनाच वेणी गोदावरी सिंधु सरस्वती च ।**
**सर्वाणि तीर्थानि वसन्ति नित्यं यत्र अच्युत उदार कथा प्रसंगाः ॥ सुभा.**

असे सात फायदे आहेतच शिवाय कीर्तनकार, प्रवचनकार यांना आपले विचार मांडण्याची संधी मिळते. श्रोत्यांना, श्रवणाची मेजवानी मिळते. या सप्ताहातून मिळणाऱ्या देणगीतून काहींनी मंदिर, धर्मशाळा यासारखी सामाजिक कामे केली. सप्ताहाचा हिशेब जर व्यवस्थित ठेवला तर खूप काळ सप्ताह टिकतो. पण स्वतःच्या वैयक्तिक फायद्याचा विचार केला तर सप्ताह जास्त दिवस चालत नाही. हा बऱ्याच लोकांचा अनुभव आहे.



# (८९) दुःख

माऊलींनी सुखाची व्याख्या सांगितली आहे. जीव व आत्मा यांचे मिलन म्हणजे सुख. त्याच्या विरुद्ध ते दुःख.

**आणि ऐसी हे अवस्था । न जोडतां पार्था ।**
**जे जीजे तेंचि सर्वथा । दुःख जाणें ॥ ज्ञाने १३/१३२**

काही म्हणतात संसारात दुःख आहे. तु.म. म्हणतात संसारात दुःख आहे असं नाही तर संसारच दुःखरूप आहे. 'दुःख बांदवडी आहे हा संसार । सुखाचा विचार नाही कोठे ॥' सर्वात मोठी दोन दुःखे आहेत. त्याच्या अंतर्गत सर्व दुःखे वास करतात. ज्याप्रमाणें कॅपसूल गोळीस दोन टोपणे असतात व आत सर्व कडू औषध असते, इतके कडू की, वाटते रोग परवडला पण औषध नको. तसे जन्म व मरण ही मोठी दुःखे आहेत.

**तेथ सकळदुःखधामें । भुंजीजती जियें मृत्युजन्में ।**
**तियें दुर्गमेंचि सुगमें । होती तुज ॥ ज्ञाने १८/१२७०**

**जन्मदुःखं जरादुःखं जायादुःखं पुनः पुनः ।**
**अंतकाले महादुःखं तस्मात् जागृत जागृत ॥ सुभाषित**

**अर्थ -** जन्माचे दुःख, म्हातारपणाचे दुःख, बायकोचे दुःख, व अंतःकालाचे महादुःखआहे. तरी जागृत राहा. दुसऱ्या भाषेत दुःख म्हणजेच ताप. जगात आठजण असे आहेत, ज्यांना दुसऱ्याचे दुःख कळत नाही.

**राजा वेश्या यमो अग्नि तस्करो बाल याचकः ।**
**परं दुःख न जानन्ति अष्टमो ग्राम कंटक ॥ सुभा.**

**अर्थ -** राजा, वेश्या, यम, अग्नि, चोर, बालक. भिकारी व गावगुंड हे दुसऱ्याचे दुःख जाणत नाहीत. जगात असे मूर्ख आहेत, आपण दुःख भोगतो आहे याची त्यांना अज्ञानामुळे जाणीवच नसते. ज्ञानोबाराय दृष्टांत देतात.

**दुःखशोकांच्या घाईं । मारिलीयाची सेचि नाहीं ।**
**हें सांगावया कारण काई । जे ग्रासिले माया ॥ ज्ञाने ७/१०७**

**दृष्टांत -** एका गावात चार गंजाडू होते. रोज संध्याकाळी गावाच्या बाहेरील शिवमंदिराजवळ हे चौघे जमत. गांज्या पिणे हा त्यांचा ठरलेला कार्यक्रम असायचा. गंजाडू लोकांचे असे मत आहे शंकर सुद्धा गांज्या ओढतात. ते म्हणत, 'जय भोलेनाथ टेकडी वाले चिलीम भरा है ताजा, दम लगाने तू आ जा ।' शंकर गांज्या ओढतात असा उल्लेख कुठेही आढळत नाही. मात्र शंकराने हलाहल विष

घेतले. हे विदित आहे. मात्र हे विष घेऊन मरतील म्हणून घेत नाहीत. या चौघांना गांज्या जास्त झाला. नशेत त्यांनी विचार केला. रोज आपणास एवढ्या लांब यावे लागते. त्यापेक्षा हे शिवमंदिरच गावात घेऊन जाऊ. चौघांनी चार बाजूस धरले व मंदिरास ढकलू लागले. रात्री जेवण तयार करून यांच्या बायका वाट पहात होत्या हे केव्हा जेवायला येतात. बरीच रात्र झाली. बायकांना माहीत होते, आपले पतीराज कुठे असतील ! चौघी कंदिल घेऊन शंकर मंदिराजवळ आल्या. पाहतात तो काय चौघे तर्र होऊन मंदिर ढकलत आहेत. एकीने आपल्या पतीस ओळखले व रागाच्या भरात वरून पाठीवर एक चप्पल मारली. तो दुसऱ्यास म्हणाला, 'रामभाऊ एवढा प्रयत्न करून 'आत्ताशी' एक वीट पडली.' या प्रकारे काहींना मार पडतो. दुःख भोगतात. पण व्यसन, वाईट नाद सोडत नाहीत. माऊली सांगते,

**म्हणोनि विषयभोगीं जें सुख । ते साद्यंतचि जाण दुःख ।**
**परि काय करिती मूर्ख । न सेवितां न सरे ॥ ज्ञाने ५/१२०**

**तें अंतर नेणती बापुडे । म्हणोनि अगत्य सेवणें घडे ।**
**सांगें पूयपंकींचे किडे । काय किळसी घेती ॥ ज्ञाने ५/१२१**

**तयां दुःखियां दुःखचि जिव्हार । ते विषयकर्दमींचे दर्दुर ।**
**ते भोगजळातें जलचर । सांडिती केवीं ॥ ज्ञाने ५/१२२**

**आणि दुःखयोनि जिया आहाती । तिया निरर्थका तरी नव्हती ।**
**जरी विषयांवरी विरक्ती । धरिती जीव ॥ ज्ञाने ५/१२३**

संसार दुःखरूप असल्यामुळे साधक यातून सुटण्याचा प्रयत्न करतात. दुःखरूपी संसारात एक सुख आहे ते म्हणजे देवाचे नाम. या नामामुळे दुःख जात नाही तर दुःखाचे सुखात रूपांतर होते. 'संसारा आलीया एक सुख आहे । आठवावे पाय विठोबाचे ।। तेणे होय सर्व संसार सुखाचा । न लगे दुःखाचा लेश कांही ॥' तु.म. 'कामामध्ये काम । कांही म्हणा रामराम । जाईल भव श्रम । सुख होईल दुःखाचे ॥' तु.म. सर्वसाधारणपणे संसारात, अनुकूल विषय भोग प्राप्त झाले तर, सुख वाटते पण त्याचा परिणाम दुःख आहे. 'विषयाचे सुख येथे वाटे गोड । पुढे अवघड यमदंड ॥ मारीती झोडीती तोडीती निष्ठूर । यमाचे किंकर बहु साल ॥' तु.म. संसारी सुखात देवाची आठवण होणे, कठीण आहे. दुःखात मात्र देवाची आठवण होते. 'सुखमें सुमरण सब करें । दुःखमें ना करे कोये । दुखमें सुमरन जो करें । दुख काहें का होय ॥' कबिर. कांही महात्म्यांनी देवाकडे दुःखच मागितले. श्रीकृष्ण परमात्मा महाभारतीय युद्ध झाल्यानंतर निघाले. जाताजाता आत्यास म्हणजे कुंती मातेस म्हणाले, 'आत्या मी चाललो, तुला काय पाहिजे ?' आत्या म्हणाली, 'तू सर्व समर्थ देव आहेस. मी तुझ्याकडे 'विपत्ती' मागते. संकट आले की तुझी आठवण होईल व संकटातून सोडविण्याकरिता तू

धावून येशील. तुझ्या दर्शनाने संकट निवारण तर होईलच शिवाय तुझ्या दर्शनाचे सुख लाभेल.' तिच्या भाषेत -

**विपदः सन्तु नः शश्वत्तत्र तत्र जगद्गुरो ।**
**भवतो दर्शनं यत्स्यादपुनर्भवदर्शनम् ॥ भाग.१/८/२५**

तु.म. म्हणतात,

**तुका म्हणे करी फकिराचे परी । रात्रंदिवस हरि येईल वाचे ॥**

**आगी लागो तया सुखा । जेणें हरि न ये मुखा ॥१॥**

**मज होत कां विपत्ती । पांडुरंग राहो चित्तीं ॥२॥**

**जळो ते समूळ । धन संपत्ती उत्तम कुळ ॥३॥**

**तुका म्हणे देवा । जेणें घडे तुझी सेवा ॥४॥**

तुळशीदास म्हणतात,

**सुखके माथे शिल पडे जो नाम हृदयसें जाय ।**
**बलिहारी वा दुःख की जो पल पल नाम रटाय ॥**

सुखात देवाची आठवण होत नाही. दुःखात होते.

**दृष्टांत -** एका गावात एक महात्मा रस्त्याच्या बाजूस असणाऱ्या गुहेत राहात होता. त्याच्याकडे खूप रत्ने होती. एक दिवस रस्त्यात त्याने रत्ने टाकली. रस्त्यानी चार बायका चालल्या होत्या. एकीचे लक्ष रत्नांकडे गेले. पळत पळत रत्ने गोळा केली. त्यांच्यात भांडणे सुरू झाली. शेवटी रत्ने विकून त्यांनी पैसे वाटून घेतले. पण रत्ने कोठून आली याचा विचार त्यांच्या डोक्यात आला नाही. काही दिवसांनी महात्म्याने परत रत्ने टाकली. रस्त्यावरून चार पुरुष चालले होते. त्यांना ती रत्ने दिसली. चौघांनी वाटून घेतली. पण त्यांनाही रत्ने कुठून येतात हे कळले नाही. महात्म्याने विचार केला व एक दिवस माणसांचा घोळका चालला होता, त्यांच्यावर दगड फेकले. काहींना दगड लागले. दगड कोठून येतात म्हणून तिकडे धावले व साधूस जाब विचारला. साधू म्हणाले, 'रत्ने टाकली. ती उचलून घेऊन आपण श्रीमंत झालात. पण रत्ने कुठून आली याचा विचार केला नाहीत. आता दगड अंगावर आले तर धावत आलात. परमात्मा तुम्हास सुख देतो त्याची आठवण होत नाही. दुःखात मात्र आठवण होते. तुम्हास हे समजण्याकरिता दगड मारले. मला क्षमा करा व परमात्म्याची आठवण करा.'

जगात सर्व दुःखी आहेत. कोण सुखी नाही हे कबीरदास सांगतात -

**जो देखे सो दुखिया बाबा सुखिया कोई नहीं रे ॥धृ॥**

**जोगी दुखिया जंगम दुखिया तपस्वीको दुख दुना रे ॥१॥**

**राजा दुखिया प्रजा दुखिया दुखिया घर बैरागी ॥२॥**

**साच कहे तो सब जग दुखिया झूठा कहे न जाई ॥३॥**

**ब्रह्मा विष्णू शंकर दुखिया जिन्हे सृष्टी कमाई ॥४॥**

**धूत दुखिया अवधूत दुखिया दुखिया धन रंका रे ॥५॥**

**शुक देवने दुखके कारण उदरी माया त्यागी ॥६॥**

**कहत कबिर वो नही दुखिया जिसने मन को जिता रे ॥७॥**

**परिणामतापसंस्कारदुःखैर्गुण वृत्तिविरोधाच्च दुःखमेव सर्वं विवेकिनः ॥ साधनपाद - १५**

**अर्थ -** विषयसुखात परिणाम दुःख, ताप दुःख, संस्कार दुःख, शिवाय सात्त्विक राजस तामस गुणवृत्तीस विरोध असल्यामुळे विवेकी पुरुषांच्या दृष्टीने हे दुःखच आहे.

★★★★★

## (९०) पुत्र

भागवतात पुत्रांचे चार प्रकार सांगितले आहेत.

**उत्तमाश्चिंतीतं कुर्यात प्रोक्तकारी तु मध्यमः ।**
**अधमोऽश्रद्धया कुर्यादकर्तोच्चरितं पितुः ॥ भागवत ९/१८/४४**

**अर्थ -** उत्तम पुत्र तो वडिलांच्या मनात काय आहे हे जाणून न बोलता काम करतो, मध्यम पुत्र वडिलांनी सांगितल्यानंतर खुशीने काम करतो, अधम पुत्र वडिलांनी आज्ञा दिल्यानंतर काम करतो पण नाखुशीने !

वारकरी वडील मरताना पुत्रास जवळ घेऊन सांगतात, 'तू माझी सर्व इस्टेट घे पण तीन कामे कर. सकाळी रोज देवपूजा कर, रोज सकाळ-संध्याकाळ हरिपाठ वाच व वर्षातून एकदा पंढरीची वारी कर.' असे सांगून वडील मरतात. हा सर्व करतो पण जबरदस्तीने. कोणी विचारले, 'काय करत होतास ?' तो म्हणे, 'देवाच्या डोंबलावर पाणी घालत होतो.' म्हणजेच 'देवपूजा - डोंबलावर पाणी' काय वाचत होतास ? 'ते भारूड म्हणजे हरिपाठ दोन वेळा म्हणावे लागते.' कोणी विचारले, 'कुठे गेला होतास ?' तो म्हणे, 'पंढरपूरला हेलपाटा मारून आलो' म्हणजे वारीस तो हेलपाटा म्हणतो. पण काम करतो. चौथा जो मुलगा आहे तो काहीच करत नाही. बापाने कितीही बोंब मारली तरी !

यास भागवतकार पुत्र म्हणत नाहीत तर आईवडिलांचे मूत्र म्हणतात. 'पोटी जन्मती रोग । तरी का म्हणावे आप्तवर्ग ॥' तु.म. अर्थात हे चांगल्या आई-बापाविषयी आहे. काहींचे पिता मात्र कायम पित असतात. रात्रंदिवस नशेमध्ये, ते मुलांना काय चांगले सांगणार ?

पुत्र याची शास्त्रात व्याख्या आहे, 'पु' नरकातून तारतो त्यास पुत्र म्हणावे. काही वाईट वागून आईवडिलांना नरकात घालतात. काही जिवंतपणी आईवडिलांना दुःखाच्या खाईत लोटतात.

विदुरांनी धृतराष्ट्रास सांगितले, 'आपला एक कुपुत्र दुर्योधन याच्यावर नियंत्रण ठेव. नाहीतर हा सर्व पुत्रांचा नाश करील. पण पुत्रमोहामुळे धृतराष्ट्राने ऐकले नाही व सर्व मारले गेले.

ज्याप्रमाणे जंगलात एखादे लाकूड लाकडावर घासले जाते व सर्व जंगल पेट घेते तद्वत एखादा मूर्ख पुत्र निपजतो व सर्व कुळाचा नाश करतो.

**एकेन शुष्क वृक्षेण दह्यमानेन वन्हिना । दह्यते ते तदवनं सर्वं कुपुत्रेण कुलं तथा ॥ सुभा.**

काही आईवडिलांचे असे दुर्दैव असते की सर्वच पुत्र मूर्ख निपजतात.

एक म्हातारी एका साधूकडे गेली व म्हणाली, 'महाराज, मी फार दुःखी आहे.' महाराज म्हणतात, 'आजी आपणास पाच पुत्र असून आपण दुःखी का ?' ती म्हणते - सुभाषित -

**ज्येष्ठो भृंगीतंबाखुभक्षणपरा, तस्यानुजो मद्यपि ।**
**लब्ध्वाद्युतिः रुचि तृतीया चोराणां चोरगीत महिमानं चतुर्था ।**
**बालस्तुवतो पंचमो लोकानां नित्य गृहानि दहते ।**
**एक द्विणि त्रिणि चत्वारि वा ॥**

**अर्थ -** मोठा मुलगा नेहमी तंबाखू व भांगेच्या नशेत असतो. दुसरा दारूच्या, तिसरा जुगाराच्या आहारी गेला आहे. चौथा चोरी करतो व पाचवा दुसऱ्याची एक-दोन घरे पेटवतो. महाराज, मी कशी सुखी असणार ?

याउलट एखाद्याचा एकच पुत्र असतो. पण सर्वांना सुखी करतो. ज्याप्रमाणे जंगलात एखाद्या सुगंधी फूलाचा दरवळ जंगलात सर्वत्र दरवळतो तद्वत एखाद्या मुलामुळे सर्व कुळ पवित्र होते.

**एकेनापि सुपुष्पेन पुष्पितेन सुगंधीना ।**
**वासीतं तद्वनं सर्वं सुपुत्रेण कुलं तथा ॥ सुभा.**

असा एकच पुत्र चांगला.

**वरमेको गुणी पुत्रो न च मूर्खा शतान्यपि ।**
**एकश्चन्द्रस्तमो हन्ति न तु तारा सहस्त्रशः ॥ सुभा.**

**अर्थ -** एक गुणी पुत्र चांगला. शंभर मूर्ख पुत्र काय कामाचे ? ज्याप्रमाणे एक चंद्र प्रकाश देतो, ह तान्यांचा काय उपयोग ?

तु.म. सांगतात - 'पुरे एकचि माय पुत्र पोटी । हरिस्मरणे उद्धरे कुळे कोटी ॥' याउलट - म्हणे हरिसी विन्मुख । गांधारीचे उदरी शतमूर्ख ॥'

**कथा -** एका माणसाचे तीन पुत्र होते. तो एका साधूकडे गेला व म्हणाला, 'या मुलांमध्ये उ मध्यम, अधम मुलगा कोणता ते आपण सांगावे.' महात्म्याने सांगितले, 'यांना माझ्याकडे दिवस ठेवावे लागेल.' पुत्रांना दोन दिवस ठेवून तो माणूस घरी गेला. दुसऱ्या दिवशी साधूने मुलांना दोन-दोन केळी दिली. तिघांनी केळी खाल्ली. ती केळी खाऊन साल कुठे टाकतात या साधूचे लक्ष होते. एकाने केळाच्या साली रस्त्यावर टाकल्या. दोन माणसे त्याच्यावरून घस पडली. दुसऱ्याने साली कचऱ्याच्या डब्यात टाकल्या. तिसऱ्याने मात्र जवळच चरत असणाऱ्या गाई मुखात घातल्या. अर्थात त्याचे दूधच होणार. दोन दिवसांनी मुलांना नेण्याकरिता तो माणूस साधू आला. साधू म्हणाला, १) रस्त्यात केळीच्या साली टाकणारा मुलगा - अधम २) केळीच्या सा कचऱ्याच्या डब्यात टाकणारा - मध्यम ३) गाईच्या मुखात साली घालणारा - उत्तम मुलगा आहे. अ घराचा कारभार त्या माणसाने तिसऱ्या - उत्तम मुलाच्या हाती दिला.

**सहाय्यक श्लोक -**

**पुन्नाम्नो नरकात् यस्मात् त्रायते पितर सुतः ।**
**तस्मात्पुत्र इति प्रोक्तः स्वयमेव स्वयम्भुवा ॥ भागवत**

**अर्थ -** पुन्नामक नरकातून जो श्राद्धाच्या माध्यमाने पितरांना तारतो त्यास पुत्र म्हणतात अ ब्रह्मदेव सांगतात.

**जीवतो वाक्यकरणात् मृताहे भुरिभोजनात ।**
**गयायां पिण्डदानाश्च त्रिभिः पुत्रस्य पुत्रता ॥**

**अर्थ -** जिवंत असताना पित्याची आज्ञा पाळतो, मृत तिथीला ब्राह्मणांना भोजन देतो व गयेम पिंडदान करतो तो पुत्र होय.

पुरुषास आई-वडिलांची पुण्यतिथी साजरी करणे हा पर्वकाळ आहे.

**पुरुषासी पर्वकाळ । जन्मात जोडे एक वेळ ।**
**मातापित्याचा अंतकाळ । ते धर्माची वेळ अति पवित्र ॥ भा. २१/९४**

**कथा १) :** एका क्षेत्रात भयंकर दुष्काळ पडला. एक निर्धन कुटुंब आवश्यक सामान घे दुसरीकडे जाण्यास निघाले. एका रात्री एका झाडाखाली थांबले. प्रमुखास तीन पुत्र होते. वडिल आदेश दिला. एकाने इंधन आणावे, एकाने पाणी घेऊन यावे व तिसऱ्यास सांगितले अग्नि घेऊन

चूल पेटविली. तिघांना सांगितले झाडावर चढा व फळे मिळतात का पहा. तिघे झाडावर चढले.

झाडावर एक देव रहात होता. त्यास वाटले हे सर्वजण मला पकडतील, कदाचित यांच्या भांड्यात शिजवतील कारण मुले आज्ञाधारक व कष्टाळू असून एकीने राहात आहेत. देव प्रगट झाला म्हणाला, 'मला पकडू नका. झाडाच्या मुळाशी एक मोहराचा घडा आहे तो घ्या व जीवन चालवा.' दुसऱ्या दिवशी सर्व कुटुंब परत घरी आले व आनंदाने राहू लागले. ही गोष्ट शेजाऱ्यास समजली. त्याचेपण तीन पुत्र होते. ते सर्वजण त्याच झाडाखाली रात्री आले. वडिलांनी चूल पेटवून तिघांना तीन कामे सांगितली. तिघांची काम करण्यावरून भांडणे झाली. परिवाराचा स्वामी देवास पकडण्या-करिता झाडावर चढला. देव प्रगट झाला व म्हणाला, 'तुमच्या कुटुंबात एकसूत्रीपणा नाही. त्यामुळे मला पकडू शकत नाही. शिवाय तुम्हास धन दिले तर तुम्ही आपसात भांडण करून मरून जाल.' देवाने त्यांना हाकलून दिले. सर्वजण निराश होऊन घरी आले.

**कथा - २) :** एकाचे चार पुत्र होते. पण नेहमी आपसात भांडत असत. त्यामुळे त्यांची शारीरिक, आर्थिक, मानसिक, बौध्दिक हानी होत होती. हे पाहून वडिलांना फार दुःख होत होते. वडिलांची मरणाची वेळ जवळ आली. एक दिवस चौघांना जवळ बोलावून घेतले. लाकडाचा एक गठ्ठा घेतला व म्हणाले, 'हा लाकडाचा गठ्ठा एकएक मोडून टाका.' प्रत्येकाने प्रयत्न केला. पण लाकडाचा गठ्ठा तुटला नाही. त्यानंतर एकएक लाकूड दिले. ते प्रत्येकाने सहज तोडले. वडील म्हणाले, 'तुम्ही सर्व एकत्र राहिला तर तुमचे कोणी काही वाकडे करू शकणार नाही. पण वेगळे वेगळे राहिले तर तुम्हास आपत्ती येण्याची शक्यता आहे.' त्या दिवसापासून सर्व पुत्र मिळून मिसळून वागू लागले.

**कथा ३) :** बुद्धु हलवाईचा मुलगा काशीत शिक्षणाकरिता ठेवला होता. ज्या आचार्यांकडे मुलाची व्यवस्था, शिक्षण होते ते एकदा हलवायाच्या गावी आले. हलवाई आतुरतेने विचारतात, 'मुलगा कसा आहे ? काही कमी आहे का ?' आचार्य म्हणतात, 'आपली मनी ऑर्डर व्यवस्थित पोहोचते. व्यवस्थित जेवतो. भरपूर झोपतो. कधी कधी खेळतो. फक्त दोन गोष्टींची उणीव आहे. १) जवळ अक्कल नाही २) गुरुजींचे ऐकत नाही.'



# (११) इंद्रिये

हा मानव देह म्हणजे इंद्रियांचा समूह आहे. यात पाच ज्ञानेंद्रिये आहेत व पाच कर्मेंद्रिये आहेत.

**तरि श्रवण नयन । त्वचा घ्राण रसन ।**
**इयें जाणें ज्ञान । करणें पांचें ॥ ज्ञाने १३/९८**

कान, डोळे, त्वचा, नाक व रसना ही पाच ज्ञानेंद्रिये आहेत.

**मग वाचा आणि कर । चरण आणि अधोद्वार ।**
**पायु हे प्रकार । पांच आणिक ॥ ज्ञाने. १३/१००**

ही सर्व बाह्य इंद्रिये आहेत. आत जे इंद्रिय आहे, त्यास अकरावे इंद्रिय म्हणतात. त्याचे नाव 'मन'.

**इंद्रियांमाजी अकरावें । मन तें मी हें जाणावें ।**
**भूतांमाजीं स्वभावें । चेतना ते मी ॥ ज्ञाने. १०/२२४**

ज्ञानेंद्रिय व कर्मेंद्रिय यांचा जवळचा संबंध आहे.

१) कान हे ज्ञानेंद्रिय व वाचा, तोंड हे कर्मेंद्रिय आहे. आपण मनाने जे ऐकतो ते तोंडाने बोलत असते बहुतेक जी माणसे बहिरी असतात ती मुकी असतात. असा यांचा घरोबा आहे. जीभ ही दोन कामे करते महत्त्वाचे व नाजूक इंद्रिये आहे. म्हणून देवाने या जिभेस दोन भिंतीच्या आत ठेवली आहे. एक ओठ दुसरे दात. जशी एखादी मौल्यवान वस्तू कपाटाच्या, लॉकरमध्ये ठेवतात. म्हणून तोंडाचा योग्य उपयो करा.

२) डोळे हे ज्ञानेंद्रिय व पाय हे कर्मेंद्रिय आहे. यांचा संबंध असा आहे, पायास जास्त त्रास झाला त त्याचा डोळ्यावर परिणाम होतो व पायास तेल चोळले तर डोळे शांत राहतात.

**कां पावो शीतळता लाहे । कीं ते डोळ्यांचिलागीं होये ।**
**तैसें परसुखें जाये । सुखावतु ॥ ज्ञाने १६/१६०**

३) त्वचा हे ज्ञानेंद्रिय, हिचा संबंध हात या कर्मेंद्रियाशी आहे. म्हणून त्वचेवर हात फिरविला तर शहा येतात. किंबहुना शरीरावरची त्वचा साफ करण्याकरिता हाताचाच उपयोग होतो.

४) नाक हे ज्ञानेंद्रिये व गुदद्वार हे कर्मेंद्रिय आहे. या दोघांचा संबंध वायूशी आहे. नाकाने श्वास आं घ्यायचा व सोडायचा. घाणेरडा वायू, अपानवायू गुदद्वारावाटे सोडला जातो. गुदद्वारातून कधी चांगला वायू येत नाही, तसा दुष्ट माणूस कधी चांगले बोलत नाही.

**अपानाचेनि तोंडें । जरी सुगंधा येणें घडे ।**
**तरी सत्य तयां जोडे । आसुरांतें ॥ ज्ञाने. १६/२९१**

यापेक्षा कोणी घाणेरडा वायू सोडला तर माणूस प्रथम नाक धरतो.

५) रसना व शिश्न यांचा जवळचा संबंध आहे. ज्यांची जीभ म्हणजे खाणे ताब्यात नाही त्यांच्या ताब्यात शिश्न राहू शकत नाही. 'रसना शिश्नांचे अंकित । तुका म्हणे वरदळ स्फीत ॥' नारदांनी भविष्य सांगितले आहे. कलियुगात बहुतेक लोक या दोन इंद्रियांमुळे परमार्थाकडे वळणार नाहीत.

तात्पर्य - ज्यांना परमार्थात प्रगती करायची आहे त्यांनी प्रथम (आधी) इंद्रियांवर ताबा ठेवला पाहिजे. 'योगाचे ते भाग्य क्षमा । आधीं दमा इंद्रिये ॥' तु.म.

**आधीं यांतें जिणावें । मग तें ज्ञान पावावें ।**
**तंव पराभवो न संभवे । रागद्वेषा ॥ ज्ञाने. ३/२६४**

किंबहुना काम, क्रोध हे विकार, विषय येथून निर्माण होतात. म्हणून यांच्यावर ताबा हवा.

**यांचा पहिला कुरुठा इंद्रियें । एथूनि प्रवृत्ति कर्मातें विये ।**
**आधीं निर्दळूनि घालीं तियें । सर्वथैव ॥ ज्ञाने. ३/२६८**

तु.म. सांगतात इंद्रियावर ताबा नसेल तर भजनाचा काही उपयोग होत नाही. 'इंद्रियासी नेम नाही । मुखी राम म्हणोनि कांही ।। जेवी माशीं संगे अन्न । सुख नेदी ते भोजन ॥' तु.म.

**एक प्रसिद्ध श्लोक**

**विश्वामित्रपराशरप्रभतियो वातांबूपर्णाशिना ।**
**स्तेऽपिस्त्रिमुखपंकजं सुललितं दृष्ट्वैव मोहं गता ।**
**शाल्यन्नं सुघृतं पयोदधी युतं भुंजन्ति ये मानवाः ।**
**तेषां इंद्रियनिग्रहो भवेत्विंद्य तरेत् सागरे ॥**

**अर्थ -** विश्वामित्र व पराशर या मोठ्या व्यक्तींनी वायू, पाणी व पाने प्राशन करून तपश्चर्या केली पण त्यांनी स्त्री-मुखकमल पाहिल्यानंतर मोहित झाले. मग जे मानव साखर, तूप, पक्वान्न खातात त्यांचा इंद्रियावर निग्रह असणे म्हणजे विंध्य पर्वत सागरात तरण्यासारखे होईल. यापेक्षा जे मदिरा, मांस खात असतील त्यांची गती काय होत असेल ते देवच जाणे. बप्पा - श्री. ह.भ.प. अप्पासाहेब वासकर यांचा एक नेहमीचा दोहा होता. 'तित्तिर पत्थर चुमत है उसको न छोडे काम । घी शक्कर खावत जो उसकी जाणें राम ॥' तित्तिर नावाचा पक्षी दगड खातो त्यास काम सुटत नाही. त्यांचा इंद्रियांवर ताबा रहात नाही मग तूप साखर खाणाऱ्यांचे काय होईल ?

सगळ्याचे सार - इंद्रियावर ताबा ठेवणे कठीण आहे पण ही इंद्रिये देवाकडे लावली तर त्यांच्यात दिव्यता येते. गीतेत काही गुह्य आहे. काही गुह्यतर आहे. काही गुह्यतम आहे पण सर्वगुह्यतम काय आहे ?

**सर्वगुह्यतमं भूयः श्रृणु मे परमं वचः ।**
**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ।। गीता. १८/६४**

**अर्थ -** सर्वात अत्यंत गुह्य असे माझे उत्कृष्ट भाषण पुन्हा ऐक. तू मला अत्यंत प्रिय आहेस म्हणून तुला मी हित सांगतो. ते सर्व गुह्यतम कोणते ?

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ।। गीता. १८/६५**

**अर्थ -** माझ्या ठिकाणी मन ठेवणारा हो, माझा भक्त हो, माझे भजन करणारा हो मला नमस्कार कर म्हणजे तू माझ्याप्रतच येशील. तू मला प्रिय असल्यामुळे हे मी तुला प्रतिज्ञेवर सत्य सांगत आहे.

मनासहित सर्व इंद्रिये देवाकडे वळविणे हे सर्वगुह्यातले गुह्य आहे.

**तरी बाह्य आणि अंतरा । आपुलिया सर्व व्यापारा ।**
**मज व्यापकातें वीरा । विषयो करी ।। ज्ञाने. १८/१३५३**

**तत्प्राप्य तदेवावलोकयति, तदेव श्रृणोति, तदेव भाषयति, तदेव चिंतयति । ना.भ.सू. ५५**

**अर्थ -** त्याला प्राप्त करण्यास त्याला पहा, त्याला ऐका, त्याच्याबद्दल बोला व त्याचेच चिंतन करा.

धोका -

**म्हणोनि इंद्रियें एकें । जाणतेनि पुरुखें ।**
**लाळावीं ना कौतुकें । आदिकरुनी ।।**

**हां गा सर्पेसी खेळों येईल । कीं व्याघ्रसंसर्ग सिद्धी जाईल ।**
**सांगें हालाहाल जिरेल । सेविलिया काई ।।**

**देखें खेळतां अग्नि लागला । मग तो न सांवरे जैसा उधवला ।**
**तैसा इंद्रियां लळा दिधला । भला नोहे ।। ज्ञाने. ३/२०२ ते २०४**

माऊली म्हणते जाणत्या पुरुषानीसुद्धा इंद्रियांचे लाड करू नये. जसे सापाशी खेळणे धोकादायक आहे. वाघाचा संग भीतीदायक आहे. हलाहल विष पचविता येईल का ? हे पहा खेळता खेळता आग लागली तर भडका उडतो तसे थोडे जरी इंद्रियांचे लाड केले तरी सर्वनाश होतो. माणूस सहज संगतीने व्यसनांच्या नादी लागतो व पूर्ण आहारी जाऊन आयुष्य बरबाद करून घेतो. गुटखा, वगैरेचे परिणाम समाजात दिसतात. एड्समुळे तरुण पिढी बरबाद होत आहे.

माऊली म्हणते, 'वास्तविक या इंद्रियांना धर्माचा मळा दिला आहे. तो हा जाळतो व विषयांचा सोहळा भोगून पतनास जातो. माऊलीच्या शब्दात -

**जे इंद्रियजात लळा । दिधलिया धर्माचा मळा ।**
**जाळूनि भोगिजे सोहळा । विषयांचा जेथ ॥ ज्ञाने. १८/८०२**

**चिंतन -** उंटाला नकेल, बैलाला वेसण, हत्तीला अंकुश, घोड्यास लगाम लावले तर हे प्राणी ताब्यात राहतात, व त्यांच्याकडून काम करून घेता येते. तसा इंद्रियांना लगाम लावला तर मोठी कामे होतात. नाहीतर, उंट, बैल, घोडा, हत्ती यांना सैल सोडले तर जसे नुकसान होते तसे इंद्रियांना सैल सोडले तर जीवनाचे नुकसान होते.

**कथा -** एक जहाज चालले होते. आत सत्यनारायणाची पूजा चालली होती. मात्र जहाजाच्या एका छिद्रातून पाणी येऊ लागले. आता प्रश्न पडला, सत्यनारायणाची पूजा करायची का जहाजात येणारे पाणी थांबवायचे ? तथापि प्रथम पाणी येण्याचे थांबवावे लागेल कारण जहाज बुडण्याची शक्यता आहे. पूजा नंतर निश्चिंतीने करता येईल.

तात्पर्य - देवाच्या पूजेपेक्षा प्रथम इंद्रियावर ताबा पाहिजे. नाहीपेक्षा पूजेचा एवढा उपयोग होणार नाही.

★★★★★

## (९२) गाव

छांदोक्य उपनिषदामध्ये आदर्श गावाची कल्पना आली आहे ती अशी -

**न मे स्तेनो जनपदे न कदर्यो न मद्यपः ।**
**नाना हिताग्निर्नाविद्वान स्वैरी स्वैरिणीकुतः ॥ छा. ३**

**अर्थ -** आमच्या राज्यात चोर नाही, कंजूष नाही, दारुड्या नाही. दुसऱ्याचे अनहित करणारा, अग्निसेवा न करणारा, अविद्वान, स्वैर पुरुष नाही. मग स्वैरिणी स्त्री असेलच कशी ? या आठ प्रकारची माणसे ज्या गावात नाहीत तो आदर्श गाव समजावा. गाव स्वच्छ असावा पण ही स्वच्छता महत्त्वाची आहे. तुकोबारायांनी दोन्हीही गावाची व्याख्या अभंगाद्वारे मांडली आहे.

गाव कसा नसावा -

**स्मशान ते भूमी प्रेतरूप जन । सेवा भक्ति हीन ग्रामवासी ॥१॥**

**भरतील पोटे श्वानाचिया परी । वस्ती दिली घरीं यमदूता ॥२॥**

**अपूज्य लिंग तेथें अतित नेघे थारा । ऐसी वस्ती चोरा कंटकांची ॥३॥**

**तुका म्हणे नाही ठावी तीथमती । यमाची निश्चितीं कुळवाडी ॥४॥**

गाव कसा असावा त्याची लक्षणे -

**धन्य तोचि ग्राम जेथे हरिचे दास । धन्य तोचि वंश भक्ति भाग्य ॥१॥**

**ब्रह्मज्ञान तेथे असे घरोघरी । धन्य नरनारी चतुर्भुज ॥२॥**

**नाही पापा रिघ काळाचे खंडण । हरिनाम कीर्तन घरोघरी ॥३॥**

**तुका म्हणे तिहीं तारिले सकळा । आपल्या कोंटीकुळा सहित पै ॥४॥**

हे वर्णन गोकुळ गावाचे वाटते.

ज्ञानोबारायांनी ज्ञानेश्वरीत काही गावे सांगितली आहेत.

१) आंधळ्याचे गाव

**हां गा आंधळेयांच्या गांवीं । आपणपें प्रगटले रवीं ।**
**तरि तिहीं वोतपलीचि घ्यावी । वांचूनि प्रकाशु कैंचा ॥ ज्ञाने.१०/१५६**

२) नग्न लोकांचे गाव

**एऱ्हवीं तरी खवणेयांच्या गांवीं । पाटाउवें काय करावीं ।**
**सांगें जात्यंधा रवी । काय आथी ॥ ज्ञाने.४/२२**

३) विवेकी लोकांचे गाव

**ते विवेकाचे गांव । कीं परब्रह्मींचे स्वभाव ।**
**नातरी अळंकारिले अवयव । ब्रह्मविद्येचे ॥ ज्ञाने.५/१३९**

४) रत्नपारखीचे गांव

**रत्नपारखियांच्या 'गांवी' । जाईल गंडकी तरी सोडावी ।**
**काश्मीरीं न करावी । मिडगण जे ॥ ज्ञाने. १३/३१९**

ज्ञानोबारायांनी देहास 'गांव' म्हटले आहे.

**१) देहाचिया गांवा आलिया । जन्ममृत्यूचिया सोहळिया ।**
**ना म्हणों नये धनंजया । जियापरी ॥ ज्ञाने.१८/१०१**

**२) पाहें पां शरीराचिया गांवा । जयालागीं आले पांडवा ।**
**तो कार्यार्थु आघवा । सांडुनियां ॥ ज्ञाने.७/१०५**

३) **तेव्हां तया महासुखाचेनि भरें । धांवोनि देहाचिये गावांबाहेरें ।**
**मिया धाले तेणें उद्गारें । लागती गाजों ॥ ज्ञाने.१०/१२५**

गाव आपले असते, तसा देह आपला. पण गावातील घर मात्र आपले जास्त मालकीचे. तद्वत देह गाव आहे व हृदय घर आहे.

**चिंता नाही 'गांवी' विष्णूदासाचिये । घोष जयजयकार सदा ॥१॥ तु.म.**

**नारायण 'घरी' सांठविले धन । अवघेचि वाण तयापोटी ॥२॥ तु.म.**

★★★★★

# (१३) दंभ

परमार्थातील जे काही अडथळे आहेत त्यातील एक महत्त्वाचा प्रतिबंध दंभ आहे. माऊली दंभाची व्याख्या सांगतात -

**जेणें सत्याचा भोकसा काढिला । मग असत्य तृणकुटा भरिला ।**
**तो दंभु रूढविला । जगीं इहीं ॥ ज्ञाने.३/२५०**

ज्याने सत्याच्या पोटी असलेला मालमसाला काढून त्याऐवजी असत्याचा पेंढा भरला, असा दंभ तो कामक्रोधांनी जगात प्रसिध्द केला. थोडक्यात पाप लपविणे व जगात पुण्य उघडे करणे, प्रसिध्द करणे यास दंभ म्हणतात. ज्ञानोबारायांनी दृष्टांत दिला आहे - चतुर माणूस गाईचे वासरू मेल्यानंतर त्याच्या कातडीत भुसा भरून गायीपुढे ठेवतो व गायीचे दूध काढतो. भोळी गाय आपले वासरू समोर पाहून दूध देते.

**पैं वासरुवाचा भोकसा । गाईपुढें ठेवूनि जैसा ।**
**उगाणा घेती क्षीररसा । बुद्धिवंत ॥ ज्ञाने.१६/३८६**

तद्वत काही हुशार, स्वार्थी माणसे एखादे धार्मिक कार्य लोकांसमोर ठेवून भाविक लोकांना लुटतात. याससुद्धा दंभ म्हणतात. गीतेमध्ये जी आसुरी संपत्ती सांगितली त्यातील पहिला क्रमांक दंभाचा आहे.

**दम्भो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ सम्पदमासुरीम् ॥ गीता. १६/४**

**तरी तयाचि आसुरां । दोषांमाजीं जया वीरा ।**
**वाडपणाचा डांगोरा । तो दंभु ऐसा ॥ ज्ञाने.१६/२१७**

माऊलींनी चार दृष्टांत दिले आहेत - आपली आई तीर्थरूप आहे पण लोकांमध्ये तिची उघड निर्भत्सना केली तर पतनास नेण्यास कारण होते. अथवा गुरूंनी दिलेली विद्या इष्ट फळ देणारी आहे. पण ती चव्हाट्यावर मांडली तर अकल्याणास कारण ठरते. किंवा जी नाव महापूरातून तारून नेऊ शकते ती डोक्यावर बांधली तर बुडविते. जगण्यास कारण असणारे अन्न वाजवीपेक्षा जास्त खाल्ले तर त्याचे विष होते. तद्वत दृष्ट, अदृष्ट हितास कारण असणाऱ्या धर्माचा जर डांगोरा पिटला तर दोष लागतो, यास दंभ म्हणतात.

दंभाचे अनेक प्रकार आहेत.

**जपदम्भाः तपोदम्भाः ध्यानदम्भास्तथैवच ।**
**सर्वे निस्पृहदम्भस्य कलां नार्हन्ति षोडशीम् ।। सुभा.**

**अर्थ** - जपदंभ म्हणजे मी एवढ्या कोटीचा जप केला म्हणून सांगणे. मी एवढी वर्षे तप केले असे लोकांना सांगणे, मी एवढे ध्यान करतो हे जनात प्रगट करणे पण या सर्व दंभात लोकांना लुटून मी निःस्पृह आहे असे सांगणे हा बाकीच्या दंभापेक्षा सोळा पटीने मोठा आहे. तुकोबारायांच्या शब्दात 'करूनि वस्ती बाजारीं । म्हणवी कासया निस्पृही ।।' काही माणसे प्रत्यक्षात कोणाकडूनही काही घेत नाहीत पण दुसऱ्या मार्गाने पैसे उकळतात. त्यांना प्रश्न विचारला, 'तुम्ही दुसऱ्याकडून काही घेत नाही मग नोकरी, व्यापार, शेती न करता तुमच्याजवळ एवढी संपत्ती कशी काय ?' याचे ते स्पष्ट उत्तर देऊ शकत नाहीत.

**दृष्टांत** - एका दांभिक साधूने मोठ्या जटा डोक्यावर चिकटविल्या होत्या. जटा धरण्याकरिता दोन शिष्य होते. हे वेषधारी साधू ज्या ठिकाणी गर्दी असायची त्या ठिकाणी प्रगट व्हायचे. लोकांना यांचे शिष्य सांगायचे हे त्रेता युगातील साधू आहेत. आपल्याला दर्शन देण्याकरिता आले आहेत. भोळे, बावळट लोक फसायचे व यांना भरपूर दक्षिणा मिळायची. एखाद्याने विचारले, 'राम अवतारात हे काय करत होते ?' शिष्य सांगायचे, 'रामाच्या पंगतीत हे तूप वाढत होते.' एका मिलिट्रीमधून निवृत्त झालेल्या कॅप्टनच्या कानावर हा प्रकार पडला. त्याने विचार केला, त्रेता युगातील माणूस अजूनपर्यंत जगणे शक्यच नाही. तो साधूच्या दर्शनासाठी उभा राहिला. साधुजवळ गेला व एक जोरात कानाखाली खेचली. त्याबरोबर सर्व चिकटविलेल्या जटा बाजूस पडल्या. शिष्य वैतागले. 'आपण हे काय केले ?' कॅप्टन म्हणाला, 'तुम्ही गप्प बसा. मी रामाच्या पंगतीत जेवावयास होतो. याने मला तूप वाढले नाही. बरेच दिवस मी याचा शोध घेत होतो. आज बरा सापडला !' अर्थात त्या दांभिक साधूने व त्याच्या शिष्यांनी आपला गाशा गुंडाळला व पसार झाले.

समाजामध्ये असे बरेच प्रकार होतात. पण मूर्ख लोकांच्या लक्षात फार उशिरा येते. त्यावेळी वेळ निघून गेलेली असते. तुकोबारायांनी दांभिक (वांझ) गरोदर स्त्रीचे उदाहरण दिले आहे. 'वांझेने

दाविले गऱ्हवार लक्षण । चिरगुटे घालून वाथयाला ।। तेवी शब्द ज्ञानीं करिती चावटी । ज्ञान पोटासाठी विकूनिया ।।' तु.म. मात्र देव ज्याच्यावर कृपा करतात, त्याचा दंभाचा डेरा फोडतात.

**डेरा फोडिला दंभाचा । त्रिगुण तिवईस ठाव कैचा ।**
**प्रपंच सडा हा ताकाचा । केला तुझीया कृष्णे ।। नाथ.**

ज्याला आपले खरोखरच कल्याण व्हावे वाटत असेल तर दंभापासून दूर राहावे. 'हित व्हावें तरी दंभ दुरी ठेवा । चित्त शुद्ध सेवा देवाची हे ।।' तु.म. तुकोबाराय म्हणतात, 'मान दंभ चेष्टा । हे तों शूकराची विष्ठा ।।' संतांनी कीर्तन केले पण दंभ बाजूस टाकून. 'थुंकोनिया मान । दंभ करितो कीर्तन ।।' तु.म.

समाजामध्ये दंभाचे प्रकार फार वाढले आहेत. एक महिला शेजाऱ्यास म्हणाली, 'आमचे हे (पती) एवढे धार्मिक आहेत की सकाळी उठून दोन तास पूजा केल्याशिवाय घराबाहेर पडत नाहीत.' चार वेळा हे ऐकल्यावर शेजारी म्हणाला ज्याला सर्व माहीत होते, 'आपले पतिराज रात्री तीर्थ (मदिरा) घेतल्याशिवाय झोपत नाहीत त्याचे काय ?' स्त्रीचा चेहरा उतरला. तात्पर्य - बहुतेक लोक पाप लपवितात व सत्कर्म सांगतात. काहीजण काहीही काम न करता मानाकरिता कॅमेऱ्यासमोर, सध्या व्हिडिओ शुटींगसमोर घुटमळतात. समजावे, हे दांभिक आहेत. परमार्थात काही सेवा न करता मोक्याच्या ठिकाणी मानाकरिता फक्त हजर राहतात, त्यांनासुद्धा दांभिक समजावे. परमार्थात अदंभपण असले पाहिजे. पुण्य लपवावे व पाप उघड करावे तरच प्रगती संभवते.

**शोके वियोग घडला सकळांचा । गेल्या शरण हा अन्याय आमुचा ।**
**केला उच्चार घडल्या दोषांचा' । झाला प्रगट स्वामी तुकयाचा वो ।। तु.म.**

**कथा -** एका गावाच्या बाहेर मठात एक संन्यासी रहात होता. निरपेक्ष म्हणून त्याची प्रसिद्धी होती. गावातील एक ब्राह्मण नोकरीतून सेवा निवृत्त झाला. पत्नी अगोदरच वारली होती. त्यास वाटले जन्मभर नोकरी केली आता तीर्थयात्रा करावी. पण मिळालेले पैसे कुठे ठेवायचे हा प्रश्न पडला. पन्नास हजार रुपये होते. त्या वेळी बँका नव्हत्या. त्यास वाटले हे पैसे निरपेक्ष संन्यास्याकडे ठेवावे व चार महिने यात्रा करून परत यावे. त्याने एका डब्यात पन्नास हजार घातले व गावाच्या बाहेर मठ होता तिथे संन्याशाजवळ जाऊन म्हणाला, 'महाराज हे माझे पन्नास हजार रुपये मी आपणाजवळ ठेवत आहे. कारण माझा कोणावर विश्वास नाही.' 'संताचिये पायी हा माझा विश्वास ।।' तु.म. 'मी चार महिन्यानंतर चारोधाम करून येतो व पैसे घेऊन जातो.' पण संन्यासी म्हणाला, 'मी पैशास शिवत सुद्धा नाही. (मैं तो पैसे को छूता नही) वहा खड्डा खोदो और रखो।' मठात एका कोपऱ्यात खड्डा खोदून सेवानिवृत्त ब्राह्मणाने पन्नास हजाराचा डबा ठेवला व निर्धास्त यात्रेस गेला. सर्व तीर्थयात्रा करून चार महिन्याने ब्राह्मण आला व संन्याशास म्हणाला, 'महाराज आपल्या कृपेने तीर्थयात्रा सफल झाली. डोळ्याचे पारणे फिटले आता मी माझे पैसे घेऊन जातो.' महात्मा म्हणाला, 'लेके

जाओ ।' पण ज्या ठिकाणी पैसे ठेवले होते त्या ठिकाणी खोदून पाहिले पण डबा गायब झाला होता. ब्राह्मणानी कपाळावर हात मारून घेतला. संन्याशी म्हणाला, 'मैं तो पैसे को छूता नही ।' लिखापटी नव्हती. कोण साक्षीदार नव्हता. कोणाकडे तक्रार करणार ! नशिबास दोष देत ब्राह्मण रडत घरी चालला होता. एका श्रीमंत बाईने ब्राह्मणास पाहिले. चेहरा उतरलेला होता. तिने विचारले, 'आपण चार महिने यात्रा करून आलात. चेहऱ्यावर आनंद हवा होता. पण डोळ्यात अश्रू दिसत आहेत. चेहरा उदास दिसत आहे.' त्याने सांगितले, 'मठातील संन्याशावर विश्वास ठेवला व त्याने मला उध्वस्त केले. मी महाराजाकडे विश्वासाने पन्नास हजार रुपये ठेवले होते. पण त्याने लंपास केले.' सर्व घटना सांगितली. श्रीमंत बाईस दया आली. म्हणाली, 'मी आपणास पैसे मिळवून देते पण माझ्या नाटकात आपण सामील व्हावे.' तो म्हणाला, 'पैसे मिळत असतील तर दहा वेळा नाटक करण्यास मी तयार आहे.'

श्रीमंत बाईने सांगितले, 'मी संन्याशाकडे पाच लाख रुपये घेऊन जाते. त्यांना सांगते माझा एकुलता एक भाऊ लापता आहे. त्यास शोधणे माझे कर्तव्य आहे. माझा कोणावर विश्वास नाही. मी आपणाकडे तीन लाख रुपये रोख व दोन लाखाचे दागिने ठेवत आहे. कृपया परत येईपर्यंत आपण सांभाळ करावा. आपण अर्ध्या तासाने यावे व सांगावे बाई आपण माझ्या ओळखीच्या आहात, माझे पन्नास हजार रुपये गायब झाले आहेत. आपले पाच लाख रुपये आहेत. आपण थोडा विचार करावा.' नोकरास सांगितले, 'तू ब्राह्मणानंतर अर्ध्या तासाने यायचे व म्हणायचे आपला भाऊ घरी परत आला. शोधण्यास जाण्याची गरज नाही.' सर्व प्लॅन ठरला.

बाई महाराजांच्याकडे गेली. तिने सांगितले, 'महाराज हे पाच लाख आपणाजवळ ठेवत आहे. माझा भाऊ चुकला आहे. त्यास शोधण्यास जाते आहे.' संन्याशी नेहमीप्रमाणे म्हणाला, '(मैं तो पैसे को छूता नही) वहा खड्डा खोदो और रखो। इधरसे चोरी नही हो सकती ।' बाईस संन्याशाने जागा दाखविली. ती खड्डा खोदणार एवढ्यात ब्राह्मण आला व म्हणाला, 'बाई माझे पन्नास हजार यांच्याकडे असेच खड्यात ठेवले होते पण यात्रेवरून येइपर्यंत गायब झाले आहेत.' संन्याशी भडकला व म्हणाला, 'कहाँ रखते हो और कहाँ ढुंढते हो ? यहाँ खोदो आपका पैसा मिल जाएगा ।' ब्राह्मणाने संन्याशाने दाखविलेली जागा खोदली. एका फुटावरच त्याचा डबा मिळाला. तो नाचतच आनंदाने घरी गेला. नोकर आला व म्हणाला, 'बाईसाहेब आपला भाऊ आत्ताच घरी आला आहे. शोधण्याची गरज नाही.' बाईपण आनंदाने घरी निघाली. म्हणाली, 'महाराज काय आपल्या दर्शनाचा प्रभाव आहे. दर्शन घेतल्याबरोबर माझा भाऊ घरी आल्याची बातमी मिळाली. आता पैसे ठेवण्याची गरज नाही.' दोघे घरी गेल्यानंतर संन्याशाचा चेहरा पडला. त्याचे दोन शिष्य समोर होते. ते गालातल्या गालात हसायला लागले. महात्म्यास राग आला व म्हणाला, 'मुरख क्यों हँसते हो ?' त्यांनी विचारले, 'ब्राह्मण क्यों हँसा ?' महाराज म्हणाले, 'अरे उसका पैसा उसने पाया ।' शिष्य म्हणाले, 'वो बाई क्यों हँसी ?' 'अरे उसका भाई आया । लेकीन मुरख तुम क्यों हँसते हो ?' शिष्य म्हणाले,

'महाराज, हम इसलीये हँसते है वो भी गया और ये भी गया।' समाजात बरेच प्रकार असेच चालले आहेत. वरून विरक्ती आतून पक्की आसक्ती.

सध्या कोणावर विश्वास ठेवावा हा यक्ष प्रश्न निर्माण झाला आहे. पतपेढ्या लोकांना फसवित आहेत. काही बँका बुडत आहेत. काहीतरी योजना काढून धूर्त लोक गरीब लोकांचे पैसे आपल्या खिशात कसे जमा होतील याकडे पहात आहेत. परमार्थ करणारी माणसेपण परमार्थाच्या नावावर आपली श्रीमंती वाढवित आहेत. एकूण सगळा घोळ आहे.

लेखकाचे मत आहे पैसे ठेवताना दहा वेळा विचार करा. पोस्टात अथवा राष्ट्रीयकृत बँकेत ठेवा अथवा जमिनीत गुंतवा. जास्त व्याजाच्या लोभाने पैसा कोणाच्यातरी घशात घालू नका व दुःख ओढवून घेऊ नका. माऊली सांगते, 'भांडवल परत येईल की नाही याचा विचार न करता मुर्ख माणसे चोरास भांडवल देतात.'

**कां दिधलें मागुती येईल । कीं न ये हें पुढील ।**
**न पाहातां दे भांडवल । मुर्ख चोरा ॥ ज्ञाने १६/२८३**

★★★★★

## (९४) मस्तक

आपल्या शरिरातील महत्त्वाचा भाग म्हणजे आपले मस्तक होय.

**सर्वौषधीनाममृतप्रधानं सर्वेषु सौख्येष्वशनं प्रधानम् ।**
**सर्वेंद्रियाणां नयनं प्रधानं सर्वेषु गात्रेषु शिरः प्रधानं ॥ चाणाक्य**

**अर्थ -** सर्व औषधात अमृत मुख्य, सर्व सुखात जेवणाचे सुख मुख्य. सर्व इंद्रियात डोळा मुख्य व गात्रात डोके महत्त्वाचे आहे. माणसाचा जन्म डोक्याकडून होतो. डोके मुख्य कारण. येथे सर्व निर्णय घेतले जातात. डोके मूळ व बाकीची इंद्रिये फांद्या आहेत. माणसाची ओळख चेहऱ्यामुळे होते. फोटो जवळ असतो तो मुखाचा. शिवाय चेहरा हा मनाचा आरसा आहे.

**विशेष -** डोक्यात मेंदू आहे. प्रत्येकाच्या मेंदूत सात कोटी तंतू आहेत. शिवाय एका तंतूत एक कोटी स्मृती साठवण्याची क्षमता आहे. म्हणून प्रत्येकाने कोणतेही काम करताना मेंदू वापरावा. पूर्वीचे ब्राह्मण - पंडित चार वेद, सहा शास्त्रे, अठरा पुराणे, डोक्यात ठेवत होते.

रस्त्यावर पोलीसांची सीमा (हद्द) दाखविली जाते. रस्त्याच्या रेषेवर एखादा अपघात झाला तर ज्या बाजूला डोके असते त्या बाजूच्या पोलिसांना ते प्रेत उचलावे लागते व पंचनामा करावा लागतो.

**कथा -** एकदा एक राजा व प्रधान शिकारीकरिता जंगलात गेले. शिकार मिळाली नाही. जंगलात देवीचे पुरातन मंदिर होते. ते दोघे दर्शनाकरिता मंदिरात गेले. दोघे भाविक असल्यामुळे साष्टांग नमस्कार केला. त्या मंदिरात एक राक्षस रहात होता. आडवे पडल्यानंतर अचानक राक्षस आला व तलवारीने राजा व प्रधानाचे मस्तक धडावेगळे केले. राक्षस पळून गेला. सेवक बरोबर होते पण चुकामूक झाली होती. सेवक राजास व प्रधानजीस शोधत मंदिरात आले. पाहतात तो राजा व प्रधानजीचे शिर धडावेगळे झाले आहे. काहीजण मंदिरात राहिले. काहीजण राजवाड्यात गेले. राणीस व प्रधानजीच्या पत्नीस बातमी कळली. त्यांच्यावर दुःखाचा डोंगर कोसळला. त्या दोघी मंदिरात आल्या व देवीसमोर अनुष्टान मांडले. देवीला साकडे घातले, 'जोपर्यंत आमचे पती जिवंत होत नाहीत तोपर्यंत आम्ही जेवणार नाही, झोपणार नाही किंबहूना पाणी पिणार नाही.' सात दिवसाच्या अनुष्टानानंतर देवी प्रसन्न झाली. दोघींना वर मागण्यास सांगितले. दोघींनी सांगितले, 'पती जीवंत करा.' देवी म्हणाली, 'मुंडी धडास लावा.' दोघींना आनंद झाल्यामुळे गडबडीने मुंडी धडास लावली. दोघेही, राजा, प्रधान जिवंत झाले पण घोटाळा असा झाला राजाचे मस्तक व प्रधानजीचे धड, प्रधानजीचे मस्तक व राजाचे धड. राणी व प्रधानजीच्या पत्नीस प्रश्न पडला नवरा म्हणून कोणास स्विकारायचे ? परत अनुष्टान मांडले. चार दिवसाने देवी म्हणाली, 'चूक तुमची आहे. ज्याचे मस्तक तो राजा. धड प्रधानजीचे असले तरी ते महत्त्वाचे नाही. याचे कारण 'शिर सर्वांगा प्रमाण । यथाविधी करचरण । धर्माचे पाळण । सकळी सत्य करावें ॥' तु.म. तात्पर्य - सर्व शरीरात शिर महत्त्वाचे आहे.

असे महत्त्वाचे मस्तक कोठे वापरावे ? संतांचे मत आहे या मस्तकाची शोभा संतांचे चरण. 'धन्य हे मस्तक सर्वांगा शोभले । संताची पाऊले लागताची ॥' तु.म. 'श्रीसंताचिये 'माथा' चरणावरी । साष्टांग हे करी दंडवत ॥' तु.म. 'मस्तक ठेंगणा । करी संताच्या चरणा ॥' तु.म. 'काय वाणू आता न पुरे हे वाणी । मस्तक चरणी ठेवीतसे ॥' तु.म. 'मस्तक माझा पायावरी । या वारकरी संताच्या ॥' निळो. संतांच्या चरणावर डोके ठेवणे याचा अर्थ त्यांचे विचार डोक्यात ठेवणे. 'संतांचा उपदेश आमुच्या मस्तकी । नाही हे लौकीकी रहाणे साच ॥' तु.म. तुलशीदास म्हणतात जे मस्तक देवाच्या, गुरूच्या संतांच्या चरणावर झुकले जात नाही, ते डोके म्हणजे कडू भोपळा. 'ते सिर कटु तुंबरी सम तूला । जे न नमत हरी गुरपद मूला ॥'

**कथा -** कलिंग युद्ध जिंकल्यानंतर सम्राट अशोक राजास फार दुःख झाले कारण फार मोठी जीवित हानी झाली होती. पश्चाताप झाल्यामुळे अशोक राजाने बुद्धधर्म स्विकारला. एकदा एक बौद्ध भिक्षुक सम्राटांना भेटण्याकरिता आला. धर्म स्विकारल्यामुळे अशोक राजाने भिक्षुकाच्या पायावर डोके ठेवले. मात्र हे वागणे प्रधानजीला आवडले नाही. एकदा एकांतात असताना प्रधानजी म्हणाले, 'राजे सरकार आपण सामान्य भिक्षुच्या पायावर डोके ठेवले हे कोणास आवडले नाही. मलाही हे बरोबर वाटले नाही.' राजाने प्रधानजीचे मनोगत ओळखले. त्यांच्या मनात कुठे हा सामान्य भिक्षुक व कुठे सम्राट अशोक ! काही दिवसांनी राजाने प्रधानजीस जनावराच्या, मोठ्या पक्षांच्या कवट्या

जमा करण्यास सांगितले. प्रधानजीने वाघ, हत्ती, कोल्हा, लांडगा, गरूड, वगैरेच्या कवट्या जमा केल्या. राजाने त्यात माणसाची कवटी जमा केली. प्रधानजीस सांगितले, 'बाजारात जा व सर्व कवट्या विकून ये.' सर्व कवट्यास लेबल लावून बाजारात कवट्या मांडल्या. संध्याकाळपर्यंत सर्व कवट्या गेल्या. पण माणसाची कवटी गेली नाही. बातमी राजास सांगितली. सर्व कवट्या विकल्या गेल्या पण माणसाची कवटी कोणी घेतली नाही. राजाने सांगितले, 'ही कवटी उद्या फुकट देऊन ये.' दुसऱ्या दिवशी तसा प्रयत्न केला पण माणसाची कवटी कोणी फुकट पण घेतली नाही. प्रधानजी परत आले. 'या कवटीकडे कोणी पाहातही नाही.' राजा म्हणाला, 'ही कवटी म्हणजे 'धोका' आहे.' (पावर हाऊसच्या खांबावर ही कवटी व दोन हाडे लावतात व खाली लिहितात 'धोका'.) राजा प्रधानजींना म्हणाला, 'मेल्यानंतर या कवटीचा काहीच उपयोग नाही. मग जिवंतपणी ही भिक्षुकांच्या, संतांच्या चरणावर का ठेवू नये ? पण त्यांच्या चरणावर डोके ठेवा ज्याचे आचरण चांगले आहे. आचारभ्रष्ट लोकांच्या चरणावर डोके ठेवले तर ते बिघडण्याची शक्यता आहे.' नाथ महाराज म्हणतात, रात्रंदिवस माऊलीच्या चरणावर डोके ठेवा. 'श्री ज्ञानदेवा चरणी । मस्तक असो दिवस रजनी ॥' तुकाराम महाराज म्हणतात मी मरेपर्यंत यांच्याच चरणावर डोके ठेवणार, मरणातून वाचलो म्हणजे मुक्त झालो, भक्त म्हणून जन्म घेतला तरी संतांच्याच चरणावर डोके ठेवणार. 'येथोनिया नुठऊ माथा । मरणावाचूनि सर्वथा ॥' तु.म.

★★★★★

## (९५) युग संख्या

मनु अथवा मनुपुत्र याचा कार्यकाल यास मन्वन्तर म्हणतात.

मनुष्य १ महिना - १ दिवस - रात्र - पितर

मनुष्य १ वर्ष - १ दिवस - रात्र - देवता

मनुष्य ३० वर्षे - १ महिना - देवता

मनुष्य ३६० वर्षे - १ देवता वर्ष (दिव्यवर्ष)

मानववर्ष - ४,३२,००० - १,२०० दिव्यवर्ष - १ कलियुग

मानववर्ष - ८,६४,००० - २,४०० दिव्यवर्ष - १ द्वापारयुग

मानववर्ष - १२,९६,००० - ३,६०० दिव्यवर्ष - १ त्रेतायुग

मानववर्ष - १७,२८,००० - ४,८०० दिव्यवर्ष - १ सत्ययुग

एकूण ४३,२०,००० मानववर्षे - १,२०० दिव्य वर्षे यास १ महायुग अथवा चतुर्युगी म्हणतात.

७१ युगाचे एक मन्वन्तर होते. ३०,६७,२०,००० मानव वर्षे प्रत्येक मन्वन्तराच्या शेवटी सत्ययुगाच्या वर्षाएवढी संख्या होते. (अधीक महिन्यासारखी)

अर्थात ३०,६७,२०,०००+१७,२८,००० = ३०,८४,४८,००० संधीसहित एक मन्वन्तर होते.

१४ मन्वन्तर = १ कल्प म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस कल्पाच्या आरंभी एक संध्या - सत्ययुगाच्या वर्षाएवढी, एकूण-१५ संध्या होतात. अर्थात ६ महायुग.

१ कल्प म्हणजे १४ मन्वन्तर - मध्ये ७१ चौकड्या+१५ संध्या ९९४ महायुग+६ महायुग = १,००० महायुग किंवा दिव्ययुग.

१ महायुग = ४३,२०,००० मानववर्षे - १२,००० दिव्य वर्षे

७१ महायुग = ३०,६७,२०,००० मानववर्षे - ८,५२,००० दिव्य वर्षे

कल्पसंधी = १७,२८,००० मानववर्षे - ४८,००० दिव्य वर्षे

मन्वन्तर २१४ संध्या = २,४१,९२,००० मानववर्षे - ६७,२०० दिव्य वर्षे

संधीसहित १ मन्वन्तर = ३०,८४,४८००० मानववर्षे - ८,५६,८०० दिव्य वर्षे

| | | मानव वर्षे | | दिव्य वर्षे |
|---|---|---|---|---|
| १४ संधीसहित १४ मन्वन्तर | - | ४,३१,८२,७२,००० | = | १,१९,९५,२०० |
| कल्पाची संधीसहित १४ मन्वन्तर किंवा १ कल्प | - | ४,३२,००,००,००० | = | १,२०,००,००० |

१ कल्प म्हणजे ब्रह्मदेवाचा १ दिवस, तेवढीच रात्र

दिवस उगवल्यानंतर त्रैलोक्य सृष्टी होते. समाप्तीनंतर रात्र होते.

दिवस = ४,३२,००,००,०००

रात्र = ४,३२,००,००,०००

८,६४,००,००० मानव वर्ष

x ३० दिवस

२,५९,२०,००,००,००० १ महिना

x १२ महिने

३१,१०,४०,००,००,००० १ वर्ष (ब्रह्मदेवाचे)

असे १०० वर्षे - १ ब्रह्मदेव परमायुष्य = याला पर म्हणतात. आता ब्रह्मदेवाचे ५० वर्षे (१ परार्ध) संपले असून ५१ वर्षामधला प्रथम दिन किंवा कल्प चालू झाला आहे.

२ परार्ध आदि व शेवटी क्रमशः बाह्म आणि पादम - २ विशेष कल्प होतात.

याप्रमाणे ब्रह्मदेवाचे १ महिना ३० दिवसाचे ३० कल्प + २ कल्प = ३२ कल्प होतात.

१ परार्ध कल्पाची गणना - रथान्तर कल्पाने होते.

२ परार्ध कल्पाची गणना - श्वेतवराह कल्पाने होते. (सध्या चालू आहे.)

**मन्वन्तराची १४ नावे**

१) स्वायम्भुव
२) स्वारोचिष
३) औत्तम
४) तामस
५) रैवत
६) चाक्षुष
७) वैवस्वत
८) सूर्य सावर्णी
९) दक्ष सावर्णी
१०) ब्रह्म सावर्णी
११) धर्म सावर्णी
१२) रुद्र सावर्णी
१३) रौच्य
१४) भौत्य

सध्या वैवस्वत मन्वन्तर चालू आहे. त्याच्यातील २७ युगे संपली आहेत. २८ युगातील तीन युगे संपून कलीयुग चालू आहे. म्हणून नामदेवराय म्हणतात 'युगे अठ्ठावीस विटेवरी उभा'

१) गीतेच्या आधारे ब्रह्मदेवाचे आयुष्य १०० वर्षे

**सहस्त्रयुगपर्यन्तमहर्यदब्रह्मणो विदुः ।**
**रात्रिं युगसहस्त्रान्तां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ गी.८/१७**

**अर्थ** - एक सहस्र युगे (चार युगांच्या चौकड्या) झाली म्हणजे संपणारा असा ब्रह्मदेवाचा एक दिवस होय आणि एक हजार युगे राहणारी ब्रह्मदेवाची एक रात्र होय (८ हजार युगे) असे जे जाणतात ते अहोरात्र जाणणारे होत.

२) भागवताच्या आधारे ब्रह्मदेवाचे आयुष्य २ परार्ध वर्षे आहे. परार्ध म्हणजे १००००००००००००००००० याच्या दुप्पट

**लोकानां लोकपालानां मद्भयं कल्पजीविनाम् ।**
**ब्रह्मणोऽपि भयं मत्तो द्विपरार्ध परायुषः ॥ भागवत ११/१०/३०**

ब्रह्मदेवाससुद्धा पुनरावृत्ती आहे. जन्म-मरण आहे.

**एऱ्हवीं ब्रह्मपणाचिये भडसे । न चुकतीचि पुनरावृत्तीचे वळसे ।**
**परि निवटलियाचें जैसे । पोट न दुखे ॥ ज्ञाने.८/१५२**

★★★★★

# (१६) चातुर्य

ज्ञानोबाराय म्हणतात महाभारत कथा म्हणजे चतुरास शहाणा करण्याऱ्या कथा आहेत.

**एथ चातुर्य शहाणे झालें । प्रमेय रुचीस आलें ।**
**आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें एथ ॥ ज्ञाने १/३५**

या जगात चातुर्यास फार मान आहे. ब्रह्म देवास चतुरानन म्हणतात. याचे कारण त्यांनी विविध सृष्टी निर्माण केली. सध्या जगाची संख्या ६०० कोटी आहे पण या सहाशें कोटीत एकासारखा एक माणूस निर्माण केला नाही. 'पाग भाग वाणी प्रकृति आकृति वचन विवेक । अक्षर न मिले एकसे देखे देश अनेक ॥' पगडी, भाग्य, वाणी, शरीर, आकृती, वचन, विवेक हे प्रत्येकाचे वेगळे आहे. प्रत्येकाच्या आंगठ्याच्या रेषा वेगवेगळ्या आहेत. प्रत्येकाचे चालणे वेगळे आहे. याचे सर्व श्रेय ब्रह्मदेवास आहे. हे एवढे चतुर तर यांचे पिता विष्णू किती चतुर असतील !याची कल्पना करता येत नाही. हा चतुराचा शिरोमणी आहे. 'चतुरा तू शिरोमणी । गुण लावण्याची खाणी । मुगूट सकळा मणीं । धन्य तूचि विठोबा ॥' तु.म. वक्त्यांकडून ऐकलेल्या काही चातुर्य कथा -

१) **चतुर भविष्यकार -** एका राजासमोर एक भविष्यकार येतो. राजा सहज प्रधानजीचे भविष्य विचारतो. भविष्यकार सांगतो हा प्रधान उद्या मरणार आहे. प्रधानजी मरतो. सर्वांना मोठे आश्चर्य वाटते. राजा म्हणतो माझे भविष्य सांगू नकोस. मला भीती वाटते. तू बोललेले खरे होते. पण भविष्यकार पटकन सांगतो मी मेल्यानंतर आपण तीन दिवसांनी मरणार आहात. आपण लवकर मरू नये म्हणून ५-६ नोकर ठेवून राजा भविष्यकाराची काळजी घेतो.

२) एका मुलाखत घेणाऱ्या मॅनेजरने समोरील विद्यार्थ्यास विचारले, 'घड्याळात चार वाजले आहेत. पण ठोके १० झाले तर कोणती वेळ झालेली आहे ?' चतुर विद्यार्थी म्हणाला, 'घड्याळ दुरुस्त करण्याची वेळ झाली आहे.'

३) मुलाखतीत विद्यार्थ्यास विचारले या हॉलमध्ये निर्वात वस्तू कोणती आहे ? त्याने सांगितले या हॉलमध्ये सर्व बल्ब व ट्यूब निर्वात आहेत.

४) एका गावात एक सरपंच रहात होता. त्याच्या जवळ १९ घोडे होते. त्याने आपले मृत्यूपत्र लिहिले होते. सरपंच लवकरच वारला. त्याने मृत्यूपत्रात लिहिले होते माझ्या १९ घोड्यापैकी १/२ घोडे मुलास द्यावे. १/४ घोडे भावास द्यावे व माझी आयुष्यभर सेवा करणारा नोकर यास १/५ घोडे द्यावे. समाजासमोर जेव्हा हे मृत्यूपत्र आले, पण कोणाचेही डोके चालले नाही. बऱ्याच दिवसांनी एक वारकरी घोड्यावरून वारीस जात होता. गावाच्या काही लोकांनी रात्री कीर्तन ऐकल्यानंतर, हुशार वारकऱ्यास विचारले, 'आमच्या गावातील सरपंचानी मृत्यूपत्र लिहिले आहे. त्याचे कोडे कोणास

सुटत नाही.' वारकरी म्हणाला मृत्यूपत्र आणा. सर्व गावकरी सकाळी जमा झाले. वारकरी म्हणाला सोपे आहे. घोडे घेऊन या व त्या तिघांना बोलवा. मुलगा, भाऊ, नोकर हजर झाले. वारकऱ्याने आपला घोडा १९ घोड्यात मिसळला. घोडे २० झाले. सर्वांना वाटले वारकरी आपला घोडा यांना देऊन जातो आहे. 'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती ।' पण २० पैकी १/२ घोडे म्हणजे १० घोडे मुलास दिले. १/४ घोडे भावास म्हणजे ५ घोडे दिले व १/५ नोकरास म्हणजे ४ घोडे नोकरास दिले. १०+५+४ = १९ घोडे झाले. स्वतःचा घोडा घेऊन वारकरी पंढरपूरास गेला.

५) राजाच्या दरबारात एक वृद्ध पोहोचला. राजास म्हणाला, 'मी आपला मावस भाऊ आहे. कधी काळी मी आपल्यासारखा होतो. माझ्याजवळ ३२ नोकर होते. पण कालांतराने एक एक निघून गेले. दोन मित्र आहेत पण बरोबर चालत नाहीत. दोन भाऊ आहेत पण मोठ्या मुश्किलीने काम करतात. माझी पत्नी उलटी-सुलटी उत्तर देते. माझी अडचण समजून घ्या व मला मदत करा.' राजाने मोठा आदर केला व त्यास काही रुपयांची थैली दिली. म्हातारा निघून गेला पण प्रधानजींना व इतर मंत्र्यांना मोठे आश्चर्य वाटले. त्यांनी राजास विचारले हा दरिद्री म्हातारा आपला मावस भाऊ असेलच कसा ? राजाने सांगितले, 'याने माझ्या कर्तव्याची जाणीव करून दिली आहे. याचे ३२ नोकर म्हणजे दात गेले आहेत. दोन मित्र म्हणजे पाय बरोबर चालत नाहीत. दोन भाऊ म्हणजे दोन हात बरोबर काम करत नाहीत. याची पत्नी म्हणजे बुद्धी उलटी-सुलटी निर्णय घेते. माझी आई श्रीमंती व त्याची आई गरिबी या बहिणी असल्यामुळे हा माझा मावस भाऊ होतो.' राजाने कर्तव्यपालन करीत उरलेले आयुष्य भगवत भक्ती करीत घालविले.

६) एका गावात एक भविष्यकार रहात होता. एकाची बायको गरोदर होती. आतुरता वाढली म्हणून त्याने भविष्यकारास विचारले, 'माझ्या पत्नीस कोणते अपत्य होईल मुलगा का मुलगी ?' भविष्यकाराने एक चिठ्ठी दिली व म्हणाला, 'आपली पत्नी बाळंतीण झाल्यानंतर चिठ्ठी उघडायची. मी त्यात भविष्य लिहिले आहे.' त्याच्या पत्नीस काही दिवसांनी मुलगा झाला. त्याने चिठ्ठी उघडली. त्यात लिहिले होते 'बेटा न बेटी'. तो पेढे घेऊन गेला व म्हणाला, 'महाराज मला मुलगा झाला आहे. पण आपण काय लिहिले आहे ?' तो म्हणाला, 'मी आपले भविष्य बरोबर सांगितले आहे. आपणास बेटाच होणार हे लिहिले आहे न बेटी म्हणजे मुलगी होणार नाही.' तो खुश होऊन घरी गेला. गावात भविष्यकाराची प्रसिद्धी झाली. दुसऱ्याची पत्नी गरोदर होती. तो विचारण्याकरीता गेला. त्यासही तशीच चिठ्ठी दिली व प्रसुतिनंतर उघडण्यास सांगितली. त्याची पत्नी बाळंतीण झाली. त्याला मुलगी झाली होती. त्याने चिठ्ठी उघडली पण चिठ्ठीत लिहिले होते 'बेटा न बेटी'. तो तसाच भविष्यकाराकडे बर्फी घेऊन गेला. 'पहिली बेटी, धनाची पेटी' म्हणून त्यास आनंद झाला होता. म्हणाला, 'महाराज मला मुलगी झाली आहे पण आपण चिठ्ठीत काय लिहिले आहे.' तो म्हणाला, 'तुम्हास मुलगी होईल असेच लिहिले आहे. आपण किती शिकला आहात ? बेटा न, बेटी. याचा अर्थ आपणास मुलगा होणार नाही. मुलगीच होईल.' तिसरा गेला. त्याची पत्नीपण गरोदर होती. त्यास

सुद्धा तशीच चिठ्ठी दिली व तसेच सांगितले. त्यास नपुंसक अपत्य झाले. त्याने चिठ्ठी उघडली व सरळ रागाने भविष्यकाराकडे गेला. म्हणाला, 'हे आपण काय लिहिले आहे ?' त्याने सांगितले, 'मी योग्य लिहिले आहे. मधला 'न' दोन्हीकडे लावायचा म्हणजे आपणास न बेटा न बेटी. म्हणजे असे नपुंसक अपत्य होईल हे माझे चिठ्ठीतील भविष्य तंतोतंत खरे आहे.'



# (१७) कर्माचे वर्म

१) **शारीरिक कर्म** - शरीरावर संसार, परमार्थ अवलंबून आहे. म्हणून शरीराची काळजी घेणे अति आवश्यक आहे. सूर्योदयाच्या अगोदर उठणे, दात घासणे, आंघोळ करणे, व्यायाम करणे, योग्य आहार घेणे यास शरीरिक कर्म म्हणतात.

२) **धर्म कर्म** - सकाळी देवाची पूजा करणे, ठराविक जप करणे, अतिथी सत्कार करणे, गरिबास मदत करणे, पक्षांना धान्य टाकणे यास धर्म कर्म म्हणतात.

३) **व्यवसाय कर्म** - आपल्या वाट्यास आलेले कर्म प्रामाणिकपणे करणे, शेती, व्यापार व नोकरी करणे यास व्यवसाय कर्म म्हणतात. 'चाकरीवाचून । खाणे अनुचित वेतन ॥' तु.म. कष्टाशिवाय फुकटचे खाणे हा अपराध आहे.

४) **कर्तव्य कर्म** - पत्नीने पतीची सेवा, पतीने पत्नीच्या गरजा, मुलाने आई-वडिलांचा सांभाळ, सेवकाने स्वामीचे काम, शिष्याने गुरूची सेवा यास कर्तव्य कर्म म्हणतात. 'स्वामी काज गुरुभक्ति। पितृवचन सेवा पती ।। हेचि विष्णूची महापूजा । अनुभाव नाही दुजा ॥' तु.म.

५) **अध्यात्मिक कर्म** - सत्संग करणे, कीर्तन ऐकणे, देव जोडण्याकरिता जे सत्कर्म आहे त्यास अध्यात्मिक कर्म म्हणतात.

**परि संतासवें वसतां । योगज्ञानीं पैसतां ।**
**गुरुचरण उपासितां । वैराग्येंसी ।। ज्ञाने.१५/४२२**

**येणेंचि सत्कर्में । अशेषही अज्ञान विरमे ।**
**जयांचे अहं विश्रामे । आत्मरूपीं ॥ ज्ञाने.१५/४२३**

माणसास देव कर्माप्रमाणे फिरवित असतो.

६) गीतेत वर्णाप्रमाणे कर्म सांगितले आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांची कर्मे वेगवेगळी आहेत.

**दृष्टांत १ -** महाराज जयवर्धन एकदा सेनापतीबरोबर फिरण्यास वनात जातात. अचानक राजा प्रश्न विचारतो, 'मी राजा का ? आपण सेनापती का ?' सेनापती म्हणतात, 'जंगलात त्रिकालदर्शी सरपहा महाराज राहतात. त्यांनाच विचारू.' दोघे साधूजवळ येतात व त्याला विचारतात, 'राजा म्हणतो मी राजा का व हे सेनापती का ?' सरपहा महाराज सांगतात आपण वीस कोस घोड्यावरून जा. एक दगड खाणारा भेटेल, त्यास विचारा. तो उत्तर देईल.' राजा, सेनापती वीस कोस जातात. दगड खाणारा माणूस भेटतो. त्यास प्रश्न विचारतात. दगड खाणारा सांगतो, वीस कोस घोड्यावरून जा. तेथे माती खाणारा माणूस आपल्या प्रश्नाची उत्तरे देईल. राजा व सेनापती वीस कोस गेल्यानंतर माती खाणारा माणूस भेटतो. त्यास विचारतात. पण तो सांगतो आपण वीस कोस जा. एक भूकेने तडफडणारा माणूस आपणास आपल्या प्रश्नांचे उत्तर देईल. हा तिसरा माणूस या दोघांना साधारण ओळखतो. उत्तर सांगतो, 'आपण मागच्या जन्मी प्रवास करीत असताना एका तळ्याकाठी जेवत होतो. प्रत्येकाजवळ एक-एक भाकरी होती. जेवताना अचानक एक साधू आला. म्हणाला, 'काही असल्यास द्या. मला फार भूक लागली आहे.' एक म्हणाला दगड खा, दुसरा म्हणाला माती खा, तिसरा म्हणाला तडफडत रहा. चौथा म्हणाला मी दिली असती. पण भाकरीच संपली. पाचव्याने साधूस आपली अर्धी भाकरी दिली. अर्धी भाकरी देणारे आपण राजे झालात. विनयाने नाही म्हणणारे हे सेनापती झाले. मी तडफडत राहतो आहे. एक माती खातो आहे व एक दगड खातो आहे. राजा, सेनापती व तिघेजण सरपहा महाराजाकडे आले. महाराज म्हणाले, 'मीच भाकरी मागणारा साधू मागच्या जन्मी आपल्याकडे तळ्याच्या काठी भाकरी मागितली. मी मनातून काहींना धिक्कारले, व काहींना आशीर्वाद दिला. तुम्हांस शापमुक्त केल्याशिवाय मी मुक्त होत नाही. आपण भेटलात, आपणास मी शापमुक्त करतो व मीपण कर्मातून मुक्त होतो.' तात्पर्य - कर्म कोणास सुटत नाही, मग ते ज्ञात असो वा अज्ञात.

**दृष्टांत २ -** एका गावात एक मुलगा नास्तिक होता. बाप मात्र आस्तिक होता. मुलगा नेहमी वडिलांना म्हणायचा, 'देव एकास सुखी ठेवतो - एकास दुःखी ठेवतो. पंक्तिभेद करतो.' दोघे शेतकरी असल्यामुळे एकाच शेतात वडिलांनी ऊस, कारले, गुलाबाचे झाड लावले. झाडे वाढल्यानंतर बापाने मुलास विचारले, 'एकाच पाण्यामुळे, एकाच सूर्यप्रकाशात, एकाच शेतात कारले कडू का ? ऊस गोड का ? गुलाब सुगंधी का ?' मुलगा म्हणाला, 'हा पाण्याचा, प्रकाशाचा, शेताचा दोष नाही. हा दोष बीजाचा आहे.' बाप म्हणाला, 'तसा श्रीमंती, दारिद्र्य हे देव देत नाही. हा प्रत्येकाच्या कर्माचा दोष आहे.'

**जैसें जीवनचि उदक । परी विषीं होय मारक ।**
**कां मिरयामाजीं तीख । ऊंसीं गोड ।। ज्ञाने. १७/६८**

एकाच कुंभाराने एकाच मातीपासून, एकाच चक्रावर, एकाच आळ्यात भाजलेली मडकी

वेगवेगळ्या कारणांसाठी उपयोगात आणली जातात. एका मडक्यात तूप साठविले जाते, एकात भात शिजविला जातो, एकात पैसे ठेवले जातात पण एखादे मडके शौचाकरिता वापरले जाते. ही कर्माची गती आहे.

**कुंभ अवघा एक आवा । पाकी एकीं गू फेडावा ।।१।। तु.म.**

**ऐसे भिन्न भिन्न साठे । केले प्रारब्धाने वाटे ॥ २॥ तु.म.**

**दृष्टांत ३ -** एक लाकूडतोड्या रोज जंगलातील लाकडे तोडून शहरात विकून उदरनिर्वाह करतो. एक सज्जन माणूस सल्ला देतो, 'आगे बढो !' तो जंगलात पुढे गेल्यानंतर चांगल्या प्रतीची झाडे मिळतात. त्यास बाजारात उत्तम भाव मिळतो. आणखी थोडे पुढे गेल्यानंतर चंदनाची झाडे मिळतात. पहिल्यापेक्षा त्याचा जास्त फायदा होतो. काही दिवसांनी तो जंगलात आणखी पुढे जातो. त्यास डोंगरात तांब्याची खाण सापडते. आणखी पुढे गेल्यावर चांदीची खाण सापडते. त्याच्या पुढे गेल्यानंतर सोन्याची खाण लागते. अशा प्रकारे तो माणूस कष्ट करून श्रीमंत झाला. तात्पर्य - कर्म करीत राहिलात तर फळ मिळत रहाणारच. माणसाने सतत काही ना काही करीत रहावे. आळसात राहू नये कारण ही कर्मभूमी आहे. 'कांडिल्या कुटिल्या होतो मांडा । आळसे धोंडा पडतसे ॥' तु.म.

**कर्मफल -** एकदा सर्व शिष्यांनी गुरूंना विचारले, 'स्वर्ग व नरक कसे असतात ?' गुरू म्हणाले, प्रत्येकाच्या कर्मानुसार !' शिष्य म्हणाले, 'प्रत्यक्ष दाखवा.' गुरू शिष्यांना घेऊन फिरू लागले.

१) एका घरात फासे पारधी रहात होता. तो जनावरे, पक्षी मारून पोट भरत होता. त्याची मुले मात्र कुकर्मी, दुर्गुणी होती. घरात नेहमी कलह असायचा. जवळ जवळ नरकच.

२) दुसरे घर वेश्येचे होते. आपल्या यौवनात या बाईने खूप पैसा कमविला व घालविलासुद्धा. मात्र म्हातारपणी तिला कोणाचा आधार नव्हता. भीक मागत होती.

३) तिसरे घर सद्गृहस्थाचे होते. तो स्वतः संयमी, परिश्रमी, उदार व सद्गुणी होता. त्यामुळे त्याचा सर्व परिवार समाधानी होता.

४) चौथे घर शिष्यांना दाखविले ते साधूचे होते. तो आपल्या अध्यात्मिक मस्तीत जगत होता. गांवातील सर्व लोक त्याच्या पायावर मस्तक ठेवीत होते. कांही विद्यार्थी शिकण्याकरिता येत होते. गुरूंनी शिष्यांना नरक व स्वर्ग याची दोन दोन रूपे दाखविली.

**कथा -** एका गावात एक फकिरचंद राहतो. तो अतिशय श्रीमंत असतो. एकदा तो एका महात्म्याच्या दर्शनास जातो. महात्म्यास शेठ विचारतो, 'जीवनामध्ये काय करावे म्हणजे समाधान प्राप्त होईल ?' महात्मा सांगतो, 'आपण श्रीमंत आहात. दान करीत रहा म्हणजे समाधान प्राप्त

होईल.' हा फकिरचंद खूप दानधर्म करतो, परोपकार करतो. काही दिवसांनी महात्मा त्या गावी येतात पण शेठ सांगतो, 'एवढा परोपकार करून मला कोणी मान देत नाही अथवा चांगले म्हणत नाही.' महात्मा त्यांना द्राक्षाच्या मळ्यात घेऊन जातात व म्हणतात, 'ही द्राक्ष्याची झाडे दर वर्षी गोड द्राक्षे देतात पण त्यांना असे कधीही वाटत नाही की आपण परोपकार करतो. देणे हे त्यांचे कर्म आहे. आपली वाहवा करावी अशी त्यांची अपेक्षा नाही. तद्वत चांगले कर्म करीत रहा, फळाची अपेक्षा धरू नका. हेच गीतेचे वर्म आहे.' 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ||' गी.२/४७

*****

# (९८) दानाचे वर्म

**कथा -** धर्मध्वज नावाचा राजा होऊन गेला. तो शूर वीर ईश्वरभक्त, नीतिवान व दानशूर होता. तो रोज गरिबांना, साधूंना दान करत असे. राजास बाहेरगावी जायचे होते. आपल्या आर्यध्वज मुलास म्हणाला, 'मी बाहेर जात आहे. दानाचा क्रम तसाच चालू ठेव.' दुसऱ्या दिवशी सर्व लोक जमा झाले. दान घेणाऱ्या लोकांना आर्यध्वज म्हणाला, 'दान देण्याचे फळ काय मिळते ? व दान न देण्यामुळे काय नुकसान होते ?' या प्रश्नाचे उत्तर कोणीही देऊ शकले नाही. राजकुमाराने कोणालाही दान दिले नाही. सर्व विन्मुख गेले. दुसऱ्या दिवशी राजा घरी आला. त्यास समजले, आपल्या दानाचा नेम मुलाने मोडला आहे. मुलावर राजा रागावला. मुलाने वडिलांना तोच प्रश्न विचारला. पण राजा समाधानकारक उत्तर देऊ शकला नाही. राजकुमार आर्यध्वज उत्तर शोधण्याकरिता निघाला. एका राजास भेटला. त्यास प्रश्न विचारला, 'दानाचे फळ काय ? न देण्याचे नुकसान काय ?' राजा म्हणाला, 'माझी समस्या आहे, माझा एकही मुलगा जगत नाही. कारण काय असावे या चिंतेत आहे. मला याचे उत्तर हवे आहे.' आर्यध्वज वाटेत एका म्हाताऱ्या शेतकऱ्याकडे थांबतो. प्रश्न शेतकऱ्यास विचारतो. शेतकरी म्हणतो, 'आपल्या प्रश्नाचे उत्तर उज्जैनचा राजा शंकरभक्त विक्रमादित्य देऊ शकेल.' शेतकऱ्याची बायको चार भाकऱ्या करते. शेतकरी बायकोस म्हणतो, 'आपण दोन भाकऱ्या खाऊ व या मुलास दोन भाकऱ्या देऊ. कारण हा आज आपला अतिथी आहे.' बायको म्हणते, 'माझ्या भाकऱ्या देणार नाही. आपण हवे तर द्या.' शेतकऱ्याने आपल्यातील एक भाकरी राजकुमारास दिली. सर्व झोपले. सकाळी राजकुमार पाहतो तो शेतकऱ्यास सर्पाने दंश केला आहे. सर्प तेथे होता. राजकुमारास पाहून सर्प पळून जातो. राजकुमार सर्पाच्या मागे पळत जातो. म्हातारी उठते, ती पळू लागते. पळता पळता पडते व गतप्राण होते. सर्प गायब होतो. राजकुमार आर्यध्वज विक्रमादित्याकडे जातो. एका सकाळी महाकालाची पूजा आटोपून विक्रमादित्य आर्यध्वजास सांगतो, 'तू ज्या राजाकडून आलास, ज्याचा पुत्र जगत नाही त्यास जाऊन सांग, तू श्रमदान कर. तरच तुझा पुत्र जगेल.' आर्यध्वज त्या राजाकडे येतो व त्यास सांगतो, 'आपण शरीराचे दोष श्रमदानाशिवाय जात नाहीत.

श्रमदान करा, आपला पुत्र जगेल असे मला महादेवभक्त विक्रमादित्यांनी सांगितले आहे.' पुत्र जगावा म्हणून राजा स्वतः धर्मशाळा, मंदिर, दवाखाना, इमारतींवर काम करतो. खूप राबतो. यावेळी राजाचा पुत्र जगतो. सगळीकडे आनंदी आनंद होतो. मुलगा दोन वर्षाचा होतो. मुलगा बोलू लागतो. आर्यध्वज तिथेच थांबलेला असतो. एक दिवस मुलगा म्हणतो, 'एक मंच उभारा. मला काही बोलायचे आहे.' मंच तयार होऊन सभा भरते. मुलगा म्हणतो, 'एक डुकरीण व्यायली आहे. त्या पिल्लास येथे घेऊन या.' लोक पिल्लास घेऊन येतात. मुलगा म्हणतो, 'दानाचे तीन प्रकार आहेत, १) शरीराने श्रमदान करावे. २) संपत्ती दान - संपत्ती असल्यास गरजूंना दान करावी. ३) समय दान - लोकांना मार्गदर्शनाकरिता वेळ द्यावी. राजाला श्रमदानामुळे मुलगा (मी) झाला. मागच्या जन्मी मी म्हातारा शेतकरी होतो. आर्यध्वज माझ्याकडे आल्यामुळे मी त्याला एक भाकरी दान दिली. म्हणून मी राजकुमार झालो. मात्र माझ्या बायकोने भाकरी न दिल्यामुळे तिला डुकरीण व्हावे लागले.' तात्पर्य - दान देण्याचे फळ - राजकुमार व दान न देण्याचे फळ - डुकरीण. आर्यध्वज राजकुमारास दानाचे महत्त्व समजते व तो आपल्या राज्यात जाऊन धर्मध्वजासारखे दानाचे व्रत चालवू लागला.

**१) बोधयन्ति न याचन्ते भिक्षा द्वारे गृहे गृहे ।**
**दीयतां दीयतां नित्यं अदातुं फलमिदृश्यम् ।। सुभा.**

**अर्थ** - भिकारी आपल्याकडे भिक्षा मागण्यास येत नाही तर बोध करण्यास येतो. काय बोध करतो ? देत रहा, देत रहा. मी मागच्या जन्मी काही दिले नाही म्हणून भीक मागण्याची वेळ आली आहे.

**२) न्यायोपार्जितवित्तेन दशमोंऽशेन धीमहि ।**
**कर्तव्य विनियोगस्य ईश्वर प्रित्यर्थमिव च ।। सुभा.**

**अर्थ** - न्यायाने मिळविलेल्या संपत्तीपैकी कर्तव्य म्हणून दहावा हिस्सा देवाकरिता, धर्माकरिता खर्च करावा. बाकी नव्वद टक्के संपत्तीचे रक्षण देवास करावे लागते.

**कितव कथा :**

कितव नावाचा एक पातकी होता. सर्व व्यसनात तरबेज ! एकदा हा चंदन, फुले वेश्येला देण्याकरिता नेत होता. वाटेत चालताना ठेच लागली. जमिनीवर पडला व हातातील चंदन, फुले रस्त्यात पडली. त्याने विचार केला की मळलेली फुले आपली 'प्रिया' स्विकारणार नाही. म्हणून शंकराच्या मंदिरात गेला व शंकराच्या पिंडीवर फुले व चंदन समर्पित केले. (जे कोठे खपत नाही ते देवाला) हा पातकी लवकरच मेला. याची रेकॉर्ड कॅसेट यमदूतांनी यमराजास ऐकविली. यमराज म्हणाले, 'आपली सर्व कॅसेट 'ब्लॅक' आहे. एकच 'ग्रीन' सिग्नल आहे. याकरिता तुला तीन तासांसाठी इंद्रपद मिळेल. कारण जीवनात तू एकदाच शंकराच्या लिंगावर फुले समर्पित केली आहेस. बाकी सर्व

तुला नरक भोगावा लागणार आहे. बोल, तुला काय भोगायचे आहे ?' तो म्हणाला, 'मला तीन तासांकरिता इंद्रपद प्रथम द्या.' यमराजांनी त्याला तीन तासांकरिता इंद्रपद दिले. सर्व अधिकार त्यास प्राप्त झाले. सेवकांनी विचारले, 'आपणास काय हवे आहे ? शचीला आपल्या सेवेकरिता आणू का ?' कितव म्हणाला, 'नको, पाच जणांना ताबडतोब बोलवा.' पाच ऋषीमुनींना बोलविले व त्यांना कितवने पाच उपहार दान केले. १) विश्वामित्रास स्वर्गातील उच्चश्रवा घोडा दान दिला. २) अगस्थींना ऐरावत हत्ती दान दिला. ३) वसिष्ठांना कामधेनु दान दिली. ४) गालव मुनींना चिंतामणी दान दिला. ५) कौंडिल्य ऋषींना कल्पवृक्ष दान दिला. या स्वर्गातील दिव्य वस्तू दान दिल्यानंतर वाद झाला. स्वर्गातून मृत्यूलोकात दान देता येत नाही. पण यास अपवाद (खास केस) ठरविण्यात आला. तीन तास संपले. बराच काळ कितवने पापामुळे नरक भोगला. पण अंतःकरणात दानाची तीव्र इच्छा. सत्पात्रांना दिव्य वस्तू दान दिल्यामुळे हा कितव बळीराजा म्हणून जन्माला आला. जगात दानशूर म्हणून गाजला. किंबहुना देवांनी वामन होऊन याच्याकडे दान मागितले व देव द्वारपाल झाले. हा आहे दानाचा महिमा.

★★★★★

## (९९) इतर

**१) ऐसे मत बनो**

**१) इतने नरम मत बनो कि लोग तुम्हे खा जाये ।**

**२) इतने गरम मत बनो कि लोग तुम्हे छू भी न सके ।**

**३) इतने सरल मत बनो कि लोग तुम्हे मूर्ख बना दे ।**

**४) इतने जटिल भी मत बनो कि लोगो में तुम मिल न सके ।**

**५) इतने गंभीर मत बनो कि लोग तुमसे उब सके ।**

**६) इतने छिछिले मत बनो कि लोग तुम्हे माने ही नही ।**

**७) इतने महंगे मत बनो कि लोग तुम्हे बुला न सके ।**

**८) इतने सस्ते भी मत बनो कि लोग तुम्हे नचाते रहे ।**

**२) क्रोध**

१) **शीघ्र कोपी -** लवकर रागवतात, लवकर शांत होतात - अनिश्चिततेच्या भीतीतून

२) **दीर्घ कोपी -** सारखे रागवत नाहीत व एकदा रागावले तर शांत होत नाहीत - अविवेकातून

३) **बलहीन कोपी -** स्वतःचा राग स्वतःवर काढतात - अविवेकातून.

४) **सुप्त कोपी -** ज्वालामुखीप्रमाणे कधीतरी उफाळतात, दुसऱ्याबरोबर स्वतःचा नाश करतात - द्वेषातून निर्माण होतो.

### ३) चित्ताच्या चार अवस्था

१) **अस्फुंद -** झोपेत चित्ताचा लय होतो.

२) **अहं स्फुंद -** उठल्यानंतर अहम् जागा होणे. मी कोण आहे ? जात, धर्म, पद वगैरेचा अहंकार

३) **वासना स्फुंद -** उठल्याबरोबर विषयाची आठवण, काही अंथरूणातच तंबाखू खाऊन, बिडी ओढून बाहेर पडतात. स्टँडर्ड व मॉडर्न मात्र बिछान्यावरच बेड-टी घेतात.

४) **भगवत् स्फुंद -** उठल्याबरोबर देवाचे स्मरण. राम-राम म्हणत उठणे. पृथ्वीस नमस्कार करणे अथवा कराग्रे लक्ष्मी, वगैरे श्लोक म्हणणे.

### ४) भावार्थ रामायणातील सात दारवंठे

भावार्थ ते राम (राज) भवन । प्रथम दारवंठा ते श्रवण ।<br>
दुसरे द्वार ते साधन । नित्यानित्य ज्ञान तो तीजा ॥<br>
चवथा दारवंठा मनन । पांचवा निदिध्यास जाण ।<br>
सहावा वैराग्य पूर्ण । सातवा जाण साक्षात्कार ॥

### ५) चार वाक्ये -

१) जितना दाम - उतना काम - योग्य

२) पूरा दाम - आधा काम - घसरण

३) दुगुणा दाम - बिना काम - सर्वजण खड्ड्यात

४) बिना दाम - पूरा काम - देव (भक्तांचे)

'असे भक्तांचिया घरी । काम न सांगता करी ॥' तु.म.

### ६) काय वाचावे

१) वेळ असेल तरी वाचू नये - अश्लिल लिखाण. या वाचनामुळे सुप्त विकार जागे होतात व अनर्थ घडतो.

२) वेळ असल्यास वाचावे - पत्र, वर्तमानपत्र, लग्नपत्रिका वगैरे.

३) वेळ काढून वाचावे - ज्ञानेश्वरी, भागवत, गाथा, संत वाङ्मय

'वाचावी ज्ञानेश्वरी । डोळा पाहावी पंढरी ॥ जना.

७) **योग - वियोग**

१) नित्ययोगात योग - राधाकृष्ण परस्पर मिलन

२) नित्ययोगात वियोग - हे जाणार तर नाहीत ना, थोडे कुठे गेले तरी तळमळ (श्रीकृष्ण)

३) वियोगात नित्ययोग - श्रीकृष्ण समोर नाही. त्याचे सतत ध्यान-चिंतन असणे.

४) वियोगात वियोग - शामसुंदर समोर आले नाहीत. थोडे विस्मरण झाले तरी तळमळ होणे.

८) **साधक चार कोटीचे (प्रकाराचे)** कापूस, भूस, घृत, मधू

१) **कापसासारखे** - कापसाला आग लागल्यानंतर सर्व भस्म होते - तद्वत साधकाच्या अंतःकरणात सत्संगाची, भगवतभक्तीची आग लागल्यानंतर अंतःकरणात विकार, विषयासक्ती रहात नाही. अंतकरण निर्मळ होते. अशा प्रकारच्या साधकांना कापूसकोटीतील साधक म्हणतात.

२) **भूसासारखे** - भूसाला आग लागल्यानंतर ते हळूहळू जळते. धूर येतो. सारखी फुंकर मारावी लागते. कधी पाणी पडले तर धूर बंद होतो. परत फुंकर मारावी लागते. खूप त्रास घेतल्यानंतर भूस जळते. तद्वत साधक सत्संग करतो. काही दुःख आल्यानंतर बंद करतो. विषयाचे, कुसंगाचे कधी कधी पाणी पडते. मात्र त्यास जाग दिल्यानंतर परत साधना करतो. जेवढी फुंकर मारावी तेवढेच भूस जळते. तसे पुन्हा पुन्हा साधना करून साधक उद्धार करून घेतो. अशा साधकास भूस कोटीतील साधक म्हणावे.

३) **घृतासारखे** - एखाद्या पदार्थास तूप लावले तर त्यास पाणी चिकटू शकत नाही. तसे भगवतभक्तिरूपी तूप ज्याच्या अंतःकरणास लागले त्याला विषयरूपी पाणी चिकटू शकत नाही. त्यांना घृतकोटीचे साधक म्हणतात.

४) **मधुसारखे** - कोणत्याही पदार्थात मध टाकला तर तो पदार्थ गोड, मधूर लागतो. तद्वत साधकाचे हृदय भक्तीप्रेमाने एवढे मधूर बनते की तो सर्वांना मधूर वाटतो. याच्या संगतीत दुष्टांनासुद्धा आनंद होतो. यांना मधुकोटीतील साधक म्हणतात.

९) **ज्ञानेश्वरीतील शिव** - वारकरी सांप्रदायात शंकरांना गुरूचे स्थान आहे. किंबहुना निवृत्तीनाथ, ज्ञानदेव, सोपानकाका यांनी ज्या ठिकाणी शिवाचे स्थान आहे, त्या ठिकाणी समाधी घेतली आहे.

अनुक्रमे त्र्यंबकेश्वर, आळंदी (शिवपीठ हे जूनाट । ज्ञानाबाई तेथे मुगुट ।। नाथ), सासवड, ज्ञानोबांनी ज्ञानेश्वरीत सर्व महत्त्वाच्या ठिकाणी शंकराच्या नावाचा उल्लेख केला आहे. त्याचा उहापोह -

१) रसिक शिव -

**तया गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी ।**
**जेथ भवानी प्रश्नु करी । चमत्कारोनी ।। ज्ञाने.१/७०**

**तेथ हरु म्हणे नेणिजे । देवी जैसे कां स्वरूप तुझें ।**

**तैसें हें नित्य नूतन देखिजे । गीतातत्त्व ।। ज्ञाने.१/७१**

२) योगाचे यात्रेकरू, शंकर पंढरीचे पण कापडी आहेत.

**तेथ प्रवृत्तितरूच्या बुडीं । दिसती निवृत्तिफळाचिया कोडी ।**
**जिये मार्गींचा कापडी । महेशु अझुनी ।। ज्ञाने.६/१५३**

३) ब्राह्मण सहकारी शिव

**जयांचा कोप सुभटा । काळाग्निरुद्राचा वसौटा ।**
**जयांचे प्रसादीं फुकटा । जोडती सिद्धी ।। ज्ञाने.९/४८२**

४) संकट निवारक शिव (जगाचे)

**पूर्वी अमृतही हातां आलें । परि देव नसतीचि उगले ।**
**मग काळकूट उठविलें । शेवटीं जैसें ।। ज्ञाने.११/४०३**

**परि तें एक बगीं थोडें । केलिया प्रतिकारामाजिवडें ।**
**आणि तियें अवसरींचें तें सांकडें । निस्तरविलें शंभू ।। ज्ञाने.११/४०४**

शंकराच्या अंगाचा दाह झाल्यानंतर त्यांनी अर्धा चंद्र कपाळी धारण केला.

**जेथ निववील ऐसिया आशा । हरें चंद्रमा आधा ऐसा ।**
**वाहीजत असे शिरसा । निरंतर ।। ज्ञाने.९/८६**

५) देवाची विभूती

**अशेषांही रूद्रामाझारीं । शंकर जो मदनारी ।**
**तो मी येथ न धरी । भ्रांती कांही ।। ज्ञाने.११/२२५**

६) विश्वरूपामध्ये शिवशक्तीचे दर्शन

**श्री महादेव भवानीयेंशीं । तुझ्या दिसतसे एके अंशीं ।**

**आणि तूतेंही गा हृषीकेशी । तुजमाजीं देखें ॥ ज्ञाने.११/२६२**

७) तपस्वी - निरहंकारी शिव

**करीतां तापसांची कडसणी । कवणु जवळां ठेवीजैल शूळपाणी ।**
**तोही अभिमानु सांडूनि पायवणी । माथां वाहे ॥ ज्ञाने.९/३७२**

८) संन्याशी शिव

**येणेंचि क्षेत्राभिमानें । राज्य त्यजिलें ईशानें ।**
**गुंती जाणोनि स्मशानें । वासु केला ॥ ज्ञाने.१३/२४**

९) काम जिंकणारे, कामारी शिव

**ऐसिया पैजा महेशा । पांघुरणें दाही दिशा ।**
**लांचकरू म्हणोनि कोळसा । कामु केला ॥ ज्ञाने.१३/२५**

१०) आदिगुरू शंकर

**ना आदिगुरू शंकरा । लागोनि शिष्य परंपरा ।**
**बोधाचा हा संसारा । जाला जो आमुतें ॥ ज्ञाने.१८/१७५८**

११) भक्तकृपाळ - शिव

**शंभू उपमन्युचेनि मोहे । क्षीरसागरूही केला आहे ।**
**येथ तोही उपमे नोहे । जे विषगर्भ कीं ॥ ज्ञाने.१८/१७८८**

१२) उदार शंकर

**मागां दूध दे म्हणतलियासाठीं । आघवियाचि क्षीराब्धिची करूनि वाटी ।**
**उपमन्यूपुढें धुर्जटी । ठेविली जैसी ॥ ज्ञाने.१०/१७**

**पाहें पां श्रीशंभूची प्रसन्नता । तया उपमन्यूचिया आर्ता ।**
**काय क्षीराब्धि दूधभाता । देइजेचिना ॥ ज्ञाने.५/११**

१३) कर्पूरगौर - शिव

**श्रीमहादेवो कापुरें उटिला । कां कैलासु पारदें डवरिला ।**
**नाना क्षीरोदकें पांघरविला । क्षीरार्णवो जैसा ॥ ज्ञाने.११/२२२**

१४) गुह्य सांगणारे शिव

**क्षीरसिंधुपरिसरीं । शक्तीच्या कर्णकुहरीं ।**
**नेणों कैं श्रीत्रिपुरारीं । सांगितलें जें ॥ ज्ञाने.१८/१७५१**

**१०)** १) पूर्वी पुण्य केले पण आता पुण्य करीत नाहीत.
परिणाम - इथे सुखी आहेत पण परलोकांत दुःखी होतात.

२) पूर्वी पुण्य केले नाही पण आता पुण्य करतात.
परिणाम - इथे दुःखी पण परलोकांत सुखी होतात.

३) पूर्वी पुण्य केले व आता पण करतात.
परिणाम - इथे सुखी व परलोकांतपण सुखी.

४) पूर्वी पुण्य केले नाही व आता पण करीत नाहीत.
परिणाम - इहलोकांत दुःखी व परलोकांतपण दुःखी

**११) स्वप्न :** एका गावात ब्राह्मण, शेतकरी, मुसलमान व ख्रिश्चन मित्र पार्टी करतात. चांगली बासुंदी बनवितात. बासुंदी तशीच ठेवतात व ठराव पास करतात. रात्री चांगले स्वप्न पडेल तेव्हा उठून बासुंदी खायची. शेतकरी दिवसभर कष्ट करून दमला होता. त्यास फार भूक लागली होती. त्यास झोप येत नव्हती. शेतकरी उठला, त्याने बनविलेली सर्व बासुंदी खाऊन टाकली व आरामशीर झोपला. थोड्या वेळाने तिघे उठले व स्वप्न सांगायला लागले. ब्राह्मण म्हणाला, 'मला एवढे सुंदर स्वप्न पडले, मी वैकुंठात गेलो व देवाने मला मांडीवर घेतले.' ख्रिश्चन मित्र म्हणाला, 'मला स्वप्न पडले, मला येशूने मांडीवर घेतले व दोन लाडू दिले.' मुसलमान म्हणाला, 'मला स्वप्नात अल्ला भेटले. मांडीवर घेतले व चार लाडू दिले.' तिघांनी शेतकऱ्यास उठविले. तो आळसात उठला. तिघांनी विचारले, 'तुला काय स्वप्न पडले की नाही ?' तो म्हणाला, 'मी झोपल्या झोपल्या हनुमान स्वप्नात आले. त्यांच्या हातात गदा होती. त्यांनी मला दम दिला, सर्व बासुंदी खाऊन टाक.' मी उठलो, घाबरलो व सर्व बासुंदी खाऊन टाकली.' तिघांनी भांडे पाहिले. भांडे रिकामे होते.

**१२) कथा :** एक शिष्य गुरूकडे अभ्यासाकरिता राहतो. खूप दिवस राहूनसुद्धा त्यास समाधान वाटत नाही. काही फळ प्राप्त होत नाही. एक दिवस देवाच्या पूजेकरिता एक मातीचा घडा घेऊन गंगेवर पाणी भरण्याकरिता येतो व त्यास वाटते घडा टाकून गांवी पळून जावे. किती दिवस अशी गुरूंची सेवा करणार ! पळणार एवढ्यात घडा बोलू लागला. 'मी पहिल्यांदा तळ्याच्या काठी माती होतो. माणसे, जनावरे माझ्यामध्ये विष्ठा, मूत्र विसर्जित करीत होती. एक दिवस कुंभार आला व मला घेऊन गेला. पाणी टाकून मला लाथेने तुडविले, त्याच्या चाकावर थापटले, उन्हात ठेवले व शेवटी भट्टीत चांगले भाजले. नंतर मला बाजारात आणले. बरेच जण टिचकी मारून मला पारखू लागले. शेवटी एक महात्मा मला घेऊन आला. आता माझा उपयोग गंगेचे पाणी देवाच्या पूजेकरिता वापरण्यासाठी होतो. मी धीर सोडला नाही. 'तुका म्हणे नाही चालत तातडी । प्राप्तकाळ घडी आल्याविण ॥ तुका म्हणे यासी न चले तातडी । अनुभवें गोडी येईल कळो ॥'

**१३) कथा : धैर्य -** छत्तीसगढ राज्यात रायपूर नगरात राजा मोहनसिंह राज्य करीत होता. राज्यामध्ये लुटारूंची टोळी गावेच्या गावे लुटत होती. खूप मनुष्य वध होत होता. राजाच्या शिपायांना भीती निर्माण झाली होती. खजिन्याच्या संरक्षणास कोण तयार नव्हता. राजाने सभा घेतली. बाजूच्या राज्यातील राजास बोलविले. ठराव पास झाला. लुटारूंच्या जागेचा शोध लावायचा व त्यांच्यावर अचानक हल्ला करायचा. पण लुटारूंच्या जागेचा शोध कोण लावणार हा प्रश्न निर्माण झाला. पुढे येण्यास कोणी तयार होईना. सर्वजण घाबरले होते. इतक्यात एक ब्राह्मण साधक राजाच्या समोर आला ज्याचे नाव होते रुद्रदेव. तो म्हणाला, 'मी लुटारूंच्या टोळीचा शोध लावतो. मला बक्षिसपण नको. सभेतील सर्वांना मोठे आश्चर्य वाटले. तो जंगलाच्या दिशेने निघाला. खाण्याची सामुग्री जवळ होती. दोन दिवस प्रवास केला. तिसऱ्या दिवशी शरद पौर्णिमेची चांदणी रात्र होती. स्वच्छ चांदणे पडले होते व रुद्रदेव महर्षि पतंजलीचे वाक्य वाचत होते. 'सत्य प्रतिष्ठायां क्रिया फलाश्रमत्वम'

**अर्थ :** सत्याची प्रतिष्ठा इच्छित फळ प्राप्त करून देते.

एवढ्यात एक व्यक्ती रुद्रदेवांच्या जवळ येऊन विचारू लागली, 'आपण कुठे जात आहात ?' रुद्रदेव सहज म्हणाले, 'मी लुटारूंच्या टोळीचा शोध लावण्याकरिता जात आहे.' विचारणारी व्यक्ती स्तब्ध झाली. ती व्यक्ती म्हणाली, 'मी लुटारू थोडाच आहे. मी एक यात्रेकरू आहे. मी आपणास सोबत करू शकतो पण खरे सांगा.' रुद्रदेव म्हणाले, 'मी खरे सांगतो आहे. लुटारूंच्या जागेचा शोध मला लावायचा आहे.' आगंतूक व्यक्ती म्हणाली, 'आपणास भीती वाटत नाही ?' रुद्रदेव म्हणाले, 'मी २४ लाख गायत्री मंत्र जप केला आहे. गायत्री माझी माता आहे व ती माझे रक्षण करते. मरण तिच्यावर सोपविले आहे.' आगंतूक व्यक्ती म्हणाली, 'मी लुटारूंचा सरदार आहे. आपण, सत्य बोलता. आपले तेज विशेष आहे.' रुद्रदेव सरदाराबरोबर जंगलात निघाले. ते म्हणाले, 'माझ्याजवळ २६ सुवर्णमुद्रा आहेत व खाण्याचे सामान आहे व कपडे आहेत.' रुद्रदेव लुटारूंच्या दाट जंगलात पोहोचले. सर्वांना ७-८ दिवस उपदेश केला. लुटारूंना सांगितले आपण मनुष्य जीवन कलंकित करीत आहात. रुद्रदेवांच्या उपदेशाने सर्वांची मने परिवर्तित झाली. आपण आपला व्यवसाय सोडला तर मी आपणास राजाकडून अभय देतो. आपल्या केसास धक्का लागणार नाही ही जबाबदारी माझी राहील. रुद्रदेव व लुटारूंचे सरदार अभयसिंह दोघे राज्यात निघाले. राजदरबारात आनंदोत्सव साजरा होऊ लागला. राजाने सैन्यास तयारी करण्यास सांगितले. पण रुद्रदेव राजा मनमोहनसिंहास म्हणाले, 'आता सैन्याची गरज राहिली नाही. लुटारूंनी आपला धंदा सोडला आहे. हा सरदार अभयसिंह आपणास शरण आला आहे.' राजाने रुद्रदेवाच्या चरणावर मस्तक ठेवले. त्यास राजगुरू नेमले व सांगितले 'आपल्या सल्याने राजकारभार चालला जाईल.' लुटारूंना एक वसाहत बांधून दिली व त्यांना काम दिले. अद्याप छत्तीसगढला रुद्रदेवाची शपथ घालतात. खोटी शपथ घेणाऱ्या माणसाच्या घरी अद्याप चोरी होते हे तप-सत्य व धैर्य याचे प्रतिक आहे. महात्मे हे सत्यवादी तपस्वी व धैर्यवंत असतात.

'तुका म्हणे धैर्यवंतें । निर्मळ चित्तें सखी ती ॥'

**१४) संस्कृत कोडी**

**१) अपादो दूरगामी च साक्षरो न च पण्डितः ।**
**अमुखस्फूटवक्ता च यो जाणाति स पंडितः ॥**

अर्थ - पाय नाहीत पण दूर जाते. स-अक्षर आहे पण पंडित नाही. मुख नाही पण कांही तरी सांगते हे जो जाणतो तो पंडित होय. उत्तर - पत्र

**२) पर्वताग्रे रथौ याति भूमौ तिष्ठति सारथीः ।**
**चलते वायुवेगेन पदमेकं न गच्छति ॥**

अर्थ - पर्वताच्या शिखरावर रथ असून त्याचा सारथी मात्र जमिनीवर बसतो. रथ वायूवेगाने चालतो पण एक पाऊलही पुढे जात नाही. उत्तर - कुंभाराचे चाक.

**३) कृष्णमुख न मार्जारी द्वि जिव्हा न च सर्पिणी ।**
**पंञ्चभर्ती न पांचाली यो जानाति स पण्डितः ॥**

अर्थ - मुख काळे आहे पण मांजरीण नाही. दोन जिव्हा आहेत पण सर्पिण नाही. पांच पती आहेत पण पांचाली नाही. हे जो जाणतो तो पंडित होय. उत्तर - लेखणी.

**४) वृक्षाग्रवासी न च पक्षिराजः त्रिनेत्रधारी न च शंकरोऽयम् ।**
**त्वक्वस्त्रधारी न च सिद्ध योगी जलं न विभिन्न घटा न मेघः ॥**

अर्थ - वृक्षावर वास करतो पण पक्षी नाही, त्रिनेत्र आहेत पण शंकर नाही, भगवी वस्त्रे आहेत पण सिध्द योगी नाही, जलाने भरलेला आहे पण घटही नाही अथवा मेघही नाही. उत्तर - नारळ.

**१५) प्रतिबंध - कथा -** अरण्यात वैशंपायन ऋषी कथा सांगत होते. पुराण ऐकण्यास सर्व पांडव बसले होते. जवळच गंगा नदी वाहत होती. प्रवचनात ऋषींनी एक दिवस सांगितले, 'माणसांस २५ हजार शत्रू गंगेचे स्नान करू देत नाहीत. ५० हजार शत्रू दान करू देत नाहीत व एक लाख शत्रू भजन करू देत नाहीत.' प्रवचनाचा हा विषय भीमास पटला नाही. त्याने याची प्रचिती घ्यायचे ठरविले.

भीमदादा पहाटे पाच वाजता गंगेवर हजर झाले. सर्व लोक स्नान करून जात होते. संध्याकाळी सहा वाजेपर्यंत भीम गंगेच्या काठावर उभे होते. पण कोणास स्नानास अडथळा झाला नाही. संध्याकाळी सात वाजता प्रवचन सुरू झाले पण भीमदादाने वैशंपायन ऋषींना विचारले, 'गुरुजी, आपण काल जो सिध्दान्त सांगितला, त्याची मी आज प्रचिती घेतली. पहाटे पाच ते सायंकाळी सहा वाजेपर्यंत मी गंगेच्या काठी उभा होतो पण कोणीही स्नान न करता विन्मुख गेले नाही. आपण तर सांगितले, गंगा स्नानास २५ हजार प्रतिबंध येतात.' वैशंपायन म्हणाले, 'मी पुराणातील श्लोकाचा अर्थ सांगितला.

व्यास खोटे कसे बोलतील ?' ऋषींनी तर्क लढविला. भीमदादास विचारले, 'आपण आज गंगास्नान केले का ?' भीमदादांचा चेहरा पडला व म्हणाले, 'लोक पाहण्याच्या नादात मी दिवसभरात गंगास्नान केलेच नाही.' वैशंपायन म्हणाले, 'म्हणजे आज २५ हजार शत्रूंनी आपणास गंगा स्नान करू दिले नाही हे खरे आहे.'

## १६) देणे-घेणे

१) जो फक्त घेतो - संसारातील स्वार्थी माणूस

२) जो देतो घेतो - व्यवहारी माणसे

३) घेणे कमी करतो, देणे वाढवितो - यास साधक म्हणावे.

४) ज्याचे देणे घेणे बंद झाले त्यास सिद्ध म्हणावे.

५) जे घेत नाहीत फक्त देतात त्यांस देव अथवा संत म्हणावे.

देवास भक्त प्रसाद दाखवितात. देव खात नाही.

**१७) चिंतन :** अखंडानंद सरस्वती यांनी साबरमतीमध्ये गांधीजींचे चित्र काढले पण सर्व सुताचे ! सुताचे शरीर, सुताचा चष्मा, सुताचे डोळे, चप्पल, काठी, सूत मशीनसुद्धा सुताची. तद्वत न्यायाने सर्व ब्रह्मच वेगवेगळ्या रूपाने अवतीर्ण होते.

**जगामाजी ब्रह्म दिसे उघडे ॥**
**एकचि सोने नाना लेणे । बाही आणि बुगडे ॥१॥**
**एकचि माती नाना याती । परळ आणि सुगडे ॥२॥**
**एकचि तंतू नाना कपडे । पागोटे आणि लुगडे ॥३॥**
**म्हणे मुक्ताबाई ऐक चांगया । खरे आणि रोकडे ॥४॥**

## १८) तुम्ही करू इच्छिता ?

**१) पोहू इच्छिता - तर ज्ञान सागरात पोहा.**

**२) घेऊ इच्छिता - तर सद्गुण घ्या.**

**३) टाकू इच्छिता - तर दुर्गुण टाका.**

**४) बोलू इच्छिता - तर गोड बोला.**

**५) करू इच्छिता - तर परोपकार करा.**

**६) शिकू इच्छिता - तर चांगले शिका.**

**७) आणू इच्छिता - तर मानवता आणा.**

**८) जिंकू इच्छिता - तर अंतःकरण जिंका.**

**९) शोधू इच्छिता - तर ज्ञानकण शोधा.**

**१०) जगू इच्छिता - तर मानाने जगा.**

**१९)**

| | | |
|---|---|---|
| १) प्रतिष्ठेने वागा | २) सत्कार्माला लागा | ३) निष्ठेने जगा |
| ४) स्वधर्माला लागा | ५) अन्यायापासून दूर भागा | ६) सात्विक अन्न खा गा |
| ७) कुणावर येऊ नका रागा | ८) ईश्वरासी जोडा प्रेमाचा धागा | ९) मागायचे ते देवाला मागा |

**सामान्य -**

१) श्रावणाच्या आईवडिलांचे नाव

आई - मुमुक्षादेवी, वडिल - सिधम

२) पुंडलिकाच्या आईवडिलांचे नाव

आई - सत्या, वडिल - जनुदेव

**२०) चिंतन : बुद्धी (गुण-दोष)**

बुद्धीच्या ठिकाणी दोन गुण असावेत, तर चार दोष नसावेत.

**१) गुण - रा)** बुद्धीकडे श्रद्धेचे सौंदर्य असावे.

**म)** बुद्धीकडे सदाचारयुक्त एकनिष्ठता असावी.

**२) दोष -** बुद्धीकडे भ्रम, प्रमाद, विप्रलिप्सा व करणापाटव हे दोष नसावे.

**१) भ्रम -** बुद्धीच्या ठिकाणी भ्रम नसावा. अनात्मतत्वाला आत्मतत्व समजणे हे भ्रमिष्ट बुद्धीचे लक्षण आहे. दोहीचा मानलेला संबंध तोडल्याशिवाय बुद्धीचा भ्रम नावाचा दोष दूर होत नाही.

**दृष्टांत -** एकदा एक ब्राह्मण रानातून पायी चालला होता. त्याच्या जवळ एक मोठी घंटा होती. त्या निबीड अरण्यात एका वाघाने त्या ब्राह्मणावर हल्ला करून त्याला ठार मारले. तेव्हा त्याच्याजवळची घंटा बाजूच्या माकडांनी पळवून नेली. नंतर ते जोरजोरात घंटा वाजवू लागले, त्या घंटानादाने

बाजूच्या गावातील लोक भयभीत झाले. लोकांना वाटू लागले की, हे घंटा वाजविण्याचे काम भूतच करीत असावे. त्या घंटानादाने लोकांच्या मनात भ्रमाचे भूत उभे राहिले. त्या भूताची लोकांवर दहशत निर्माण झाली. परंतु एका वारकऱ्याला हे भूत मान्य नव्हते. त्याने पिशवीत चणे घेतले व तो रानात गेला, त्या वेळेस त्याला दिसले की, काही माकडे एक घंटा वाजवित होती. त्याने तिथे चणे ठेवले. तेव्हा माकडांनी घंटा टाकून चण्यांवर धाव घेतली, तीच संधी पाहून त्या वारकऱ्याने ती घंटा पळविली. वाजवत वाजवत तो गावाकडे येऊ लागला. त्या आवाजामुळे सर्व ग्रामस्थ भीतिग्रस्त झाले. परंतु वारकऱ्याला घंटेसह जेव्हा वारकऱ्यांनी पाहिले, त्यावेळेस त्यांच्या सत्यपरिस्थिती लक्षात आली. भूताविषयीचा भ्रम दूर झाला. त्या वारकऱ्याला अनेक बक्षिसे मिळाली.

त्या भूताला (भ्रम) दूर करण्यासाठी वारकऱ्याने माकडांना मारले नाही आणि घंटा फोडलीही नाही. फक्त दोन्हीचा संबंध तोडला. तद्वत अनात्मतत्वाशी आत्मत्वाचा जोडलेला संबंध तोडला की बुद्धीने निर्माण केलेले भ्रमाचे भूत नष्ट होते.

**२) प्रमाद -** प्रमाद म्हणजे चुका. बुद्धी आपले कार्य करण्यात चुकली न पाहिजे. बुद्धीही निश्चयात्मिका आहे.

**संकल्प विकल्प मनाचे । निश्चयो कर्म बुद्धीचे ।**
**चिंतन जाण चित्ताचे । अहंकाराचे मीपण ।। भा.**

निश्चयातून निश्चितता सिद्ध होते. स्वीकार करण्यात बुद्धी प्रमादी न बनली पाहिजे.

**३) विप्रलिप्सा -** विप्रलिप्सा म्हणजे फसवणूक. काहींच्या बुद्धीचा वापर केवळ फसवणुकीकरिता होतो. हा बुद्धीचा दोष आहे.

**दृष्टांत -** एका गावात एक निपुत्रिक गृहस्थ राहत होता. पुत्र नसल्यामुळे चित्ताला समाधान नव्हते.

**पुत्रहिनस्य मे राज्यं सर्वदुःखाय कल्पते । अ.रामायण**

त्यावेळी एका जागृत देवस्थानाबद्दलची माहिती त्याच्या कानावर आली. तत्क्षणी तो त्या देवस्थानाकडे जाण्यास निघाला. सपत्नीक तेथे गेल्यानंतर त्याने त्या देवाला नवस केला की देवा, जर आम्हाला पुत्र झाला तर आमच्या मालकीची गाय विकून जेवढे पैसे येतील तेवढे मंदिराला दानस्वरूप अर्पण करू. पुढे कालौघात त्या माणसाला मुलगा झाला. नवस फेडण्यासाठी गाय व मांजर विकण्यासाठी बाजाराच्या गावी गेला. बाजारात त्याने दोन्ही प्राण्यांची किंमत ग्राहकांना सांगितली. ती थोडी विचित्र वाटली. गायीची किंमत १ रुपया आणि तिच्याबरोबर मांजरीची किंमत १०० रुपये. कोणी गिऱ्हाईक या तिऱ्हाईत माणसाकडे येईना. परंतु एका बुद्धिवान माणसाने विचार

केला की, गाय आणि मांजर एकत्रच घ्यायची आहे तर वास्तवात गाय १०० रु. तर मांजर १ रु. किंमतीची आहे. कसेही घेतले तरी पैसे तेवढेच द्यावे लागणार.

शेवटी त्याने त्या गाय व मांजरीची १०१ रु. देऊन खरेदी केली. नंतर त्याने मालकाला विचारले 'काहो तुम्ही असे उलट का केले ?' तेव्हा तो मालक म्हणू लागला, 'अहो तुम्हाला काय कळतय ? मी देवाला नवस करून आलोय की, गायीचे जेवढे पैसे येतील तेवढे मी मंदिराला देईन. आता मी विकलेल्या मांजरीचे मला १०० रु. तर गायीचे केवळ १ रु. मिळाले म्हणजे मी आता देवाला १ रुपया देणे लागतो.'

**४) करणापाटव -** करणापाटव या पदाचा विग्रहाने अर्थ मिळतो.

करण + अपाटव = करणापाटव

अपटू - पटू नसणे.

आपल्या कार्यात जो तरबेज नाही. बुद्धी आपल्या निश्चय करण्याच्या कार्यात तरबेज नसते. बुद्धी आत्मतत्वाचा निश्चय करण्यात अपटू ठरते. हा बुद्धीचा दोष आहे.

**२१) चिंतन -** दान हे मानव कल्याणाचे साधन आहे. परंतु या दानापासून विन्मुख असणाऱ्याचे काय होते ! याचा विचार.

**दृष्टांत -** एक दिवस उजव्या हाताचे आणि डाव्या हाताचे कडाक्याचे भांडण झाले. डावा हात बोलायला ऐकतच नव्हता. त्याचे काही मुद्दे पटण्यासारखे होते. तो म्हणाला, 'या लोकांना म्हणे काही कळतच नाही. सगळी कामे मी करायची आणि श्रेय मात्र उजव्या हाताला.'

१) घोड्याचे लगाम धरण्याचे काम मी करतो आणि आयती टाच मारण्याचे काम हा उजवा हात करतो.

२) शत्रूचे घाव झेलण्याचे कार्य करणारी ढाल मी सांभाळतो आणि तलवार घेऊन आयते वार या उजव्या हाताने करायचे.

३) शत्रूची केसासकट मान मी धरायची, मानेवरून आयती तलवार या उजव्याने चालवायची.

याला म्हणे लोक उगाचच मानतात. एवढे बोलणे झाल्यावर, गप्प बसलेला उजवा हात बोलला, 'अरे डाव्या मी इतर काहीच करत नाही. पण दान करण्यात नेहमीच अग्रणी असतो, म्हणून लोक मला मानतात, या उलट तू दानाच्या बाबतीत आळस करतोस. त्यामुळे तुझी काय फजिती झाली माहितेय !'

**दानान्नोद्यमतां विलोक्य विधिनां शौचाधिकारी कृतः ।**

विधीने तुला सकाळची ड्युटी दिली.

**२२) दोन टाळा दोन पाळा**

ज्याला पारमार्थिक क्षेत्रात प्रगती करावयाची आहे त्या साधकाने दोन गोष्टी कटाक्षाने टाळल्या पाहिजेत. १) कणक आसक्ती २) कामिनी आसक्ती. परमार्थात हे दोन मोठे अडथळे आहेत असे वेदशास्त्र व संतांचे मत आहे. संतांच्या शब्दात (नाथ महाराज)

१) **कणक आणि कामिनी । ज्यासी नावडे मनीहूनी ।**
**तोचि इश्वरू त्रिभुवनी । सत्य हे वाणी उद्धवा ॥ भा. १९/४४/६६**

२) **परदारा आणि परधन । सर्वथा नातळे ज्याचे मन ।**
**गंगादि तीर्थे जाण । चरण स्पर्शन वांछिती ॥ भा. ११/३०/८९४**

३) **स्वदारा स्वधन सलोभता । अवश्य जाणे अध:पाता ।**
**द्रव्यदारा निरपेक्षता । शुचिष्मंतता साधूची ॥ भा. ११/३०/८९५**

तुकोबाराय यांच्या शब्दात

१) **साधने तरी हीच दोन्ही । जरी कोणी साधील ॥१॥**
**परद्रव्य परनारी । याचा धरी विटाळ ॥२॥**

२) **परद्रव्य परनारीचा अभिलास । येथोनिया ऱ्हास सर्वभाग्या ॥**

३) **परद्रव्य परकांता । नातळे जयाचिया चित्ता ।**
**आणिक कर्मे तो तत्वता । बांधला नवजाय ॥४॥**

४) **इतुले करी भलत्या परी । परद्रव्य परनारी ।**
**सांडूनी अभिलाष अंतरी । वर्ते वेव्हारी सुखरुप ॥**

५) **कामातुर चवी सांडी । बरळ तोंडी बरळे ॥१॥**
**रंगले ते अंगी दावी । विष देववी आसडे ॥२॥**
**धनसोसे लागे वेड । ते बडबड शमेना ॥३॥**
**तुका म्हणे व्यसने दोन्ही । नर्कखाणी भोगावया ॥**

६) **द्रव्य दारा नको मानाची आवडी । कवणें विशीं गोडी प्रपंचाची ॥**

७) **परविया नारी माऊली समान । परधनी बाटो नेदीं मन ।**
**जिवीत्व ते तृणा समान । स्वामी काजी जाण । शूर म्हणो तया आम्ही ॥**

८) **परविया नारी माऊली समान । मानिलिया धन काय वेचे ॥१॥**
**न करीता परनिंदा परद्रव्य अभिलास । काय तुमचे यास वेचे सांगा ॥२॥**

९) **परद्रव्य परनारी । झाली विषाचिये परी ॥ (संताची स्थिती)**

१०) **परविया नारी आणि परधना । नका देऊ मनावरी येऊ ॥ (देवाकडे मागणे)**

१) **वेधा द्वेधा भ्रमं चक्र कांतासु कनकेषुच ।**
**तासू तेष्वाप्यनासक्त साक्षाद्धर्गो नराकृतिः ॥ सुभा.**

**अर्थ -** विधात्याने कांता व कणक ही दोन भ्रमरूपी चाके निर्माण केली आहेत. या दोन्हीच्या बाबतीत जो आसक्त नसतो. तो नररूपे देवच आहे.

२) **कनकाणि कान्ता द्वय कातराया । केल्या विधीने नर कातराया ।**
**जो सापडेना नर कातराया । तो योग्य जाणा नर कातराया ॥**

३) **चलो चलो सब कोइ कहे । बिरला पहूँचे कोय ।**
**एक कनक अरू कामिनी । दुर्गम धाटी दोय ॥ कबिर**

४) **नरहरी कांचन कामिनी रहिये इतने दूर ।**
**जो चाहिये कल्याण निज, राम दरस भरपूर**

५) **मातृवत्परदारेषु परद्रव्येषु लोष्ठवता ।**
**आत्मवत सर्वभूतेषु यः पश्यति स पश्यति ॥**

**अर्थ -** परस्त्री माते समान, परद्रव्य मातीसारखे, सर्व सृष्टी परमात्मरूप अशी दृष्टी खरी दृष्टी होय. या सर्व प्रमाणांचा विचार एवढ्याकरिता, या दोन गोष्टी जीवाला नरकास नेतात. दुसऱ्या दोन गोष्टी पाळाव्या ज्या जीवाचे संपूर्ण कल्याण करतात. त्या दोन म्हणजे नामस्मरण व संत संग. ज्ञानोबारायांना दोन गोष्टींमध्ये गोडी आहे.

१) **ज्ञानदेवा गोडी संगती सज्जनी । हरी दिसे जनी वनी आत्मतत्वी ॥**

२) **ज्ञानदेवा गोडी हरीनामाची जोडी । राम कृष्ण आवडी सर्वकाळ ॥**

३) **संत संग धरा तुम्ही हरी भजन करा । पाठी लागलासे काळ दात खातो करकरा ॥ ज्ञान.**

नामदेवराय सुद्धा सांगतात,

१) **संत चरणी भाव धरा । क्षणोक्षणा नाम स्मरा ।**
**मुक्ति सायुज्यता वरा । हेचि करा बापानो ॥**

तुकोबाराय आपली आवड सांगतात,

**आमुचि आवडी संत समागम । आणिक त्या नाम विठोबाचे ॥**

तुकाराम महाराज देवाकडे याच दोन गोष्टींची मागणी करतात.

**कंठी राहो नाम । अंगी भरोनिया प्रेम ॥१॥**
**ऐसे द्यावे कांही दान । आलो पतीत शरण ॥२॥**
**संताचिया पायी । ठेवी वेळोवेळी डोई ॥३॥**
**तुका म्हणे तरे । भवसिंधु एक सरे ॥४॥**
**मागणे ते एक हेचि आहे आता । नाम मुखी संत संग देई ॥**

तुलसीदास म्हणतात, या दोन्ही गोष्टीच जगात दुर्लभ आहेत.

**संतसमागम हरीकथा तुलसी दुर्लभ होय ।**
**सुत दारा अरू लक्ष्मी पापी घरभी होय ॥**

गरुड पुराणात व्यास सांगतात

**संसारविषवृक्षस्य द्वे फले अमृतोपमम् ।**
**कदाचित् केशवं भक्तिस्तद्भक्ते समागमः ॥ सुभा.**

**अर्थ -** संसाररूपी विषवृक्षास दोन अमृतासारखी फळे आहेत. ती म्हणजे केशवाची भक्ती व त्याच्या भक्ताचा समागम.

वैज्ञानिक परिसाचा शोध लावत असताना विज्ञान वाढले व अमृताचा शोध लावताना रसायन वाढले. याचे कारण असे, जगात मरावेसे कोणाला वाटत नाही व श्रीमंत व्हावे असे सर्वांना वाटते.

**जगस्पृहे आस्पद । एक सार्वभौमपद ।**
**न मरणे निर्विवाद । जगा पढियें ॥ ज्ञाने. १६/२३१**

श्रीमंत होण्याकरीता परीस हवा व अमर होण्याकरिता अमृत पाहिजे. पण वैज्ञानिकांना अद्याप परीस अथवा अमृताचा शोध लागलेला नाही. पण त्या दोन पदार्थापेक्षा दुसरे दोन पदार्थ त्यापेक्षा श्रेष्ठ आहेत हे त्यांच्या लक्षात आलेले दिसत नाही. अमृतापेक्षा नाम गोड व श्रेष्ठ आहे,

**जीव्हे गोड तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिके पुढे ॥ तु.म.**

संत परिसापेक्षा श्रेष्ठ व उत्तम आहेत, कारण परीस लोखंडाचे सोने करतो, लोखंडाचा परीस बनवित नाही. पण संत मात्र जीवाला आपल्यासारखे संतच बनवितात.

**पारसमे अरू संत मे बहू अंतरो जाण ।**
**वह लोहा कांचन करे ये करे आपु समान ।। तुलसी**

**कृपाकटाक्षे न्याहाळीले । आपुल्या पदी बैसविले ।**
**बापरखूमादेवीवरु विठ्ठले । भक्ता दिधले वरदान ।।**

नाम हे जीवाकरिता गोड आहे. भक्ताकरिता फारच गोड आहे. पण नामाची गोडी नामी परमात्मा यास नाम नामी यांच्यात अभिन्नत्व असल्यामुळे चाखता येत नाही. ज्याप्रमाणे पाणी पाण्यास गोड नाही. झाडाचे फळ झाडास गोड नाही. ते पिणाऱ्यास अथवा खाणाऱ्यास गोड असते. 'जळ न खाती जळा । वृक्ष आपुलिया फळा । भोक्ता तो निराळा । तेणे गोडी निवडली ।। तु.म.

महात्मे सुद्धा सर्वांना गोड असतात.

**तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड । ज्याचे पुरे कोडे त्याचे परी ।।**

संत संतांना सुद्धा गोड असतात.

**हे पियुषापरते गोड वाटत । पंढरीरायाचे भक्त भेटत ।। ज्ञान.**

संत देवास अतिशय गोड वाटतात.

**देव म्हणे माझे पुरतसे कोड । संगती या गोड वैष्णवाची । नाथ.**

तात्पर्य - परस्त्री व परधन याची आसक्ती नसावी व देवाचे नामस्मरण व संत संगती सतत असावी. हीच खरी सेवा होय.

**होईन भिकारी । पंढरीचा वारकरी ।।१।।**

**हाची माझा नेम धर्म । मुखी विठोबाचे नाम ।।२।।**

**हीच माझी उपासना । लागेन संताच्या चरणा ।।३।।**

**तुका म्हणे देवा । हीच माझी भोळी सेवा ।।४।।**

सेवा म्हणजे स्मरण व संत संगती यामुळे जीवाचे कल्याण होते.

## मार्मिक चुटके :

१) अब्राहम लिंकन अमेरिकेचे अध्यक्ष झाले. ते दिसण्यास कुरूप होते. एक सुंदर स्त्री त्यांना लग्नाची गळ घालते. लिंकन विचारतात, 'आपला काय उद्देश आहे ?' ती सांगते, 'आपले लग्न झाले तर आपणास तुमच्यासारखा हुशार व माझ्यासारखा देखणा मुलगा होईल.' लिंकन म्हणाले, 'याच्या विरुद्ध झाले तर ? (माझ्या सारखा कुरूप व आपल्या सारखा बुद्धु) त्याच्यावर फार मोठा अन्याय

होईल. कृपया आपण सुंदर व हुशार माणसांचा शोध घेऊन लग्न करावे.'

२) तिब्बतमध्ये एक हजार बुद्ध प्रतिमा होत्या. एका भक्ताने एक मूर्ती निवडली. तिची फुलांनी व अगरबत्तीने पूजा करू लागला. पण सुगंध दुसरीकडे जाऊ नये म्हणून मूर्तीच्या चारी बाजूस पडदा लावला. दोन महिन्यांनी त्याच्या लक्षात आले मूर्ती काळी पडत चालली आहे. असे का होते ? कारण दिपाची काजळी, धुपाचा धूर यांचा थर मूर्तीवर बसत होता. स्वार्थी माणसाचे असेच नुकसान होते.

३) गाढवास सकाळी काळे मीठ दिले जाते. ते त्याच्या दातास कडकड लागते. नंतर त्यास दगड वाहण्याकरिता नेले जाते. दिवसभर दगड वाहते. रात्रभर इकडे तिकडे चरते, फिरते मात्र सकाळी मिठाच्या आशेने मालकाकडे येते. मालक सकाळी मीठ देऊन परत त्याचा दगड ओढण्याकरिता उपयोग करतो. तसा जीव थोड्याशा संसाराच्या सुखाकरीता ओझे ओढत असतो. थोडे सुख पण भरपूर दुःख भोगावे लागते. 'सुख पाहता जवापाडे । दुःख पर्वता एवढे ॥' तु.म.

४) राजा माकड पाळतो. नेहमी राजाच्या जवळ माकड राहते. एक दिवस राजा झोपतो व माकडास सांगतो, 'माझे रक्षण कर.' राजाच्या मानेवर मच्छर बसतो. माकड तलवार घेतो व राजाच्या मानेवर मारतो. मान तुटते व राजा मरतो. मूर्खांच्या संगतीमुळे कधी कधी असा घात होतो.

५) एकदा चार व्यापारी जंगलातून चालले होते. संरक्षणाकरिता एक जाडजूड पण बुद्धु माणूस बरोबर घेतला होता. कारण यांच्या जवळ प्रत्येकी लाख रुपये होते. व्यापाऱ्यांनी त्यास कल्पना दिली. आमच्याजवळ संपत्ती आहे म्हणून तुला सोबत घेतला आहे. आमच्या गावी पोहोचल्यानंतर तुला बक्षीस देतो. एका ठिकाणी हे थांबले. चार व्यापारी चोराच्या भीतीने एका झाडावर जाऊन बसले. पण हा माणूस रस्त्याच्या बाजूस झोपला. त्या रस्त्याने चोरांची टोळी चालली होती. त्यांनी पाहिले एक माणूस रस्त्याच्या कडेस झोपला आहे. सर्व त्याच्या जवळ गेले. एक लुटारू म्हणाला, 'कोण हा दरिद्री माणूस आहे ?' तो म्हणाला, 'कोणाला दरिद्री म्हणता ? मी ज्यांच्या बरोबर आहे त्या चौघांकडे एक एक लाख रुपये आहेत.' चोरांनी विचारले,'कुठे आहेत ते ?' त्याने दाखविले, 'त्या मोठ्या झाडावर बसले आहेत.' चोर गेले व त्यांना खाली उतरवून त्यांची सर्व संपत्ती घेऊन गेले. मुर्खाच्या संगतीचा असा परिणाम होतो.

६) जैनांचे चोविसावे तिर्थंकर संकल्प करतात. मी आज भीक मागणार पण श्रृंगार केलेल्या युवतीकडे. फक्त तिच्या डोळ्यात अश्रू हवेत. ते भिक्षा मागण्यास निघतात. तेव्हा एक सुंदर युवती श्रृंगार करून भिक्षा वाढते. पण तिर्थंकर भिक्षा घेत नाहीत. पुढे जाऊन मागे पाहतात तो युवतीच्या डोळ्यात अश्रू दिसतात. परत येऊन भिक्षा स्विकारतात. युवतीस विचारतात, 'आपण श्रृंगार का केला आहे ?' ती सांगते, 'बऱ्याच दिवसांनी माझा भाऊ तुरुंगातून सुटून आला आहे. त्याच्या स्वागताकरिता श्रृंगार केला आहे. जेव्हा आपण भिक्षा स्विकारली नाही तेव्हा वाटले, माझे काय पाप की माझी भिक्षा तिर्थंकर स्विकारीत नाहीत ?' तीर्थंकरांचा संकल्प देवानी पूर्ण केला.

**मनाचे संकल्प पाववील सिद्धी । जरी राहे बुद्धी याचे पायी ॥ तु.म.**

७) एका कुंभारास हिरा सापडतो पण तो दगड समजतो. चमकतो म्हणून गाढवाच्या गळ्यात बांधतो. एक हिरा पारखी तिथून जात असतो. तो कुंभारास विचारतो, 'हा दगड मला एक रुपयास दे.' कुंभार म्हणाला, 'दोन रुपये द्या व घेऊन जा.' पारखीने हिरा घेतला नाही. दुसरा जोहरी आला. त्याने हा दगड केवढ्यास देणार हे विचारले ? कुंभार म्हणाला, 'दोन रुपयास घेऊन जा.' दोन रुपये देऊन जोहरी हिरा घेऊन जातो. काही वेळाने पहिला जोहरी येतो व विचारतो, 'दगड केवढ्यास दिलास ?' कुंभार सांगतो, 'दोन रुपयास दिला.' जोहरी म्हणतो, 'किती मूर्ख आहेस ? एक लाख रुपयाचा हिरा दोन रुपयास दिलास.' तो म्हणतो, 'तुम्हास माहीत असूनसुद्धा तुम्ही दोन रुपयास हिरा घेतला नाही. आपण महामूर्ख आहात.' विद्वानांना आयुष्याचे मोल कळूनसुद्धा फुकट घालवतात. यांना शहाणे मूर्ख म्हणावे.

८) रामराज्यात एका कुत्र्यास एका माणसाने विनाकारण काठी मारली. त्या कुत्र्याने रामसभेत तक्रार केली. या माणसाने माझा अपराध नसताना मला काठी मारली. माणूस म्हणाला, 'बायकोचे माझे भांडण झाले होते. बायकोवर राग काढता येत नव्हता म्हणून कुत्र्यावर राग काढला. आपण द्याल ती शिक्षा भोगण्यास तयार आहे.' कुत्र्यास विचारले, 'यास काय शिक्षा करू ?' कुत्र्याने सांगितले, 'यास मठपती करा.' सर्वांना आश्चर्य वाटले. सर्वांनी विचारले, 'तुला काठी मारली तरी यास मठपती करा ही शिक्षा कशी काय ?' कुत्रा म्हणाला, 'मी मागच्या जन्मी मठपती होतो. पण मठाच्या कामाकरिता कुत्र्यासारखा दारोदार फिरत राहिलो. रामाचे भजन घडले नाही. परिणाम कुत्र्याचा जन्म प्राप्त झाला.'

९) काही कारणाने एका माणसाचे नाक कापले गेले. दुसऱ्याने त्यास विचारले, 'आपले नाक कसे काय कापले गेले ?' त्याने सांगितले, 'दोन डोळ्यांच्या मध्ये नाक येते म्हणून ब्रह्म दिसत नाही. नाक कापल्यामुळे मला ब्रह्म दिसते.' त्याने पण नाक कापले. पण ब्रह्म दिसले नाही. तो म्हणाला, 'नाक कापून ब्रह्म दिसत नाही.' तो म्हणाला, 'असेच सर्वांना सांग म्हणजे आपली संख्या वाढेल.' सर्व माणसांनी नाक कापून घेतले. त्यांच्या गावात एक नाकवाला माणूस आला. त्यास सर्वजण चिडवू लागले. नक्कू आला नक्कू आला. तो एकटाच होता. तथापी वाईट वागणारी माणसे एकट्या चांगल्या माणसास चिडवणारच.

१०) बिरबलाला मंत्रीपद मिळाल्यानंतर आईस म्हणतो, 'आई मला सांग तुझे काय काम करू, काय सेवा करू ?' आई म्हणाली, 'तू बोललास माझे पोट भरले. तू माझी सेवा करू शकत नाहीस. बिरबलाने हट्ट धरला, मुलाची परीक्षा पाहण्याकरिता रात्रौ बारा वाजता आईने बिरबलाकडे पाणी मागितले. त्याने पाणी दिले. परत दोन वाजता पाणी मागितले. त्याने पाणी दिले. पहाटे चार वाजता पाणी मागितले. बिरबलाने पाणी दिले. शेवटी सकाळी सहा वाजता पाणी मागितले. बिरबलाने पाणी

दिले पण तो वैतागला. म्हणाला, 'आई पाणी मागण्याची ही रीत आहे का ? रात्रभर मला जागवलेस. मला कामावर जायचे आहे.' आई म्हणाली, 'बिरबल याकरिता मी म्हणाले होते, तू माझी सेवा करू शकणार नाहीस. एक दिवस जागलास तर तू वैतागलास. मी दिवसभर कामे करून रात्रौ तुझ्याकरिता दहा वेळा उठले असेन. तुला सुक्या कपड्यावर झोपवले. मी ओल्या कपड्यावर झोपले.'

तात्पर्य - कोणताही मुलगा आईच्या ऋणातून मुक्त होत नाही.

११) स्वामी विवेकानंद ऋषीकेशनंतर मेरठला विश्रांतीसाठी आले. स्वामींना वाचनाची खूप आवड होती. त्यांचा एक शिष्य अखंडानंद वाचनालयातून पुस्तके घेऊन येत असे. स्वामी एक मोठे पुस्तक वाचून संध्याकाळी परत देत असत. ग्रंथपाल स्वामींना भेटले व म्हणाले, 'पुस्तके वाचता का पाने उलटून परत देता.' स्वामींनी जॉन इलब्बाकची तत्वज्ञानाची पुस्तके वाचली होती. ग्रंथपालाला विचारले, 'यातील एक पुस्तक घ्या.' कोणत्या पानावर कोणता मजकूर आहे हे स्वामींनी सांगितले. ग्रंथपाल चकित झाला व म्हणाला, 'स्वामी हे कशाचे सामर्थ्य आहे ?' स्वामींनी सांगितले, 'हे सामर्थ्य आहे, ब्रह्मचर्य पाळल्यामुळे.' वीर्यशक्तीमुळे स्मरणशक्ती तेज रहाते. ही शक्ती नसेल तर विकास साधत नाही. जीवन भकास बनते.'

१२) एका घरात सासू श्रीमंत असते. सून गरीब घराण्यातील करते. नेहमी श्रीमंतीचा टेंभा मिरवत असते. एकदा तीर्थयात्रा करून येते. उद्यापन करण्याकरिता ब्राह्मणास बोलवते. पूजेस मुलगा बसतो. सुनेस बोलवत नाही. सासू म्हणते, 'कनवटीस सुपारी बांध व पूजा पूर्ण कर.' हा सर्व प्रकार माहेरी सुनेस कळतो. काही दिवसात सासू आजारी पडते. सासू निरोप पाठवते, 'लवकर ये मी आजारी आहे.' सून निरोप पाठवते, 'सुपारीकडून सेवा करून घ्या.'

सासू - सारख्या सूचना करते ती. सून - जिला सूचना नको असतात ती.

१३) एकदा देवांची सभा भरली. इंद्र, नारद होते. त्या ठिकाणी तीन ऋषी आले होते पर्वत, कर्दन, कुतूक ऋषी. यांचे वैराग्य किती आहे हे पाहण्याकरिता तिघांसमोर इंद्राने उर्वशीस कुमौद (कॅबरे) नृत्य करण्यास सांगितले. ती नृत्य करू लागली व अंगावरचे कपडे उतरू लागली. पर्वत ऋषी वैतागले. कर्दनाने डोळे झाकून घेतले मात्र कुतूक ऋषी पहात राहिले. परिणाम काही झाला नाही. उर्वशी म्हणाली, 'माझे नृत्य पाहिले की नाही ?' कुतूक ऋषी म्हणाले, 'आपण महत्त्वाचे कपडे उतरले नाहीत. अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय हे कोष, कपडे जोपर्यंत उतरत नाहीत तोपर्यंत खरे कुमौद नृत्य नाही.' बाकी दोन ऋषी परीक्षेत नापास झाले व कुतूक ऋषी मात्र वैराग्याच्या परीक्षेत उत्तीर्ण झाले.

१४) नेमी कुमार जैनाचे प्रसिद्ध साधू होऊन गेले. त्यांचे जेव्हा लग्न ठरले तेव्हा घरात महोत्सव चालू झाला. वरात निघाली. अचानक त्यांच्या कानावर बकऱ्याचा चित्कार ऐकण्यास आला. नेमी कुमार

रथातून खाली उतरले. त्यांनी पाहिले आपल्या लग्ना निमीत्त मेजवानी म्हणून गावकऱ्यांना हे पशूबळी द्यायचे आहेत कारण मुसलमान राजांना याची मेजवानी हवी होती. नेमी कुमार यांनी सर्व बकरी व मेंढ्यांची बंधने सोडली. आपल्या लग्नाची बंधनेपण सोडली. चांगले कपडे उतरविले व संन्यास वेश धारण केला. त्यांच्या पत्नीने पण सर्व अलंकार उतरवले व दोघेजण भोगातून योगाकडे निघाले. या दोघांनी गिरनार पर्वताकडे प्रयाण केले. तपश्चर्या केली व हे जैनांचे मुनी म्हणून प्रसिद्ध झाले.

★★★★★

## (१००) शेवट

मनुष्याच्या जीवनात शेवटास फार महत्त्व आहे. 'शूर ओळखावा रणी । साधू ओळखावा मरणी ।।' ही उक्ती प्रसिद्ध आहे. काळाचे अनेक प्रकार असले तरी दोन काळ महत्त्वाचे. एक माध्यान्ह काळ व दुसरा अंतकाळ. जगातील सर्वसामान्य जन माध्यान्हकाळाचा म्हणजे खाण्याचा विचार करतात. 'जरी झाला संन्यासी । माध्यान्हकाळी तोंड वासी ।।' नाथ. पण देवाने जन्मल्याबरोबर सर्वांची खाण्याची सोय केलेली असते. ते देवाचे ब्रीदच आहे. 'मातेचिया उदरी उपजलासी जेव्हां । चिंता तुझी तेंव्हा केली त्याने ।।' तु.म. 'जभी दंत नही थे तभी दूध दिया । अभी दंत दिये तो अन्न न दे ।। कबिर. साधक - साधू मात्र अंतकाळाचा विचार करतात. एक दिवस मरण येणार आहे. जाताना बरोबर काही घेऊन जाऊ शकत नाही. उघडा येतो व उघडा जातो. जन्मल्याबरोबर कपडा गुंडाळतात त्यास खिसा नसतो. प्रेतास कपडा गुंडाळतात त्यास पण खिसा नसतो. आपल्याबरोबर फक्त कर्म येते. पापपुण्य शिदोरी असते. वैराग्य निर्माण करणारा श्लोक -

**धनानि भूमौ पशवश्च गोष्ठे भार्या गृहद्वारे जनः स्मशाने ।**
**देहश्चितायां परलोकमार्गे कर्मानुगो गच्छति जीव एकः ।।**

**अर्थ -** मरताना धन भूमीत, पशू गोठ्यात, बायको दारापर्यंत, जन स्मशानापर्यंत देह चितेत भस्म होतो व जीव कर्मानुसार परलोकात जातो. नामदेवरायांचा एक चिंतनीय अभंग आहे - 'अंतकाळी मी परदेशी । जाणोनिया माणसी । म्हणोनिया ऋषीकेशी । शरण तुजशी मी आलो ।।' शरीर संबंधाचे सर्व नातेवाईक इथेच राहतात. भगवान मात्र यमाच्या तावडीतून सोडवतो. 'हरिवीण कोणी नाही सोडविता । पुत्र बंधू कांता संपत्तीचे ।।' नाथ 'अंतकाळीचा सोयरा । तुका म्हणे विठू धरा ।।'

शेवट चांगला कशाने होतो ? चांगल्या दिवशी मरण आले म्हणजे ? मोठी प्रेतयात्रा निघाली म्हणजे ? चंदनाच्या लाकडात जाळला म्हणजे ? सर्व नातेवाईकांच्या समोर प्राण सोडला म्हणजे ? या सर्वांचे उत्तर नाही असेच मिळते. तर ज्याच्या मुखामध्ये गोड नाम आले त्याचा शेवट गोड होतो. 'अंतकाळी ज्याच्या नाम आले मुखा । तुका म्हणे सुखा पार नाही ।। शेवट तो होतो तुझियाने

गोड । म्हणुनिया चाड धरितसे ॥' तु.म.

**कथा -** गौतम बुद्धाची कथा अशी आहे - यांचा जन्म झाल्याबरोबर भविष्यकाराने सांगितले, 'हे बालक ताबडतोब वैराग्यवान होणार आहे.' हे जाणून सिद्धार्थाच्या वडिलांनी तरुण होईपर्यंत यास घराबाहेर सोडले नाही. सर्व सोय राजवाड्यात केली. सुंदर, सुस्वभावी, सुकुळातील मुलीशी लग्न लावून दिले. एक मुलगा झाला. वडिलांनी विचार केला पुढे यास राज्यकारभार पहावयाचा आहे. म्हणून प्रधानाबरोबर बाहेर पाठविले. रथातून प्रधान व सिद्धार्थ निघाले असता समोर म्हातारा दिसला. सिद्धार्थाने विचारले, 'हा कोण ?' प्रधान म्हणाला, 'हे म्हातारे आहेत.' 'म्हणजे माणूस म्हातारा होतो ?' प्रधान म्हणाला, 'प्रत्येक माणसास, जीवास म्हातारपण असतेच.' सिद्धार्थ खिन्न झाला. परत समोरून एक आजारी माणूस चालला होता. दोघांनी त्यास धरले होते. प्रधानाला सिद्धार्थाने विचारले, 'हे कोण आहेत ?' प्रधान म्हणाला, 'हे रोगी आहेत.' 'म्हणजे माणसास रोग होतात ?' प्रधान म्हणाला, 'शरीर रोगाचे भांडार आहे. यास हजारो रोग आहेत.' दुसरा झटका बसला. पुढे गेल्यानंतर एक प्रेत चालले होते. सिद्धार्थाने विचारले, 'हे काय आहे ?' प्रधान म्हणाला, 'हे प्रेत आहे. यास जाळण्याकरिता स्मशानात घेऊन चालले आहेत. हा मृत झाला आहे.' 'म्हणजे माणूस मरतो ?' प्रधान म्हणाला, 'हा मृत्यूलोक आहे. सर्वांना एक ना एक दिवस जावेच लागते.' रात्री दोघे राजवाड्यात आले. राजपुत्र सिद्धार्थ उदास झाला. राज्याचा, बायकोचा, मुलाचा, आई-वडिलांचा विचार न करता हा मरणावर विजय मिळविण्याकरिता राजवाड्याच्या बाहेर पडला. तपश्चर्या केली. बोध झाला व भगवान बुद्ध म्हणून जगात यांची किर्ती झाली. जगात यांचे खूप अनुयायी आहेत. काहींना सर्व प्रतिकूल परिस्थिती असून वैराग्य निर्माण होत नाही. साधकाने शेवट चांगला व्हावा म्हणून प्रथमपासूनच प्रयत्न केले. 'राम राम दोन्ही अक्षरे । सुलभ आणि साचारे । जागा मागिलिया पहारे । 'शेवटीचे गोड' तेचि खरे गा ॥ तु.म. 'काही थोडा बहुत लागपाठ । करा भक्तिभाव धरा बळकट । तन मन धन द्या लाउनिया नीट । जरी करणे असेल 'गोड शेवट' गा ॥' तु.बं. 'देहे सार्थक अंती वासुदेव आद्य छंदे ॥' ज्ञान.

काही लोक विचार करतात, चांगला संसार करू व सेवानिवृत्त झाल्यानंतर परमार्थ करू. पण हे हास्यास्पद आहे. वर्षभर पिकनिक, पार्टी, मजा करू व शेवटचा महिना अभ्यास करून पास होऊ असे म्हणण्यासारखे आहे. हे शक्य नाही. याउलट असे घडले आहे, परमार्थ करण्याकरिता राज्याचा त्याग करणारे भरत राजे हरणाच्या गर्भास गेले. आयुष्यभर परमार्थ करणारे एक ब्राह्मण, शेवटी 'जोड्यावर' लक्ष गेले व चर्मकाराचा देह प्राप्त झाला. (रोहिदास महाराज) 'वासनेचा संग होय अंतकाळी । तरी तपोबळी जन्म धरी ॥' तु.म.

काही बोटी तीराला लागताच अचानक वादळ निर्माण होऊन परत बुडतात.

**जैसी नाव थडिये ठाकितां । जरी वरपडी होय दुर्वाता ।**

**तरी चुकलाही मागौता । अपावो पावे ॥ ज्ञाने.२/३४९**

१) मात्र दोघांच्या बाबतीत असे घडले आहे. आयुष्य वाईट कर्मात गेले पण शेवटी नामस्मरणाने उद्धार झाला. पुराणात, संतवाङ्मयात या दोघांचे गुण गाईले आहेत. गणिका व अजामेळ.

**दृष्टांत -** एकदा एक माणूस पुरात सापडला, खूप लांब वाहत गेला. लोकांना वाटले हा मेला असावा. पण त्यास एका झाडाची मुळी सापडली व पुरातून बाहेर आला व वाचला. ज्ञानोबा, तुकोबा हाच दृष्टांत देतात.

**तो आधीं जरी दुराचारी । तरी सर्वोत्तमुचि अवधारीं ।**
**जैसा बुडाला महापूरीं । न मरतु निघाला ॥ ज्ञाने ९/४१९**

'बुडणें खोटे पावता थडी । स्वप्नी झाली वोढावोढी । नासली जागृती घडी । साच जोडी । 'शेवटी' गोड घास ॥' तु.म. 'पुत्र स्नेहे शोक करी अजोमेळ । तंव तो कृपाळ जवळी उभा । अनाथाच्या नाथे घातला विमानीं । नेला उचलोनि परलोकां ॥' तु.म. 'अंतकाळी गणिका । पक्षियाच्या छंदे । राम राम पद उच्चारिलें । तंव त्या दीनानाथ कृपा आली कैसी । त्याने तियेसी वैकुंठासी नेलें ॥' तु.म. (विस्तार भयास्तव यांच्या कथा देत नाही.)

२) काशीमध्ये मरण आले तर काशी विश्वनाथ (शंकर) मरणाऱ्या माणसाच्या कानात राम मंत्र म्हणतात व त्याचा उद्धार होतो. 'पायं पायं श्रुतिचुलकितं रामनामामृतं । ध्यायं ध्यायं मनसा सततं ब्रह्मतत्तारकं । जापं जापं प्रकृति विकृतो प्राणिनां कर्णमूले । विथ्यां विथ्यां अटति जटीलः कोपी काशी निवासः ॥' सुभा. - या श्लोकांचा अर्थ तुकोबाराय सांगतात 'उपदेश करी विश्वनाथ कानी । वाराणशी प्राणी मध्यें मरे ॥ मरणाचे अंती राम म्हणे जरी । न लगे यमपुरी जाणे तया ॥'

३) दोन राजांनी आपला शेवट चांगला करून घेतला. खटवांग राजास देवाने सांगितले, 'आपले आयुष्य १ तास उरले आहे.' त्याने एका तासात देवाचे स्मरण केले व उद्धार करून घेतला. 'एक तास उरला खटवांग रायासी । भाग्य दशा कैसी प्राप्त झाली ॥' नाथ.परिक्षीती राजाने शमी ऋषींच्या गळ्यात मेलेला साप घातल्यानंतर शची नावाच्या त्यांच्या मुलाने शाप दिला माझ्या बापाच्या गळ्यात, देवाचे ध्यान करीत असता साप घातला त्याचा सात दिवसांत मृत्यू होईल. हे जेव्हा परिक्षीतीस कळले तेव्हा राज्याचा त्याग केला. देवाचा धावा केला. देवाने शुकाचार्यास सांगितले व भागवत सांगून शुकाचार्यांनी परिक्षीती राजाचा सात दिवसात उद्धार केला. 'परिक्षीती मृत्यू साता दिवसांचा । मुक्त झाला वाचा उच्चारिता ।। तु.म. श्रवणे परिक्षीती तरला भूपती । साता दिवसा मुक्ती झाली तया । महाभागवत करूनि श्रवण । सर्वांगाचे कान केले त्याने ॥' नाथ. 'शुकसनकादिकीं उभारिला बाहो । परिक्षिती लाहो दिसा साता ॥' तु.म.

४) रामायणात बऱ्याच भक्तांनी रामाच्या समोर प्राण सोडला व त्याच्या स्वरूपात लीन झाले.

जटायूने रावणाशी युद्ध केले. खोटे बोलून रावणाने त्याचे पंख तोडले. सीतेस रावण घेऊन गेला हे रामास सांगण्याकरीता जटायू शेवटचे श्वास मोजत होता. राम आले. त्यास मांडीवर घेतले. कुरवाळले. जटायूने सर्व कथा सांगितली. राम म्हणाले, 'मी समर्थ आहे. आपला देह दिव्य करतो.' पण जटायू म्हणाले, 'प्रभू मरताना ज्याच्या मुखात नाम आले तर, अधम असला तरी तो मुक्त होतो. असे श्रुती गाते. मग प्रत्यक्ष राम समोर असता मरण आले तर देह कशाकरिता ठेवायचा ?' 'ज्याकर नाम मरत मुख आवा। अधमऊ मुकत होई श्रुती गांवा ।। सो सम लोचन गोचर आगे । राखौ नाथ देह केहि खागे ।।' तुलसी. वालीने पण प्रभू समोर प्राण सोडले व मुक्त झाले. वाली म्हणतात 'जनम जनम मुनी जतन कराई। अन्त राम कई आवत नाही ।' जन्मोजन्मी स्मरण करून मुनींना शेवटी राम आठवत नाही तो तू समोर आहेस. जमवूनसुद्धा कधीच हा योग येणार नाही.

५) बऱ्याच महात्म्यांनी शेवट साधला, शेवटी देवाचे ध्यान केले व मुक्त झाले.

**प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।**
**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ।। गी. ८/१०**

याचा अर्थ न देता माऊलीच्या ओव्या देत आहे.

**कां झांकलिये घटींचा दिवा । नेणिजे काय जाहला केव्हां ।**
**या रीती जो पांडवा । देह ठेवी ।। ज्ञाने ८/९८**

**तो केवळ परब्रह्म । जया परमपुरुष ऐसें नाम ।**
**तें माझें निजधाम । होऊनि ठाके ।। ज्ञाने ८/९९**

वामन बाबा तळोजेकर यांना समजले आपला शेवट जवळ आला आहे. त्यांनी सर्वांना जमवून हरिपाठ म्हणावयास सांगितला व हरिपाठ म्हणता म्हणता प्राण सोडला. वारकरी सांप्रदायात ह.भ.प. जोग महाराजांनीपण आळंदीत भजनात देह सोडला. आमच्या वारकरी घराण्याचे मूळ पुरुष ह.भ.प. मल्लाप्पा वासकर महाराज यांनी प्रथम पंढरपूर आळंदी वारी करीत असता दिवे घाटात कार्तिक वद्य षष्ठीस देह सोडला. वारकरी व दिवेगावातील गावकरी यांचा वाद निर्माण झाला. मल्लाप्पा महाराज उठून बसले व म्हणाले, 'मला आळंदीत देह ठेवायचा आहे.' कार्तिक शुद्ध अष्टमीस आळंदीत शेवट गोड केला. जगाच्या पाठीवर हे असे महात्मे होऊन गेले ज्यांच्या दोन पुण्यतिथी साजऱ्या होतात.

नाथ महाराजांनी जलसमाधी घेतली. ज्ञानोबारायांनी संजीवन समाधी घेतली. काळ ज्यांच्या ताब्यात तो परमात्मा यांच्या ताब्यात असतो. ज्ञानोबारायांना समाधीस बसवताना एका बाजूस हर व दुसऱ्या बाजूस हरी होते. (देव व गुरु)

६) मरणाच्या अगोदर ज्याला देवाचे दर्शन झाले त्यांचा शेवट चांगलाच होतो.

**ते मरणाऐलीचकडे । मज मिळोनि गेले फुडे ।**
**मग मरणीं आणिकीकडे । जातील केविं ॥ ज्ञाने ९/३६५**

**आहे शेवटीचे माझे येथे येणे । वाटे निश्चय याचिया दर्शने ।**
**राहीले चित्ती वो याचेचि चिंतने । निळा म्हणे आजी ऐकीले गाऱ्हाणे वो ॥**

७) तुकोबारायांच्या बाबतीत मात्र अदभूत घटना आहे. यांना न्यावयास प्रत्यक्ष देव आले. व विमानात बसून सदेह वैकुंठ गमन केले.

**प्रयाणकाळी देवे विमान पाठविले । कळिच्या काळामाजी अदभूत वर्तविले ।**
**मानव देह घेऊनी निजधामा गेले । निळा म्हणे सकळ संता तोषविले ॥ निळो.**

म्हणून तुकोबाराय म्हणतात

**शेवट तो भला । माझा बहु गोड झाला ॥**

**॥ ज्ञानदेव तुकाराम ॥**

# श्री तुकोबारायांची आरती

प्रपंचरचना सर्वही भोगूनि त्यागिली ।
अनुतापाच्या ज्वाळीं देहबुद्धी हविली ।
वैराग्याची निष्ठा प्रगटूनि दाखविली ।
अहंता ममता दवडूनि निजशांती वरिली ॥१॥

जय जयाजी सद्गुरू तुकया दातारा ।
तारक तूं सकळांचा जिवलग सोयरा ॥धृ॥

हरि भक्तीचा महिमा विशेष वाढविला ।
विरक्ती ज्ञानाचा ठेवा उघडुनि दाखविला ।
जगदोद्धारालागीं उपाय सुचविला ।
निंदक दुर्जनांचा संदेह निरसिला ॥२॥

तेरा दिवस वह्या रक्षूनियां उदकीं ।
कोरड्याचि काढूनि दाखविल्या शेखी ।
अपार कविता शक्ति मिरवुनि इहलोकीं ।
कीर्तनश्रवणे तुमच्या तरिजे जन लोकीं ॥३॥

बाळवेष घेउनि श्रीहरी भेटला ।
विधिचा जनिता तूचि आठव हा दिधला ।
तेणें ब्रह्मानंदे प्रेमा रूढविला ।
न तुके म्हणूनि तुका नामे गौरविला ॥४॥

प्रयाणकाळीं देवे विमान पाठविलें ।
कलिच्या काळामाजीं अद्भुत वर्तविले ।
मानव देह घेऊनि निज धामा गेले ।
निळा म्हणे सकळ संता तोषविले ॥५॥

